Maratha.Exe

# मोगल दरबारची बातमीपत्रे

## १६८५–१७००

अनुवादक व संपादक
सेतुमाधवराव पगडी




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, मुंबई
१९७८

# निवेदन

मराठी भाषेला व साहित्याला आधुनिक ज्ञानविज्ञानाच्या व आधुनिक सांस्कृतिक मूल्यांच्या आविष्काराचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य प्राप्त व्हावे, विविध विद्या व कलांबाबत उत्कृष्ट ग्रंथांची निर्मिती करून मराठी भाषेला जागतिक उच्च स्थान मिळवून द्यावे या उद्देशाने महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळाने बहुविध वाङमयीन कार्यक्रम आखला असून तो व्यवस्थितपणे कार्यवाहीत आणण्याकरिता विश्वकोश समिती, इतिहास समिती, भाषांतर समिती, मराठी वाङमयकोश समिती, ललित कला समिती, प्रकाशन समिती आदी समित्या स्थापन केल्या आहेत.

२. इतिहास समितीच्या कार्यक्रमामध्ये महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर उपलब्ध झालेल्या अद्यावत साधनसामग्रीचा उपयोग करून व गेल्या काही वर्षांत महाराष्ट्रेतिहास विषयक नवी उजेडात आलेली अव्वल साधने लक्षात घेऊन, आधुनिक इतिहासरचनेच्या तत्त्वांनुसार महाराष्ट्राचा एक प्रमाणभूत व सलग सांस्कृतिक-राजकीय इतिहास मराठी भाषेत नव्याने संपादून तो प्राचीन कालखंड, मध्ययुगीन कालखंड, मराठा कालखंड, पेशवा कालखंड व आधुनिक कालखंड याप्रमाणे पाच खंडांत प्रकाशित करण्याचे कार्य मंडळाने हाती घेतले आहे. याखेरीज, इतिहास समितीच्या कार्यक्रमामध्ये महाराष्ट्रेतिहासविषयक पोर्तुगीज, फ्रेंच, उर्दू, पर्शियन आणि राजस्थानी भाषांत उपलब्ध असलेल्या कागदपत्रांचे संशोधन, भाषांतर व प्रकाशन आणि महत्त्वाच्या ग्रंथांचे भाषांतर वा सारानुवाद प्रकाशित करणे ही योजनाही अंतर्भूत आहे. या योजनेखाली संकल्पित संशोधन–प्रकाशनकार्यासाठी मंडळ एकतर सुयोग्य संस्थांना अनुदान देते अथवा सदर संशोधन-प्रकाशनाचे कार्य स्वतः हाती घेते.

३. महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबंधित गोव्याच्या पोर्तुगीज दप्तरातील पोर्तुगीज-मराठे संबंध दर्शविणाऱ्या ए. बी. द. ब्रागांस परेरा संपादित कागदपत्रांचे भाषांतर व प्रकाशनाचे कार्य मंडळाने स्वतः हाती घेतले आहे. तसेच, डॉ. वा. वि. मिराशी संपादित *सातवाहन नृपती आणि पश्चिमेचे क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख* या ग्रंथाचे प्रकाशन मंडळाने स्वतःच्या वतीने स्वीकारले असून तो लौकरच प्रकाशित होईल. फ्रेंच दप्तरातील फ्रेंच-मराठे संबंध दर्शविणाऱ्या कागदपत्रांचे संशोधन, संपादन व भाषांतर करण्यासाठी मंडळाने मुंबई विद्यापीठास अनुदान दिले होते. त्याचप्रमाणे, राजस्थानी राज्यदप्तरात राजस्थानी व डिंगली भाषांमध्ये उपलब्ध असलेल्या महाराष्ट्रेतिहासविषयक कागदपत्रांचे संशोधन, संपादन व प्रकाशन करण्यास मंडळाने भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे या संस्थेस अनुदान दिले आहे. याशिवाय,

*काशिराजाची बखर, पानिपतची लढाई, बहामनी राज्याचा इतिहास, अहमदनगरची निजामशाही, गुजरातेतील मराठी राजवट, सिंखेडचे राजे जाधवराव यांची बखर, करवीर रियासत, महाराष्ट्र पुरातत्त्वीय समालोचन, पेशवे व मराठे सरदार यांच्या स्वाऱ्यांचे मुक्काम, शिवपुत्र संभाजी, भूषण साहित्य एवं ऐतिहासिक अनुशीलन, शिलाहार राजवंशाचा इतिहास व कोरीव लेख, मोहेंजोदडो : लिपी, समाज आणि संस्कृति, महाराष्ट्र संस्कृतीचे तात्त्विक अधिष्ठान, नागपूर प्रांताचा इतिहास, आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास* इत्यादी मौलिक संदर्भग्रंथांच्या प्रकाशनार्थ मंडळाने संबंधित व्यक्ती-संस्थांना अनुदान दिले आहे. इतिहास विषयक संशोधनाच्या कार्यास वाहिलेल्या इतिहास संशोधन मंडळ, मुंबई या संस्थेच्या *भारतीय इतिहास आणि संस्कृती* आणि भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे या संस्थांच्या *भारतीय इतिहास* या त्रैमासिकांना मंडळ दरवर्षी अनुदान देते.

४. या योजनेखाली आतापर्यंत मंडळाने कै. न्या. म. गो. रानडे लिखित *Rise of Maratha Power* या पुस्तकाचा प्रा. न. र. फाटक कृत अनुवाद, कै. शं. वि. आवळसकर लिखित *रायगडची जीवनकथा*, श्री. स. शं. देसाई संपादित *मराठ्यांच्या इतिहासाची साधने, पोर्तुगीज दप्तर खंड २ व ३*, श्री. वि. गो. खोबरेकर लिखित *महाराष्ट्रातील दप्तरखाने*, कै. ना. ह. गद्रे लिखित *महाराष्ट्रातील महोदयाचा पूर्वरंग* या पुस्तकाची संस्कारित आवृत्ती आणि डॉ. भा. कृ. आपटे लिखित *A History of Maratha Navy and Merchantships*, डॉ. पां. स. पिसुर्लेकर संपादित *Portuguese and Marathas* (पोर्तुगीज आणि मराठे) आणि श्री. निकोलाय मनुची लिखित *Storia-Do-Mogor* (असे होते मोगल) ही दोन भाषांतरे, असे महाराष्ट्राच्या इतिहासावर प्रकाश टाकणारे नऊ मौलिक संदर्भग्रंथ प्रकाशित केले आहेत व सुरत येथील फ्रेंच वसाहतीतील सन १७७४ ते १७८० या काळातील फ्रेंच दूत M. Anquetil De Briancourt व इ.स. १७७६ ते १७८० या काळातील पुणे येथील पेशव्यांच्या दरबारातील फ्रेंच दूत M. De. St. Lubin यांच्यांतील मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश टाकणारा फ्रेंच भाषेतील पत्रव्यवहार इंग्रजी भाषेत *French Records relating to the History of Marathas* या नावाने प्रसिद्ध केला आहे. तसेच, फरिश्तांचे *गुल्शने इब्राहिमी*, सर जदुनाथ सरकार यांचे *History of Aurangzeb* या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित होत आहेत. याशिवाय, महाराष्ट्र व गोवा यांच्या इतिहासाशी संबंध असलेल्या शिलालेखांची व ताम्रपटांची वर्णनात्मक संदर्भसूची प्रकाशित करण्याचे मंडळाने ठरविले आहे.

५. मंडळाच्या महाराष्ट्रेतिहास योजनांतर्गत महाराष्ट्राचा इतिहास मंडळाने एकूण ५ खंडांत (प्रत्येकी ५०० पृष्ठांचा) प्रकाशित करावयाचे ठरविले आहे. या इतिहासास पूरक असे महाराष्ट्र व मराठे यांच्या इतिहासावर प्रकाश टाकणारे नॅशनल लायब्ररी, कलकत्ता या संस्थेत असलेले कै. डॉ. जदुनाथ सरकार यांच्या संग्रहातील फारशी भाषेतील *अखबारात-इ-दरबार-ई-मुअल्ला* या बातमीपत्रांचे भाषांतर करण्याचे काम मंडळाने हाती घेतले आहे.

औरंगजेबाच्या दरबारातील ही बातमीपत्रे आहेत. ही बातमीपत्रे मूळ अनेक खंडांत असून मंडळाने ती एकूण चार खंडांत प्रसिद्ध करण्याचे ठरविले आहे. त्यापैकी प्रस्तुत खंड १ इ. स. १६८५ ते १६९६ या कालावधीतील उपलब्ध त्रोटक बातमीपत्रे व इ. स. १६९९ ते १७०० या दोन वर्षांतील संपूर्ण बातमीपत्रांचा आहे. त्यांपैकी मूळ फारसी भाषेतील निवडक बातमीपत्रांचा मराठी अनुवाद या खंडात देण्यात आला आहे. या बातमीपत्रांत मराठ्यांच्या हालचाली, मोगल संघर्षाचे परिणाम वगैरे व औरंगजेबाची राहणी, विचारसरणी यांवरही प्रकाश पडतो. कै. डॉ. जदुनाथ सरकार यांच्या संग्रहातील या फारसी भाषेतील बातमीपत्रांच्या प्रतीचे मराठी भाषांतर फारसी भाषेचे पंडित व प्रसिद्ध इतिहासतज्ञ, श्री. सेतुमाधवराव पगडी यांनी मंडळाच्या वतीने अत्यंत सोप्या भाषेत केला असून इतिहाससंशोधक व अभ्यासक यांना त्याचा फारच उपयोग होणार आहे. मंडळाच्या इतिहास योजनेखाली सदर बातमीपत्रे *मोगल दरबारची बातमीपत्रे–खंड १* या शीर्षकाने प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे.

*लक्ष्मणशास्त्री जोशी*
अध्यक्ष
म. रा. सा. सं. मंडळ

मंत्रालय, मुंबई
दिनांक १ ऑगस्ट १९७८

# अनुवादकाचे निवेदन

औरंगजेबाच्या दरबारची बातमीपत्रे म्हणजे मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासकांसाठी एक महत्त्वाचे साधन होय. प्रस्तुत अनुवादात १६८५ ते १६९६ व १६९९ ते १७०० या कालखंडातील नोंदी घेतल्या आहेत. १६९७ व १६९८ या काळातील नोंदी उपलब्ध झाल्या नाहीत.

प्रस्तुत ग्रंथाचे प्रकाशन महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ याजकडून होत आहे. ग्रंथाचे महत्त्व पाहून मंडळाने बातमीपत्रांच्या अनुवादाच्या एकंदर योजनेस संमति दिली याबद्दल मी मंडळाचे मनःपूर्वक आभार मानतो.

थोडक्याच अवधीत ग्रंथाची छपाई उत्कृष्टपणे करून दिल्याबद्दल अक्षर प्रतिरूप प्रा. लि. चे संचालक श्री. अरुण नाईक व त्यांचे सहकारी यांचेही आभार मानणे आवश्यक आहे. छपाई चालू असताना मूळ मजकूर, मुद्रिते यांचे बारकाईने वाचन करून वेळोवेळी दुरुस्त्या करण्यात मुद्रणालयातील कु. सुधा शिरहट्टी यांनी फार श्रम घेतले. याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

सेतुमाधवराव पगडी

वसुधा, देवीदयाळ रोड,
मुलुंड (पश्चिम),
मुंबई ४०० ०८०.

१० मे १९७८
अक्षय्य तृतीया, शके १९००

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

महाराष्ट्र राज्य सहित्य संस्कृति मंडळात औरंगजेबाच्या दरबारच्या बातमीपत्रांच्या फोटोप्रती आहेत. मोगल काळात दरबारातील रोजच्या घटनांचा सारांश लिहून काढण्याची पद्धत असे. यांनाच अखबार म्हणत. या अखबारांना बादशहाची मान्यता मिळाल्यावर, राजे रजवाडे, सरकारी अधिकारी व इतर प्रतिष्ठित माणसे अखबारांच्या प्रती करून घेत असत. मूळ अखबार काळाच्या ओघात नष्ट झाले. पण जयपूर येथे काही वर्षांच्या अखबारांच्या प्रती उपलब्ध झाल्या.

काही म्हणण्याचे कारण असे की, जयपूर येथील अखबारांपैकी कित्येक दिवसांचे अखबार काळाच्या ओघात नष्ट झाले. काही अखबार कर्नल टॉड याने विलायतेत नेले. ते तेथे सुरक्षित राहिले. पण औरंगजेबाच्या राजवटीची पन्नास वर्षे पाहता अठरा हजार दोनशे पन्नास दिवसांच्या नोंदी हव्यात. पण प्रत्यक्षात नोंदी सुमारे सहा हजार दिवसांच्या आढळतात. या अखबारांचे मुद्रण अद्याप झालेले नाही.

या खंडात १६८५ ते १६९६ या काळातील त्रोटक नोंदी व १६९९ ते १७०० या दोन वर्षातील निवडक पण सलग नोंदींचा मराठी अनुवाद करण्यात आला आहे. १६९५ पासून १६९९ च्या ऑक्टोबर महिन्यापर्यंत औरंगजेबाचा मुक्काम सोलापूरच्या दक्षिणेस चोवीस मैलावर भीमेच्या दक्षिणतीरी ब्रह्मपुरी (औरंगजेबाने त्याला इस्लामपुरी हे नाव दिले होते) येथे होता. पहिल्या भागातील नोंदी त्रोटक असल्यामुळे १६८५

ते १६९९ या काळाचे धावते समालोचन पुढे केले आहे.

१६८९ मध्ये संभाजी राजाच्या मृत्यूनंतर राजाराम हा तमीळनाडमध्ये जिंजीला निघून गेला. संभाजीच्या मृत्यूनंतर १६८९ मध्ये मोगलांनी मराठयांच्या स्वराज्यातील किल्ले अल्पप्रयासाने घेतले. बागलाण (नाशिक जिल्हा) हा १६८९ च्या मार्च पर्यंत मराठयांच्या ताब्यातून गेला होता. पुढील दहा महिन्यात मोगलांनी पुरंदर, सिंहगड, लोहगड, माहुली, पन्हाळगड, प्रतापगड, राजगड, तोरणा, रोहिडा, रायगड इत्यादि किल्ले घेतले. मराठयांच्या ताब्यात सातारा, परळी, विशाळगड, राजमाची, रांगणा, सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, पद्मदुर्ग, असे काही महत्त्वाचे किल्ले राहिले.

**१६९०**

१६९० पासून परिस्थिति हळुहळु बदलू लागली. जिंजी जिंकून घ्यावी व राजारामाला कैद करावे या उद्देशाने औरंगजेबाने आपला मावसभाऊ व प्रसिद्ध सेनापती जुल्फिकारखान याला जिंजीकडे रवाना केले. त्याच्या मागोमाग जुल्फिकारखानाचा बाप व मुख्यप्रधान असदखान व औरंगजेबाचा मुलगा कामबक्ष हेहि जिंजीला पोहोचले. औरंगजेबानेहि कोरेगावजवळची छावणी हलवून विजापूर जिल्ह्यात गलगली येथे नेली. तमीळनाड हे प्रमुख रणक्षेत्र बनले.

महाराष्ट्रावरील मोगलांचे दडपण थोडेसे कमी झाले. याचा लाभ घेऊन मराठयांनी मोगलांकडून बरेचसे किल्ले परत घेतले. पन्हाळगड, राजगड, तोरणा, रोहिडा, प्रतापगड, सिंहगड, हे किल्ले त्यांच्या हाती आले. तरी काही महत्त्वाचे किल्ले मोगलांकडे १६८९ पासून राहिले हे अखबारावरून दिसून येते. कोणते किल्ले मोगलांकडे होते व कोणते मराठयांकडे हे समजून घेण्यास अखबारासारखे साधन नाही.

**महत्त्वाचे किल्ले (१६९९)**

मराठयांच्या स्वराज्यातील आणि तेहि सध्याच्या महाराष्ट्रात असलेल्या स्वराज्य भागातील किल्ल्यासंबंधीचे चित्र १६९९ मध्ये दिसते ते असे :-

मोगलांकडे – माहुली, कोथळज, लोहगड, विसापूर, चाकण, पुरंदर, रायगड, मच्छेंद्रगड, भूषणगड, सिद्धगड, कर्नाळा.

मराठयांकडे–सातारा, पन्हाळगड, परळी, प्रतापगड, राजगड, तोरणा, रोहिडा, सिंहगड, राजमाची, पद्मदुर्ग, विशाळगड, रांगणा, प्रचीतगड, मंडणगड, सामानगड, वारुगड, भूदरगड, वसंतगड, चंदनवंदन, नांदगिरी, वासोटा, दाभोळच्या दक्षिणेस गोव्यापर्यंतचे जलदुर्ग.

रामचंद्रपंत अमात्य, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, इत्यादींनी तमीळनाड मधील जिंजीला पुन्हा पुन्हा मदत करून तेथील लढा १६९८ पर्यंत चालू ठेवला. १६८९ ते १६९६ पर्यंत संताजीने जो पराक्रम गाजविला तो असामान्यच म्हणावा लागेल. मोगल सेनापती काही कमी पराक्रमी व अनुभवी नव्हते. पण संताजीच्या पराक्रमाने तेहि स्तिमित झाले. रुस्तमखान, जाननिसारखान, तहव्वुरखान, अलीमर्दानखान, कासिमखान, खानाजादखान, हिंमतखान इत्यादि मोगल सरदारांचा संताजीने पार निकाल लावला.

पण संताजीच्या मृत्यूबरोबरच मोगलांनी नेट लावून जिजी जिंकून घेतली. (जानेवारी १६९८) आणि राजाराम फेब्रुवारी महिन्यात विशाळगडला परत आला. तमीळनाड मधून मराठ्यांची सत्ता नाहीशी झाली. मराठ्यांची सैन्ये तमीळनाड व दक्षिण कर्नाटक सोडून उत्तरेकडे सरकू लागली. औरंगाबाद, नांदेड, वऱ्हाड, खानदेश व हैद्राबाद या सुभ्यातून मराठ्यांची सैन्ये संचार करू लागली. नागपूर कडील गोंड राजा बख्तबलंद (मोगल त्याचा उल्लेख निगूनबख्त–'भाग्यहीन' असा करीत.) हा मोगलांविरुद्ध उठला होता. त्याच्याशी मराठ्यांनी संधान बांधले होते. माळव्यांत अफगाणांनी डोके वर काढले होते. बुंदेलखंडात छत्रसाल हा मोगलांविरुद्ध लढत होता. मराठे हे उत्तरेकडे सरकतील अशी औरंगजेबाला रास्त भीति वाटू लागली. मराठ्यांची सैन्ये म्हणजे लहान सहान पथके नव्हत. त्यांचे सरदार चांगले फौजबंद असत. प्रस्तुत खंडात अनेक मराठे सरदार व त्यांची सैन्ये यांच्याबद्दल ज्या नोंदी आल्या आहेत. त्यापैकी काही पुढे देत आहे. अशा नोंदी मराठी साधनांतून सहसा आढळत नाहीत. म्हणून अखबाराचे महत्त्व.

### मराठे सरदार व त्यांची सैन्ये

| | |
|---|---|
| सोळा एप्रिल १६९९ : | कृष्णा सामंत साडेचार हजार स्वार घेऊन वऱ्हाडात. |
| एकोणतीस एप्रिल १६९९ : | गुलबर्गा बीदर भागात मराठ्यांचे सहा हजार स्वार. |
| सात मे १६९९ : | धनाजी जाधव वगैरे पंचवीस हजार स्वारांसहित बेदर प्रांतात. |
| चौदा जून १६९९ : | इंडी (विजापूर) भागात मराठ्यांचे पाच हजार सैन्य. |
| दहा जुलै १६९९ : | परसोजी भोसले, सहा हजार स्वारांसहित गुलबर्गा भागात. |
| सव्वीस जुलै १६९९ : | यमाजी वगैरेंचे सैन्य दहाबारा हजार, बसंतगड भागात, वारुगडजवळ एक हजार स्वार. |
| चोवीस ऑगस्ट १६९९ : | कंधार नांदेड भागात सहा हजार मराठ्यांची छावणी. |
| दोन ऑक्टोबर १६९९ : | परशुरामपंत दोन हजार स्वार व दोन हजार पायदळासहित पुरंदर भागात. |
| एकतीस ऑक्टोबर १६९९ : | राजारामाबरोबर धनाजी, रामचंद्रपंत, राणोजी, सैन्य तेवीस हजार. |
| सहा डिसेंबर १६९९ : | राणोजी घोरपडे, दोन हजार स्वारांसहित सांगोला भागात. |
| सोळा डिसेंबर १६९९ : | दोन हजार मराठ्यांचे पायदळ, सातारच्या उत्तराळ्यासाठी. |
| दहा डिसेंबर १६९९ : | शंकराजी, दहा हजार सैन्यासहित श्रीगोंदा भागात. |
| एकवीस डिसेंबर १६९९ : | धनाजी जाधव व बहिर्जी घोरपडे कऱ्हाड जवळ, दहा हजार सैन्यासहित. |
| सहा जानेवारी १७०० : | मराठ्यांचे सहा हजार सैन्य बादशाही छावणीपासून दोन तीन कोसावर. |
| दहा जानेवारी १७०० : | धनाजी जाधव, हणमंतराव, राणोजी (घोरपडे), पंधरा हजार सैन्यासहित, रहिमतपूर जवळ. |

सहा एप्रिल १७०० : रामाजी, दोन हजार स्वारांसहित, ब्रह्मपुरीजवळ.
चार मे १७०० : खंडोजी, तीन हजार स्वारांसहित, चंदनवंदनकडे.
एकवीस मे १७०० : फीरोजाबाद, गुलबर्गा जिल्हा, मराठ्यांचे सैन्य पस्तीस हजार (लेखक भीमसेन तेथे हजर).
दोन ऑगस्ट १७०० : हणमंतराव (घोरपडे), सात हजार सैन्यासहित म्हसवड-जवळ.
सतरा ऑगस्ट १७०० : हणमंतराव (घोरपडे), चार पाच हजार स्वारांसहित खटाववर हल्ला करतो.
सोळा नोव्हेंबर १७०० : अंजनवेलच्या उपराळ्यासाठी रामचंद्रपंत एक हजार स्वार व सहा हजार पायदळ पाठवितो.

## औरंगजेबाची योजना

१६९९ मध्ये मराठ्यांचे उरलेले किल्ले जिंकून घेण्यासाठी औरंगजेब ब्रह्मपुरीहून स्वत: निघाला. लष्करीदृष्टीने पाहता त्याचा हा निर्णय चुकीचा होता असेच म्हणावे लागते. कारण एकेका किल्ल्यासमोर औरंगजेब जवळ जवळ लाख पाऊण लाख माण-सांची छावणी घालून बसू लागला. आणि तिकडे मराठी सैन्यांना संचार करण्यास दक्षिणचे सर्व सुभे मोकळे झाले. तरी ब्रह्मपुरीहून निघण्यापूर्वी औरंगजेबाने मराठ्यांना दक्षिणच्या सुभ्याच्या बाहेर जाऊ न देण्यासाठी म्हणून अधिकाऱ्यांची कार्यक्षेत्रे वाटून दिली. ती पुढीलप्रमाणे :–

नऊ ऑगस्ट १६९९ औरंगाबाद सुभ्याच्या रक्षणाची व्यवस्था.

१) औरंगाबादचा सुभेदार नजाबतखान याजकड – जालना, अंबड, वैजापूर, फर्दापूर, शहागडपर्यंत प्रदेशाचे रक्षण.
२) चीनकुलीजखान (भावी निजामुल्मुल्क) याजकडे – नगर, संगमनेर, पुणे, शिरवळ भागाचे रक्षण.
३) बीडचा फौजदार इल्तिफातखान याजकडे – धारूर, शेवगाव, ब्रह्मपुरी.
४) कल्याणभिवंडीचा अधिकारी मातबरखान याजकडे – मालेगाव, जव्हार, दिंडोरी.
५) धारूरचा फौजदार उजबेकखान याजकडे – औसा निलंगा इत्यादि.

छावणीबाहेरील सेनापती (फिल्डजनरल). ब्रह्मपुरीला असताना औरंगजेबाचे पुढील अधिकारी आपापली सैन्ये घेऊन पुढील प्रदेशात बंदोबस्त राखीत होते. :—

१) औरंगजेबाचा मुलगा आज्जम दौंडजवळ पेडगाव येथे.
२) औरंगजेबाचा नातू व आज्जमचा मुलगा बेदारबख्त, कोल्हापूर धारवाड भागात.
३) गाजिउद्दीन फीरोजजंग (निजामुल्मुल्काचा बाप) वऱ्हाड व तेलंगण यांच्या सरहद्दीवर.

मराठ्यांचा पाठलाग चालू राहावा व किल्ले निर्विघ्नपणे घेता यावे म्हणून औरंग-जेबाने दक्षिणेतून जुल्फिकारखानाला बोलावून घेतले. किल्ले घेण्याच्या मोहिमेत औरंगजेबाने आपला मुलगा आज्जम यास पेडगावहून बोलाविले. बेदारबख्ताला पन्हाळ्याकडे पाठवावे

असा त्याचा बेत होता. तो स्वतः प्रथम पन्हाळा जिंकून घेण्याचा बेत करीत असावा. पण राजाराम हा वऱ्हाडच्या दिशेने निघालाआहे असे कळताच तो साताऱ्याकडे वळला. बेदारबख्त, जुल्फिकारखान व चीनकुलीजखानयांनी राजारामाचा पाठलाग करून त्याला बार्शीच्या पलीकडे परंड्याजवळ गाठले. राजारामाला वऱ्हाडचा बेत टाकून देऊन विशाळगडाकडे यावे लागले. (सोळा नोव्हेंबर १६९९).

## दक्षिणेतील महत्त्वाचे अधिकारी

या दोन वर्षाच्या कालखंडात दक्षिणेतील निरनिराळ्या सुभ्यांवर पुढील सुभेदार होते :—

### औरंगाबाद

औरंगाबादच्या सुभेदारीवर आठ मे १६९९ रोजी सय्यद हसनअलीखानाच्या ऐवजी बागलाणचा फौजदार नजाबतखान याची नेमणूक. हा प्रत्यक्ष तैमूरलंगाच्या वंशजापैकी म्हणजे औरंगजेबाच्या भाऊबंदापैकी एक असे म्हणावे लागेल. वंशावळ अशी आहे :

तैमूरलंग–मीर इन्शा–सुल्तान मुहंमद मिर्जा–सुल्तान अबूसईद—सुल्तान महमूद मिर्जा—खान मिर्जा —मिर्जा सुलेमान–मिर्जा सुल्तान इब्राहीम–मिर्जा शाहरुख–मुहंमदशुजा नजाबतखान–मुहंमद इसहाक नजाबतखान.

### खानदेश

खानदेशचा सुभेदार मोतिकदखान मुहंमद कुली. याच सुभ्यात बागलाण असून तेथील फौजदार, नजाबतखानाचा मुलगा बहरोजखान हा होता.

### वऱ्हाड

वऱ्हाडचा सुभेदार अस्करखान (पूर्वीच्या गोवळकोंडा राज्यातील अधिकारी) हा होता. नोव्हेंबर १६९९ मध्ये त्याची नेमणूक नांदेड बीदर सुभ्यावर करण्यात आली व त्याच्या जागी तेथील सुभेदार अलीमर्दानखान (हाहि पूर्वीच्या गोवळकोंडा राज्यातील अधिकारी) याला वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. कांचीजवळ संताजीने ज्याला धरून कैदेत टाकला होता तोच हा अलीमर्दानखान.

### सुभे नांदेड बीदर

या सुभ्याचा उल्लेख पूर्वी सुभे तेलंगण किंवा सुभे नांदेड असाहि करीत. नंतर याला सुभे मुहंमदाबाद बीदर असे म्हणू लागले. पण सुभेदार हे नांदेडला राहात. या सुभ्यात नांदेड, औसा, उदगीर हे मराठी भाषिक, निजामाबाद, आदिलाबाद जिल्ह्याचा निम्मा भाग व करीमनगर जिल्ह्याचा काही भाग हे तेलुगू भाषिक व बीदर, चिंचोळी, यादगीर, मळखेड (आता कर्नाटकातील गुलबर्गा जिल्हा) हे कन्नड भाषिक प्रदेश येत. या सुभ्यावर १६८९ नंतर सय्यद अब्दुल्ला (सुप्रसिद्ध सय्यद बंधूंचा बाप), रुहुल्लाखान व त्यानंतर अलीमर्दानखान १६९९ पर्यंत. आणि नंतर खुदाबंदाखान हे सुभेदार होते. खुदाबंदाखान हा शायिस्ताखानाचा मुलगा, औरंगजेबाचा मामेभाऊ.

### विजापूर

१६९९ व १७०० या कालखंडात विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान (भावी निजामुल्मुल्काचा मामा) हा होता. या पूर्वी मामूरखान हा सुभेदार होऊन गेला.

### हैद्राबाद

सुभे हैद्राबादवर या कालखंडात बहादुरदिल उर्फ जानसिपारखान हा सुभेदार होता. हा औरंगजेबाची बायको दिलरसबानू हिचा मावसभाऊ. १७०० मध्ये हा मरण पावल्यावर राजपुत्र कामबक्ष हा सुभेदार झाला. पण त्याच्यातर्फे नायब म्हणून प्रत्यक्ष कारभार जानसिपारखानाचा मुलगा रुस्तमदिल हाच पाहात होता. हैद्राबाद कर्नाटकवर फौजदार म्हणून दाऊदखान पन्नी होता. विजापूर कर्नाटकचा फौजदार मामूरखान याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा पुरदिलखान उर्फ मामूरखान हा या कालखंडात काम करीत होता. हे प्रदेश सुभे हैद्राबाद किंवा सुभे विजापूर मध्ये असले तरी वरील फौजदारांना जवळजवळ सुभेदाराइतके अधिकार होते.

## फौजदार

सुभ्याचा अधिकारी सुभेदार तसा जिल्ह्याचा (मोगल काळात जिल्ह्यांना सरकार म्हणत) अधिकारी फौजदार हा असे. लष्करी पथके बाळगून आपल्या जिल्ह्याचे रक्षण करणे, खजिने आदि सुरक्षितपणे पोहोचविणे, मराठ्यांचा प्रतिकार करणे, ठाणी व ठाणेदार यांची मदत करणे व बादशहाची आज्ञा झाली तर आपली पथके घेऊन बादशाही छावणीत जाणे ही कामे फौजदाराला असत.

या कालखंडात कल्याण भिवंडीचा फौजदार मातबरखान, बीडचा इलितफातखान, धारूरचा उजबेकखान, तळकोकणचा बसालतखान अशी काही तडफदार फौजदारांची नावे आढळतात.

संभाजी राजाच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रातील मराठ्यांच्या स्वराज्याचे मोगलांनी जिल्हे म्हणजे सरकार पाडले. पुणे भाग हा सरकार जुन्नर मध्ये, कल्याण भिवंडी प्रदेशाचा वेगळा जिल्हा, रायगडच्या भोवतालचा प्रदेश सरकार रायरी, सध्याचा रत्नागिरी जिल्हा म्हणजे सरकार तळकोकण (रत्नागिरी जिल्हा ,मराठ्यांच्या ताब्यात असल्यामुळे तळकोकणचा फौजदार बसालतखान हा बेळगावचा किल्लेदार म्हणून बेळगावात राहू लागला.) व सरकार मिरज (मुर्तजाबाद), मिरजखाली सातारा, सांगली व कोल्हापूर हे प्रदेश होते.

वरील सरकार (जिल्हे) पैकी जुन्नर, कल्याण व रायरी हे औरंगाबाद सुभ्यात तर तळकोकण (रत्नागिरी) व मिरज हे विजापूर सुभ्यात होते.

कागदोपत्री व्यवस्था होती ती वरीलप्रमाणे पण प्रत्यक्षात याच प्रदेशात मोगल आणि मराठे याचा निकराचा संघर्ष चालला होता.

## किल्ले व किल्लेदार

औरंगजेबाने प्रमुख किल्ल्यांच्या रक्षणाकडे विशेष लक्ष दिले. बागलाणात साल्हेर,

मुल्हेर, मराठ्यांच्या महाराष्ट्रातील स्वराज्यात माहुली, लोहगड, पुरंदर इत्यादि किल्ल्यात बरीच सावधगिरी बाळगण्यात येई. परवानगी वाचून किल्ल्याच्या बाहेर निघण्याची किल्लेदारांना सक्त मनाई असे. सोलापूर, परंडा, अहमदनगर इत्यादि किल्ल्यांतून युद्धोपयोगी सामग्रीचा साठा करून ठेवलेला असे. मोहिमेसाठी तो मागवून घेण्यात येई. जरूर पडल्यास किल्लेदार आपली पथके घेऊन बादशहाच्या मोहिमेत हजर होत. बसंतगडचा किल्लेदार अहमद हा साताऱ्याच्या वेढ्यात व कंधार( नांदेड जिल्हा)चा किल्लेदार शम्सुद्दीन हा मिरजेच्या लढाईत (जानेवारी १७०१) लढत असताना मारले गेले. राजहंसगडचा किल्लेदार अल्लाहदाद हा मराठ्यांशी लढत असताता मारला गेला. (पंधरा जुलै १६९९ ची बातमी).

बऱ्याच किल्लेदारांना फौजदार असेहि म्हणत. याचा अर्थ ते किल्ल्याच्या भोवतालच्या जिल्ह्याचे अधिकारी असत असे नाही. फक्त किल्ल्याच्या भोवती पाच ते दहा मैला पर्यंतचा प्रदेश त्यांच्या शिबंदीच्या खर्चासाठी म्हणून त्यांच्या अधिकाराखाली असे. अर्थात किल्लेदार व जिल्ह्याचा फौजदार हे एकच असू शकत. पण हे अपवादात्मक असे. किल्लेदार सुभेदाराच्या नियंत्रणाखाली नसत. ते रास्त बादशहाच्या हाताखाली असत हे लक्षात ठेवले पाहिजे.

## ठाणी व ठाणेदार

औरंगजेबाच्या लष्करी डाव पेचातील महत्त्वाचे घटक म्हणजे ठाणी व ठाणेदार.

एखादा प्रदेश ताब्यात आला की त्याच्या बंदोबस्तासाठी मोगल तेथे ठाणी (मिलिटरी पोस्ट) कायम करीत. ठाण्यात पडकी गढी असल्यास ती दुरूस्त करीत, नसल्यास बांधून काढीत. ठाणेदाराच्या दिमतीला पाच पन्नास स्वारांपासून पाचशे पर्यंतहि स्वार असू शकत. ठाण्यावर मराठ्यांचे हल्ले झाले तर वेळेवर मदत पोहोचविण्यासाठी बादशाही छावणीतून पथके जात अगर पाच पंचवीस मैलाच्या आत मोगल सरदारांचे तळ असत तेथून मदत पोहोचे. किंवा मोगलांचे फिरते सेनापती (जुल्फिकारखाना सारखे) ठाणेदारांच्या मदतीला धावून जात. जेथे मोगल मराठा संघर्षाची शक्यता कमी तेथे ठाणी अगदी कमी असत. उदाहरणार्थ हैद्राबाद सुभ्यात चार पाचच्यावर ठाणी नव्हती. त्याउलट कोल्हापूर, सांगली, सातारा, पुणे या भागात दर पाच दहा मैलावर तरी एखादे ठाणे असेच. अनेक ठाण्यांचे ठाणेदार हे उच्च वर्गाचे दोन हजारी तीन हजारी मन्सबदार असत. खाली काही ठाणी व त्यांचे ठाणेदार यांची नावे दिली आहेत. यावरून मोगलांच्या संरक्षण यंत्रणेची कल्पना येईल.

१. पुणे जिल्हा :

| | | | |
|---|---|---|---|
| १) | शिक्रापूर | : | ठाणेदार मानाजी |
| २) | शिरवळ | : | संग्रामखान |
| ३) | इंदापूर | : | मुगलखान |
| ४) | बारामती | : | यासीनखान |

५) कडूस : निजामराव

२. सातारा :

१) महादेव डोंगर : यासीनखान
२) वाई : नाहरखान
३) म्हसवड : नागोजी माने, त्यापूर्वी रणदूल्लाखान
४) खटाव : रामचंद्र-नंतर कृष्णराव
५) मसूर : मंबाजी
६) कऱ्हाड : घोरीखान, कांही दिवस जगदेव जाधव
७) बुधपाचगाव : पदाजी
८) औंध : खंडोजी
९) अंबामायनी : एकोजी घोरपडे

३. सांगली जिल्हा :

१) आटपाडी : नागोजी माने
२) संख (जत) : अली
३) डफळापूर (जत) : अमानुल्ला
४) मलाबाद (जत) : मुहंमद हुसेन
५) खानापूर : आवजी आढळराव
६) उम्दी (जत) : हिदायतुल्ला

४. कोल्हापूर :

१) कोल्हापूर : बहिर्जी पांढरे
२) कागल : पिराजी घाटगे

ही या कालखंडातील नोंदींवरून घेतलेली काही नावे आहेत. ठाणेदारंचे जीवन म्हणजे सुळावरची पोळी असे. मराठ्यांशी लढताना अनेक ठाणेदार मारले गेले.

उदाहरणार्थ :—रामचंद्र खटावकर, बागेवाडीचा ठाणेदार मुहंमद नसीर. अनेकजण पकडले गेले आणि खंडणी भरून त्यांनी सुटका करून घेतली. उदाहरणार्थ :- कऱ्हाडचा घोरीखान, इंडीचा गजपत कंबू, खानापूरचा आवजी आढळराव, शिक्रापूरचा मानाजी इत्यादि.

मराठ्यांचे किल्ले घेण्यास निघेपर्यंत औरंगजेबाचे मुक्काम, कोरेगाव, १६८९ पर्यंत, विजापूर जिल्ह्यात, १६९५ पर्यंत, नंतर ब्रह्मपुरी येथे.

## औरंगजेबाचा प्रवास मार्ग (१६९९ पासून)

१६९९ व १७०० या दोन वर्षात औरंगजेबाने सातारा व परळी हे किल्ले जिंकून घेतले. एक जानेवारी १७०१ रोजी तो पन्हाळगड घेण्यासाठी म्हणून मिरजेस पोहोचला. या वरील दोन वर्षातील त्याच्या हालचाली पुढे दिल्या आहेत. हस्तलिखितातील अनेक स्थळनामांचा बोध होत नाही. फारसी हस्तलिखितातूनहि अनुस्वार न देणे, क व ग मध्ये भेद न करणे, गावांचे उच्चार आपल्या पद्धतीने करणे हे दोष असल्यामुळे

अभ्यासकाची दिशाभूल होते. पुरंदर–पूनाधर, भाळवणी–भालोनी–धारवाड–धारूर, सातारा––सतारा, जत–जीत, अथणी–हथणी, म्हसवड–ब्रहिरुर, नाझरे–माजरा, प्रतापपूर परनाईपूर, सोनंद–सोंधा असे स्थळांचे हास्यास्पद वाचन होऊ लागते. तरी पण शक्य तितकी काळजी घेऊन औरंगजेबाचा प्रवास मार्ग दिला आहे. पण त्यात दुरुस्ती करण्यास वाव आहे.

| | | |
|---|---|---|
| एकोणीस ऑक्टोबर १६९९ | : | औरंगजेब ब्रह्मपुरीहून रवाना, मंगळवेढ्यात मुक्काम |
| बावीस ऑक्टोबर १६९९ | : | मंगळवेढ्याहून अडीच कोस प्रवास, भाळवणीला मुक्काम |
| चोवीस ऑक्टोबर १६९९ | : | अडीच कोस, उमदी येथे मुक्काम |
| पंचवीस ऑक्टोबर १६९९ | : | नहूर (निंबोणी) गावी मुक्काम |
| सव्वीस ऑक्टोबर १६९९ | : | सव्वातीन कोस प्रवास, कोसारी (जत तालुका सांगली जिल्हा) येथे मुक्काम |
| अठ्ठावीस ऑक्टोबर १६९९ | : | साडेतीन कोस, व्हसपेठ येथे मुक्काम |
| एकोणतीस ऑक्टोबर१६९९ | : | साडेतीन कोस, मेंढेगिरी गावाजवळ |
| तीस ऑक्टोबर १६९९ | : | सव्वादोन कोस, मलाबाद, जतेपासून बारा मैल, बजरवाडची वाडी |
| एकतीस ऑक्टोबर १६९९ | : | साडेपाच कोस, अथणी (बेळगाव जिल्हा) जवळ नगरी (?) |
| दोन नोव्हेंबर १६९९ | : | अडीच कोस, गन्नापूर(?) |
| चार नोव्हेंबर १६९९ | : | सव्वादोन कोस, उगार (मिरजेच्या पुढे) |
| पाच नोव्हेंबर | : | साडेतीन कोस, बसमरु(म्हैसाळ?) |
| सहा नोव्हेंबर | : | पावणेतीन कोस, मिरज, औरंगजेब मिरजेत एक आठवडाभर होता |
| बारा नोव्हेंबर १६९९ | : | मिरजेहून पावणेदोन कोस, कृष्णाकाठ, अंकली |
| तेरा नोव्हेंबर १६९९ | : | पावणेतीन कोसाचा प्रवास, मुक्काम डिग्रस येथे |
| चौदा नोव्हेंबर १६९९ | : | साडेचार कोस प्रवास, आमनापूर येथे मुक्काम (तासगाव तालुका) |
| सोळा नोव्हेंबर १६९९ | : | मछींद्रगडच्या अलीकडे एक कोसावर मुक्काम, प्रवास सव्वातीन कोसाचा |
| अठरा नोव्हेंबर १६९९ | : | मछींद्रगडजवळ |
| एकोणीस नोव्हेंबर १६९९ | : | मछींद्रगडहून सव्वातीन कोसाचा प्रवास, मक्काम |
| | : | रेवन (शेणोली?) |
| वीस नोव्हेंबर १६९९ | : | औरंगजेबाची कऱ्हाडला भेट, पावणेतीन कोस प्रवास |
| | : | करून मुक्कामावर दाखल |
| बावीस नोव्हेंबर १६९९ | : | वसंतगडजवळ साडेतीन कोसाचा प्रवास करून मसूर जवळ मुक्काम |

पंचवीस नोव्हेंबर १६९९ : वसंतगड नजीक मुक्काम
सव्वीस नोव्हेंबर १६९९ : वसंतगड काबीज
एकोणतीस नोव्हेंबर १६९९ : औरंगजेब वसंतगडला भेट देतो
तीस नोव्हेंबर १६९९ : पावणेतीन कोसाचा प्रवास, कृष्णेच्या कांठावर मुक्काम
दोन डिसेंबर १६९९ : सव्वातीन कोसाची मजल, बोरगावला मुक्काम रहिमतपूरच्या दक्षिणेस
चार डिसेंबर १६९९ : बादशहा रहिमतपूरला भेट देतो. तेथून दोन कोस प्रवास करून धामनेर येथे मुक्काम
पाच डिसेंबर १६९९ : साडेतीन कोसाचा प्रवास करून बादशहा माहुलीत दाखल
नऊ डिसेंबर १६९९ : सव्वा कोसाचा प्रवास करून औरंगजेब साताऱ्यासमोर दाखल

नऊ डिसेंबर १६९९ पासून सत्तावीस एप्रील १७०० पर्यंत औरंगजेबाची छावणी साताऱ्याला होती. सातारा जिंकून घेतल्यानंतर (एकवीस एप्रील) तो परळीकडे रवाना झाला.

अठ्ठावीस एप्रिल १७०० : साताऱ्याहून रवाना, सव्वा दोन कोसाचा प्रवास, कृष्णेवर : मुक्काम
एकोणतीस एप्रिल १७०० : पुढे रवाना, अडीच कोस व पंधरा साखळी इतका प्रवास
तीस एप्रिल १७०० : अडीच कोसाचा प्रवास, परळीच्या किल्ल्या समोर छावणी

सात जून रोजी परळीचा किल्ला औरंगजेबाच्या ताब्यात आला. सतरा जूनला तो परळीहून निघाला.

१७ जून १७०० : पावणे दोन कोसाचा प्रवास, साताऱ्याजवळ

मधील काळातील १८ ते २५ जून पर्यंतच्याप्रवासाच्या नोंदी नाहीत. या काळात औरंगजेब साताऱ्याहून निघालेला दिसतो. ३० जूनला तो कृष्णाकाठावर आहे.

तीस जून १७०० : कृष्णेच्या काठावरून रवाना, पावणे दोन कोसाचा प्रवास, सांपगावाजवळ (रहमतपूरपाशी नहवी, (न्हावी बुद्रुक?) येथे मुक्काम
दोन जुलै १७०० : दीड कोसाची मजल, भूषणगडच्या वाटेवर मुक्काम
पाच जुलै १७०० : सव्वा दोन कोसाचा प्रवास, भूषणगडच्या वाटेवर
दहा जुलै १७०० : दोन कोस चार साखळी प्रवास, भूषणगड पलीकडे सेनोरी (शेणवाडी, खटाव तालुका ?) ला मुक्काम
अकरा जुलै १७०० : पुढे प्रवास, भूषणगड जवळ रसगाव (इसगाव, अलसगाव?) येथे मुक्काम
बारा जुलै १७०० : पुढील प्रवास, एक कोस अर्धापाव इर्ला नदी जवळ असलेल्या अंबावाडी (आंबवडा?) येथे मुक्काम

आंबवडा येथे बादशहांनी तीस ऑगस्ट १७०० पर्यंत मुक्काम केला.

एक सप्टेंबर १७०० : औरंगजेब भूषणगड जवळील इर्ल्याच्या काठावरून निघतो. सव्वादोन कोसाचा प्रवास करून पाली (अनफाल)येथे मुक्काम

चार सप्टेंबर १७०० : सव्वादोन कोसाचा प्रवास करून औरंगजेब कळेढोण(खटाव तालुका, सातारा जिल्हा) येथे मुक्काम करतो

सात सप्टेंबर १७०० : कळेढोणहून रवाना, सव्वातीन कोसाचा प्रवास करून (आटपाडी महाल, सांगली जिल्हा) झरे येथे दाखल

दहा सप्टेंबर १७०० : झऱ्याहून रवाना, अडीच कोसाचा प्रवास, आटपाडी (सांगली जिल्हा) येथे दाखल

बारा सप्टेंबर १७०० : आटपाडीहून रवाना, सव्वातीन कोसाचा प्रवास, माण नदीच्या काठी खवासपूर(सांगोला तालुका, सोलापूर जिल्हा) येथे मुक्काम

बारा सप्टेंबर पासून पंधरा डिसेंबर १७०० पर्यंत औरंगजेबाचा मुक्काम खवासपूरला होता. तेथे एक ऑक्टोबर १७०० रोजी माण नदीला एकाएकी पूर येऊन मोगल सैन्याची फार वाताहत झाली. सोळा डिसेंबर १७०० रोजी औरंगजेब पन्हाळगड घेण्याच्या उद्देशाने खवासपुराहून निघाला. त्याचा मिरजेपर्यंतचा प्रवास पुढीलप्रमाणे आहे.

सोळा डिसेंबर १७०० : खवासपुराहून सव्वादोन कोस, माण नदीच्या काठी माहीवाडी (मांगेवाडी ?)

अठरा डिसेंबर १७०० : माहीवाडीहून पावणेतीन कोस, अवतार या गावी(?) मुक्काम

वीस डिसेंबर १७०० : अवतारहून पावणेचार कोस सोंधा येथे (सोनंद, सांगोला तालुका, सोलापूर जिल्हा)

बावीस डिसेंबर १७०० : सोनंदहून सव्वादोन कोस, वारुगडी (वाळेखिंडी, जत तालुका) येथे मुक्काम

तेवीस डिसेंबर १७०० : दोन कोस, परनाईपूर (प्रतापपूर, जत तालुका)

चोवीस डिसेंबर १७०० : परनाईपूर (प्रतापपूर) पासून अडीच कोस, मौजे तातार(?)

पंचवीस डिसेंबर १७०० : तातारहून अडीच कोस, मौजे नौकला (कोकळे ? कवठे महांकाळजवळ)

अठ्ठावीस डिसेंबर१७०० : कोकळेहून पाच कोस, मौजे खिळणा(?)

एकोणतीस डिसेंबर१७००: खिळण्याहून तीन कोस, मकसूळी(?)

तीस डिसेंबर १७०० : मकसूळीहून पावणे चार कोस, मौजे खानगाव (मालगाव मिरजेहून सहा मैल)

एक जानेवारी १७०१ : मिरजेत मुक्काम

प्रस्तुत कालखंडातील औरंगजबाच्या प्रवासाच्या स्थळांचा तपशील वर दिला आहे. हा प्रवास सध्याच्या सोलापूर, सांगली व सातारा या जिल्ह्यांतून घडला आहे. काही स्थळांसंबंधी फारसीतील लेखन दोषामुळे किंवा उच्चार भिन्नतेमुळे अभ्यासकाचा घोटाळा होतो. यामुळे प्रत्यक्ष पाहणी करून विवाद्य स्थळाबद्दल निर्णय घेणे इष्ट ठरेल.

## औरंगजेबाचे अधिकारी

या दोन वर्षांच्या कालखंडातील औरंगजेबाचे या मोहिमेतील अधिकारी पाहिले तर १६८० मध्ये औरंगजेब दक्षिणेत उतरला त्यावेळी त्याच्या नेतृत्वाखाली काम करणारे अधिकारी किंवा विजापूर व गोवळकोंडा ही खालसा झाल्यानंतर त्याला येऊन मिळालेले अधिकारी या पैकी बरेच जण मृत अगर निवृत्त झालेले दिसतात. औरंगजेबाचा दूधभाऊ व एके काळचा दक्षिणचा सुभेदार बहादुरखान हा १६९७ मध्ये वारला. त्याचा मुलगा हिंमतखान हा संताजी घोरपडे याच्या हातून १६९६ मध्ये मारला गेला. औरंगजेबाच्या मावस बहिणीचा मुलगा बक्षी रुहुल्लाखान हा १६९२ च्या सुमारास गलगली येथे मरण पावला.

रणमस्तखान पन्नी उर्फ बहादुरखान हा वाकिणखेडयाच्या वेढयात ठार झाला (१६९०). विजापूर कर्नाटकचा फौजदार सय्यद कासिम हा संताजीचा वेढा चालू असताना मरण पावला. संभाजीराजांना धरणारा शेख निजाम उर्फ मुकर्रबखान हा १६९७च्या सुमारास मरण पावला. ख्वाजा आबिद चीनकुलीजखान (निजामुल्मुल्काचा आजा) हा गोवळकोंडयाच्या वेढयात गोळा लागून ठार झाला. हसन अली (१६८१मध्ये कोकणात उतरणारा) हा विजापूरच्या वेढयाच्या वेळी मरण पावला. शिवाजी महाराजांशी चिवटपणाने लढणारा दिलेरखान हा १६८३ मध्ये मरण पावला. वऱ्हाडचा सुभेदार ईरजखान (याने शिवाजी महाराजां विरुद्ध लढा दिला होता) हा १६८५मध्ये मरण पावला.

वर फक्त काही ठळक व्यक्तींची नावे दिली आहेत. काही अधिकारी १६९९ पूर्वी दक्षिणेतून उत्तर भारतात बदलण्यात आले. उदाहरणार्थ राजारामाचा पाठलाग करणारा सय्यद अब्दुल्ला (सय्यद बंधूंचा बाप) हा नांदेडच्या सुभेदारीवरून बदलून अजमीर सुभ्यावर गेला. बहादुरखानाची मुले उत्तर भारतात सुभेदारीची कामे करीत होती. खुद्द औरंगजेबाच्या कुटुंबातील काही राजपुत्र उत्तर भारतात परतले होते.

## औरंगजेबाचे कुटुंबीय व आप्त

वडिलांकडून (शहाजहानकडून) औरंगजेबाचे आप्त असे कोणी शिल्लक राहिले नव्हते. शहाजहानने आपले सर्व भाऊ व पुतणे यांचा निकाल लावला होता. खुद्द औरंगजेबाचे तिन्ही भाऊ दारा, शुजा व मुराद हे मारले गेले होते. दाराचा धाकटा मुलगा सिपिहर शुको याला औरंगजेबाची मुलगी जुब्दतुन्निसा ही दिली होती. दुसरी मुलगी मिहरुन्निसा ही मुरादबख्शाच्या मुलाला दिली होती. औरंगजेबाचे दोन्ही जावई दिल्लीतच राहिले. औरंगजेबाने त्यांना कोणतीच कामगिरी सांगितली नाही. औरंगजेबाची

एक मुलगी बद्रुन्निसा ही तरुण वयात अविवाहित वारली. दुसरी मुलगी जेबुन्निसा ही दिल्लीस नजर कैदेत होती. तीहि अविवाहित होती. तिसरी मुलगी जीनतुन्निसा (अविवाहित) ही मात्र शेवटपर्यंत औरंगजेबाबरोबर दक्षिणेत होती. औरंगजेबाच्या अंत:पुराची संपूर्ण देखरेख तिच्याकडे असे.

### आईकडून

औरंगजेबाचे जितके नातेवाईक दक्षिणेतील मोहिमेत हजर दिसतात ते एकतर आजोळचे किंवा औरंगजेबाची बायको दिलरसबानू हिच्या माहेरचे.

औरंगजेबाच्या आईची वंशावळ पुढीलप्रमाणे आहे :—




### औरंगजेबाची मुले

औरंगजेब १६८० मध्ये दक्षिणेत उतरला. त्यावेळी त्याच्या मोहिमेत त्याची तिन्ही मुले होती. मुअज्जम(हा पुढे शहा आलम बहादुरशहा या नावाने गादीवर आला.)याने १६८३ मध्ये दक्षिण कोकणात स्वारी केली. मुअज्जमचा मुलगा मुइजुद्दीन(हा पुढे जहांदारशहा या नावाने १७१२ मध्ये गादीवर आला.)हा पन्हाळगडच्या वेढयात हजर होता(१६९३–९४).

औरंगजेबाचा दुसरा मुलगा आज्जम हा विजापूरच्या वेढयात हजर होता. तिसरा मुलगा कामबक्ष हा जिंजीच्या वेढयात हजर होता(१६९२ – ९३).

१६९९ मध्ये वरील परिस्थितीत काही बदल झाले. औरंगजेबाचा मोठा मुलगा शहाजादा मुअज्जम आणि त्याची मुले यांना मे १६९५ मध्ये मोठे हुद्दे देऊन उत्तर भारतात पाठविण्यात आले.

१६९९ मध्ये दक्षिणेत औरंगजेबाजवळ त्याची पुढील मुले व नातवंडे होती.

(१) औरंगजेबाचा तिसरा मुलगा कामबक्ष जिंजीहून फजीत होऊन परत आल्यावर तो औरंगजेबाबरोबर छावणीत राहिला. प्रत्यक्ष मोहिमेत त्याने भाग घेतला नाही.

(२) औरंगजेबाचा बंडखोर मुलगा अकबर हा इराणात होता. त्याचा मुलगा बलंद अख्तर हा छावणीत होता. त्याच्या कडूनहि कोणतीच कामगिरी घेण्यात आली नाही.

(३) शहाजादा आज्जम हा दौंडजवळ पेडगाव उर्फ बहादुरगड येथे छावणी करून होता. त्याची दोन मुले.

(४) वालाजाह व (५)आली तबा ही त्याच्या बरोबर होती. आज्जम हा आपल्या मुलांसहित साताऱ्याच्या वेढ्यात हजर होता.

(६) आज्जमचा तडफदार मुलगा शहाजादा बेदारबख्त हा पन्हाळगडच्या परिसरात छावणी घालून होता. राजारामाची वऱ्हाडची मोहीम हाणून पाडण्यात याने मोठी कामगिरी बजावली.

(७) औरंगजेबाचा मुख्य प्रधान असदखान. हा औरंगजेबाच्या मावशीचा नवरा. तो १७०७ पर्यंत औरंगजेबाबरोबर दक्षिणेत होता.

(८) असदखानाचा मुलगा म्हणजे औरंगजेबाचा मावसभाऊ जुल्फिकारखान, औरंगजेबाचा हा यशस्वी सेनापती.

(९) औरंगजेबाच्या दुसऱ्या मावशीचा नवरा म्हणजे माजी मुख्यप्रधान जाफरखान. हा नात्याने असदखानाचा मामा लागत होता. याच जाफरखानाचा पुतण्या म्हणजे असदखानाचा मामेभाऊ बहरामंदखान. हा या कालखंडात औरंगजेबाचा बक्षी म्हणून काम करीत होता.

(१०) मुम्ताजमहलची बहीण सालेहाबानू. हमीदाबानू ही तिची मुलगी म्हणजे औरंगजेबाची मावसबहीण. तिचा मुलगा रुहुल्लाखान हा औरंगजेबाचा बक्षी. तो गलगली (विजापूर जिल्हा)येथे १६९२ मध्ये वारल्यावर त्याचा मुलगा रुहुल्लाखान दुसरा (मीर मुहंमद हसन खानाजादखान)हा या कालखंडात(१६९९ – १७००)औरंगजेबाचा खानसामान(पुरवठा मंत्री)व नंतर बक्षी होता.

(११) सुहराबखान व त्याचा मुलगा आकिबत महमूद सजावारखान याचे घराणे परंडा, उद्गीर, कंधार इत्यादींच्या किल्लेदारीवर व सुभे नांदेडच्या सुभेदारीवर काम करीत होते. हे इराणी घराणे म्हणजे मुम्ताजमहलचे आजोळ होय. गियासुद्दीन अली आसफखान, निजामुद्दीनखान, हुसामुद्दीनखान, नेमतुल्ला सुहराबखान व आकिबत मुहमद सजावारखान अशी ही वंशावळ आहे. गियासुद्दीन अली आसफखान याची मुलगी म्हणजे मुम्ताजमहलची आई.

(१२) मुम्ताजमहलचा सख्खा भाऊ शायिस्ताखान हा इतिहासात प्रसिद्ध आहे. या कालखंडात त्याचा मुलगा(औरंगजेबाचा मामेभाऊ) खुदाबदाखान हा प्रथम छावणीत व नंतर नांदेड बीदरचा सुभेदार म्हणून काम करीत होता.

(१३) मुम्ताजमहलच्या दोन चुलत बहिणी. त्या पैकी नौरसबानू ही शहानवाजखानाची

बायको. तिचीच मुलगी दिलरसबानू (हिची कबर म्हणजे बिबीचा मकबरा औरंगाबाद) ही औरंगजेबाची बायको. दुसरी चुलत बहीण म्हणजे नौरंगबानू. शहानवाजखानाप्रमाणे ही पण मुख्तारखान सब्जवारी या इराणवंशीय सरदाराला दिली होती. हिची मुले म्हणजे दिलरसबानूचे मावसभाऊ. पैकी एक मावसभाऊ बहादुर दिल जानसिपारखान हा सुभे हैद्राराबादचा सुभेदार होता.

(१४) दिलरसबानूचा सख्खाभाऊ मुअज्जमखान (मृत्यू १६९८) याचा मुलगा अकरमखान (शहाजादा आज्जमचा मामेभाऊ) हा शेवटपर्यंत औरंगजेबाच्या छावणीत होता.

(१५) दिलरसबानूचा दुसरा मावसभाऊ दाराबखान. याचा मुलगा म्हणजे औरंगजेबाच्या तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान हा होय. सातान्याच्या वेढयात त्याने उत्कृष्ट कामगिरी बजावली.

(१६) दिलरसबानूची मावसबहीण गुलरंगबानू हिचा मुलगा मतलबखान हा औरंगजेबाच्या जवळ निरनिराळया हुद्यावर असून त्याने महत्त्वाच्या लष्करी कामगिऱ्या बजावल्या. याचे नाव बातमीपत्रातून अनेक वेळा येते.

औरंगजेबाच्या जवळच्या किंवा दूरच्या अशा काही नातेवाइकांची नावे वर दिली आहेत. मोगल साम्राज्याची तात्त्विक बैठक लष्करी होती. मन्सबदार म्हणजे मोगल साम्राज्याचा प्रमुख अधिकारी वर्ग. या नोकरशाहीची उभारणी लष्करी तत्त्वावर झाली होती. मन्सबदारात लष्करी व मुल्की असा भेद नसे. दहाचा मन्सबदार म्हणजे जरूर लागेल तेव्हा दहा घोडेस्वार आणून चाकरी बजावणारा असा अर्थ होई व त्या हिशेबाने त्याला पगार अगर तितक्या उत्पन्नाची जमीन अगर गावे दिली जात. दहा पासून सात, हजारा पर्यंतचे मन्सबदार असत. मन्सबीचे दोन भाग असत. एक म्हणजे जात (प्रतिष्ठेसाठी) व दुसरे म्हणजे स्वार (सरंजाम) लष्करी चाकरीसाठी.

पण हिशेबाप्रमाणे कोणीहि स्वार बाळगीत नसे आणि तशी अपेक्षाहि नसे. अशा हिशेबाचे स्वरुप पगार निश्चित करण्यासाठी ठरविलेल्या फॉर्म्युल्याचे झाले. प्रत्यक्षात सात हजारी मन्सबदार याजपाशी स्वतःचे हजार बाराशे स्वार असले तर फार झाले असे समजत असत.

औरंगजेबाचे हे अधिकारी कोणत्याहि कामावर असोत, सेनापती, फौजदार, ठाणेदार, किल्लेदार, बक्षी, वाकनीस, सुभेदार ते कोणत्याहि कामावर असले तरी, त्यांना कोणती ना कोणती मन्सब असे. एक हजार किंवा त्याहून अधिक मन्सब असलेल्यांना अमीर म्हणत. औरंगजेबाचे स्वतःचे सैन्य (मराठेशाहीतील हुजराती प्रमाणे) थोडे असे. पण पथके बाळगणारे अनेक मन्सबदार अधिकारी त्याच्या छावणीत असत. किल्याविरुद्ध मोहीम औरंगजेबाने उघडली तेव्हा त्याने अनेक अधिकाऱ्यांना पथके घेऊन छावणीत येण्याची आज्ञा केली.

या कालखंडातील बातमीपत्रात आपल्याला औरंगजेबाच्या छावणीतील अनेक अधिकाऱ्यांची नावे आढळतात. बक्षी मुखलिसखान, बहरामंदखान, रुहुल्लाखान, मतलब-

खान, मुहंमद अमीनखान, इनायतुल्ला काश्मीरी, महसूल खात्याचा अर्शदखान, औरंगजेबाचा विश्वासू अधिकारी हमीदुद्दीनखान, इत्यादींची नांवे आपल्याला आढळतात.

जुल्फिकारखान, गाजिउद्दीन फीरोजजंग(भावी निजामुलमुल्काचा बाप) कमरुद्दीन चीनकुलीजखान(भावी निजामुल्मुल्क), शहाजादा बेदारबख्त हे सेनापती दक्षिणेत फिरून मराठ्यांचा पाठलाग करीत होते. त्यांच्या सैन्यात मन्सबदारांची पथके असत. अशा सैन्यावर औरंगजेबाचे नियंत्रण पुढील प्रकारचे असे :–

सेनापतीच्या सैन्यातील बक्षी वाकनीस, तोफखान्याचे अधिकारी इत्यादींच्या नेमणुका, बदल्या, बढत्या, बडतर्फ्या ही बादशहा करीत. तोच प्रकार निरनिराळ्या सेनापतीच्या हाताखाली नेमलेल्या मन्सबदारांच्या (अधिकाऱ्यांच्या) बाबतीत होता. त्यामुळे आपल्या हाताखालील कोणती पथके आणि कोणते अधिकारी केव्हांहि बदलले जाऊ शकतात असे सेनापतींना वाटे.

एखादी मोहीम करावी असे ठरले, मग ती मोहीम छावणीच्या बाहेर जाऊन रसद, लाकूडफाटा, गवत आणण्यासाठी असो अगर मराठ्यांशी लढण्यासाठी असो, पथकांची जुळवाजुळव, कोण कोण सरदार मोहिमेवर राहावेत, एकंदरीत किती स्वार राहातील इत्यादि गोष्टींची पाहणी होई. मग बक्षी स्वारांचा, सरदारांचा तपशील बादशहा समोर ठेवीत. या तपशिलाला तूमार म्हणत. लांबच्या मोहिमेसाठी जाणाऱ्या सैन्याबरोबर बक्षी व वाकनीस असत.

## औरंगजेबाचे अधिकारी

दक्षिणेतील मोहिमेतील सूत्रे १६८१ पासून १७०७ पर्यंत औरंगजेब हा स्वतः चालवीत होता. या युद्धाचा सरसेनापती तोच. त्यामुळे त्याच्या सेनापतींना स्वतंत्र मोहिमा काढून, धोरणे आखून, युद्धे करून, अगर राजकारणे खेळून स्वतःची कर्तबगारी दाखविण्यास वाव नव्हता. तरी पण त्यातल्या त्यात बराच अधिकार गाजविणारे सेनापती म्हणजे बेदारबख्त, जुल्फिकारखान व गाजिउद्दीन फीरोजजंग(निजामुलमुल्काचा बाप) हे दिसतात. त्यांच्या खालोखाल, कर्नाटकात दाऊदखान पन्नी व कोकणात मातबरखान यांची नावे घ्यावी लागतील.

मध्य आशियातून आलेल्यांना तुर्क अगर तुराणी म्हणत. औरंगजेब हा तुर्क होता. तुर्क, तुराणी सैनिकांना व अधिकाऱ्यांना गाजिउद्दीन फीरोजजंग याचा आश्रय असे. कारण तो स्वतः मध्य आशियातील बुखारा येथून आला होता. औरंगजेबाच्या सैन्यातील अनेक तुर्क, तुराणी पुढील काळात मोठमोठ्या हुद्यावर पोहोचले. निजामुल्मुल्क, बाजीराव पेशव्याशी लढणारा ऐवजखान, पंजाबचा पुढे सुभेदार झालेला अब्दुस्समद दिलेरजंग, बहादुरशहाचा मुख्य प्रधान मुनीमखान, निजामुल्मुल्काच्या बापाचा चुलत भाऊ व मुहंमदशहाचा मुख्य प्रधान मुहंमद अमीन इत्यादि लहान मोठे सरदार साताऱ्याला बादशहाच्या छावणीत आपल्याला आढळतात.

औरंगजेबाच्या अधिकाऱ्यांपैकी दुसरा गट म्हणजे ईराणवंशीयांचा किंवा इराणी

संस्कृति स्वीकारलेल्या तुर्कांचा होय. औरंगजेबाचे नातेवाईक व मातबर सरदार या गटातील होते. मुख्य प्रधान असदखान, त्याचा मुलगा जुल्फिकारखान, रुहुल्लाखान, बक्षी बहरामंदखान बक्षी मुखलिसखान, जानसिपारखान, तरबियतखान, मतलबखान, खुदाबंदाखान, सरबलंदखान, इत्यादी मंडळी या गटा पैकी होती. तुर्कांच्या मानाने या गटाचे वजन औरंगजेबाशी काहीसे अधिक होते असे म्हणावे लागेल. पण औरंगजेबासमोर कुणाचेच काही चालत नव्हते हे लक्षात घ्यावे लागेल.

या कालखंडात गट म्हणण्या इतके पठाणांचे बळ नव्हते. पुढे प्रसिद्धीस आलेला दाऊदखान पन्नी याचे नाव मात्र जुल्फिकारखानाचा तडफदार नायब म्हणून गाजू लागले होते.

जुन्या विजापूर व गोवळकोंडा या राज्यातील काही सरदार मातबर हुद्यावर होते. वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान, ओरिसाचा सुभेदार अस्करखान, शेख निजाम याची मुले खाने आलम, मुनव्वरखान इत्यादि, सावनूरचे नबाब दिलेरखान इत्यादींची नावे आपल्याला आढळतात. पण औरंगजेबाजवळ त्यांचे वजन विशेष होते असे दिसत नाही.

### रजपूत

१६९९ व १७०० या कालखंडात औरंगजेबाच्या छावणीत फारच थोडे रजपूत सरदार आढळतात. अंबर(जयपूर)चा राजा बिशनसिंग हा पेशावर जवळ वारला. त्याचा मुलगा जयसिंग (सवाई जयसिंग) हा १७०० मध्ये बारा वर्षाचा होता. त्याला आपली पथके घेऊन दक्षिणेत येण्याची आज्ञा झाली होती. जोधपूरशी लढा चालू असल्यामुळे तिकडून रजपूत सैनिक मिळणे शक्य नव्हते. पण बिकानेरचा राजा सरूपसिंग आणि त्याचा भाऊ सुजानसिंग हे औरंगजेबाबरोबर होते. उदयपूरच्या राण्याची काही पथके कराराप्रमाणे दक्षिणेतील मोहिमेत सामील होती. उदयपूर घराण्यातील राजपुत्र भीम हा मोगलांच्या नोकरीत होता. तो वारल्यानंतर त्याचे भाऊ व मुले ही औरंगजेबाची चाकरी बजावीत होती.

कोट्याचा राजा रामसिंग हाडा हा जुल्फिकारखानापाशी तैनात असून त्याने उत्कृष्ट कामगिरी बजाविली. बुंदेलखंडातील दोन राजे, दतियाचा रावदलपत बुंदेला व ओछर्याचा अवधूतसिंग हे मोगलांबरोबर होते. राव दलपत बुंदेला हा जुल्फिकारखानापाशी तैनात होता. तर अवधूतसिंग हा औरंगजेबाच्या छावणीत होता. पण एखाद्या रजपूत सरदाराला स्वतंत्र मोहीम करून आपली कर्तबगारी दाखविण्याची संधी मिळाली नाही. दतियाचा राव दलपत बुंदेला व कोटयाचा रामसिंग हाडा यांनी जुल्फिकारखानाच्या हाताखाली कामगिरी केली. ओछर्याचा राजा अवधूतसिंग हा बेदारबख्त या शहाजाद्याकडे अगर खुद्द बादशहाच्या छावणीत असे. बीकानेरचा राजा सुजानसिंग हाहि बादशहाच्या छावणीत होता.

या कालखंडातील नाव घेण्यासारखे राजे ते हे. रजपुतांच्या बाबतीत औरंगजेबाला

विशेष आस्था होती असे दिसत नाही. इतकेच नव्हे तर त्यांची मने राखण्याचा त्याने विशेष प्रयत्न केला असेहि दिसत नाही. उलट त्यांची मने दुखावली गेली तरी विशेष बिघडणार नाही असे त्याला वाटत असावे. या कालखंडातील पुढील उदाहरण फार बोलके आहे :—

माळव्यातील रजपूत सरदार गोपाळसिंग चंद्रावत याचे घराणे मोगलांच्या सेवेत गाजलेले. माळव्यातील रामपुरा येथे त्यांची जहागीर होती. महाराणा प्रताप याचा विश्वासू सरदार दुर्गासिंह याचे हे घराणे. गोपाळसिंहाचा बाप अमरसिंह हा साल्हेरच्या लढाईत मराठ्यांशी लढत असतांना इ. स. १६७२ मध्ये मारला गेला. गोपाळसिंग हा बेदारबख्ताच्या सैन्यात नोकरी बजावीत होता. त्याचा मोठा मुलगा रतनसिंग हा माळव्यात आपल्या बापाच्या जहागिरीचे काम बघत होता. तिकडून त्याने बापाकडे खर्चासाठी रक्कम पाठविणे बंद केले. गोपाळसिंगाची फार ओढाताण होऊ लागली. आपल्याला आपल्या जहागिरीवर जाऊन येण्याची परवानगी मिळावी अशी त्याने विनंती केली. ती नाकारण्यात आली. आपले म्हणणे मांडावे म्हणून गोपाळसिंग बादशाही छावणीत आला. बेदारबख्ताची परवानगी घेतल्याशिवाय का आला म्हणून बादशहा त्याच्यावर रागावला.

या सुमारास रतनसिंग हा माळव्याच्या सुभेदारापाशी गेला आणि मुसलमान झाला (नऊ एप्रिल १७००). औरंगजेबाने त्याला इस्लामखान ही पदवी देऊन त्याच्या बापाची जहागीर त्याच्या नावावर करून टाकली. ज्या घाईने रतनसिंग उर्फ इस्लामखानाचे कौतुक करण्यात आले ती पाहता औरंगाजेबाच्या मनोवृत्तीचा अंदाज येणे कठीण नाही. गोपाळसिंगाची स्थिति केविलवाणी झाली. आपली जहागीर परत घेण्यासाठी गोपाळसिंग उत्तरेकडे निघाला तर तो सापडेल तेथे त्याला पकडावे अगर ठार मारावे अशी आज्ञा औरंगजेबाने केली. पुढे औरंगजेबाच्या मृत्यूनंतर रतनसिंग हा आपल्या बापाशी लढत असताना ठार झाला. आणि गोपाळसिंगाने आपली जहागीर परत मिळविली.

. रजपुतांच्या भावनांकडे दुर्लक्ष केले तरी चालण्यासारखे आहे असे औरंगजेबाला वाटत असावे. काही किल्लेदाऱ्या व क्वचित ठाणेदाऱ्या मात्र काही रजपुतांना देण्यात आलेल्या दिसतात. पुरंदरचा किल्लेदार खानचंद बुंदेला, लोहगडचा किल्लेदार अटलसिंह, सुधागडचा किल्लेदार सेनापत, रायगडचा किल्लेदार शिवसिंग, साताऱ्याचा किल्लेदार सत्रसाल राठोड, परळीचा किल्लेदार रावतमल झाला, दौंडचा ठाणेदार मानसिंग (राठोड)असे काही रजपूत अधिकारी आपल्याला आढळतात. पण प्रांताचे मुख्य (सुभेदार, नाजिमे सूबा)अगर जिल्ह्यांचे मुख्य (फौजदार) यांच्या यादीत रजपूत आढळत नाहीत.

## औरंगजेबाचे मराठे सरदार

औरंगजेबाच्या एकूण मन्सबदारांपैकी एक हजारावरचे मराठे मन्सबदार असे थोडे होते. १६८० पर्यंत एकूण ४८६ मन्सबदारांत मराठे हे अवघे पंचवीस होते. यात प्रमुख म्हणजे संभाजीराजे व त्र्यंबकजी, परसोजी इत्यादि भोसले मंडळी, शिंदखेडची जाधव मंडळी, माहूरचे उदाराम, गाढे, खंडागळे इत्यादि सरदार होते. १६८० नंतर औरंगजेब

दक्षिणेत उतरला. मराठे सरदारांना आपल्याकडे ओढण्याचे त्याने प्रयत्न केले. शाहूला सात हजारी मन्सब व राजा ही पदवी देण्यात आली. मराठे सरदारात कान्होजी शिर्के, अचलोजी महाडीक, नागोजी माने, बहिर्जी पांढरे, सटवाजी डफळे, जगदेवराव जाधव इत्यादि नावे आपल्याला आढळतात. १७०७ पर्यंत औरंगजेबाच्या एकूण ५७५ मन्सबदारांपैकी नव्वद पर्यंत मन्सबदार मराठे होते. मोगल मराठा संघर्ष जसा तीव्र होऊ होऊ लागला तसे मोठमोठ्या मन्सबी देऊन मराठ्यांना आपल्याकडे ओढण्याची औरंगजेबाला निकड वाटू लागली. या संबंधी मुहंमद अतहर अली हे आपल्या *नोबिलिटी अंडर औरंगजेब* या ग्रंथात (पान तीस) म्हणतात, 'परिस्थितीमुळे मराठ्यांना मन्सबी देणे औरंगजेबाला भाग पडू लागले. शाहूला सात हजारी मन्सब देण्यात आली. पण मन्सबी दिल्याने मराठे आपल्याकडे येतील ही औरंगजेबाची अपेक्षा फोल ठरली. काही मराठे मोगलांकडे आले की त्यांची जागा घेण्यास आणि मोगल प्रदेश उध्वस्त करण्यास नवीन मराठे सरदार पुढे येत. औरंगजेबाचे मराठे सरदार हे एकनिष्ठ नसत. अनेक वेळा ते मोगलांना सोडून जात. त्यामुळे मोगल राज्ययंत्रणेत त्यांना खऱ्या अर्थाने वजन प्राप्त झाले नाही. त्यांचे अस्तित्व म्हणजे मोगलसाम्राज्याच्या वाढीचे प्रतीक नव्हे तर ते त्याच्या ऱ्हासाचे प्रतीक समजले पाहिजे.' जानोजी, कान्होजी शिर्के, सर्जेराव हे पाच हजारी मन्सबदार होते. सातारा पडल्यावर तेथील किल्लेदार सुभानजी याला पाच हजारी मन्सब देण्यात आली. शंकरराव अहीरराव यास चार हजारी मन्सब, जगदेवराव जाधव तीन हजारी मन्सब, नागोजी माने व एकोजी घोरपडे तीन हजारी मन्सब, बुधपाचगावचा ठाणेदार पदाजी अडीच हजारी, मसूरचा ठाणेदार मंबाजी अडीच हजारी, रामचंद्र खटावकर दोन हजारी, खानापूरचा ठाणेदार आवजी आढळराव दोन हजारी अशी प्रमुख नावे आपल्याला आढळतात.

काही मराठ्यांनी मन्सबीसाठी किंवा कैदेतून सुटण्यासाठी धर्मांतर केले. प्रतापराव गुजराच्या मुलांनी कैदेतून सुटण्यासाठी धर्मांतर केले (तेरा जुलै १७००). मावळातील देशमुख खंडोजी उर्फ दौलतमंदखान याला धर्मांतराचा मोबदला म्हणून तीन हजारी मन्सब मिळाली (तेवीस फेब्रुवारी १७००), बहिर्जी देशमुख वतनासाठी मुसलमान झालेला दिसतो (वीस जुलै १७००), तोच प्रकार मयाजी (सयाजी?) उर्फ शेख नेकनाम (चौदा डिसेंबर १६९९) व सूर्याजी पिसाळ शेख फतेहुल्ला (सतरा नोव्हेंबर १७०२) यांच्या बाबतीत घडला असे म्हणता यईल. पण अशी उदाहरणे अगदी थोडी, हाताच्या बोटावर मोजण्या इतकी आहेत. दरबारच्या बातमीपत्रावरून धर्मांतर करणारी बरीच माणसे कारकून अगर सैन्याच्या खालच्या थरातील दिसतात. ही धर्मांतरे बढतीच्या आशेने झाली असावीत. क्वचित प्रसंगी अफरातफरीची शिक्षा चुकविण्यासाठी धर्मांतर झाले. औरंगाबादच्या सुभ्याचा प्रमुख कारकून मिहिरचंद याच्यावर सरकारचे हजारो रुपयांचे देणे निघाले. तो कैदेत पडला. शिक्षा टाळण्यासाठी तो मुसलमान झाला. बादशहांनी त्याला स्वतः कलमा पढवून मुसलमान केला आणि त्याचे नाव शेख मिहरुल्ला ठेवले. त्याच्यावरचे सरकारी देणे तर माफ करण्यात

आलेच उलट त्याला बक्षीस देण्यात येऊन चांगल्या जागेवर त्याला बढती देण्यात आली. यावरून औरंगजेबाच्या मनोवृत्तीवर उत्कृष्ट प्रकाश पडतो. धर्मांतर घडवून आणण्याची तो संधी सोडीत नसे. पण तीहि एका मर्यादेत. मराठ्यांशी निकराचा लढा चालू असताना धर्मप्रसाराचा आपला छंद फार महाग पडेल याची त्याला जाणीव असावी.

रजपूत काय किंवा मराठे सरदार काय. त्यांच्याकडे स्वतंत्र मोहीम देण्याचा प्रश्नच नव्हता. मराठे सरदारांना गाजिउद्दीन फीरोजजंग, चीनकुलीजखान, शहाजादा बेदारबख्त, जुल्फिकारखान यांच्यापाशी अगर बादशाही छावणीत तैनात करण्यात येई. तेथे त्यांना देण्यात आलेली कामगिरी ते कमी अधिक प्रमाणात बजावीत. नागोजी माने, जगदेवराव जाधव, कान्होजी शिर्के व बहिर्जी पांढरे ही नावे अनेक वेळा बातमीपत्रांतून आढळतात.

मोगलांचे मराठे किल्लेदार फार थोडे. पण ठाण्यांच्या संरक्षणाचे काम करणारे अनेक अधिकारी मराठे दिसतात. खटाववर रामचंद्र, मसूरवर मंबाजी, बुधपाचगाववर पदाजी, कागलवर पिराजी, खानापूरवर आवजी आढळराव, म्हसवडवर नागोजी माने, खेड कडूसवर निजामराव, शिक्रापूरवर माणकोजी, कोल्हापूरवर बहिर्जी पांढरे अशी नावे आपल्याला आढळतात. मराठ्यांच्या हल्ल्यापासून आपल्या ठाण्यांचे संरक्षण करताना त्यांची पुरेवाट होई.

### औरंगजेबाच्या हालचाली

मराठ्यांचे किल्ले घेण्याच्या उद्देशाने औरंगजेब ब्रम्हपुरीतून बाहेर पडला. तो साताऱ्याच्या वाटेवर असताना वऱ्हाडच्या मोहिमेवर जाण्याच्या उद्देशाने राजाराम बाहेर पडला. बार्शी जवळ शहाजादा बेदारबख्त याने त्याला अडविले. घनघोर लढाई होऊन (सोळा नोव्हेंबर १६९९) राजारामाला विशाळगडाकडे परत यावे लागले.

### मराठ्यांचे डावपेच

औरंगजेबाच्या हाचालीला तोंड देण्यासाठी मराठ्यांनी पुढीलप्रमाणे आपल्या हालचाली ठरविल्या :–

(१) औरंगजेबाच्या छावणीभोवती सतत घिरट्या घालीत राहणे. संधी मिळाल्यास छावणीवर हल्ले करणे, रसद तोडणे, रसद आणण्यास निघालेल्या पथकांवर हल्ले करणे.

(२) औरंगजेबाला किल्ले घेणे जितके अवघड व दिरंगाईचे करता येईल तितके करणे. किल्ला जितका लढविता येईल तितका लढविणे.

(३) मोगल सेनापतींना पाठीवर घेऊन शेकडो मैल पायपिटी करण्यास लावणे.

(४) दक्षिणेत सर्वत्र संचार करून मोगलांची ठाणी मारणे, मोगल प्रदेश उध्वस्त करणे, अधिकाऱ्यांना कैद करून भक्कम खंडणी घेऊन सोडून देणे, ठिकठिकाणी चौथाई गोळा करणे आणि मोगल प्रदेशात जागोजाग स्वतःच्या छावण्या घालणे.

(५) वऱ्हाडातून पुढे सरकून माळव्यात व पश्चिम किनाऱ्यावरून उत्तरेकडे सरकून गुजरातेत जाण्याचा प्रयत्न करणे.

(६) नागपूरचे गोंड राजे, बुंदेलखंडातील बुंदेले व कर्नाटकातील गुलबर्गा विजापूर भागातील बेडर जमातींचे सरदार यांचे सहकार्य मिळविणे.

## मराठ्यांचे नेते

या युद्धाचे नेतृत्व ताराबाईकडे होते. तिला सल्लामसलत देणाऱ्यात रामचंद्रपंत अमात्य, परशुरामपंत प्रतिनिधि व शंकराजी नारायण हे दिसतात. त्यांची नावे अनेकवेळा बातमीपत्रांतून आली आहेत.

युद्धाचा सरसेनापती अर्थातच धनाजी जाधव हा होता. या कालखंडात(१६९९–१७००) त्याने उत्कृष्ट कामगिरी बजावली. त्याने जुल्फिकारखानाला हजार दीड हजार मैल पायपिटी करून महाराष्ट्रभर फिरविले, ब्रह्मपुरीच्या मोगल तळावर पुन्हा पुन्हा हल्ले करून त्याने अशी काही दहशत निर्माण केली की औरंजेबाला शेवटी आपली बायको व मुलगी यांना सुरक्षिततेसाठी म्हणून विजापूरला हलवावेसे वाटले आणि शेवटी त्यांना दौंडजवळील पेडगावच्या छावणीत आणून ठेवावे लागले.

धनाजी जाधवने साताऱ्च्या मोगल छावणीवर पुन्हा पुन्हा हल्ले चढविले. साधा लाकूडफाटा व गवतचारा आणण्यासाठी औरंगजेबाला भक्कम पथके बरोबर देऊन सरदारांना छावणीबाहेर पाठवावे लागे. छावणीत आणि खुद्द बादशहाच्या निवासस्थाना-भोवती सतत गस्त व पहारे यांची व्यवस्था करावी लागली. धनाजी जाधवाचा संचार कसा सर्वत्र होता याची कल्पना येण्यासाठी या दोन वर्षाच्या कालखंडातील त्याच्या काही हालचाली पुढे दिल्या आहेत.

## धनाजी जाधवाच्या हालचाली

| | | | |
|---|---|---|---|
| सात मे | १६९९ | : | पंचवीस हजार सैन्यासहित बीदर प्रांतात |
| पाच जून | १६९९ | : | ब्रम्हपुरीपासून अकरा कोसावर |
| अकरा जून | १६९९ | : | भानोळी (मंगळवेढा तालुका) जवळ लढाई. धनाजी साताऱ्याकडे |
| पंचवीस ऑक्टोबर | १६९९ | : | धनाजी जाधव साताऱ्यात |
| सोळा नोव्हेंबर | १६९९ | : | परंडयापासुन (बार्शी जवळ) दोन कोसावर धनाजी व शहा-जादा बेदारबख्त यांची लढाई |
| अठरा डिसेंबर | १६९९ | : | धनाजी ब्रम्हपुरी भोवती, पंतप्रधान असदखान याच्याबरोबर-लढाई |
| एकवीस डिसेंबर | १६९९ | : | धनाजी जाधव दहा हजार सैन्यासहीत कऱ्हाडजवळ |
| बावीस डिसेंबर | १६९९ | : | हमीदुद्दीनखानाशी युद्ध |
| एक जानेवारी | १७०० | : | जुल्फिकारखान धनाजीच्या पाठलागावर |
| अकरा जानेवारी | १७०० | : | धनाजी जाधव, हणमंतराव, राणोजी घोरपडे, पंधरा हजार सैन्यासहित, रहिमतपूर जवळ, जुल्फिकारखानाशी लढाई |
| तेवीस जानेवारी | १७०० | : | धनाजी खानापूरचा ठाण्यावर हल्ला करतो |

पंचवीस जानेवारी १७०० : परंडा तालुक्यात उदरगाव येथे खजिन्यावर हल्ला, जुल्फिकारखाना बरोबर लढाई
बारा फेब्रुवारी १७०० : गुलबर्गा जिल्हा फीरोजाबाद येथे जुल्फिकारखानाशी लढाई
सत्तावीस मे १७०० : धनाजी पन्हाळगडाकडे
पाच जून १७०० : धनाजी विशाळगडाकडे
सतरा नोव्हेंबर १७०० : धनाजी टेंभुर्णीजवळ, चौथाईची वसुली
अठ्ठावीस डिसेंबर १७०० : धनाजी ब्रह्मपुरीजवळ
वर्षा अखेर १७०० : धनाजी मिरजेजवळ, बादशहाही छावणीवर हल्ल्याची तयारी

या कालखंडात धनाजीच्या हालचाली पूर्ण महाराष्ट्रातील नांदेड जिल्ह्यापासून पुण्यापर्यंत चालू होत्या. इतर मराठे सरदारात कृष्णा सामंत(पवार) (१७०० मध्ये याने नर्मदा ओलांडली), राणोजी घोरपडे, बहिर्जी घोरपडे, हणमंतराव निंबाळकर, दादो मल्हार, कृष्णा मल्हार, परसोजी भोसले, शहाजी निंबाळकर, खंडोजी दाभाडे, मकाजी पांढरे इत्यादी नावे आपल्याला आढळतात.

## मराठ्यांच्या हालचालींचा परिणाम

मराठ्यांचे किल्ले आपण अल्पावधीत सर करू अशी औरंगजेबाची समजूत असावी. पण रसद तोडून, छावणीवर हल्ले करून, किल्ले लढवून मराठ्यांनी बादशहाचे बेत हाणून पाडले. मराठ्यांचे सातारा, परळी, पन्हाळगड, विशाळगड, सिंहगड, राजगड व तोरणा हे किल्ले घेण्यात १६९९--१७०४ अशी पाच वर्षे गेली. या अवधीत मराठे गुजरात व माळवा या प्रांतात घुसले. दक्षिण सुभ्यात त्यांनी जागोजागी छावण्या घातल्या, खंडणी व चौथाई वसूल करण्यास सुरवात केली. सारांश, मोगलांची राज्ययंत्रणा त्यांनी खिळखिळी करून सोडली.

ब्रह्मपुरीला कबीले ठेवून औरंगजेब मराठ्यांचे किल्ले घेण्यास जरी निघाला तरी त्याची छावणी म्हणजे सड्या सैन्याची आणि मोहिमेवरच लक्ष देऊन असलेली छावणी नव्हती. औरंगजेबाचा सगळा राज्यकारभार छावणीतून चाले. बादशहा रोज न्यायदानाचे काम करी, प्रकरणे निकालात काढी. साऱ्या हिंदुस्थानातील सुभेदार, फौजदार, सरदार इत्यादींच्या बदल्या, बढत्या, शिक्षा, सेनापतींना आदेश, परराष्ट्रांशी राजकारणे इत्यादी सगळी छावणीतून चालावयाची. औरंगजेबाचे प्रमुख अधिकारी बक्षी (आजच्या परिभाषेत संरक्षण मंत्री), खानसामान (पुरवठा मंत्री), दिवाण (महसूल मंत्री), सदर(न्याय खात्याचा प्रमुख) हे सर्व बादशाही छावणीत असत. छावणीत लढवय्ये कमी व इतर माणसेच फार असा प्रकार असे. किल्ल्याला मोगलांचा वेढा पडला आहे. किल्ल्याभोवती घालण्यात येणारे मोर्चे शहाजादा आज्जम, तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान, खानसामा रुहुल्लाखान इत्यादींमध्ये वाटून देण्यात आले आहेत. बादशहा मधूनमधून मोर्च्यांना भेट देत आहेत. सरदारांशी सल्लामसलत करीत आहेत. वेढ्यासाठी लागणारे सामान गोळा करीत आहेत. आणि तरीही रोजचे न्यायदानाचे काम चाललेच आहे असे हे

दृश्य आहे. किल्ल्याच्या पायथ्याशी बसून राज्यकारभार करावयाचा तर किल्ले लवकर हाती कसे येणार ? वसईच्या समोर बसून चिमाजी आप्पाने असेच केले असते तर वसई मराठ्यांना कधीतरी मिळाली असती काय ?

मोगलदरबारची बातमीपत्रे म्हणजे आज कालची गझेट (शासनपत्रे अगर राजपत्रे म्हणाना) अशा स्वरूपाची होती. कुठे पंजाबच्या सुभेदाराच्या बदलीची नोंद आहे तर कुठे बरद्वानच्या कलेक्टरला शिक्षा झाली तिचा उल्लेख आहे. मराठ्यांशी संबंधित अशा बातम्या त्यातून निवडाव्या लागतात. पण मोगलांचा लढाच दक्षिणेत चालू असल्यामुळे अशा बातम्या संख्येने विपुल आहेत. हेरांच्या बातम्या, अधिकाऱ्यांचे वृत्तांत, मोगल सरदारांच्या हालचाली, मराठ्यांचे ठाण्यावरील हल्ले, त्यांचे धावपळीच्या युद्धाचे तंत्र, असे तपशील किती म्हणून सांगावे. या युद्धाचे परिणाम बुंदेलखंड, माळवा, राजस्थान इत्यादी प्रांतात हि जाणवू लागले. त्यामुळे तिकडील बातम्यांचे अनुवादही द्यावे लागले.

## मोगलांचे हाल

या मोहीमांचा तपशील पाहिला तर मोगलांना मनुष्यबळ कमी पडू लागले होते की काय असे वाटू लागते. साताऱ्याला औरंगजेबाच्या छावणीत लाख पाऊण लाख माणसे तरी असावीत. पण किल्ल्याभोवतीच्या मोर्च्यातून पंधरा ते वीस हजार माणसेच गुंतली असावीत असे वाटते. विजापूर व हैद्राबाद या सुभ्यांच्या रक्षणासाठी आमच्यापाशी पाच पाच हजार सैन्यही नाही अशी तेथील सुभेदार तक्रार करतात. रसद आणण्यासाठी अगर मराठ्यांचा पाठलाग करण्यासाठी पथके तयार करून पाठवावी लागत. अधिकाऱ्यांना मोर्च्यातून हलवून रसदेसाठी पाठवावे लागे. ठाणी व किल्ले यांच्या संरक्षणात मोगलांचे बरेच सैन्य वाटले गेले असावे. शहाजादा बेदारबख्त हा तडफदार सेनापती, पण पूर्वी आपल्यापाशी चोवीस हजार सैन्य होते, आता माझ्या तैनातीतील अधिकाऱ्यांना बदलल्या-मुळे ते चौदा हजारावर आले आहे, अशी तक्रार करतो. परळीच्या वेढयानंतर औरंग-जेबाने शहाजादा आज्जम याला उत्तरेकडे जाण्यास निरोप दिला. त्याच्याबरोबर देण्यात आलेले सैन्य, अधिकाऱ्यांची पथके व माळव्यात येऊन त्याला मिळणारे अधिकारी यांची पथके जमेस धरूनही एकोणीस हजार स्वारांचे भरले हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. जिल्ह्यांच्या फौजदारांच्या (जिल्हाधिकारी) पाशी एक हजार स्वार तैनात म्हणजे शिकस्त झाली. दहा सप्टेंबर १६९९ च्या नोंदीवरून बीडच्या फौजदारापाशी आठशेऐंशी स्वार होते असे दिसते. फीरोजाबादच्या लढ़ाईत (मे १७००) इतिहासकार भीमसेन सक्सेना हा हजर होता. तो म्हणतो : 'मराठ्यांचे सैन्य पस्तीस हजारापेक्षा कमी नव्हते. मोगलांचे सैन्य तीन हजारापेक्षा अधिक नव्हते.'

बादशाही छावणीतून रसदेसाठी अगर युद्धासाठी सैन्ये पाठविण्यात येत. त्यातील स्वारांची संख्या पाच सहा हजाराच्यावर क्वचितच असे. त्याची काही उदाहरणे पुढे दिली आहेत. ती १६९९ व १७०० या कालखंडातील आहेत.

सहा जून १६९९ : तरबियतखानाबरोबर चार हजार दोनशे स्वार, जत भागात मराठ्यांवर चालून जाण्यासाठी.
सहा जून १६९९ : छावणीभोवती गस्त घालण्यासाठी हमीदुद्दीनखानाबरोबर दोन हजार पाचशे स्वार.
सोळा जुलै १६९९ : नांदेड बीडचा सुभेदार अलीमर्दानखान याचे पत्र. 'गनिमांचे सैन्य मोठे आहे. पारिपत्याचा प्रयत्न करीत आहे.'
सहा नोव्हेंबर १६९९ : रुहुल्लाखान साताऱ्च्या दिशेने. छावणीतील त्याच्या-बरोबरचे सैन्य सात हजार नऊशे स्वार.
तीस नोव्हेंबर १६९९ : १०४९ स्वार घेऊन मुहंमद काजिम हा रुहुल्लाखानाला जाऊन मिळतो.
चार डिसेंबर १६९९ : वसंतगडच्या वेढ्यात तरबियतखानाबरोबर दोन हजार चारशे स्वार. तोफखान्यात दोन हजार प्यादे भरती करण्याची आज्ञा.
चवदा डिसेंबर १६९९ : डफळापूरच्या ठाणेदाराची अडीचशे स्वार व चारशे प्यादे यांची मागणी.
सव्वीस डिसेंबर १६९९ : रुहुल्लाखान पाचशे स्वार भरती करतो.
एक फेब्रुवारी १७०० : ब्रह्मपुरीस जाण्यासाठी फतेहुल्लाखानाबरोबर पाच हजार पाचशे ऐंशी स्वार.
दहा फेब्रुवारी १७०० : दोन हजार बुंदेले व पाच हजार पायदळ यांच्या भरतीचे प्रयत्न.
चार मार्च १७०० : हमीदुद्दीनखान कही आणण्यासाठी. खानाबरोबर सहा हजार स्वार.
तेरा मार्च १७०० : सातारा मोर्च्यावरील हल्ल्यासाठी फतेहुल्लाखानाबरोबर दोन हजार सातशे स्वार.
एकवीस मार्च १७०० : कोल्हापूरच्या ठाण्याच्या मदतीसाठी पाच हजार दोनशे स्वार.
चवदा एप्रिल १७०० : साताऱ्च्या किल्ल्याचा सुरुंग उडाला (साकी मुस्तैदखान हा त्यावेळी तेथे हजर. त्याच्या मते मोगलांची दोन हजार माणसे ठार).
सोळा मे १७०० : खंडोजी (दाभाडे) याच्या पाठलागावर मोगलांचे दोन हजार नऊशे स्वार.
एकतीस मे १७०० : बेदारबख्तापाशी पूर्वी चोवीस हजार स्वार, आता चवदा हजार.
बारा जुलै १७०० : शहाजादा आज्जमबरोबर एकोणीस हजार चारशे स्वार.
सतरा जुलै १७०० : कही आणण्यासाठी बहरामंदखानाबरोबर सात हजार

| | | |
|---|---|---|
| | | एकोणीस स्वार, मुहंमद अमीनखानाबरोबर पाच हजार एकोणचाळीस स्वार. |
| दोन ऑगस्ट १७०० | : | हणमंतराव (निंबाळकर)च्या सात हजाराच्या सैन्याच्या प्रतिकारासाठी मोगलांचे दोन हजार स्वार. सुभेदारांना पुढीलप्रमाणे सैनिक पाठविण्याची आज्ञा : काबुल दोन हजार, गुजरात, अजमीर, माळवा, आग्रा, ग्वाल्हेर, इटावा, प्रत्येकीएक हजार सैनिक, अवध पाचशे सैनिक. बक्षी |
| तेरा ऑगस्ट १७०० | : | रुहुल्लाखान याचे स्वत:चे स्वार अवघे सातशे. |
| एकोणतीस ऑक्टो. १७०० | : | मराठे मायनी (खटाव तालुका) येथे बादशाही छावणी-जवळ. त्यांच्यावर चालून जाण्यासाठी रुहुल्लाखानाबरोबर नऊ हजार स्वार, पाचशे पायदळ व शंभर बर्कंदाज. |
| पाच डिसेंबर १७०० | : | जीनतुन्निसा बादशहाला भेटून परत ब्रम्हपुरीला. बरोबर चार हजारचे संरक्षक पथक |
| अकरा डिसेंबर १७०० | : | मंगळवेढा भागात मराठे. पारिपत्यासाठी १६६० स्वार, सहाशे पायदळ, पाच रेहेकले, दहा शुतरनाळ |

खुद्द बादशहाच्या छावणीतून या कालखंडात, वेळोवेळी किती सैन्य रसदेसाठी अगर लढण्यासाठी म्हणून बाहेर पडत असे, यावरून बादशाही छावणीत एक लाखाच्यावर माणसे असली तरी स्वार, पायदळ, गोलंदाज, बर्कंदाज इत्यादी मिळून तीस ते चाळीस हजाराहून अधिक असतील असे वाटत नाही. बाकीची माणसे मुलकी नोकर, खालचा नोकरवर्ग, व्यापारी, बाजारातील माणसे अशी बाजारबुणग्याची दिसतात. औरंगजेबाची छावणी म्हणजे नुसती एका सेनापतीची युद्धाची जय्यत तयारी असलेली छावणी नव्हती. ती राजधानीच होती. राज्याचे सर्व खाते प्रमुख छावणीत असत. दप्तरखाना असे, महसूल, संरक्षण, न्याय, इनामे, सनदा, परराज्यांशी पत्रव्यवहार, राजदूतांच्या भेटी, सारांश राज्यास आवश्यक असलेले सर्व व्यवहार छावणीतून चालत. स्वत: बादशहा कचेरीत बसून प्रकरणे निकालात काढी. छावणीचा घेर पाच सात कोसाचा असे. छावणीत निरनिराळे अधिकारी सरदार, त्यांच्या कचेऱ्या, त्यांची पथके, सैनिक शिपायांची बायकामुले, नोकर-चाकर, धान्याचा बाजार (याला शहागंज म्हणत) इत्यादींची गर्दी असे. हत्ती, घोडे, गाडया तोफा इत्यादी कारखाने छावणीत असत. छावणीच्या मुख्य व्यवस्थापकाला 'कोतवाल' म्हणत. धान्यबाजारच्या व्यवस्थापकाला 'करोडी' म्हणत.

छावणीच्या मधोमध बादशहाची कचेरी व निवासस्थान असे. याला दौलतखाना म्हणत. निवासस्थानात दिवाणे आम, दिवाणे खास, अंत:पुर इत्यादी असत. निवासस्थानाचा घेर निदान एक कोसाचा असे. त्याच्या भोवती लाकडी फळयांचे कंपौंड असे. या फळयांचा रंग गुलालाचा असल्यामुळे बादशहाच्या निवासस्थानातला 'गुलालबार' म्हणू लागले. छावणीचे मराठयांच्या हल्ल्यापासून रक्षण करण्यासाठी छावणीच्या भोवती मातीच्या

भिंती उभ्या करीत अगर ते नच जमले तर काटेरी कुंपण घालीत.

बादशहाचे स्वःतचे सैन्य असे थोडे असे. पण जे काही पाच सात हजार स्वारशिपाई असतील त्यांना खास चौकीचे स्वार म्हणत. बादशहाच्या निवासस्थानाभोवती चार पाच हजार स्वारांचा पहारा असे. पहाऱ्याचे काम प्रतिष्ठित उमरावांकडे पाळी पाळीने देण्यात येई.

अखबारामधील नोंदींचे स्वरूप : या कालखंडातील (१६९९–१७००) मोगल मराठा संघर्षातील महत्त्वाच्या घटना म्हणजे किल्ले घेण्यासाठी बादशहाचे प्रयाण, राजारामाची फसलेली वऱ्हाडाची मोहीम, सातारा व परळी या किल्ल्यांचे वेढे, धनाजी जाधव आदि सरदारांचे बादशाही छावण्यांवर धाडशी हल्ले, राजारामाचा मृत्यू, सुरुंग उडून दोन हजार माणसे मृत्युमुखी पडल्यामुळे मोगल सैन्यात उडालेला हाहाःकार, सातारा ते भूषणगड पर्यंत पावसापाण्याने व मराठ्यांच्या आक्रमणांनी झालेले मोगलांचे हाल, एक ऑक्टोबर १७०० च्या माण नदीतील पुरमुळे झालेली मोगल छावणीची वाताहत या होत.

रोजचे अखबार लिहून झाल्यावर ते बादशहांना दाखविण्याचा शिरस्ता असल्यामुळे, अखबार लिहिणाऱ्यांना फार जपून लिहावे लागे. काही दुर्घटनांचा उल्लेख जवळ जवळ टाळण्यात आला आहे. उदाहरणार्थ, खवासपूर येथे माण नदीला पूर येऊन मोगल छावणीची वाताहत झाली तिचा उल्लेख. काही गोष्टींचा उल्लेख अगदी सौम्यपणे करण्यात आला आहे. काही वेळा बादशहांनी कुणाची कानउघाडणी केली अगर कुणाशी गुप्त खलबते केली तर, 'चीजे इर्शाद फर्मूदंद : 'काही गोष्टी सांगितल्या' असे मोघम शब्द वापरले आहेत. ब्रह्मपुरीहून निघण्यापूर्वी बादशहांनी काही दिवस अखबार लिहिण्यावरच बंदी घातली होती. बातम्या फुटू नयेत म्हणून ही काळजी घेण्यात आली होती.

नुसत्या अखबारावरून प्रत्यक्षात काय घडले याचा अंदाज बांधणे अशक्य नसले तरी अवघड झाले असते. सुदैवाने याच काळात बादशहाच्या निकट असलेल्या मंडळींपैकी काहींनी पुढे आपले अनुभव लिहून काढले. त्यावेळी औरंगजेब जिवंत नव्हता. यामुळे वरील लेखकांच्या लिहिण्यात एक प्रकारचा मोकळेपणा आला आहे आणि काही संदिग्ध घटनांवर चांगला प्रकाश पडतो.

## मासिर आलमगीरी

'मासिरे आलमगीरी' म्हणजे औरंगजेबाचे कर्तृत्व, औरंगजेबाचे चरित्र. या ग्रंथाचा लेखक साकी मुस्तैदखान हा औरंगजेबाच्या निकट छावणीत असून दक्षिणच्या मोहिमेत सतत बादशहाच्या जवळ होता. सातारा, परळी, पन्हाळगड, विशाळगड इत्यादींच्या मोहिमेत त्याने छावणीतील इतर माणसाप्रमाणेच हाल सोसले. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर एकदोन वर्षाच्या आत साकी मुस्तैदखानाने औरंगजेबचरित्र लिहून संपविले. या ग्रंथाचे इंग्रजी, उर्दू व मराठी अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत. (मी केलेला अनुवाद, मराठे व औरंगजेब, प्रकाशन ज्ञानराज प्रकाशन ४२१ शनिवार पेठ, पुणे २.)

कुठे अखबारा मधील अतिसौम्य भाषा, आणि कुठे साकी मुस्तैदखानाच्या ग्रंथातील मोगल दुर्दशेची वर्णने. एकदोन उदाहरणे पहा :— सातार्‍याच्या वेढयात सुरुंग उडून तट मोगलांवर कोसळला त्याबद्दल मुस्तैदखान म्हणतो:

'काही वेळाने किल्ल्यातील मराठे त्या जागी आले. आणि बंदुकी झाडून गोळयांचा वर्षाव करू लागले. मोगलांचा दमदुमा मोडून पडला होता. त्यांच्या तोफा ठिकठिकाणी पडल्या होत्या. मोगल सैनिकांनी लढण्याचे सोडून दिले होते. मराठयांशी लढू शकेल असा तेथे कोण होता . . . मोर्चे येथून तेथपर्यंत लाकडाचे होते. बहेलियांनी रात्रीच्या वेळी कुणाला न कळत मोर्च्यांना आगी लावल्या. ही आग सात रात्री सात दिवस सारखी जळत होती. त्या भयंकर आगीला विझवू शकेल इतके पाणी तेथे कोठून मिळणार. ढिगार्‍यात सापडलेले सगळे हिंदू आणि ज्यांना काढण्यास अवधी मिळाला नाही असे काही मुसलमान हे सगळे जळून खाक झाले. धन्य आहे या विश्वरूप अग्निकुंडाची.'

परळीच्या वेढयाच्या वेळी पाऊस सारखा पडत होता. मुस्तैदखान म्हणतो : 'पण पाऊस धोधो पडत होता आणि लष्करात धान्याची व चार्‍याची कमालीची टंचाई होती. त्या भयंकर परिस्थितीबद्दल मी काय आणि कसे लिहू? परिस्थितीच्या चित्रणाची नुसती कल्पना केली तरी माझ्या प्रतिभेचा झरा एकदम आटून जातो . . . काळे मेघ रात्रंदिवस वर्षत होते. अनाथांच्या नेत्रातून अश्रूंची अखंड धार लागावी तसा रात्रंदिवस पाऊस पडत होता.'

परळी घेतल्यानंतर औरंगजेब तेथून भूषणगडकडे (खटाव–तालुका) जाण्यास निघाला. साकी मुस्तैदखान म्हणतो : 'प्रवासाचे खडतर कष्ट सहन करण्याची त्यांच्यात (मोगल फौजेत) ताकद राहिली नव्हती. पण बादशहाला लोकांच्या हिताची काळजी आहे. बादशहाने काळजी घेतली नसती तर त्या भयंकर प्रदेशातून एक मनुष्यही जिवंत बाहेर पडला नसता.'

खवासपूर येथील दुर्घटनेबद्दल मुस्तैदखान म्हणतो : 'लोक गाढ निद्रेत होते. एकाएकी त्यांना जाग आली. तों काय, चहूकडून पाण्याचा पूर आला आहे. माणसे ही पाण्यातील जनावरे बनल्यासारखी दिसू लागली. तंबू तर पाण्यातील बुडबुडे बनले. असंख्य माणसे आणि जनावरे पाण्यात बुडून मेली. अजून रात्र शिल्लक राहिली असती आणि पूर दिवसाच्या चार पाच घटकेपर्यंत चालू राहीला असता तर एक मनुष्यही जिवंत राहिला नसता. . .जे राहिले ते आपली जागा कुठे सापडते का हे पाहू लागले. तो त्यांच्या निवासस्थानाचा पत्ताच लागेना. आपल्या मालमत्तेवर पाणी सोडून ते रडत ओरडत सर्व दिशांनी धावू लागले.'

अशी वर्णन आपल्याला अखबारामध्ये आढळणार नाहीत.

सातारा किल्ला आपण हां हां म्हणता घेऊ अशी बादशहाची समजूत होती. राजारामच्या मृत्यूने तर तो हर्षभरित झाला. बारा मार्च रोजी ताराबाईने सात किल्ले देऊन टाकण्याच्या अटीवर तडजोड व्हावी अशी इच्छा दाखविली होती. तीत काल-हरणाचाही हेतु असावा. आपल्या दोन्ही मुलांना सात हजारी मन्सब, राजा या पदव्या, दरबारात हजेरीची माफी व दक्षिणच्या सुभ्याची देशमुखी अशा तिच्या काही अटी

होत्या. परंतु औरंगजेबाने या अटी धुडकावून लावल्या. त्याने एकच उत्तर दिले. "हमाकिला बदहंद : सर्वच्या सर्व किल्ले दिले पाहिजेत."

मोगलांच्या दृष्टीने ही एक फार मोठी घोडचूक होती. ताराबाईच्या अटी मनापासून केलेल्या नव्हत्या असे जरी मानले तरी औरंगजेबाने अटी मान्य करून मराठ्यांचे राजकारण उघडे करावयास हवे होते. बरे, तह व्हावा असे ताराबाईला खरेच वाटत होते तर त्या मान्य केल्याने मराठ्यात फूट पडण्याची शक्यता होती. तिचा औरंगजेबाने उपयोग करून घेतला नाही. याला कारण त्याची अदूरदृष्टि आणि अहंकार. मराठ्यांचा प्रश्न लष्करी दृष्टीने सोडविता येणार नाही, तो राजकीय दृष्टीनेच सोडवावा लागेल हे त्याला शेवटपर्यंत उमगले नाही.

पण सातार्‍याला चवदा एप्रिल (१७००) सुरूंग उडून मोगलांकडील दोन हजार माणसे ठार झाली. औरंगजेब हादरला. शहाजादा आज्जम व रुहुल्लाखान यांनी मध्यस्थी करून किल्ले मिळवून दिले. ते अर्थातच औरंगजेबाच्या सांगण्यावरून. पण असे लिहिणे बादशहास कमीपणाचे वाटेल म्हणून अखबारामध्ये औरंबजेबाच्या अगतिकतेचा उल्लेख गाळण्यात आला आहे. *मासिरे आलमगिरी* मध्ये आज्जमच्या सल्लामसलतीने गोष्टी घडत असा उल्लेख आहे. मराठ्यांची थोडी बहुत कागदपत्रे जी मिळतात तीतून तडजोडीच्या बोलण्याचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे:—

(*रेकॉर्डस ऑफ द शिवाजी पीरियड*, संपादक, सरकारी दप्तरखान्याचे संचालक, मुंबई, पान १९६ परशुरामपंताचे चांदजीराव पाटणकर यांना पत्र चवदा एप्रिल १७००). ' इकडील वर्तमान तर औरंगजेबाने अजी पावेतो सातारे यास जो इलाज करावयाचा तो केला. परंतु काहीच न चाले या करिता हाली सद्य प्रसंगाचे राजकारण लावणे म्हणवन रोहिलाखानास हुकुम करून त्याचे तर्फेने राजश्री विठोजी पाटील आमचे भेटीस पाठविले. पातशहाचा आदर देखोन आम्ही राजश्री अंताजी आपदेव यास पातशहाचे भेटीस पाठविले आहेत. त्याची भेटी होऊन पुढे जो प्रसंग होऊन येईल तो तुम्हास लिहून पाठवून देऊ.'

## अहकामे आलमगीरी

हमीदुद्दीनखान हा औरंगजेबाचा विश्वासू कारभारी. तोही शेवटपर्यंत औरंगजेबाबरोबर होता. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्याने औरंगजेबासंबंधीच्या काही आठवणी लिहून काढल्या आहेत. *ॲनिक्डोट्स ऑफ औरंगजेब* या नावाने यदुनाथ सरकार यांनी त्या ग्रंथाचे भाषांतर केले आहे. अखबारांमधील ज्या घटनांचा उल्लेख मोघम आला आहे त्यापैकी काही घटनांवर तरी आठवणीमुळे झगझगीत प्रकाश पडतो. सातार्‍याला काही युद्ध कैदी पकडले. त्यांना मारावे असा निर्णय काजींनी दिला. तो निर्णय अमलात आणला गेला. इतकाच उल्लेख अखबारा मध्ये आहे. आता त्यावेळी छावणीत हजर असलेला हमीमुद्दीन वरील घटने संबंधी काय म्हणतो पहा : 'काजी मुहंमद अकराम याने बादशहास असा सल्ला दिला की कुराणाच्या कायद्याप्रमाणे हिंदू कैद्यांनी मुसलमानी

धर्म स्वीकारल्यास त्यांना सोडून देण्यास हरकत नाही. मुसलमान बंद्यांना तीन वर्षांची सजा देण्यात यावी.

या कज्जामाच्या कागदावरबादशहाने लिहिले 'काजीने दिलेला हा निर्णय इस्लामी व्यवहार धर्मशास्त्राच्या हनफी परंपरेला अनुसरून आहे. पण इस्लामी व्यवहार धर्मशास्त्रात चार परंपरा (हनफी, शाफी, मलिकी, हंबाली) या सारख्याच महत्त्वाच्या मानल्या जातात. राज्यावरचा आमचा ताबा सैल होणार नही. हे लक्षात घेऊन निर्णय द्या.' झाले. काजींनी आपले दुसरे मत पुढीलप्रमाणे दिले ते असे :— 'फतवाई आलमगीरी (फेसलॉ, म्हणजे पुर्वीचे निर्णय एकत्र करून व संपादून, औरंगजेबाच्या आज्ञेने तयार केलेला ग्रंथ)च्या आधारावर असे मत आहे की, लोकांना जरब बसावी म्हणून हिंदू आणि मुसलमान अशा दोन्ही कैद्यांचा वध करण्यात यावा.'

वरील निर्णयाची अंमलबजावणी करण्यात आली आणि सूर्यास्तापूर्वी कैद्यांची डोकी बादशहासमोर आणण्यात आली. पण अखबारा मध्ये हा तपशील आढळत नाही. हमीदुद्दीनने हा प्रकार आपल्या डोळ्यांनी पाहिलेला. त्यान दिलेली वरील आठवण अधिकृत मानली पाहिजे. या प्रकरणांवरून औरंगजेबाच्या मनोवृत्तीवर जो प्रकाश पडतो त्यावर वेगळे भाष्य करण्याची आवश्यकता नाही.

### भीमसेन सक्सेना

भीमसेन सक्सेना हा प्रथम मोगलांच्या चाकरीत होता. नंतर तो दतियाचा राजा राव दल्पत बुंदेला याचा चिटणीस म्हणून काम करू लागला. राव दल्पत हा जुल्फिकारखानाच्या सैन्यातील अधिकारी. भीमसेनच्या आत्मचरित्रात (*तारीखे दिलकुशा*, याचे इंग्रजी व मराठी अनुवाद प्रसिद्ध झाले आहेत.) मोगल मराठे संघर्षातील अनेक घटनांची वर्णने आली आहेत. जुल्फिकारखानाने धनाजी जाधवाचा पाठलाग करण्यात महाराष्ट्रात दोन हजार कोसाची पायपिटी केली. या मोहिमेत भीमसेन हजर होता. बादशाही छावणीतही कित्येक वेळा जात येत असे. त्याच्या आत्मचरित्रावरून मोगल मराठे यांच्या हालचालीवर बराच प्रकाश पडतो. काही उदाहरणे पहा. भिमसेन म्हणतो:

'धनाजी वगैरेंनी ब्रम्हपुरीजवळ धाडसी आक्रमणे केली. जुल्फिकारखान हा ताबडतोब पोहोचला नसता तर त्यांनी खूपच धुमाकूळ उडविला असता. पण त्याच दिवशी जुल्फिकारखान ब्रम्हपुरीला पोहोचल्यामुळे मराठे तिकडून निघून गेले.'

बादशाही छावणीतील मराठ्यांच्या धुमाकुळाबद्दल तो लिहितो:

'मराठे परत फिरले आणि बादशाही छावणी जवळ येऊन ठेपले. त्यांनी छावणीच्या गंज भागात धुमाकुळ घातला. त्यांचा प्रतिकार करण्यास पुरेशी तुकडी बाहेर पडली नाही. पण बादशहाच्या भाग्यात शत्रूचा मोड व्हावा असेच आहे म्हणून मराठे पळून गेले.'

मोगल उमरावांच्या मनोवृत्तीवर प्रकाश पडणारी ही घटना पहा :

'वसंतगडाजवळ मराठ्यांची आणि मोगल फौजची निकराची लढाई झाली. (दहा जानेवारी १७००.) मोगलांना जय मिळाला. बक्षी बहरामंदखान (जुल्फिकारखानाचा बाप व पंतप्रधान असदखान याचा मामेभाऊ) आणि इतर मोगल सरदार हे युद्ध संपल्यावर हजर

झाले. बहरामंदखानाने जुल्फिकारखानाला विनंती केली की : हा विजय मी (बहरामंदखान) मिळविला आहे असे आपण बादशहाला कळवा. त्याचे म्हणणे जुल्फिकारखानाने उदारपणे कबूल केले. बहरामंदखानाने आपण ही लढाई जिंकली असे बादशहाला सांगितले. बादशहाने त्याच्यावर आणि त्याच्या सहकाऱ्यांवर कृपेची खैरात केली.'

मराठ्यांच्या धावपळीच्या युद्धाचा परिणाम (इ. स. १७००) म्हणून भीमसेन लिहितो:

'मोगल सैन्यातील घोडी अगदी गळून गेली होती. त्यांच्या अंगात चालण्याचे सामर्थ्यच राहिले नव्हते. पुष्कळ स्वार पायउतार होऊन चालू लागले. . . इतक्यात पावसाळ्याला सुरवात झाली. भयंकर पावसामुळे घोडी, जनावरे नष्ट झाली. लष्करातील सामानसुमान वाहणाऱ्या जनावरांचे हाल तर विचारू नका. लष्करच्या पिछाडीच्या सैन्याला चालण्याशिवाय काही काम नव्हते. या सततच्या चालण्यामुळे लष्करातील हत्ती लंगडू लागले. या मोहिमेत माझे (ग्रथंकार भीमसेन) पण घोडे आणि उंट निकामी झाले.'

## मराठ्यांचा माळव्यात प्रवेश

अखबारा मध्ये या घटनेचा उल्लेख नाही. बादशहा साताऱ्याच्या वेढ्यात आणि मराठे माळव्यात (१६९९-१७००). मोगलांच्या भवितव्याच्या दृष्टीने ही भयंकर घटना होती. भीमसेनने ही घटना नमूद केली नसती तर आपल्याला तिचा पत्ताच लागला नसता. तो म्हणतो :

'याच सुमारास (१६९९-१७००) कृष्णा सावंत हा मराठा सरदार पंधरा हजार स्वारांनिशी नर्मदा पार झाला. त्याने धामूनी (मध्य प्रदेशातील सागर या गावाच्या उत्तरेस) या गावाजवळच्या प्रदेशात धामधूम उडविली. त्यानंतर तो परत फिरला. मुसलमान सुलतानाच्या काळापासून आजपर्यंत मराठे कधीच नर्मदा पार झाले नव्हते.'

## खाफीखान

औरंगजेबाने साताऱ्याला वेढा घातला त्यावेळी खाफीखान हा आपला मित्र व मोगल अधिकारी मुरादखान याच्याबरोबर गुजरातेत गोध्र्याला असावा. त्यामुळे या कालखंडासंबंधीची खाफीखानाच्या ग्रंथातील बरीच माहिती इतर ग्रंथावरून घेतलेली दिसते. जानेवारी १७०० मध्ये मुरादखान हा मिरजेला पोहोचल्यानंतर खाफीखानाच्या हकीकतीतील बराच मजकूर मुरादखानाच्या अनुभवावर आधारलेला आढळतो.

## अखबारात

पण घटना, व्यक्ती या संबंधीची माहिती अखबारामध्ये येते ती भीमसेन काय, ईश्वरदास नागर काय किंवा खाफीखान काय, यांच्या मानाने अधिकृत समजावी लागेल. याची दोन उदाहरणे देतो. कंधार (नांदेड जिल्हा) चा किल्लेदार शम्सुद्दीन अहमद हा साताऱ्याच्या वेढ्यात मारला गेला असे भीमसेन लिहितो. पण अखबारावरून असे दिसते की, शम्सुद्दीन अहमद हा तेवीस जानेवारी १७०० च्या मिरजेच्या लढाईत मारला गेला. साताऱ्याच्या वेढ्यात नव्हे.

ईश्वरदास नागरने सातारा व परळीचे विजय म्हणजे गाजिउद्दीन फिरोजजंग

याच्या कर्तबगारीची फळे म्हणून सूचित केले आहे. वास्तविक पाहता गाजिउद्दीन फीरोजजंग (भावी निजामुल्मुल्काचा बाप) हा त्यावेळी वऱ्हाडात आहे. कमरुद्दीन (भावी निजामुल्मुल्क) याने साताऱ्याच्या वेढ्यात भाग घेतला नाही. पण तो परळीच्या वेढ्यात हजर होता. असे गैरसमज दूर होण्यासाठी सातारा व परळी येथील वेढ्यात हजर असलेल्या काही लहान मोठ्या मोगल अधिकाऱ्यांची नावे येथे देणे वावगे होणार नाही.

### साताऱ्याच्या वेढ्यात

शहाजादा आज्जम, बक्षी मुखलिसखान, हमीदुद्दीनखान, तरबियातखान, फतेहुल्लाखान, मुनीमखान, रुहुल्लाखान, मन्सूरखान, बाजीराव डफळे (जतचे), मतलबखान, इत्यादि.

### परळीच्या वेढ्यात

शहाजादा आज्जम, चीनकुलीजखान (भावी निजामुल्मुल्क), फतेहुल्लाखान, ओछर्याचा राजा अवधूतसिंग, मन्सूरखान, बीकानेरचा राजा सुजानसिंग, फतेहुल्लाचा मुलगा फकीरुल्ला, रुहुल्लाखान, मतलबखान, बहरामंदखान, मुखलिसखान, शहाजादा वालाजाह, शमशेरबेग, मुनीमखान, तरबियतखान.

आता अखबारा मध्ये चुकीच्या बातम्या आल्या नाहीत असे नाही. रामचंद्र पंतांचा वध, ताराबाईचा मुलगा शिवाजी याचा मृत्यू अशा बातम्या उघड उघड हेरांनी दिलेल्या अफवांवर आधारल्या आहेत. साताऱ्याचा किल्लेदार सत्रसाल राठोड याचा सत्रसाल बुंदेला असा उल्लेख लेखकांच्या गफलतीमुळे झालेला दिसतो. पण अशी उदाहरणे थोडी आहेत. अखबारामुळे मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनात, तपशिलांच्या दृष्टीने चांगलीच भर पडली पडली आहे. मोगलांच्या हालचालीचे बारीकसारीक तपशिल अखबारा मध्ये दिलेले असल्यामुळे जिंजीपासून नर्मदेपर्यंत आणि हैद्राबादे पासून पश्चिम किनाऱ्यापर्यंत सुमारे तीन लाख चौरस मैलाच्या प्रदेशात चाललेल्या त्या काळच्या धुमश्चक्रीची कल्पना येऊ लागते. मोगलांचे तडफदार सरदार शहाजादा बेदारबख्त, जुल्फिकारखान, गाजिउद्दीनखान फीरोजजंग, चीनकुलीजखान (भावी निजामुल्मुल्क), दाऊदखान पन्नी, रावदलपत बुंदेला, रामसिंग हाडा, कान्होजी शिर्के, नागोजी माने, मातबरखान, अवधूतसिंग यांची नावे आपल्याला जशी समजतात तशी मराठ्यांच्या तर्फे लढणारे ताराबाई, रामचंद्रपंत, परशुरामपंत, शंकराजी नारायण, धनाजी जाधव, हणमंतराव, नेमाजी शिंदे, खंडोजी दाभाडे, परसोजी भोसले, शहाजी निंबाळकर, दादो मल्हार, राणोजी घोरपडे, बहिर्जी हिंदूराव घोरपडे इत्यादींची नावे ही आपल्याला अखबारावरून समजतात.

### औरंगजेब

प्रस्तुत कालखंडातील अखबारता हे १६८५ ते १६९६ मध्ये त्रोटक व १६९९ ते १७०० मध्ये सलग आहेत. केवळ यावरूनच औरंगजेबाचे स्वाभावविशेष दिले तर ते चित्र अपूर्ण ठरण्याचा संभव आहे. पण या दोन वर्षातील घटनांवरून त्याच्या स्वभावाचा थोडाबहुत अंदाज करता येणे शक्य आहे.

### धर्मनिष्ठ व कर्मनिष्ठ

औरंगजेबाचे जीवन आगदी साधे होते. मोगल बादशहांच्या छानछोकीची, वैभवाची वर्णने त्याला लागू पडत नाहीत. पाच वेळचे नमाज, रमजानचे उपास, इत्यादी कर्तव्ये तो बजावीत असेच. याशिवाय जप जाप्य, आणखी उपास तपास, मौन, इत्यादी कडक वाटणारी बंधनेही तो कसोशीने पाळी. हे पाहिले तर तो मनानेच धर्मनिष्ठ असला पाहिजे. त्याच्यात दांभिकतेचा भाव होता असे वाटत नाही. इस्लाममध्ये इतर धर्मातील काही परंपरा घुसल्या आहेत. त्या दूर झाल्या पाहिजेत असे त्याचे मत असावे. जुल्फिकार-खानाच्या लग्नात मुंडावळ तुम्हीच बांधून घ्या (सेहरा बंदी) असे तो म्हणतो. या मागे ती परंपरा बिगरइस्लामी अत एव त्याज्य असेच त्याला सुचवायचे असावे. अकबरचा उदारमतवाद याचे विरुद्ध टोक म्हणजे औरंगजेबाचा इस्लामबद्दलचा अभिमान होय. एम. अतहरअली सारखे अलीकडील इतिहासकार यालाच 'ऑर्थोडॉक्स नेचर' या सौम्य नावाने संबोधतात.

मूर्तिपूजा कुराणाला अजीबात मान्य नाही. फार काय पैगंबराची काही स्मृति-चिन्हे (आसारे शरीफ, हजरत बाल म्हणजे हजरत सरोवरातील अवशेषाप्रमाणे), दर्गे, रोजे, साधु फकीरांच्या समाध्या इत्यादींचा गाजावाजाही कट्टर कुरण भक्तांना मान्य नाही. पण औरंगजबाची अजमेर, गुलबर्गा, बुऱ्हाणपूर, सिरहिंद, खुल्दाबाद इत्यादी स्थळातील औलियांच्याबद्दल बरीच श्रद्धा होती. इतकेच नव्हे तर त्याने छावणीत प्रेषिताची काही स्मृतिचिन्हे आणून ठेवली होती. तिला तो प्रदक्षिणा घाली. तेथे कुराण पाठक बसविलेले असत. त्या ठिकाणी अखंड कुराण पठण चाले. अशा प्रदक्षिणा, आणि स्मृतिचिन्हांचा गाजावाजा ही खऱ्या धर्मनिष्ठांच्या आचारात बसत नाहीत. मग या पुरता तरी औरंगजब परंपरावादी बनला असे म्हणावे लागेल.

औरंगजब हा इस्लाममधील सुन्नी हनफी पंथाचा होता. अद्वैतवादी सूफी, शिया पंथीय इत्यादींबद्दलही त्याच्या मनात अढी होती. याबद्दल हवी तितकी उदाहरणे त्याच्या चरित्रात मिळतील.

हिंदुस्थानातील मुस्लीम विचारवंतांमध्ये दोन प्रवाह चालत आलेले आहेत. उदार-मतवादी परंपरेत सूफी, अमीर खुस्रो, अकबर, अबुल्फजल, फैजी, मुहीबल्ला, दाराशुकोह इत्यादी मंडळी येतात. उलट इस्लामचे वर्चस्व राजकीय व सामाजिक दृष्टींनी टिकवायचे असेल तर त्याचे स्वरूप शुद्ध राहिले पाहिजे, इतर संस्कृतीची त्यात भेसळ होता कामा नये, सर्व धर्म सारखेच आणि समान आहेत ही भाषा टाकून दिली पाहिजे असे म्हणणारा एक वर्ग होता. या वर्गाचे पुढारीपण मुजद्द सरहंदीच्या घराण्याकडे होते. आणि औरंगजेब या घराण्याचा कट्टर शिष्य होता. यात सर्व काही आले.

औरंगजेबाचा धर्माभिमान कितीही तीव्र असला तरी उठसूट धर्मांतरे घडवून आणणे हे अशक्य आहे याची त्याला जाणीव असावी. पण त्याने आपले जे राजकीय धोरण आखले ते अकबराच्या धोरणाहून अगदी भिन्न होते. इस्लामामुळे आपली सत्ता

दृढ व्हावी व आपल्या सत्तेमुळे इस्लामचे राजकीय सांस्कृतिक वर्चस्व जनमानसात ठसावे या धोरणानेच त्याचे राजकारण चालत होते. मोगल राजकारणातील रजपुतांचे पारडे जड होत आहे असे त्याला वाटले. त्यांचे महत्त्व नाहीसे करण्याचा त्याने आ-मरण प्रयत्न केला. जोधपूर खालसा केल्यामुळे राजस्थानातील रजपूत बिथरले होते. औरंगजेबाच्या दक्षिणच्या मोहिमेत रजपूत सैनिक सरदारांची संख्या दुर्लक्ष करण्या-इतकी कमी झाली होती. बुंदेले रजपूत त्याच्या सैन्यात आढळून येतात ते ओर्छा व दतिया येथील राजांच्या मुळे. पण बुंदेल खंडातील छत्रसालाच्या विरोधामुळे त्यांची ही संख्या मर्यादितच राहिली. जयसिंग व जसवंतसिंग यांच्या मृत्यूनंतर औरंगजेबाच्या हयातीत एकाही रजपुताला मोठा हुद्दा मिळाला नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

औरंगजेबाची मराठ्यांविरुद्ध मोहीम अपेक्षेविरुद्ध लांबली. राजकारण म्हणून मराठे सरदारांना आपल्याकडे ओढण्यासाठी औरंगजेबाने त्यांना मन्सबी दिल्या. पण स्वतंत्र मोहिमा त्यांच्याकडे सोपविल्या नाहीत अगर त्यांना हुद्दे दिले नाहीत. कट्टर इस्लामी वर्गाला आपल्याकडे ओढल्याने आपली सत्ताही दृढ होईल व इस्लामचे राजकीय वर्चस्व प्रस्थापित होईल अशी त्याची चुकीची समजूत होती. मराठ्यांविरुद्ध युद्ध म्हणजे काफराविरुद्ध जिहाद अशी केविलवाणी घोषणा तो करतो. पण त्याचे सरदार आणि सैनिक या युद्धाला मनातून कंटाळले होते. औरंगजेबाच्या घोषणांचा त्यांच्या मनावर काही परिणाम होईना.

### औरंगजेबाची तक्रार

अखबारामधील आठ फेब्रुवारी १७०० ची नोंद मोठी उद्बोधक आहे. त्यावेळी बादशहा सातान्याच्या वेढ्यात गुंतला होता. "रात्री बादशहांनी काजी मुहंमद अक्रम याला आपल्या शय्यागृहात बोलाविले. बादशहा त्याला म्हणाले. "बसा" काजी अक्रम एका कोपऱ्यात बसला. बादशहा आपल्या जागेवरून उठून त्याच्यापाशी येऊन बसले आणि म्हणाले, "रमजानचा महिना आणि ईद ही सोलापुरात पार पाडावी अशी माझी इच्छा होती. पण माझे अधिकारी बादशाही काम मनःपूर्वक करीत नाहीत. मी असंख्य वेळा ताकीद करतो पण त्याचा काहीच परिणाम होत नाही. बादशहा दोन घटकापर्यंत आपल्या अधिकाऱ्यांची गाऱ्हाणी सांगत होते. या नंतर त्यांनी काजी अक्रमला आपल्या तंबूकडे परतण्यास निरोप दिला."

### स्वभावाच्या छटा

अखबारात पाहता औरंगजेब हा मितभाषी असावा. मैफिली, गाणीबजवणी, इत्यादींना त्याच्यापाशी थारा नव्हता. उलट दरवेश, फकीर, औलिया इत्यादींचा सह-वास त्याला आवडत असावा.

त्याची कामाची हौस विलक्षणच म्हणावी लागेल. तसेच काही महत्त्वाचे कारण घडले तरच त्याची न्यायदानाची कचेरी बंद राही. नाहीतर औरंगजेब सतत कामात

गढून गेलेला दिसतो. इतके मोठे साम्राज्य, पण त्याचे सगळीकडे लक्ष असे आणि तेही बारकाईचे. त्याचे हेरखाते फार कार्यक्षम असले पाहिजे. त्याच्या अधिकाऱ्यांचे वृत्तांत आणि त्यावर औरंगजेबाचे तडफेचे निकाल आपल्याला अखबारामध्ये जागोजाग आढळतील.

धैर्य, साहस व जिद्द हे औरंगजेबाचे स्वभावविशेष म्हणावे लागतील. साताऱ्याच्या मोर्च्यातील त्याचे वर्तन, परळीच्या विजयानंतर मोगल सैन्य सुरक्षितपणे बाहेर काढण्यात त्याने दाखविलेली जिद्द ही काही उदाहरणे म्हणून सांगता येतील.

तसेच त्याच्या संयमाबद्दल म्हणता येईल. तो सदा गंभीर व विचारमग्न दिसतो. तो कधी खळखळून हसला अगर त्याने कधी अपार शोक केला असे त्याच्या अखबारा मध्ये दिसून येत नाही. फार झाले तर एखाद्या आनंददायी घटनेवर तो हलके स्मित करी किंवा आफरीन, वाहवा, छान, इतके म्हणे. शोक प्रसंगी परमेश्वरी इच्छेपुढे इलाज नाही इतकेच उद्गार तो काढी. साताऱ्याचा वेढा चालू असताना एका अधिकाऱ्याने वाघिणीची शिकार केली त्यावेळी 'शकुन तर छान झाला' हे उद्गार त्याने काढले.

तो रागावला असे प्रसंगही मोजकेच दाखविता येतील. तो वसंतगडचा किल्ला पाहण्यास गेला तेव्हा प्रवेश द्वारावर मोगल सैनिकांनी एकच गर्दी केली. ती त्याला आवडली नाही. त्यावेळी तख्ते रवांवरून उतरुन त्याने काहींना आपल्या हाताने चापट्या लगावल्या अशी गंमतीची नोंद अखबारा मध्ये आहे. मराठ्यांच्या सततच्या हल्ल्यामुळे कातावून यापुढे त्यांचा उल्लेख गनीम, शत्रू, असा न करता, चोर(दुज्दान) असा करावा ही त्याची आज्ञा म्हणजे चिडखोरपणाचे एक उदाहरण म्हणून सांगता येईल. युद्धात मेलेल्या मराठ्यांच्या डोक्यांचा मनोरा रचणे, हे आणखी एक उदाहरण.

आपल्या मुलांच्या बाबतीत औरंगजेब फार सुखी होता असे दिसत नाही. त्याचा सर्वात मोठा मुलगा मुहंमदसुल्तान हा कैदेतच मेला. दुसरा मुलगा शहाजादा मुअज्जम हाहि १६८७ पासून १६९५ पर्यंत नजरकैदेत होता. तिसरा मुलगा आज्जम हा तडफदार पण तापट आणि महत्त्वाकांक्षी होता. या कालखंडात मुअज्जम हा काबुलच्या सुभेदारीवरीवर होता. आज्जम हा सातारा व परळी येथील वेढ्यात औरंगजेबाबरोबर होता. औरंगजेबाचा चौथा मुलगा अकबर हा तर बंड करून ईराणला निघून गेला होता. पाचवा मुलगा कामबक्ष हा औरंगजेबाचा लाडका. पण नादान व निष्क्रिय. हा आपल्या बापापाशी असे. त्याच्या भवितव्याची औरंगजेबाला नेहमी काळजी वाटे. आपल्यानंतर मोगल साम्राज्याचे काय होईल या विचाराने तो सतत काळजीत असावा असे दिसते.

त्याच्या पाच मुलींपैकी एक तरूण वयात वारली. दुसरी जेबुन्निसा ही दिल्लीला कैदेत होती. दोन मुलींची लग्ने झाली होती. औरंगजेबाचे जावई म्हणजे एक दाराचा व दुसरा मुरादचा मुलगा. औरंगजेबाने त्यांना दक्षिणेत आणलेच नाही. औरंगजेबापाशी

त्याची अविवाहित मुलगी जीनतुन्निसा ही होती. अंतःपुराची सर्व व्यवस्था ही हुशार व प्रेमळ बाई पाहात असे. औरंगजेबाच्या तीन बायका, दिलरसबानू, औरंगाबादी महल, व नवाबबाई या यापूर्वीच मेल्या होत्या. फक्त एक बायको उदयपुरी बेगम, कामबक्षाची आई, ही औरंगजेबाबरोबर छावणीत होती. पण राजकारणात त्यांचा काहीच प्रभाव नव्हता.

औरंगजेबाच्या आवडी निवडी अगदी साध्या होत्या. आयुष्यभर त्याने दारूच्या थेंबाला स्पर्श केला नाही. धूम्रपानाचेही व्यसन त्याला होते असे दिसत नाही. त्याला फळांची विशेष आवड असावी. त्यातल्या त्यात आंब्यावर त्यांची बरीच आसक्ति दिसते. आंब्याचे बरेच उल्लेख अखबार मध्ये येतात. काबुलहून शहाजादा मुअज्जम हा त्याच्याकडे नासपाती, डाळिंबे, सफरचंद पाठवी. खानदेश, जुन्नर, रहिमतपूर येथून आंबे येत. औरंगबादेहून द्राक्षे येत. जुन्नरची अंजिरेही त्याला आवडत. काबुलच्या सौदागरांनी अद्याप फळे विकण्यास कशी आणली नाहीत असे तो विचारतो. कलिंगडे, अननस, नारळ या फळांचेही उल्लेख अखबारा मध्ये बरेच वेळा येतात.

फुलांचाही औरंगजेबाला बराच षौक असावा. सोलापूरचा किल्लेदार त्याला मोगऱ्याच्या वेली भेट म्हणून देतो. आपल्या प्रार्थनागृहात मोगरा लावा अशी औरंगजेब आज्ञा करतो. बागा लावणे, त्यांची निगा राखणे इकडेही त्याचे लक्ष होते. बागांचा व्यवस्थापक ख्वाजा मुहरमखान याला यासंबंधी बारीक सारीक सूचना दिलेल्या अखबार मध्ये आढळतात. औरंगाबादेत हर्सुल दरवाजाजवळ बाग तयार करण्यात आली ती त्याच्या आज्ञेनेच होय. आंबवड, खवासपूर येथे छावणीभोवती भाजीपाल्याची लागवड त्याच्या आज्ञेनेच करण्यात आली.

औरंगजेब खर्चिक नव्हता. पण सैन्याला वेळच्यावेळी पगार देण्यातही तो कुचराई करी. एक एक वर्षाची पगार बाकी म्हणजे त्याच्या छावणीतील सामान्य गोष्ट होती. त्यामुळे अधिकाऱ्यांना घेराव, पगार वाटपासाठी दंगेधोपे हे प्रकार नेहमी चालत. दरबारी शिष्टाचाराची कडक अंमलबजावणी करविणारा औरंगजेब हा आपल्या अधिकाऱ्यांतील भ्रष्टाचार, मदिरासक्ति इत्यादींकडे काणाडोळा करतो. अधिकाऱ्यांना तो शिक्षा करीत नाही. केली तरी सौम्य आणि तीही तात्पुरती. हे पाहिले म्हणजे विस्मय वाटतो.

असे हे औरंगजेबाचे स्वभावचित्र. दोन वर्षांच्या (१६९९–१७००) कालखंडाच्या अखबारामधून दिसणारे.

अखबाराच्या काही निवडक भागाचा अनुवाद श्री. ग. ह. खरे व डॉक्टर गो. त्र्यं. कुळकर्णी यांनी केला आहे. पण तो कालखंड १६६५ ते १६८५चा आहे. त्या ग्रंथात मूळ फारशी अखबारही दिले आहेत.

येथे कालखंड जो घेतला आहे तो त्या पुढचा आहे. मूळ फारसी अखबार न देता, निवडक अखबारांचा मराठी अनुवाद देण्यात आला आहे. निवड करताना केवळ मराठ्यांच्या हालचालीवर भर देण्यात आला नाही. तर मोगल मराठा संघर्षाचे परिणाम इतर

प्रांतात जाणवू लागले त्यांचीही दखल घेण्यात आली आहे. याशिवाय औरंगजेबाच्या जीवनावर, स्वभावावर, राहणीवर प्रकाश पाडतील अशा घटनाहि देण्यात आल्या आहेत. असे या अखबाराचे स्वरूप आहे.

**सेतुमाधवराव पगडी**

# एक

## २५ मे १६८५ ते २५ डिसेंबर १६९२

२५ मे १६८५

गाजीउद्दीनखान बहादुरने लिहिले ते असे : हंबीरराव वगैरे सरदार सातार्‍याच्या डोंगरात जमले होते. मी मुजाहिद वगैरेंना त्यांना तंबी देण्यासाठी तिकडे नेमले. शत्रूंपैकी अनेक जणांना ठार मारण्यात आले. शत्रूचा पराजय झाला. त्या ठिकाणी ठाणे बसविण्यात आले आहे. यावर बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली. मजुरा झाला.'

२९ मे १६८५

शिरवळचा ठाणेदार ताजखान आणि इतर यांनी मकहूर (मराठे) यांच्या युद्धात कामगिरी बजाविली. त्यांच्यावर कृपा करण्यात आली. ताजखान, त्याचा मुलगा अब्दुल-करीम, रादअंदाजखान, मुहियुद्दीनखान इत्यादींच्यावर बक्षिसे, मन्सबीची वाढ, अशी कृपा झाली.

१७ एप्रिल १६८७

शहाजादा आलीजाह मुहंमद आज्जमशहा याने बेळगावचा किल्ला जिंकून घेतल्याची अर्जी, सोन्याच्या किल्ल्या आणि एकोणीसशे अश्रफ्या नजर म्हणून पाठविल्या. बेळगावचा पूर्वीचा किल्लेदार सय्यद मुहंमद याला वस्त्रे देण्यात आली. किल्लेदार बेळगावला नेमला जाईपर्यंत फौजेच्या तोफखान्याचा दारोगा आका अलीखान याने बेळगावच्या किल्ल्याचे रक्षण करावे असा बादशहाने हुकुम केला. बादशहा म्हणाले, 'शहाजाद्याने किल्ला शस्त्रबळाने जिंकून घेतला. शाबास त्याची.'

२० एप्रिल १६८७

बेळगावच्या किल्ल्याला आजमनगर हे नाव द्यावे असे ठरले.

**७ एप्रिल १६८८**

जव्हारचा जमीनदार विक्रम पतंगराव याने संभाजीचा किल्ला कोह्ज जिंकून घेतला. त्याची अर्जी व सोन्याच्या किल्ल्या बादशहासमोर ठेवण्यात आल्या. बादशहांनी धन्योद्गार काढले.

**१२ एप्रिल १६८८**

गुल्शनाबाद(नाशिक)चा ठाणेदार असोजी याने मार्कंडगड जिंकला. त्याला फर्मान आणि वस्त्रे पाठविण्यात आली.

**१४ एप्रिल १६८८**

नुस्रताबाद उर्फ धारवाडच्या बर्कंदाजांना पगार म्हणून एक लाख रुपये द्यावे असा हुकुम झाला.

**७ ऑगस्ट १६८८**

काफर बच्चा(संभाजी)चा मुलुख जिंकून घेण्यासाठी बादशहांनी मुल्तफतखानाला ससैन्य पाठविले. मुल्तफतखानाबरोबरील प्रमुख अधिकारी :– बख्तबलंदखान, मुल्तफतखानाचा भाचा फजलुल्ला, नागोजी, पाच हजारी मन्सबदार.

नुकतेच जिंकण्यात आलेल्या सरसगड किल्ल्यावर सय्यद अब्दुल्लाखान याची नेमणूक करण्यात आली.

मुल्तफतखानाच्या फौजेत महदाजी(महादजी निंबाळकर ? )चे चारशे स्वार तैनात करण्यात यावे असा हुकुम देण्यात आला.

**९ ऑगस्ट १६८८**

सय्यद नूर मुहंमद मन्सबदार याने सय्यद अब्दुल्लाखान याची अर्जी व होलगड किल्ला(बागलाण) जिंकला त्याचे चिन्ह म्हणून सोन्याच्या किल्ल्या आणल्या. अर्जीत सय्यद अब्दुल्लाखानाने म्हटले, 'किल्ला जिंकण्यासाठी मी माझा मुलगा हसन अली याला सैन्य देऊन पाठविले होते. किल्लेदाराने लढा दिला पण त्याला युद्ध करण्यास धीर पुरवला नाही. त्याने किल्ला हवाली केला.' बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.' अब्दुल्लाखानाच्या मुलाला खान ही पदवी देण्यात आली व पाचशेच्या मन्सबीत दीडशे जात व पन्नास स्वार अशी वाढ करण्यात आली.

**२९ सप्टेंबर १६८८**

काफर बच्चा(संभाजी)चा किल्ला सामानगड जिंकल्याची बहादुरखानाची अर्जी बादशहासमोर ठेवण्यात आली. बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.'

मुल्तफतखानाचा अर्ज आला. त्यात म्हटले होते की : आपल्या फौजेत तैनात असलेला नागोजी याने सांगितले की, संभाजीच्या किल्लेदारांनी माझ्याकडे पुढील निरोप धाडला आहे :– आपण सैन्य घेऊन इकडे याल तर किल्ले बादशहाच्या स्वाधीन करू. यावर मी सैन्य घेऊन खटावहून निघालो. तेथून आठ कोसांवर संभाजीच्या मुलुखात

पोहोचलो. नारोगड (वारुगड?)च्या पायथ्याशी असलेला संभाजीचा प्रदेश उध्वस्त केला. किल्लेदार चालून आले. बादशहाच्या भाग्याने शत्रूची दोनशे माणसे आम्ही मारली आणि गुरेढोरे पकडली.

हरकाऱ्यांच्या तोंडून या संदर्भात समजले ते असे : मुल्तफतखान हा किल्ल्याच्या पायथ्याशी पोहोचला. किल्लेदार मोठे सैन्य घेऊन चालून आले. मुल्तफतखान त्यांना चकवून निघून आला.

बादशहाने बहरामंदखानाच्या द्वारे आज्ञा केली की : मुल्तफतखानाने शहाजादा मुहंमद मुअज्जम यांच्या मन्सबदारांना घेऊन हुजुरात यावे. मुल्तफतखानाबरोबर असलेले नागोजी (माने) वगैरे यांनी मुकरबखानाच्या फौजेत जावे. तशी व्यवस्था करण्यासाठी गुर्जबर्दार (दंडधारी) यांना पाठविण्याची आज्ञा झाली.

अब्दुलकादर (हाच पुढे मातबरखान म्हणून प्रसिद्ध झाला) हा केडल(?)चा ठाणेदार होता. त्याने पुढील अर्ज पाठविला :-

मी बारा जिल्काद (ऑगस्ट अखेर, १६८८)ला माझ्या ठाण्यावर पोहोचलो. कोकणचे जमीनदार मला येऊन भेटले. संभाजीचा माहुलीचा किल्लेदार याने माहुलीचा किल्ला बादशहाच्या हवाली करण्यासंबंधी बोलणे लावले. त्याचे म्हणणे पुढीलप्रमाणे आहे :-

(१) साल्हेरचा किल्लेदार असूजी याला जशी मन्सब मिळाली तशी मला मिळावी.
(२) चाळीस हजार रुपये रोख, दहा घोडे, खिलतीची वस्त्रे आणि दोन खेडी (जुन्नर-पाशी ?) वतन म्हणून मिळावी, म्हणजे मी बादशहाच्या सेवेत हजर होतो.

बादशहांनी हे मान्य केले. बहरामंदखानाला ते म्हणाले, 'अब्दुलकादरला लिहा की, किल्लेदाराने भेटीस यावे. येथे आल्यानंतर त्याला मन्सब व इनाम ही देण्यात येतील. त्याने खात्री बाळगून यावे.'

### ३० सप्टेंबर १६८८

नळदुर्गचा किल्लेदार कामिलखान याचा अर्ज आला. त्यात म्हटले होते की, 'मी या महिन्याच्या पाच तारखेस (२१ सप्टेंबर १६८८) किल्ल्यात दाखल झालो. किल्ल्याच्या बंदोबस्ताविषयी खबरदारी बाळगीत आहे.'

अकलूजचा किल्लेदार मुहंमद अब्बास याला बहादुरगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. तेथील किल्लेदार फखरुद्दीनखान याला मरहमतखानाच्या जागी सैन्यात अधिकारी म्हणून नेमण्यात आले. मरहमतखानाला इंदापूरच्या ठाणेदारीवर नेमण्यात येऊन त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

### १० जुलै १६८९

तळकोकणचा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याने लिहिले की : तळकोकणचा प्रदेश ताब्यात आणण्यासाठी माझ्यापाशी दोन हजार पायदळ शिपाई तैनात करण्यात आले होते. त्यापैकी शंभर शिपाई पोहोचले. बाकीचे पळून गले. त्यांच्या जागी इतरांची तैनाती होईल अशी आशा करतो. यावर त्या प्रांताच्या दिवाणाला माणसे पाठविण्यासंबंधी हुकुम देण्यात आला.

**११ जुलै १६८९**

बादशहांना कळविण्यात आले की : रायरी (रायगड) च्या किल्लेदाराचा वकील हा आका अलीखान याच्याकडे आला. भेट व्हावी म्हणून त्याने निरोप केला. आका अलीखान याने वकिलाला एतिकादखानाकडे (हाच जुल्फिकारखान) पाठविले आहे.

खानजमान फतेहजंग याच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : गनिमांचे सैन्य कोल्हापूरजवळ आले. खानजमान फतेहजंग याचा मुलगा मुनव्वरखान हा त्यांच्यावर चालून गेला. त्याने शत्रूचा मोड केला आणि त्याचे साठ घोडे धरले.

**१४ जुलै १६८९**

बादशहांनी आज्ञा केली की : एतिकादखानाला लिहावे की, तुम्ही रायरी (रायगड) ची ठाणेबंदी केली आहे. तिचा तपशील लिहून पाठवावा.

**१५ जुलै १६८९**

मरहूम खानदौरान याचा मुलगा अब्दुलनबी याला बीडच्या फौजदारीवर नेमण्यात आले.

शेवगावचा फौजदार मीर रजी याची अर्जी बादशहा समोर ठेवण्यात आली.

बीडचा परगणा बहादुरखानाच्या जहागिरीत व फौजदारी अंमलाखाली होता. बादशहांनी तो बदलून खालसात (रास्त शाही अंमलाखाली) घेण्याची आज्ञा केली.

रामाजी दखनी (मराठा) याला पाचशे (जात) व दोनशे स्वार अशी मन्सब होती. त्याला बडतर्फ करण्यात आले होते. त्याला पुन्हा बहाल करण्यात आले.

शमशीरबहादुरला पुढील हुकुम देण्यात आला : तुम्ही (रायगडजवळ) राजा अनूपसिंग व मन्सूरखान यांच्या ठाण्यापाशी जाऊन रहावे. रायरी (रायगड) किल्ल्यातील गनिमांची माणसे उपासमारीने किल्ल्याच्या बाहेर आली की त्यांना हुजुरात पाठवावे.

**२३ जुलै १६८९**

मरहमतखानाच्या फौजेतील अधिकाऱ्यांच्या खालीलप्रमाणे नेमणुका करण्यात आल्या :– खुदाबंदा व याकूतखान यांना बुधपाचगावच्या ठाणेदारीवर, रणदुलाखान यास म्हसवड (मसूर) च्या ठाण्यावर, बुऱ्हाणुल्ला यास मानेगाव (?) च्या ठाण्यावर.

**२४ जुलै १६८९**

संभाजीची माणसे एतिकादखानाकडून बादशहाकडे आली. खालील इसमांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली. रघोजी, दादजी, लोकोजी (तुकोजी?).

**२५ जुलै १६८९**

गुलशनाबादनाशिकचा ठाणेदार मातबरखान याने लिहिले की : त्र्यंबकचा किल्ला जिंकून घेण्याबद्दल मला वीस हजार रुपयांचे बक्षीस देण्यात आले आहे. मला तो किल्ला जिंकून घेण्याच्यापायी अतोनात खर्च आला. माझ्यावर कृपा होईल अशी आशा आहे. बादशहांनी आज्ञा केली की : तीस हजार रुपये देण्यात यावे.

**२५ जुलै १६८९**

गुर्जबर्दार दंडधारी पाठवून जानबाजखान यास खटावच्या ठाण्यावर व खानजमान फतेहजंग यास कोल्हापूरच्या ठाण्यावर पोहचवावे असा हुकुम झाला.

**२७ जुलै १६८९**

खटावचा ठाणेदार जानबाजखान याने विनंती केली की : माझ्याशी सहकार्य करण्याबद्दल आणि गनिमांची (मराठयांची) बातमी देण्याबद्दल नाहरखान यास सांगण्यात यावे. तसे करण्यात यावे असा हुकुम झाला.

**३ नोव्हेंबर १६८९**

भीमसेन (याचे आत्मचरित्र तारीखे दिल्लकुशा प्रसिद्ध आहे) ला तोलारामच्या जागी जफराबादच्या दाग खात्याची मुश्रफी देण्यात आली.

कल्याण भिवंडीचा फौजदार मातबरखान याला तातडीने हुजुरात येण्याविषयी हुकुम देण्यात आला.

**४ नोव्हेंबर १६८९**

एतिकादखान याला जुल्फिकारखान ही पदवी देण्यात आली.

दौलतमंदखानाचा (बागलाण) मुलगा होशमंद याला पाचशे (जात) व शंभर स्वार अशी मन्सब होती. तीत शंभरची वाढ करण्यात आली.

दौलतमंदखानाचा मुलगा बख्तमंदखान याला दोनशे (जात) व वीस स्वार अशी मन्सब होती. तीत वीसची वाढ करण्यात आली.

खानजमान फतेहजंग याला घाटावरच्या ठाण्याची व नाहरखान घोरी याला घाटाखालच्या प्रदेशाची खबरदारी बाळगावी असा हुकुम देण्यात आला.

**५ नोव्हेंबर १६८९**

बहरामंदखानाच्या फौजेतून पुढीलप्रमाणे बातमी आली : हेरांनी बहरामंदखानाकडे बातमी आणली की (मराठयांच्या) आष्टे वगैरे दोन गढयातील माणसे दारु पिऊन धुंद आहेत. हे ऐकून बहरामंदखान तिकडे चाल करून गेला. लढाई झाली. शत्रूची बरीच माणसे मारली गेली. बहरामंदखानाच्या फौजेतील बक्षी फखरुद्दीन वगैरे ठार झाले. परमेश्वर करील तर गढया ताब्यात येतील.

रायरीला (रायगड) उत्तमगड म्हणावे असा हुकुम झाला.

**६ नोव्हेंबर १६८९**

श्यामराज (संभाजीराजांचा नाशिक त्र्यंबककडील अधिकारी श्यामराज पद्मनाभी) याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. लोहनेरचा ठाणेदार दौलतमंदखान याला निरोप देण्यात आला. बादशहा म्हणाले, 'पूर्वीप्रमाणेच दृढ भाव असू द्या.' दौलतमंदखानाचा मुलगा होशमंद याला खान ही पदवी देण्यात आली.

दिलेरखान (प्रसिद्ध मोगल सेनापती दिलेरखान नव्हे) हा रायरी (रायगड) वर तैनात होता. त्याला आणि त्याच्या भाऊबंदांना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

रुस्तमखान याला बहरामंदखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. खानजमान फतेहजंग याला रहमतपूरचे ठाणे खबरदारीने सांभाळावे असा हुकुम झाला.

## १० नोव्हेंबर १६८९

संभाजीचा सरदार शामराज हा चार हजारी जात व तीन हजारी(स्वार) असा मन्सबदार झाला होता. त्याचे एक हजार कमी करण्यात आले.

(या पुढील अडीच पावणेतीन वर्षांच्या नोंदी मला उपलब्ध झालेल्या फोटोप्रतीत आढळल्या नाहीत. या पुढील नोंदी आठ ऑक्टोबर १६९२ पासूनच्या पुढे दिल्या आहेत.)

## ८ ऑक्टोबर १६९२

असदुल्लाबेग आणि इतर चार गुर्जबर्दार(दंडधारी दूत) हे आजमनगर बेळगावहून येऊन भेटले. त्यांनी सांगितले की, 'गनिमांची(मराठ्यांची) सात हजार फौज (बेळगाव) किल्ल्याच्या जवळ आली. जवळपासच्या गढ्या त्यांनी घेतल्या. ते पिके कापून घोड्यांना खाऊ घालीत आहेत. त्यांनी आजमनगर बेळगावच्या किल्ल्यालाही वेढा घातला आहे.' बादशहा म्हणाले, 'गनिमांचा(मराठ्यांचा) जोर इतका वाढला आहे तर तुम्ही कसे आलात?' ते म्हणाले, 'आमच्यात आणि मराठ्यांच्यात नदीनाले होते. त्यांना खूप पूर आला होता. मराठे आमच्यापर्यंत पोहोचू शकले नाहीत.'

## ९ ऑक्टोबर १६९२

आजमनगर बेळगावचा फौजदार सय्यद लुत्फ याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## १० ऑक्टोबर १६९२

अहमदनगरच्या बातम्यावरून कळले की : तेथील किल्लेदार फौजदार व अमारतखान हा मना असलेले कर(बैलामागे पाच रुपये) वसूल करीत आहे. असे न करण्याविषयी त्याला लिहावे अशी आज्ञा झाली. त्याने पुढे असे केले तर त्याच्यावर बादशहाचा रोष होईल असे त्याला बजावण्यात आले.

घाटाखालचा ठाणेदार नाहरखान याची मुले घोरीखान वगैरेंच्या मन्सबी कमी करण्यात आल्या.

## ११ ऑक्टोबर १६९२

नवलख उंबऱ्याचा ठाणेदार खिदमततलबखान याला खुराकाची माफी होती. ती काढून घेण्यात आली. इंदापूरचा ठाणेदार अब्दुल्ला(नाहरखानाचा मुलगा) याला मन्सबीत अनुकूल वाढ देण्यात आली.

## १२ ऑक्टोबर १६९२

एक प्रहर तीन घटिका दिवस वर आला असता बादशहा बाहेर आले. त्यांनी न्यायदानाचे काम केले. नंतर त्यांनी दीवाणे खासमध्ये दरबार भरविला.

गुजरात प्रांतातील जमीनदार गजसिंग, रामसिंगाचा मुलगा, हा अब्दुल्हैच्या मार्फ-

तीने बादशहाला भेटला. बादशहांनी स्वत: कलमा पढवून त्याला मुसलमान केले. त्याला मानाची वस्त्रे देण्यात आली.

माधोराम उग्रसेन याला पुण्याची, दलसिंग यास नवलाख उंबराची आणि खानचंदाचा भाऊ अमरसर यास कडूरची अशा ठाणेदाऱ्या देण्यात आल्या.

### १३ ऑक्टोबर १६९२

लुत्फुल्लाखान याला असदनगर अकलूजकडे पाठवायचे होते. त्याच्यासाठी एक हत्ती द्यावयाचा आहे. तो माझ्या समोर आणण्यात यावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

सफशिकनखान याला सुप्याच्या ठाणेदारीवरून बदलण्यात आले होते. त्याला मतलबखानाच्या सैन्यात तैनात करण्यात आले.

इंदापूरच्या हरकाऱ्यांनी बातमी पाठविली की : संताजी (घोरपडे) याने खेड्यापाड्यातून ब्याऐंशी हजार रुपये वसूल करण्यासाठी माणसे पाठविली आहेत. येथील देशमुख रक्कम देण्याचे टाळीत आहेत. याबद्दल काय आज्ञा ? बादशहांनी हुकुम केला की : उपद्रवी (मराठे) च्या माणसांना मार देत बाहेर घालवावे.

आज्ञा झाली की : गाजिउद्दीनखान बहादूरला लिहिण्यात यावे की, चोपड्याकडच्या (खानदेश) फौजदारांना आंब्याच्या झाडांची निगा ठेवण्यास ताकीद द्यावी.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा सैन्यासहित जिंजीकडे रवाना झाला होता. तीन मजला चालून गेल्यावर तो आजमनगर बेळगावकडे परत आला आहे.

### १४ ऑक्टोबर १६९२

आज न्यायालये बंद होती.

### १५ ऑक्टोबर १६९२

न्यायदानाचे काम झाले.

अली अकबर मीर हैदर याला जमखिंडीचा अमीन आणि फौजदार म्हणून नेमण्यात आले. जमखिंडीचा कमी केलेला फौजदार नूरुल्ला याला दरबारात बोलावण्यात आले.

इंडीहून बातमी आली की : गनीमांचे (मराठ्यांचे) दोन हजार सैन्य इंडीपासून सहा कोसावर सानाहरी (?) गावाजवळ आले असून हालचाल करीत आहे. इंडीच्या ठाण्यात पथक नाही. काय आज्ञा? हुकुम झाला की : लुत्फुल्लाखान हा असदनगर अकलूजकडे रवाना होत आहे. गनिमांचा मोड करून त्याला पुढे जाता येईल.

शेवगाव (नगर जिल्हा) चा फौजदार अबुल्हसन याने विनंती केली की : पूर्वीच्या फौजदाराला मोठी मन्सब होती. या जिल्ह्यातून मराठ्यांच्या हालचाली नेहमी होत असतात. कृपा व्हावी. हुकुम झाला की : कामगिरी करून दाखवावी, कृपा होईल.

### १६ ऑक्टोबर १६९२

कासिमखान फौजदार विजापूर कर्नाटक याजकडे बंकापूरचा कारभारही सोपविण्यात आला. शेरखान वगैरेंना एक हजार स्वार बरोबर देऊन कासिमखानाच्या कुमकेस पाठविण्यात आले.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार इनायतखान याची मन्सब वाढविण्यात आली.

लुत्फुल्लाखानाला दोन हजार रुपये देण्यात आले. चांभारगोंद्याहून ख्वाजा ठाणेदार हा बदलला होता. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

## २३ ऑक्टोबर १६९२

बादशहापूर(पाच्छापूर)चा किल्लेदार भगवंतराव यास बदलण्यात येऊन त्याच्या जागी मनाजीला नेमण्यात आले. भगवंतरावला रामचंद्र ठाणेदार याजकडे पाठविण्यात आले.

शहाजहानाबाद(दिल्ली)चा सुभेदार यास हुकुम पाठविण्यात आला की : नुकताच मुसलमान झालेला मुहंमद हयात कानूनगो यास हुजुरात पाठविण्यात यावे.

## २४ ऑक्टोबर १६९२

न्यायदानाचे काम केल्यावर बादशहांनी दीवाणेखासमध्ये दरबार केला. शेख नूरुल्हक मुहतसिब(नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारा) याने अर्ज केला की : मुख्तारखानाचे कारभारी बालीराम लछराम याच्या घरात मदिरापान आणि जुगार ही चालली होती. सरकारी नोकरांनी त्याला मना केले. तो हमरीतुमरीवर आला. त्याला दीडशेची मन्सब आहे. हुकुम झाला की : त्याची मन्सब पन्नासने कमी करण्यात यावी आणि त्याला दरबारात येण्याची मनाई करण्यात यावी.

असदनगर अकलूजहून लुत्फुल्लाखान याच्या आलेल्या विनंतीप्रमाणे हुकुम देण्यात आला की : लुत्फुल्लाच्या आघाडीला सय्यद असालतखान, उजव्या फळीवर सय्यद मुस्तफा आणि डाव्या फळीवर मीर अब्दुल्ला यांनी असावे. पिछाडी बहिर्जीने सांभाळावी.

पन्हाळगडाजवळचा जहागीरदार पिराजी(घाटगे) यास निरोप देण्यात आला. त्याला आज्ञा करण्यात आली की : राजपुत्र मुहंमद मुइजुद्दीन याच्या सैन्यात रसद पोहोचवीत जावी. त्याला हजार जात आणि सातशे स्वार अशी मन्सब होती.

लोणारचा फौजदार रादअंदाजखान याला लोणारहून बदलण्यात येऊन हुजुरात बोलावण्यात आले.

## २५ ऑक्टोबर १६९२

बादशहांनी आज दरबार केला नाही. दुपारच्या नमाजानंतर न्यायदानाचे काम केले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जरा किल्ल्याचा किल्लेदार एतिबारखान आणि सुभानगडचा किल्लेदार आणि फौजदार मीर फाजील(राणीबिन्नूरजवळ सुभानगड) यांच्यात मारामारी होऊन अनेक लोक प्राणास मुकले. मीर फाजिल यास दरबारात आणण्याची आज्ञा झाली.

## २६ ऑक्टोबर १६९२

मीर फाजिलची मन्सब कमी करण्यात आली. उद्गीरहून एक इसम आला. त्याने तेथील किल्लेदार सय्यद मुस्तफा याच्यावर दरबारात खुनाचा खटला भरला आहे. आज्ञा करण्यात आली की : दंडधारींनी उद्गीरला जाऊन चौकशी करून यावे.

## २७ ऑक्टोबर १६९२

हरकाऱ्यांच्या तोंडून बातमी आली की : धनाजी जाधव आणि संताजी हे आजम-

नगर बेळगाव भागातून बाहेर पडले. ते धारवाडला पोहोचले असून त्यांनी धारवाडच्या किल्ल्याला वेढा दिला आहे. हुकुम देण्यात आला की : बहरामंदखानाचे अधिकारी शेख हिदायतुल्ला व दियानतराय यांनी हजर व्हावे.

असीरगडच्या किल्ल्यातील कैद्यांना ग्वाल्हेरला रवाना करण्याचा तेथील किल्लेदार शुजाअतबेग याला हुकुम देण्यात आला.

हुजुरातील तोफा सफशिकनखानाच्या फौजेत पाठविण्याचा हुकुम बर्कंदाजखान याला देण्यात आला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : अब्दुरज्जाकखान हैदराबादी, राहिरी (रायगड) चा फौजदार हा गाजिउद्दीनखानाजवळ होता. तो पथकासहित राहिरीकडे जाणार आहे.

एक हजार बंदुकची कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याजकडे पाठविण्याचा हुकुम सियादतखान यास देण्यात आला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : रामराजा (राजाराम) चा वकील याने राजपुत्र कामबक्ष, असदखान व जुल्फिकारखान याजकडे तहाची बोलणी लाविली आहेत. आज्ञा झाली की : कौल तयार करण्यात यावा. म्हणजे तो असदखानाकडे पाठविता येईल.

अर्ज आला की : चौसाळा (बीड जिल्हा) भागाचा राहदार (रक्षक) मतलबखान हा (मराठ्यांचा) शत्रूचा मोड करण्यासाठी धारूरकडे गेला होता. तेथे मराठ्यांशी युद्ध झाले.

मराठ्यांचा सरदार महिमाजी याचा एक मुलगा आणि एक मुलगी ही हातात सापडली आहेत. ती महमंद तकीखान याचा भाऊ कामयाबखान याजबरोबर रवाना केली आहेत. काय आज्ञा? हुकुम झाला की : त्यांना कोतवालाच्या हवाली करण्यात येऊन कैदेत ठेवावे.

### २८ ऑक्टोबर १६९२

आज कचेरीचे काम बंद होते.

### २९ ऑक्टोबर १६९२

आज न्यायदानाचे काम झाले. पण दीवाणेखासचा दरबार झाला नाही.

आज कासिमखान फौजदार विजापुरी, आजमनगर बेळगावचा फौजदार सय्यद लतीफ आणि देवदुर्गचा किल्लेदार वलीदाद यांचे अर्ज आले.

### ३० ऑक्टोबर १६९२

बहरामंदखानाला सांगण्यात आले की : गाजिउद्दीनखान बहादुर याला लिहून शिवापूर येथे एक ठाणे कायम करण्यास सांगण्यात यावे.

### ३१ ऑक्टोबर १६९२

आज कचेरी बंद होती.

### १ नोव्हेंबर १६९२

दौलताबादेचा किल्लेदार सय्यद मुर्तजाखान याचा अर्ज आला. दक्षिणेतील किल्ल्यातून रसद बरोबर आहे की नाही हे पहाणारा अधिकारी मुहंमद जाफर हा गाजिउद्दीनखाना-

कडे तैनात होता. तो आपला भाऊ आतिशखान फौजदार बीड याजपाशी आहे. हुकुम झाला की : त्याला गाजिउद्दीनखानाकडे पोहोचविण्यात यावे.

विजापूरचा कोतवाल फौजदारखान याने विनंती केली की : अथणीपासून बादशाही छावणीपर्यंत गनिमांची वर्दळ आहे. माझ्यापाशी पथक नाही आणि तो प्रदेश हमीदुद्दीनखानाकडे आहे. हुकुम झाला की : हमीदुद्दीनखानाचे दोनशे स्वार फौजदारखानाकडे तैनात करण्यात यावेत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी आणि धनाजी यांनी नसीराबाद धारवाड या किल्ल्याला वेढा घातला होता. आता ते नरगुंदकडे गेले आहेत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : पन्हाळगडाला दोन दरवाजे आहेत. शहाजादा मुइजुद्दीन हा एका दरवाजासमोर असून दुसऱ्या दरवाजासमोर इफ्तिखारखान हा आहे. त्यांनी किल्ल्याचा वेढा चालविला आहे.

कर्नाटकाचा फौजदार अली मर्दानखान याचा अर्ज आला की : गनिमांनी (मराठ्यांनी) चित्तूरचा किल्ला घेतला होता. आपण त्यांच्याशी लढून किल्ला परत घेतला आहे.

### १६ नोव्हेंबर १६९२

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गोविंदराव शिवा याने स्वारांनिशी मोगलांच्या काफिल्याला अहीरवाडी येथे कोंडले आहे. यामुळे वाटा बंद पडल्या आहेत. दुपारच्या नमाजानंतर बादशहांनी हमीदुद्दीनखानाला प्रार्थनागृहात बोलावून बजावले, 'आजच जा आणि हलखेड येथे मुक्काम करा. गनिमांचा मोड करा.'

### १७ नोव्हेंबर १६९२

सुभानगडचा किल्लेदार मुहंमद फाजिल हा हजर झाला असून तो आपले अपराध कबूल करीत आहे असे सियादतखानाने बादशहांना कळविले. मुहंमद फाजिलने आपले शस्त्र उतरवून ठेवले. आज्ञा झाली की : त्याच्या अपराधाची क्षमा करण्यात आली आहे. त्याची शस्त्रे परत त्याला धारण करू द्या आणि त्याची व बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याची गाठ घालून द्या.

### २१ नोव्हेंबर १६९२

बादशहांनी सियादतखानाला म्हटले, 'मीर हुसामुद्दीन गुर्जबर्दार (दंडधारी) याला कासिमखानाकडे पाठविले होते. तो परत आला आहे.' त्याला विचारा की : गनिमांच्या (मराठ्यांच्या) काय हालचाली आहेत? त्यांचा पाठलाग करीत कासिमखान कुठे पोहोचला आहे. सियादतखानाने चौकशी करून कळविले की : कासिमखान हा मराठ्यांचा पाठलाग करीत मौजे सिल्ही येथे पोहोचला आहे. संताजी व धनाजी जाधव वगैरे गोविंदगड किल्ल्याच्या जवळ आहेत. कासिमखान आणि मराठे यांच्यात दहा कोसाचे अंतर आहे. गदग प्रांतातील जमीनदार कासिमखानाला भेटले आहेत.

सागरमलचा मुलगा गोकलू मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे दिली.

शहाजादा कामबक्ष याजकडून पुढील अर्थाचे पत्र आले. मराठ्यांनी रात्रीच्या वेळी

जिंजीच्या समोर जमशीदखान आणि गौतम हजारी यांच्या मोर्च्यांवर हल्ला केला. जुल्फिकारखानबहादुर याला हे कळल्यावर त्याने कुमक पाठविली. जुल्फिकारखान स्वतः मागोमाग आला आणि त्याने मराठ्यांचा मोड करून उधळलेले मोर्चे पुन्हा कायम केले.

फतेहुल्लाखान हा शहाजादा कामबक्ष याजकडे मुजरा करण्यास गेला. शहाजाद्याने फतेहुल्लाखानाला जम्लतुलमुल्क असदखान याजकडे पाठवून त्याला म्हटले की : असदखान सांगेल ते तुम्ही कबूल करावे. फत्तेहुल्लाखान हा असदखानाकडे गेला. असदखानाने त्याला म्हटले, 'राजगड डोंगराच्या पायथ्याशी इस्माईलखान आहे, त्याची जागा तुम्ही घ्या. इस्माईलखानाला मोर्च्यासाठी दुसरी जागा दाखवितो.' फतेहुल्लाखानाने हे कबूल केले नाही. तो उठून आपल्या डेऱ्याला परत गेला.

### २२ नोव्हेंबर १६९२

गाजिउद्दीखान बहादुर याजकडून कळले की : त्याने मराठ्यांचा मोड करून किल्ले कुंजरगड(?) ताब्यात आणला आहे. आज्ञा झाली की : किल्लेदार म्हणून कुणाची नेमणूक करावी ते कळवा.

कासिमखानाने लिहून पाठविले की : गनीम(मराठे) किल्ले गोविंदगड सोडून पळाले असून आपण त्यांचा पाठलाग करीत आहोत.

### १७ डिसेंबर १६९२

रामगीर(आता आंध्र प्रदेश) किल्ल्याहून बातमी आली की : किल्लेदार मक्सूदबेग अब्दुर्रसूलखान रोजभानी हा आजारी होता. त्याला सांगण्यात आले की, 'किल्ल्यात एक भूत आहे. त्याला दोन रेडे, एक मडके दारू आणि पानविडे द्यावे. तर आजार बरा होईल.' किल्लेदाराने त्याप्रमाणे केले. बादशहांनी आज्ञा केली की : यापुढे अशी कामे करू नये.

### १८ डिसेंबर १६९२

सुहराबखान हा शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याला (पन्हाळगडापाशी) सोडून दरबारात आला होता. त्याची मन्सब कमी करून त्याला शहाजाद्याकडे परत पाठविण्यात आले. लुत्फुल्लाखानाने लिहून पाठविले की : या महिन्याच्या चोवीस तारखेस मी अकलूजहून निघून शहाजादा मुइजुद्दीन याजपाशी जाण्यासाठी पन्हाळगडाकडे रवाना झालो आहे.

गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याने किल्ले पट्टा(?) जिंकून घेतला. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या त्याने पाठविल्या.

### १९ डिसेंबर १६९२

तोफखान्याचा प्रमुख मुख्तारखान याचा नायब हुसेनखान याला शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याजपाशी पन्हाळगडाकडे रवाना करण्यात आले.

किल्ले पट्टा याजवर नुरुल्ला याची नेमणूक करण्यात आली. गाजिउद्दीनखान बहादूर फीरोजजंग व चीनकुलीजखानबहादुर(भावी निजामुलमुक) यांनी किल्ले सिरा(पट्टा?) गनिमांच्या(मराठ्यांच्या) कडून जिंकून घेतला. त्याबद्दल त्यांना व त्याच्या सहकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव हा जिंजीच्या अलीकडे राजारामाच्या फौजेत पोहोचला आहे व संताजी हा कोदूगड(कोप्पळ?)हून निघून जिंजीकडे रवाना झाला आहे.

## २० डिसेंबर १६९२

मथुराइस्लामाबादहून वृत्त आले की : तेथील फौजदार बिशनसिंग(जयपूरचा राजा) याच्या सैन्यातील कोतवाल बाजीद हा शरई धार्मिक खटल्यात ढवळाढवळ करीत आहे. कुणालाही शरा शरीफ(इस्लामी धर्मग्रंथ)कडे वळू देत नाही. काजीने त्याला मना केले. पण तो हमरीतुमरीवर येतो. बादशहाने बक्षीउलमुल्क बहरामंदखानाला आज्ञा केली की : राजा बिशनसिंग याला लिहून दुसरा कोतवाल नेमा.

पट्टाचा किल्लेदार नूरुल्ला याला सय्यद नूरखान ही पदवी देण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली. किल्ला जिंकून घेणारे गाजिउद्दीन फीरोजजंग याचे सहकारी राजा इंद्रसिंग, राजा अवधूतसिंग, दहलोजी, सरकोजी, अब्दुल ऐवज, शामराज, सहार चौहान, राजूजी, सय्यद महमूद, यारखान, अब्दुरहमान, ख्वाजा अबुल्मकारम उर्फ जानबाजखान, तीरअंदाजखान, मन्सूरखान यांना बक्षिसे देण्यात आली.

बातमी आली की : मराठा सरदार रामू(रामाजी) हा तीन हजार स्वार घेऊन कल्याण(कल्याणी) किल्ल्याच्या नजीक आला असून चौथाई वसूल करीत आहे. आज्ञा झाली की : याबाबतीत बक्षीउलमुल्क बहरामंदखान यांनी सय्यद अब्दुल्लाखान(सुभेदार बीदर) याला लिहावे.

बातमी आली की : शहाजादा मुहंमद आज्जमशहा यांनी बेडरांचा मोड करण्यासाठी दाऊदखान यास भीमेकडे पाठविले आहे.

## २१ डिसेंबर १६९२

मुहंमद फाजिल यास बिदनूरच्या राणीच्या प्रातांतील सुभानगडावरून काढण्यात येऊन त्याच्या जागी जहान काकडचा मुलगा दर्या याची किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

आतिशखानाचा आप्त मुहंमद हादी याची बेळगावच्या दिवाणगिरीवर नेमणूक करण्यात आली.

## २२ डिसेंबर १६९२

अब्दुल्कादर याला मिरज आणि पन्हाळा या मधील सांगोल्याची ठाणेदारी आणि हिंमतरावला आळत्याची ठाणेदारी देण्यात आली होती. हा हुकुम रद्द करण्यात येऊन दोन्ही ठाण्यावर मनाजी(मंबाजी) नारो राघो याची नेमणूक करण्यात आली. हिंमतरावाने आपली जहागीर मिळविण्यासाठी बादशाही छावणीत राहावे असे ठरले.

संपगाव(बेळगावजवळ)हून बातमी आली की : राजारामाचा दिवाण रामचंद्र (रामचंद्रपंत अमात्य) याने आपला गुमास्ता येथील(संपगाव) देशमुख मलंग गौडा याजकडे पाठविला असून चौथाईची मागणी केली आहे. चौथाई दिली तर बरे, नाही

तर आपण सैन्य पाठवून तुमची खेडी बेचिराख करू अशी त्याने धमकी दिली आहे. देशमुखाने ही हकीकत येथील (संपगाव) ठाणेदार अब्दुस्सलाम यास सांगितली. ठाणेदार संपगावहून निघून गोकाकला गेला. देशमुखाने एक पालखी व चार घोडे रामचंद्रपंताकडे पन्हाळगडावर पाठविले. यावर बादशहांनी अब्दुस्सलामला लिहावे अशी बक्षीउलमुल्क बहरामंदखान याला आज्ञा केली.

**२३ डिसेंबर १६९२**

आज दोन्ही दिवाणखान्यातील (दिवाणेआम व दिवाणेखास) काम बंद होते.

**२४ डिसेंबर १६९२**

अब्दुलमुख्तारचा जावई मुहंमद काजिम हा रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुरज्जाकखान याजपाशी तैनात होता. त्याला बादशहाच्या तैनातीत ठेवण्यात आले.

**२५ डिसेंबर १६९२**

मरहूम दौलतमंदखान (बागलाण) याची दानिशमंद वगैरे मुले बादशहाच्या सेवेत हजर झाली.

शहाजादा मुहंमद कामबक्ष याचे गुरू सय्यद मुहंमद याला अशरफखानाच्या जागी नंदुरबार सुल्तानपूरची फौजदारी देण्यात आली.

* * *

# दोन

## ४ जानेवारी १६९३ ते ३ डिसेंबर १६९३

### ४ जानेवारी १६९३

तोफखान्याचा प्रमुख सफशिकनखान याला पन्हाळगडाखाली शहाजादा मुइजुद्दीन याच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. त्याला दहा हजार रुपये देण्यात आले.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला बादशहांनी सांगितले की, 'हुजरातीच्या लोकांना तयार राहाण्यासाठी कळवा. विजापूरकडे गस्त घालण्यासाठी मी त्यांना पाठविणार आहे.'

देऊळघाटचा फौजदार ख्वाजा जलालुद्दीन नसीरखान हा होता. त्याचा नसीरखान हा किताब काढून घेण्यात आला. त्याच्या ऐवजी बशारतखानाची नेमणूक करण्यात आली.

### ५ जानेवारी १६९३

रात्री बादशहांनी बहरामंदखानाला चार हजार स्वार बरोबर देऊन विजापूरकडे गस्त घालण्यास पाठविले. मुहंमद बदी बल्खी व अस्करखान यांनी बहरामंदखानाबरोबर जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### ६ जानेवारी १६९३

गनिमांची (मराठ्यांची) एक तुकडी विजापूरजवळ आली होती. म्हणून बक्षी बहरामंदखान याला तिकडे रवाना केले होते. बातमी आली की : मराठ्यांची तुकडी पळून गेली आहे. बहारामंदखानाला परत घेऊन येण्यासाठी एक पथक पाठविण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणे बहरामंदखान परत आला.

### ७ जानेवारी १६९३

लुत्फुल्लाखानाला पन्हाळगडाखाली शहाजादा मुइजुद्दीन याजकडे पोहोचविले असे गुर्जबर्दारांनी बादशहांना सांगितले. मुख्तारखान हा शहाजाद्याकडून येण्यास निघाला असेही त्यांनी कळविले.

### ८ जानेवारी १६९३

हळसंगीचा ठाणेदार याने गनिमांचा (मराठयांचा) एक सैनिक पकडून पाठविला होता. कोतवालाच्या कोठडीतून तो पळाला. आज्ञा झाली की : तुरुंगाच्या दारोग्याला बदलण्यात यावे आणि पहाऱ्यावरील शिपायांना बडतर्फ करण्यात यावे.

### ९ जानेवारी १६९३

राणीबिन्नूरच्या जमीनदारांकडून खंडणी घेण्यास जाण्यासाठी खानाजादखान यास तयार राहाण्यास सांगण्यात आले.

मामूरखानाने गजपतगड वगैरे किल्ले घेतले. त्यावेळी मोगल सैनिकांनी लुटीचा माल स्वत: घेतला. मामूरखानाचे ऐकले नाही. हरकाऱ्यांकडून ही बातमी ऐकून बादशहा गप्प बसले.

### १० जानेवारी १६९३

एक प्रहर चार घटिका दिवस आला असता बादशहांनी बाहेर येऊन दिवाणेआम (दरबार) भरविला.

जासीमान मुसलमान झाला. त्याला खिलतीचे पोशाख आणि दहा रुपये देण्यात आले.

मुहंमद सईद हा निजामुल्मुल्की तळकोकणचा (कल्याण भिवंडी वगैरे) अमीन होता. त्याला मुहंमद बाकरच्या जागी तेथेच दिवाण म्हणून नेमण्यात आले.

पन्हाळगड येथे शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याच्यापाशी तोफखान्याचा प्रमुख सफशिकनखान हा तैनात होता. त्याने विनंती लिहून पाठविली की : चार मोठया तोफा पाठविण्यात याव्या. एक तोफ पाठविण्याची आज्ञा झाली.

### ११ जानेवारी १६९३

पन्हाळगडाच्या समोर मोर्चे, भुयारे व किल्ल्यापर्यंत नेणारे सुरक्षित व झाकलेले मार्ग तयार करण्यासाठी उस्मान करावल हा पन्हाळगडाला गेला होता. तो परत बादशहाच्या सेवेत हजर झाला. त्याने पन्हाळगडाचा नकाशा (प्लॅन) बादशहाच्या समोर ठेवला.

तोफखान्याचा प्रमुख सफशिकनखान याजकडे मुइजुद्दीन याच्या सैन्यात या पूर्वी दोन तोफा पाठविण्यात आल्या. याशिवाय आणखी दोन तोफा देण्यात आल्या.

भूम आणि चौसाळा (मराठवाडा) या भागातील येण्याजाण्याचे मार्ग सुरक्षित ठेवण्यासाठी मतलबखान याची नेमणूक झाली होती. त्याने विनंती लिहून पाठविली की : राव अनिरुद्ध सिंह आणि त्याचे एक हजार स्वार पूर्वी माझ्यापाशी तैनात होते. अलीकडे बादशहांनी त्यांना आपल्याकडे बोलावून घेतले आहे. त्यांना परत माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. बादशहांनी आज्ञा केली की : राव अनिरुद्ध सिंह आणि त्याचे स्वार यांना शहाजादा आज्जम याजपाशी तैनात करण्यात यावे.

दुसरी विनंती अशी की : खानाजादखान हा सध्या नुस्रताबाद सगर (गुलबर्गा जिल्हा, कर्नाटक) येथे आहे. त्याचे एक हजार सैनिक फौजेत आहेत. खानाजादखानाला

माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. आज्ञा झाली की : आमच्या सैन्यातील एक हजार पायदळ शिपाई (मतलबखानापाशी) तैनात करा.
माझ्यापाशी वीस दंडधारी होते. त्यांना बोलावून घेण्यात आले आहे. त्यांच्या जागी इतर माणसे पाठविण्यात यावी. आज्ञा झाली की : ऐवजबेग आदि दहा माणसे तैनात करण्यात यावी.

तिसरी विनंती अशी की : नगद पगारी मन्सबदार आणि मी यांची पगारबाकी बरीच राहिली आहे. पगार द्यावा. आज्ञा झाली की : मुहंमदाबाद बीदरच्या खजिन्यातून पगार देण्यात यावा.

मसूरचा ठाणेदार राव जगदेव याने अर्जी पाठविली की : मी हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात आहे. या जिल्ह्यात गनिमांची (मराठ्यांची) वर्दळ आहे. काय आज्ञा ? हुकूम झाला की : सध्या हमीदुद्दीनखानापाशी रहावे ज्यावेळी बादशाही छावणीत खजिना आणि रसद आणण्यात येतील त्यावेळी त्यांच्याबरोबर विजापूरपर्यंत यावे आणि नंतर आपल्या सरंजामी इलाख्यात जावे.'

विजापुराहून तीन तोफा मागवून घेण्याची आज्ञा झाली. हमीदखान विजापुरीने आपल्या वकीलाद्वारा विनंती केली की : मी जिंजी येथे जुल्फिकारखानाच्या तैनातीत आहे. मी येथे बजावीत असलेल्या कामगिरीचा मजकूर व्यवस्थितपणे बादशहाच्या कानावर घालण्यात येत नाही. मनुष्य पाठवून चौकशी करण्यात यावी. आज्ञा झाली की : यासाठी मुहंमद मुराद याला सजावल म्हणून नेमण्यात यावे, म्हणजे तो हमीद-खानाचे काय म्हणणे आहे ते कळवील.

नूरुल्ला उर्फ उदयसिंग हा दोनशेवीस स्वारांचा मन्सबदार होता. त्याची तैनात शहाजहानाबादेकडे (दिल्ली) करण्यात आली.

## १२ जानेवारी १६९३

मुख्तारखान हा बादशहाच्या आज्ञेने शहाजादा मुइजुद्दीन याच्याकडे पन्हाळगडा-पाशी गेला होता. तो परत आला. त्याने येताना पन्हाळगडाचा नकाशा (प्लॅन) बरोबर आणला होता. तो त्याने बादशहासमोर ठेवला. बादशहाचे न्यायदानाचे काम संपत आले आणि कचेरी संपण्याची वेळ आली तसे बादशहांनी दिवाणेखासचा नायब दारोगा मुहंमद यारखान याला म्हटले, 'मुख्तारखानाला न्यायकचेरीच्या वाटेने दिवाणे-खासमध्ये आणा.' त्याप्रमाणे मुख्तारखान आला. बादशहांनी पन्हाळगडासंबंधी आणि तेथील वस्तुस्थितीसंबंधी त्याच्यापाशी बारकाईने चौकशी केली आणि त्यानंतर त्याला आपल्या तंबूत जाण्यासाठी निरोप दिला.

रायरी (रायगड) इस्लामगडचा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याने विनंति लिहून पाठविली. ती पुढीलप्रमाणे :-
(१) पुण्याहून इस्लामगड (रायगड) पर्यंतच्या वाटेचे रक्षण व्हावे म्हणून मी तीन ठाणी

कायम केली आहेत. हुजुरातर्फे या ठाण्यासाठी पथके पाठविण्यात यावीत. बादशहांनी आज्ञा केली की : दोनशे स्वार आणि चारशे पायदळ वरील ठाण्यावर तैनात करण्यात यावी.

(२) विनंती ही की : परगणे चांदूर माझ्या जहागिरीत आहे. तेथील फौजदारी पण मला मिळावी. विनंती मंजूर करण्यात आली.

(३) विनंती ही की : पन्नास मन्सबदार माझ्यापाशी तैनात करण्याचे हुकुम होते. त्यापैकी पंधरा तैनात झाले आहेत. मुहमदबेग वगैरे वीस माणसे तैनात करण्यात यावीत. त्यांना पाठविण्याचा हुकुम देण्यात आला व त्यांचे जाणे न झाल्यास दुसऱ्यांना तैनात करावे असे ठरले.

### १३ जानेवारी १६९३

बदामीच्या किल्ल्यावरील शिबंदीचा पगार पोहोचविण्यास खुर्रम गुर्जबर्दार (दंडधारी) गेला होता. तो खजिना पोहचवून परत आला.

### १४ जानेवारी १६९३

ठाणी तपासण्यासाठी उस्मान करावल पन्हाळगडाला गेला होता. तेथून परत येऊन त्याने बादशहांना हकीकत सांगितली.

### २८ मार्च १६९३

एक प्रहर तीन घटिका दिवस आला असता बादशहांनी बाहेर येऊन अदालत (न्यायदान)चे काम सुरू केले. आज दिवाणेआममध्ये दरबार भरला नाही. बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– ईस्माइलखान (मका) हा जिंजी येथे मोर्च्यावर होता. गनिमांनी (मराठ्यांनी) त्याच्यावर हल्ला करून त्याला जखमी केले आणि ते त्याला घेऊन गेले. तो त्यांच्या कैदेतून सुटून आला असून शहाजादा आज्जम याच्या फौजेत दाखल झाला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : इस्माइलखानाची पाच हजारी (पाच हजार जात आणि पाच हजार स्वार) मन्सब चालूच आहे असे समजावे. त्याला आणखी काय हवे आहे ते त्याने शहाजादा आज्जम यास कळवावे.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याचा अर्ज : मराठ्यांची तुकडी हदोरा(?) गावाजवळ जमून धामधूम करीत आहे. हुकुम झाल्यास किल्ल्यात नायब ठेवून मी जाऊन त्यांचा मोड करीन. बादशहाने आज्ञा केली की : नांदेडच्या सुभेदाराला लिहिण्यात यावे. त्याने मराठ्यांचा मोड करण्यासाठी आपल्या मुलाला सैन्य देऊन त्यांच्या विरुद्ध पाठवावे.

### २९ मार्च १६९३

बादशहांनी आज दिवाण भरविला नाही. पण दुपारच्या नमाजानंतर न्यायदानाचे काम केले.

## १ एप्रिल १६९३

पन्हाळगडाखाली शहाजादा मुइजुद्दीन याची फौज होती. तेथील बातम्यावरून कळले की : राजा भीम आणि चांद्याचा राजा किशनसिंग यांच्या सैन्यात होळीचा सण खेळण्यात येत होता. मुहतसिब (नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारा अधिकारी) ने पुष्कळ मना केले. पण लोकांनी ऐकले नाही. ते मारामारीस तयार झाले. बादशहांनी आज्ञा केली की : राजा भीम व राजा किशनसिंग यांना कळविण्यात यावे की, यापुढे असे करण्यात येऊ नये.

जुम्दतुल्मुल्क असदखान (जिंजीजवळ) याच्या फौजेतून कळविण्यात आले की : गंगाराम हजारी याने बंदुकची घेऊन शहाजादा कामबक्ष याच्या तंबूभोवती चौक्या बसविल्या (घेराव घातला.) जुल्फिकारखानाने हे गंगारामने वेडाच्या भरात केले असे ठरवून त्याला ठार मारले.

शहाजादा मुहंमद मुइजुद्दीनच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : देवगडचा किल्लेदार याने शहाजाद्यांना विनंती केली की : या भागात मराठ्यांच्या सतत हालचाली चालू असतात आणि किल्ल्यात कशाचाच साठा नाही. बादशहाने आज्ञा केली की : फाजिलखान खानसामान याने साठ्याची व्यवस्था करावी.

## १३ एप्रिल १६९३

इस्माईलखान मका याचा पुढीलप्रमाणे अर्ज आला :- मी मराठ्यांच्या कैदेतून सुटून आलो. जुल्फिकारखानबहादुर याच्या सैन्यात असून मी बादशाही कामगिरी बजावीत आहे. माझी पाच हजारी मन्सब आणि खान हा किताब ही पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात यावी. हुकुम झाला की : खान हा किताब चालू राहील. एक हजार स्वारांनी मन्सब कमी करण्यात यावी. ही वाढविलेली मन्सब जिंजीजवळच्या राजगडला लागून असलेल्या ठाणेदारीच्या अटीवर देण्यात आली होती.

जुम्लतुलमुल्क असदखान याने लिहून पाठविले की : हैद्राबादी कर्नाटकची दिवाणी जहीरुद्दीन (हकीम नूरुद्दीनचा मुलगा) यास देण्यात यावी. हे नामंजूर करण्यात येऊन नूरुद्दीन हैद्राबादी यालाच पूर्वीप्रमाणे दिवाणी चालू करण्यात आली.

शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याचा अतालीक (पालक गार्डियन,) लुत्फुल्लाखान याचा दंड आणि नजर ही माफ करण्यात येऊन त्याच्याकडे पाच हजार रुपये पाठविण्यात यावे असा हुकुम झाला.

बेळगावचा किल्लेदार सय्यद यादगार हुसेन याला मुहंमद फाजिलच्या जागी सुभानगडच्या फौजदारीवर बदलण्यात आले. मुहंमद फाजिलने गुलबर्ग्याला जाऊन तेथील किल्लेदार व फौजदार अलफखान याजकडून खजिना घेऊन बादशहाच्या छावणीत यावे. त्याच्या बरोबर शंभर मराठे व शंभर बर्कंदाज देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याच्या फौजेतून बातमी आली की : नरसिंगराव हजारी हजर नाही. तो फरारी म्हणून नोंद करण्यात यावी असा हुकुम झाला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : राजा शाहू याचा त्र्यंबक नावाचा गुमास्ता आहे. तो पुणे परगण्यात आहे. दोनशे स्वार आणि पाचशे पायदळ जमवून तो वाटमारी करीत आहे. बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : राजा शाहू याच्या वकीलाकडून मुचलके घेण्यात यावेत. पुन्हा अशी तक्रार कानावर आली तर बादशहाचा रोष ओढवून घ्यावा लागेल.

मथुरेहून पुढील बातमी आली : सय्यद वारसबेग याचा मुलगा सय्यद गुलाम मुहंमद याजकडे जमीनदारीत रसूलपूर हे गाव आहे. तेथे एक देऊळ आहे. हिंदू तेथे येऊन मूर्तिपूजा करतात. बादशहांनी बक्षी बहरामंदखान याला पुढीलप्रमाणे हुकुम दिला : अकबराबाद(आग्रा)चे सुभेदार आणि मथुरेचे फौजदार यांना लिहा की :– त्यांनी ते देऊळ पाडून टाकावे.

### १५ एप्रिल १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : असदखान हे धान्य विकत घेऊन वांदीवाश(जिंजी जवळ) येथे साठवीत आहेत.

शंकराजीचा भाऊ हरजी याचा मुलगा प्रताप पाच हजारी मन्सबदार याला शहाजादा मुहंमद आज्जमशहा याजपाशी तैनात करण्यात आले.

मासूराय वगैरे सावकार(हिसार, हरयाणा) यांनी न्याय कचेरीत खटला आणला की : हिसारचा फौजदार अब्दुल आज्जम याने आमच्या भावाला आपल्या घरी बोलावून कैद केले आहे आणि तो त्याच्याकडून बेकायदेशीरपणे पैशाची मागणी करीत आहे. दिल्लीच्या सुभेदाराने चौकशी करून हकीकत कळवावी असा हुकुम झाला.

अबुल्हसन हा गोवळकोंड्यात राज्य करीत असता शेख मुहंमद अमीन हा गोवळकोंड्यात किल्लेदार होता. तो भेटण्यास आला. तो अतिशय वृद्ध आणि अशक्त होता. दोन माणसांनी त्याला चादरीत गुंडाळून आणले. बादशहा म्हणाले, 'याला विचारा की तुझे वय काय ?' तो म्हणाला, 'पंचाण्णव वर्षे.' त्याने विनंती केली की : मला पूर्वी पाच हजार रुपये उत्पन्नाचे गाव होते. तेथे आता काही उत्पन्न होत नाही. मला दुसरे गाव देण्यात यावे. किल्ल्यात माझे एक दुमजली घर आहे. त्याची दुरुस्ती माझ्याकडून होत नाही. ती सरकारने घ्यावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'याला दुसरे गाव द्या आणि घराची किंमत द्या.' बादशहा बक्षीउलमुल्क बहरामंदखान याला म्हणाले, 'मी शहाजादा असताना गोवळकोंड्यावर स्वारी केली होती. त्यावेळी मी याला निरोप पाठविला होता की, तू किल्ला माझ्या हवाली कर. मी तुझ्यावर खूप कृपा करीन.' याने सांगितले की, 'किल्ला आपल्या ताब्यात येईल पण जगात निमकहराम म्हणून माझा दुर्लौकिक होईल. मी तुमच्या म्हणण्याप्रमाणे करू शकत नाही.'

बादशहांनी त्याला एक हजार अश्रफ्या आणि एक हजार रुपये दिले.

### १६ एप्रिल १६९३

शिवसिंग हा यारअलीबेगच्या मार्फतीने मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

नरकवासी संभाजीचा जावई (ख्वेश) शंकराजी हा पाच हजारी (पाच हजार जात आणि तीन हजार स्वार) मन्सबदार होता. त्याला शहाजादा आज्जमच्या फौजेत तैनात करण्यात आले.

१७ एप्रिल १६९३

सुभानजी हा राजारामापासून निघून नोकरीच्या आशेने आला. त्याला पाचशे (जात) आणि शंभर स्वार अशी मन्सब देण्यात आली.

शिवाजी या नावाचा एक सरदार शहाजादा मुहंमद आज्जमशहा याजपाशी तैनात होता. त्याने विनंती केली की : राजारामाने माझा भाऊ दुर्गा (जी) याला ठार मारले आहे. आपली आज्ञा झाली तर संधी साधून त्याचा (राजारामाचा) वध करीन. बादशहांनी आज्ञा केली की : शहाजादा आज्जमच्या फौजेतून त्याला हलवून शहाजादा मुइजुद्दीनच्या फौजेत (पन्हाळगडापाशी) तैनात करण्यात यावे.

सोलापूरचा किल्लेदार आणि फौजदार मिहदीखान याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :— एका माणसाने एका बंदूकचीच्या बायकोला पळविली. नवऱ्याने तक्रार गुदरली. त्या माणसाने वाटेत एका माणसाला मारले. खानाने सर्वांना पकडून आणले.

बादशहांनी आज्ञा केली की : ती बाई मुसलमान झाली आहे. तिला, तिच्या नवऱ्याला आणि तिला पळवून नेणाऱ्या इसमाला काजीकडे नेण्यात यावे.

१८ एप्रिल १६९३

मतलबखानाचा (बीड भागातील सरदार) अर्ज आला की : माझ्यापाशी फार थोडे सैन्य आहे. आज्ञा झाली की : एक हजार स्वार आणि दोनशे बंदूकची पाठविण्यात यावे.

मरहमतखानाने (पन्हाळगडाहून) पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :— मराठ्यांचा जमाव झाला असून ते महादेवाच्या डोंगरात पूजेसाठी गेले आहेत. सात हजार स्वारांनिशी ते पन्हाळगडाला कुमक पोहोचविण्यासाठी चाल करून येण्याच्या विचारात आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनखानानी शिपायांच्या रजा थांबवाव्या आणि बहरामंदखानानी हमीदुद्दीनखानाबरोबर देण्यासाठी फौज तयार ठेवावी.

गुप्तचरांच्या बातम्यावरून कळले की : जुम्लतुलमुल्क असदखान व शहाजादा कामबक्ष हे (जिंजीहून) हुजुरात येण्यास निघाले आहेत.

१९ एप्रिल १६९३

शहाजादा मुहंमद आज्जम आजारातून बरा झाला. तो येऊन भेटला.

तरसोजी (असोजी, नरसोजी, परसोजी?) दखनी (मराठा) ला चार हजारी मन्सब व झेंडा, नौबत नगारे देऊन गाजिउद्दीनखान बहादुराच्या फौजेत तैनात करण्यात आले.

२० एप्रिल १६९३

आज कचेरी झाली नाही.

२१ एप्रिल १६९३

हमीदुद्दीनखानाबरोबर अडीच हजार स्वार देऊन त्याला मराठ्यांचा मोड

करण्यासाठी मिरजेकडे पाठविण्यात आले. निरोपाच्या वळी बादशहा, कुशल होवो या अर्थाचा फातेहा पढले. मुहंमद वहीद याला बरोबर पाठविण्यात आले. बहरामंदखानाला बादशहांनी आज्ञा केली की : अथणीचा ठाणेदार मलबूसखान याने हमीदुद्दीनखानाबरोबर जावे.

बहरामंदखानाला आज्ञा झाली की : तुम्ही निजामुल्मुल्की तळकोकणचा दिवाण मुहंमद सईद याला लिहा की, त्याने आपला एक नायब तेथील (कल्याण, भिवंडी) फौजदार मातबरखान याजपाशी ठेवावा आणि त्याने स्वतः रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रजाकखान याजपाशी जावे.

आदिलखानी तळकोकण (दाभोळपासून दक्षिणेकडे) चा दिवाण मुहंमदअली यास तेथील फौजदार सरबाजखान याजपाशी तैनात करण्यात आले.

शहाजहानाबाद (दिल्ली) च्या बातमीवरून समजले की : राजा बिशनसिंग (अंबर) जवळ तैनात असलेला रतनराय हा मदिरापान आणि इतर निषिद्ध गोष्टी करीत आहे. आज्ञा झाली की : त्याची जहागीर काढून घेण्यात यावी.

### २२ एप्रिल १६९३

बादशहांनी आज औरंगाबादच्या वाड्याचा नकाशा पाहिला. शहाजादा मुइजुद्दीन याच्या फौजेतून बातमी आली की : वडगावचा ठाणेदार रामचंद हजर झाला होता. शहाजाद्यांनी त्याला पैशासाठी तगादा केला. तो रातोरात पळून गेला. तो दोन हजारी मन्सबदार होता. आज्ञा झाली की : फरारी म्हणून त्याची नोंद करण्यात यावी.

### २४ एप्रिल १६९३

आज्ञा झाली की : संकेश्वरचा हयातखान याला लिहिण्यात यावे की :– ठाण्यात निम्मी माणसे ठेऊन बाकीची माणसे घेऊन त्याने हमीदुद्दीनखानाकडे जावे.

बातमी आली की : बेडरांचे शंभर स्वार आणि पाचशे पायदळ शिपाई सिद्दी सालमच्या जहागिरीत घुसले. सालमच्या कारभाऱ्याने गढी बेडरांच्या हवाली केली आणि तो स्वतः पळून गेला. आज्ञा झाली की : सिद्दी सालमची जहागीर काढून घेण्यात यावी.

शंकराजीचा भाऊ हरबाजी हा चार हजारी मन्सबदार होता. तो शहाजादा आज्जमच्या तैनातीत होता. तेथून काढून त्याला हमीदुद्दीनखानापाशी तैनात करण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मराठ्यांचे सात हजार स्वार आणि पायदळ असे सैन्य महादेवाच्या डोंगरातून निघून बादशाही मुलुखावर आक्रमण करण्याच्या हेतूने जवळ आले आहे. आज्ञा झाली की : तेथील फौजदार आतिशखान याला त्यांचा मोड करण्यासाठी लिहिण्यात यावे.

### २५ एप्रिल १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : मराठे हे धान्याच्या गोण्या लादलेले

सहा हजार बैल घेऊन पन्हाळगडात रसद पोहोचविण्याच्या उद्देशाने किल्ल्यापासून सात कोसावर आले. शहाजादा मुइजुद्दीन याने अबादल्लाहचा मुलगा आणि सैन्याचा बक्षी मुहंमद अस्करी आणि आपला दूधभाऊ अलीमुराद कोका याला सैन्य देऊन मराठ्यांच्या विरुद्ध पाठविले. लढाई झाली. बादशहाच्या कृपेने मराठ्यांचा मोड झाला. मोठा जय मिळाला. ओझ्याचे बैल पकडण्यात आले. या सुमारास मराठ्यांच्या सैन्याची तीन हजाराची तुकडी महादेवाच्या डोंगरातून चालून आली. पुन्हा लढाई झाली. मुहंमद अस्करी, अलीमुराद आणि इतर अधिकारी पराजय पाऊन पळून गेले. मराठ्यानी मोगलांची सुमारे पाचशे माणसे ठार मारली आणि ते धान्याची रसद सोडवून घेऊन गेले.

बादशहा बक्षी मुखलिसखान याला म्हणाले, 'त्या अधिकाऱ्यांच्या मन्सबी काय होत्या ते कळवा.'

अलीमर्दानखान (सरदार) याच्या नोकरांनी पुढीलप्रमाणे अर्ज केला :– अलीमर्दानखान यांना मराठ्यांनी पकडून कैदेत टाकले आहे. एक लाख होन खंडणी भरल्याशिवाय मराठे अलीमर्दानखानाला सोडीत नाहीत. अलीमर्दानखानाची माणसे हैद्राबादेत आली आहेत. पण हैद्राबादचे अधिकारी वरील जिन्नस विकण्यास मनाई करीत आहेत.

बादशहांनी आज्ञा केली की : हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान याला लिहा की, 'त्या लोकांना जिन्नस विकू द्या. हरकत करू नका.'

लष्करातील वंजारी लोक उपद्रव करू लागले आहेत. आज्ञा झाली की : त्यांना कैद करून विजापूरच्या किल्यात ठेवण्यात यावे.

यारअलीबेगने अर्ज केला की : जुम्लतुल्मुल्क असदखान यांनी आपल्याला देण्यासाठी म्हणून मला एक पत्र पाठविले आहे. बादशहा म्हणाले, 'जाऊ दे, मला कशाला लिहिले. ते पत्र बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याजकडे पाठवून द्या.'

**२६ एप्रिल १६९३**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मराठ्यांची तुकडी हळसंगी गावापाशी चालून आली. लष्करातील बैल यांना, रानातील गवत कडबा आणण्यासाठी पाठविण्यात आले होते. त्यांना मराठे धरून घेऊन गेले.

लछराम रजपूत याचा मुलगा परमानंद मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

शहाजादा मुइजुद्दीन याच्या बरोबर असलेला तोफखान्याचा प्रमुख याने अर्ज पाठविला की : तोफांच्या माऱ्याने पन्हाळगडाचा एक बुरूज पडला आहे. लवकरच किल्ला हातात येईल. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला' (कौतुक).

**२७ एप्रिल १६९३**

आज कचेरी बंद होती.

**२८ एप्रिल १६९३**

मच्छिद्रगडचा किल्लेदार सुखराम याने अर्ज केला की : किल्ल्यात काहीच पुरवठा नाही.

मराठ्यांनी किल्ल्याला चहुकडून वेढा दिला आहे. काय हुकुम? आज्ञा झाली की : शक्य त्या उपायांनी किल्ला रक्षावा.

**२९ एप्रिल १६९३**

बादशहांनी तोफखान्याचा अधिकारी सफशिकनखान याचा नायब मुहंमद मुनीम याला विचारले, 'जुम्लतुल्मुल्क असदखान व जुल्फिकारखानबहादुर हे जिंजीच्या समोर तोफा टाकून निघून आले. त्यांची किंमत काय असेल?' त्याने अर्ज केला की, 'चार लाख पन्नास हजार रुपय.' बादशहांनी आज्ञा केली की : यापैकी तीन लाख रुपये असदखानाकडून आणि दीड लाख रुपये जुल्फिकारखानाकडून वसूल करण्यात यावेत.

**३ मे १६९३**

जुल्फिकारखानाच्या लष्करातून (जिंजीजवळ) कळले की : मराठ्यांनी कर्नाटकातील रापूरचा किल्ला जिंकून घेतला होता. जुल्फिकारखानाने तिकडे सैन्य पाठविले. त्याने किल्ला परत ताब्यात घेतला.

मुख्तारखानाचा मुलगा इफ्तिखारखान याला चौसाळा बीड (मराठवाडा) भागाचे रक्षण करण्यासाठी पाठविण्यात आले. बादशहा योगक्षेमाचा फातेहा पढले. इफ्तिखारखानाला काटी येथे तळ देण्यास सांगण्यात आले.

**५ मे १६९३**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : उत्तरेकडून काफिला येत होता. तो कामठीला पोहोचला तसा मराठ्यांनी त्याच्यावर हल्ला चढविला. त्यांनी काफिला पूर्णपणे लुटला आणि ते मालमत्ता घेऊन गेले.

सय्यद लतीफ किल्लेदार महालगड (बिदनूरच्या राणीचा प्रांत?) यांनी कळविले की : मी मराठ्यांचा मोड केला असून त्यांच्याकडून हस्तगत केलेला पुढील माल पाठवीत आहे :– बंदुखी दोन, मोठ्या तल्वारी दोन, लहान तल्वारी पन्नास, धनुष्य पंचवीस.

कल्याण भिवंडीचा फौजदार मातबरखान याच्या शिफारसीवरून त्रिंगलवाडीचा किल्लेदार मोहनसिंग याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**६ मे १६९३**

शहाजादा मुइजुदीन याच्या लष्करातून आलेल्या बातम्यावरून कळले की : मराठ्यांशी झालेल्या युद्धात मुहमंद ताहिर व हिदायतुल्ला हे मन्सबदार मारले गेले. आज्ञा झाली की : त्यांची नावे मन्सबदारांच्या यादीतून गाळण्यात यावीत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हमीदुद्दीनखानाने जड बुणगे मिरज येथे ठेवले. आणि तो मराठ्याच्या पाठलागावर निघाला. पण मराठ्यांचा पत्ता न लागल्यामुळे तो कोल्हापुरास पोहोचला. याच सुमारास शहाजादा मुइजुद्दीन याने रसद (दाणा गोठा) आणण्यासाठी लुत्फुल्लाखान याला कोल्हापुराकडे पाठविले होते. तेथे दोघांची गाठ पडली. ते मराठ्यांवर चालून जाण्याच्या तयारीत आहेत. मराठ्यांनी अब्दुल्रहमानखान हरकारा आणि हमीदुद्दीनखानाचा वाकेनवीस मीर याह्या यांचे सामान लुटून नेले.

बक्षी मुखलिसखान याने विनंती केली की : शहाजादा मुहंमद (मुइजुद्दीन) याने आपल्याला शिसाचे गोळे पाठवावे म्हणून मागणी केली आहे. आज्ञा झाली की : तोफखान्याचा नायब मुहंमद मुनीम याने दोनशे गोळे पाठवावे.

खानाजादखान यास आज्ञा झाली की : मीर अब्दुल्लाने सोलापूरपर्यंत, इफ्तिखारखान याने सोलापूरहून भूमपर्यंत, आणि आतिशखान फौजदार बीड याने बीडहून भूमपर्यंत मार्गाचे रक्षण करावे.

मतलबखानाने कळविले की : माझ्यापाशी शंकराजी व इतर सरदार तैनात आहेत. नियमाप्रमाणे सैन्य बाळगीत नाहीत. आज्ञा झाली की : त्यांची मन्सब कितीने कमी करावी ते चौकशी करून कळवावे.

## २२ ऑक्टोबर १६९३

नांदेड (मराठवाडा)च्या बातम्यांवरून कळले की : माणकोजी हा एक हजार स्वार व पायदळ घेऊन इकडच्या तालुक्यातून रकमा वसूल करीत आहे. हुकुम झाला की : अब्दुल्लाखान (सुभेदार नांदेड) याला लिहावे की, 'बंडखोरांचा मोड करण्यासाठी आपल्या नायबाला ताकीद करा.'

## २३ ऑक्टोबर १६९३

नथू हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : अमराजी हा सैन्यासहित भीमापार झाला आहे. आणि हिंमतखानबहादुर (बहादुरखानाचा मुलगा) त्याच्या पाठलागावर निघाला आहे.

हिंमतखानाला सोडून गेल्याबद्दल बहिर्जी पांढरे याची मन्सब कमी करण्यात आली. हिंमतखानाने लिहून पाठविले की : मी अमराजीचा पाठलाग करीत होतो इतक्यात म्हसवडचा ठाणेदार रणदुल्लाखान याने लिहून पाठविले की :– संताजी हा शिवनिहालगड (भूपालगड ?) कडे गेला आहे. म्हणून अमराजीचा पाठलाग टाकून देऊन संताजीच्या मागे निघालो आहे.

## २४ ऑक्टोबर १६९३

गाजिउद्दीनखानापाशी तैनात असलेला रुस्तमखान विजापुरी याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :– माझा एक हत्ती मराठा सरदार असरब (अमृत ?) पालकर याजपाशी होता. तो मराठा बादशहाची नोकरी करण्याच्या उद्देशाने आला होता. त्याने तो हत्ती फलटणचा ठाणेदार अब्दुलगनी याजकडे ठेवला. नंतर तो मराठा पळून त्या काफराला (राजारामाला) जाऊन मिळाला. मला तो हत्ती परत देण्यात यावा किंवा त्या मराठा सरदाराने बादशहाची खंडणी म्हणून काही रक्कम अब्दुलगनीला दिली असेल तर ती मला देण्यात यावी. बादशहांनी आज्ञा केली की : मराठा सरदाराने अब्दुलगनीपाशी जे काही ठेवले असेल ते मागवून घेण्यात यावे.

## २५ ऑक्टोबर १६९३

हरकाऱ्यांच्या लिहिण्यावरून कळले ते असे : खानजादखानाचा बक्षी आणि

वाकेनवीस अमानुल्ला हा स्वारांचे पथक घेऊन गदगहून बंकापूरला येत होता. दिलेरखानाचा नोकर फजूल आणि मलनजी सरदार यांनी दोनशे स्वारांनिशी अैनी व हत्तूर यांच्या दरम्यान त्यांच्यावर हल्ला केला. बक्षी अमानुल्ला हा पळून बंकापूरला आला. धारूमल पेशकार आणि मुहंमद हसन हे मारले गेले. लालबेग वगैरे वीस स्वार यांना पकडून नेण्यात आले. आज्ञा झाली की : तेथील फौजदार नूरुद्दीन याला बंडखोरांचा मोड करण्यासाठी लिहिण्यात यावे.

### २७ ऑक्टोबर १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव वगैरे सरदार दहा हजार स्वार व पायदळ घेऊन शहाजादा मुइजुद्दीन याच्या सैन्यावर तुटून पडले. रबिलावल महिन्याच्या पहिल्या दिवशी (२१ ऑक्टोबर १६९३) लढाई सुरू झाली. अद्याप चकमकी चालूच आहेत. आज्ञा झाली की : गाजिउद्दीन फीरोजजंग याला पन्हाळगडाला शहाजाद्याच्या कुमकेसाठी ताबडतोब जाण्यास लिहिण्यात यावे.

खानाजादखानाला लिहिण्यात यावे की : त्याने सैन्य घेऊन शहाजादा मुइजुद्दीन याच्या कुमकेसाठी पन्हाळगडाकडे जावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : नजीबखानबहादुर याने संताजीचा पाठलाग केला. भूपाळगडाजवळ युद्ध झाले. मराठ्यांचा पराजय झाला. काही मराठे मारले गेले.

### २८ ऑक्टोबर १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : राजारामाचा सरदार आणि अष्टकोट्याचा किल्लेदार अच्चन्ना नायक याने किल्ला देऊ म्हणून जुल्फिकारखानापाशी बोलणे लावले आहे. बादशहांनी या संबंधीचे फर्मान जुल्फिकारखानाच्या लष्करात पाठविले.

मराठे परंड्याकडे गेले आहेत. तिकडे तुम्ही जावे असे हमीदुद्दीनखानाला कळविण्यात आले.

### २९ ऑक्टोबर १६९३

खानाजादखानाने लिहून पाठविले की : राणीबिदनूरचे आठ हजार रुपये वसूल झाले. त्याच्या हुंड्या पाठविल्या आहेत. आज्ञा झाली की : खजिन्यात दाखल करा.

खटावचा ठाणेदार रामचंद्र याजपाशी किशनराव (कृष्णराव) तैनात होता. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

संगमनेरचा फौजदार व अमीन मुहंमद हादी याने लिहिले की : या भागातील ठाणेदार व जमीनदार यांना वेळप्रसंगी आपल्या मदतीस यावे म्हणून हुकुम व्हावा. तसे लिहावे म्हणून बहरामंदखानाला हुकुम देण्यात आला.

हिंमतखानबहादुर याने लिहिले की : खर्चास रक्कम देण्यात यावी. तोफखान्याचा सरंजाम माझ्याजवळ नाही. आज्ञा झाली की : पाचशे अश्रफ्या, पन्नास मण शिसेचे गोळे आणि बंदुकीची दारू ही पाठविण्यात यावी.

नुस्रतखान उर्फ जलालुद्दीन याची मन्सब कमी करण्यात आली. त्याची खान ही

पदवी काढून घेण्यात आली आणि त्याला मुद्गल व मस्की येथील फौजदारीवरून काढण्यात येऊन त्याच्या जागी मुद्गलचा किल्लेदार रामसिंग यास पूर्वीप्रमाणे फौजदार म्हणून नेमण्यात आले.

### ३० ऑक्टोबर १६९३

सरदारांना बक्षिसे देण्यात आली किंवा त्यांची मन्सब वाढविण्यात आली. त्यात बहिर्जी, खंडोजी, मालोजी, शंकराजी हे मन्सबदार होते.

अहमद (तरीन ?) हा पाचशे जात आणि दोनशे स्वार यांचा मन्सबदार होता. पन्हाळगडाजवळ मराठ्यांशी लढताना तो मारला गेला. त्याचे पथक किती होते व त्याचे वारस कोण याची माहिती बादशहांनी मागविली.

चांदवडचा किल्लेदार आणि फौजदार रहीमुद्दीन याने दोन महिन्यासाठी औरंगाबादेस जावयाचे आहे म्हणून रजा मागितली. आपल्या गैरहजेरीत आपला भाऊ अजीजुद्दीन काम करील असे त्याने कळविले. आज्ञा झाली की : पावसाळ्यात रजा देण्यात येईल.

बादशहांनी मुहंमद आदिल वगैरे दहा गुर्जबर्दार (दंडधारी) यांना रायरी (रायगड) च्या भोवती रात्रंदिवस गस्त घालण्यासाठी पाठविले.

अकलूजचा किल्लेदार आणि फौजदार बुरहाणुल्ला याची मन्सब वाढविण्यात आली.

### ३१ ऑक्टोबर १६९३

कासेगावचा ठाणेदार बहिर्जी याने अर्ज पाठविला की : कसरूगाव (कडूगाव?) चा परगणा मला तनखा म्हणून होता. तो खानजमान फतेहजंग याजकडे देण्यात आला आहे. अशाने माझे पथक परागंदा होत आहे. तो परगणा मला परत मिळावा. हुकुम झाला की : परगण्याच्या बहालीची सनद बहिर्जीला देण्यात यावी व त्याला हिंमतखानाच्या फौजेत तैनात करण्यात यावे.

मिरजेच्या बातमीवरून कळले की : मुहंमद अश्रफने किल्ल्यात धान्याचा साठा करून ठेवला होता. तो बादशहाकडे जाण्यास निघाला. मिरजेचा किल्लेदार व फौजदार मुहंमद अश्रफ याने धान्य विकून टाकले. बादशहाने आज्ञा केली की : विकलेल्या धान्याची रक्कम घेण्यात यावी. या पुढे काळजी घेण्यात यावी.

जलालुद्दीन नसीरखान याचा किताब आणि मन्सब ही पुन्हा बहाल करण्यात आली.

विजापुरी कर्नाटकचा फौजदार कासिम याजकडील बातमीपत्रावरून कळले की : मेलगिरी देशमुख हा बलगडचा किल्लेदार सत्रसाल याच्याशी संगनमत करून रयतेकडून घरामागे दोन रुपये वसूल करीत आहे. यामुळे रयत फरार झाली आहे. बादशहांनी आज्ञा केली की : तेथील दिवाणाला लिहा की यापुढे रयतेकडून एक दमडा घेऊ नका, त्यांच्यावर जुलुम करू नका.

खानाजादखान याने अर्ज केला की : राजा अवधूतसिंग हा पूर्वी माझ्या सैन्यात पिछाडी (चंदावल) सांभाळी. त्याने हरावलीला (आघाडी) राहावे असा हुकुम झाला आहे. त्याला पूर्ववत चंदावलीला राहाण्याची आणि असालतखानाला हरावलीला राहाण्याची आज्ञा व्हावी. अर्ज मंजूर करण्यात आला.

### २ नोव्हेंबर १६९३

बीडहून पुढील बातमी आली : अजमतुल्लाखान मन्सबदार हा आपल्या जहागिरीहून रुस्तमखानाकडे चालला होता. बालगावाजवळ मराठ्यांनी त्याला लुटले. बीडचा फौजदार आतिशखान याने त्याला एक घोडा व खर्चास काही रक्कम देऊन रुस्तुमखानाकडे पाठविले.

### ५ नोव्हेंबर १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गाजिउद्दीनखान हा शहाजादा मुइजुद्दीनपाशी पोहोचला. साताऱ्याजवळ कऱ्हाडपाशी धनाजी जाधवाशी त्याचे युद्ध झाले. त्याने मराठ्यांचा पराजय केला. अनेकजण मारले गेले. आपलेहि लोक कामी आले.

बादशहा म्हणाले, 'अकबराबाद (आग्रा)च्या सुभेदाराला लिहा की : बख्तावर, उर्फ रामचंद्र (धर्मांतरित) तुमच्या जवळ तैनात आहे. जरूर असेल तर तुमच्याजवळ ठेवा, नाहीतर आमच्या हुजुरात पाठवून द्या.'

अलाहाबादचा सुभेदार सिपाहदारखान याने लिहिले की : बनारसचा फौजदार मुहंमद मुहसिन आणि एक अब्दुसमदखान सोडून इतर फौजदार काही बाबीकडे जाणून बुजून काणाडोळा करीत आहेत. बादशहांनी म्हटले, 'जिजियाचा अमीन अब्दुलकादर याला लिहून तिकडे प्रत्यक्षात काय चालले आहे याची माहिती मागवा.'

### ६ नोव्हेंबर १६९३

अचना हिन्दु हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे दिली. शहाजादा मुइजुद्दीन याच्या लष्करातून बातमी आली की : तौहीदुद्दीन हा मराठ्यांशी युद्ध करताना जखमी होऊन पडला होता. मराठे त्याला पकडून घेऊन गेले.

बादशहांनी आज्ञा केली की : पन्हाळगडाच्या समोर सफशिकनखानाच्या ज्या तोफा बंदुका, रेहकले, मराठ्यांनी नेल्या त्याची किंमत सफशिकनखानाकडून वसूल करण्यात यावी.

जुल्फिकारखानाला हुकुम देण्यात आला की : त्याच्यापाशी तैनात असलेला दीनाजी राऊत तीन हजारी मन्सबदार याला हुजुरात पाठविण्यात यावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हिंमतखान हा संताजीच्या पाठलागावर होता. दोघांची मांदगावजवळ लढाई झाली. हिंमतखानापाशी सैन्य थोडे होते म्हणून त्याने खेड्याचा आसरा घेतला. तीन बाजूंनी संताजीचे सैन्य उभे आहे.

### ७ नोव्हेंबर १६९३

तुळशीराम हिंदू मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. गाजिउद्दीनखान बहादूरचा पुढीलप्रमाणे अर्ज आला :– आज्ञेप्रमाणे मी पन्हाळगडाकडे रवाना झालो. मी फलटणला पोहोचलो. तेथे धनाजी जाधव सैन्य घेऊन आला. मी चिनकुलीजखान आणि रुस्तमखान यांना त्याजविरूद्ध पाठविले. कऱ्हाडजवळ युद्ध झाले. गनिमाची अनेक माणसे ठार झाली. त्याचा पराजय झाला. तीस कैदी, सोळाशे घोडे, घोड्या, भाले हाती लागले. ते हुजुरात पाठविले आहेत.

बारामतीचा ठाणेदार यासीनखान याने अर्ज केला की : आज्ञेप्रमाणे पाच मण दारू गाजिउद्दीनखान बहादुराच्या फौजेतून मिळाली पण त्याचे कारभारी दोनशे बाण देत नाहीत. आज्ञा झाली की : गाजिउद्दीनखान फीरोजजंग यांना लिहून त्यांच्या कारभाऱ्या-कडून बाण देण्यास लावावे.

खानाजादखानाने लिहिले की : आपल्या आज्ञेप्रमाणे मी राणी बिदनूरच्या प्रांतातून निघून बंकापूरला पोहोचलो आहे. पन्हाळगडाकडे जात आहे.

## १३ नोव्हेंबर १६९३

तेजा व रामचंद हे मुसलमान झाले. त्यांना प्रत्येकी खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

अरदलीबेग आणि इतर एक असे दोन गुर्जबर्दार यांना पुण्या(जवळ)च्या किल्ल्यांची गस्त घालण्यासाठी पाठविण्यात आले.

खटावचा ठाणेदार रामचंद याजकडे मन्सबीचे निशाण पाठविण्यात आले.

बादशहा सरबराहखानाला म्हणाले, 'तुमचा मुलगा मुहमंद फाजिल पन्हाळगडाच्या मोर्च्यावर आहे. त्याचे काय म्हणणे आहे?' अर्ज केला की : आपल्यापाशी एक पथक तैनात केले तर मी कामगीरी करून दाखवीन असे मुलाचे म्हणणे आहे. बादशहांनी आज्ञा केली की : सफशिकनखानाला लिहून वीस बंदुकची मुहमंद फाजिलपाशी तैनात करण्यात यावेत आणि सरबराहखानांनी आपल्या मुलापाशी दहा मन्सबदार पाठवून द्यावे. सरंजामाची व्यवस्था मुल्ला फाजिलखान मीरसामान याने करावी.

परगणे जहापूर(महापूर?)चा देशमुख एकरराव याने अर्ज पाठविला की : तेथील फौजदार अलीखान व लक्षमी(लक्ष्मण) कायस्थ यांनी सरकारकडे पाठविण्याच्या दीड लाख रुपयांचे अपहरण केले आहे. मलाखद(मळखेड)चा किल्ला बेंडरांना देण्याचा त्यांचा बेत आहे. माझा आरोप त्यांनी नाकारला तर मी तो सिद्ध करून देण्यास तयार आहे. बादशहा म्हणाले, 'चौकशी करा. आरोप खरा असेल तर फौजदाराची बदली करा.'

## १४ नोव्हेंबर १६९३

गाजिउद्दीनखान बहादुर यांनी लिहून पाठविले की : उजरीखानाचा मुलगा मकार-मखान हा पुणे व शिवापूर येथे फौजदार होता. तो बदलला आहे. तेथे पूर्वीप्रमाणे फौज-दाराची नेमणूक व्हावी. बादशहांनी मान्य केले.

बादशहांनी करावलखान यास पन्हाळगडाकडे पाठविले. त्याने बादशाही तळापासून पन्हाळगडाचे अंतर मोजावे. आणि बादशहाच्या छावणीसाठी, गडावरून गोळे पोहोचणार नाहीत अशी जागा पाहून यावी. असे त्याला सांगण्यात आले. त्याला हजार रुपये देण्यात आले. अब्दुल्ला गुर्जबर्दार आणि इतर काही माणसे यांना त्याच्याबरोबर देण्यात आले.

## १५ नोव्हेंबर १६९३

बादशहांनी फाजिलखान मीरसामान यास आज्ञा केली की : हत्ती व ओझी वाहून नेणारे उंट ठिकठिकाणाहून बोलावून घ्या. आतिशखान फौजदार याला आपल्या बरोबर वाहतुकीची जनावरे व इतर सामान आणण्यास लिहा. शहाजादा आज्जमच्या तैनातीतील

सहाशे आणि शहाजादा बेदारबख्ताच्या तैनातीतील चारशे स्वार यांना खानाजादखान याजकडे (पन्हाळगडाच्या जवळ) पाठविण्यासाठी गुर्जबर्दार नेमण्यात आले.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान याला हुकुम देण्यात आला की : शहाजहानाबाद दिल्लीहून खजिना येत आहे. त्याला सुरक्षितपणे खुजिस्ताबुनियाद औरंगाबादपर्यंत पोहोचवा.

वऱ्हाडचा सुभेदार नवाजिशखान याला आज्ञा करण्यात आली की : संताजी तुमच्या प्रांतात येत आहे. त्याचा मोड करा. तुमच्या प्रांतातील फौजदारांना कुमकेसाठी बोलावून घ्या.

### १६ नोव्हेंबर १६९३

उदगीरचा फौजदार मुहंमद याह्या याची उदगीरच्या किल्ल्यावर नेमणूक करण्यात आली. पूर्वीचा किल्लेदार सय्यद मुस्तफा याला हुजुरात बोलावण्यात आले.

दमाजी राऊत जुल्फिकारखानापाशी तैनात होता. त्याला सय्यद अब्दुल्ला खान (नांदेडचा सुभेदार) याजपाशी तैनात करण्यात यावे असा हुकुम देण्यात आला.

पुण्याचा ठाणेदार ख्वाजा अबुलमकारमखान याजपाशी मुजफ्फर, ख्वाजाशाह आणि मुहंमद नासिर हे मन्सबदार तैनात करण्यात आले.

जुल्फिकारखानाच्या लष्करातून सलीमबेग आणि खैरुल्ला हे मन्सबदार निघून गेले असे कळले. फरारी म्हणून नोंद व्हावी असा हुकुम झाला.

### १८ नोव्हेंबर १६९३

अब्दुलसत्तारने अर्ज पाठविला की : पन्हाळगडाच्या युद्धात मुहंमद अस्करीच्या बरोबर मी जखमी झालो. अद्याप आरोग्य नाही. शहाजहानाबाद (दिल्ली)ला जात आहे. दोन वर्षांची रजा द्यावी. अर्ज मंजूर करण्यात आला.

### १९ नोव्हेंबर १६९३

अब्दुलरसूलखानाला निरोप देण्यात आला. नोरगर हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

हिंमतखानबहादूर, हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान यांच्याकडून पुढीलप्रमाणे अर्ज आला :– विक्रमहळ्ळीजवळ संताजी बरोबर युद्ध झाले. गोकुळ, अजना वगैरे बेडर आणि संताजीबरोबरची तीनशे माणसे ठार झाली. तीनशे घोडी, निशान नगारे आमच्या हाती आले. आमची अनेक माणसे ठार किंवा जखमी झाली. मराठ्यांचा आम्ही पाठलाग केला. अर्ज वाचून बादशहा म्हणाले, ‘ मीठ खाल्ल्याचे सार्थक झाले, शाबास.’

अर्ज करण्यात आला की : इमामकुली हा बादशाही लष्कराच्या भोवतालच्या भागाचा राहदार (संरक्षक) होता. तो बेडरांच्या युद्धात ठार झाला. त्याच्याकडे कासेगावपर्यंतच्या प्रदेशाच्या रक्षणाचे काम होते.

हिंमतखानाने अर्ज पाठविला की : आपण जडबुणगे सांगोल्यात ठेऊन मराठ्यांच्या पाठलागावर गेलो आहोत. खानाजादखानाला आज्ञा करण्यात आली की : तुम्ही अकलूजला

जाल त्यावेळी सांगोल्याहून हिंमतखानाचे बुणगे बरोबर घेऊन जा.

खानदेशातील अजीजुल्लाखान वगैरे ठाणेदारांच्या नावे हुकुम गेले की : खानदेश बुऱ्हाणपूरचा सुभेदार मराठ्यांचा मोड करण्यासाठी सरहद्दीवर येईल. तो तुम्हाला बंदोबस्तासाठी बोलावू पाठवील त्यावेळी तुम्ही त्याला जाऊन मिळावे.

**२० नोव्हेंबर १६९३**

शंकर गुर्जबर्दार याला शेवगावच्या फौजदाराकडे पाठविण्यात आले. तेथील देऊळ फौजदाराकडून उध्वस्त करवून परत येण्यास त्याला हुकुम झाला.

सिरहिंद(पंजाब)च्या बातम्यावरून कळले की : गोविंद नावाच्या इसमाने (गुरु-गोविंदसिंग) आपण गुरुनानक(गुरु) असल्याचे जाहीर केले आहे. बादशहांनी बहरामंद-खानाला म्हटले, 'तेथील फौजदाराला लिहा की गर्दी(शांततेचा बिघाड) होऊन देऊ नका. (हुजुम न दहंद)'

**२१ नोव्हेंबर १६९३**

गंगाराम मुसलमान झाला. त्याला खिलतीतीची वस्त्रे देण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : हमीदुद्दीनखान व ख्वाजाखान हे गुल-बर्ग्याकडे आले आहेत. हिंमतखान हा संताजीचा पाठलाग करीत आहे. संताजीने अमृतराव याला चार हजार स्वार देऊन वऱ्हाडकडे पाठविले आहे. स्वतः संताजी हा सहा हजार स्वार घेऊन मलाखड(मळखेड जवळ) पोहोचला. बादशहांनी बहरामंदखानाला म्हटले, 'हमीदुद्दीनखान आणि ख्वाजाखान यांना लिहा. त्यांनी अमृतरावाचा पाठलाग करावा' लष्करखानाने संताजीच्या पाठलागावर जावे आणि अब्दुल्लाखानाने(नांदेडचा सुभेदार) आपल्याकडे न येता हिंमतखानाला मिळून संताजीचा मोड करावा. असे हुकुम देण्यात आले.

खुजिस्ताबुनियाद औरंगाबाद येथून पन्नास स्वार इस्लामगड(रायगड)चा ठाणेदार अब्दुर्रज्जाकखान याजकडे पाठवावे. त्यांना तेथे असलेला अजदहाबेग गुर्जबर्दार याजपाशी तैनात करावे असा हुकुम देण्यात आला.

हिंमतखानाकडे त्याने संताजीवर मिळविलेल्या विजयाबद्दल खिलतीची वस्त्रे आणि फर्मान ही पाठविण्यात आली.

**२३ नोव्हेंबर १६९३**

अर्ज करण्यात आला की : शहाजादा मुइजुद्दीन याजबरोबर तैनात असलेले दयान, अल्लाहदादखान व अजीजुल्ला हे पन्हाळगडाच्या युद्धात मारले गेले.

चौल बंदरचा अधिकारी मुहंमद आरिफ हा मरण पावला.

**२५ नोव्हेंबर १६९३**

जीवन लोहार हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

असदखानाच्या लष्करातून पुढील वृत्त कळले : संताजीचे दोन हेर पकडण्यात आले. त्यांच्यापाशी पत्रे सापडली. संताजीने ती पत्रे बालखेड(मळखेड)च्या देशमख देशपांड्यांना लिहिली होती. पत्रात म्हटले होते :– बरेच दिवसांपासून तुमच्याकडून

चौथ आला नाही. तुम्ही ही पत्रे मिळताच ताबडतोब सात हजार होन पाठवून द्यावे.

बादशहांनी आज्ञा केली की : फीरोजगड (यादगीर) च्या किल्लेदाराला लिहा :– हेरांना ठार मारण्यात यावे. पुन्हा एखादा हेर आला तर त्याची गाढवावरून धिंड काढण्यात येऊन त्याला ठार मारण्यात यावे.

बातमी आली की : हटकरांनी भूमजवळ (मराठवाडा) मामूरखानाच्या बाजार-बुणग्यावर हल्ला केला. काही घोडी व माल त्यांनी लुटून नेली.

मुहंमद तकी उर्फ फरदिलखान ठाणेदार खडी(?) याने बातमी पाठविली की : मराठे या भागात आले. त्यांच्याशी युद्ध झाले. त्यांच्यापैकी अनेकजण ठार झाले. त्यांचा पराजय झाला. त्यांचे घोडे, छत्र, निशान, भाले इत्यादी हस्तगत केले ते पाठविले आहेत. आज्ञा झाली की : माल खानसाम्याच्या हवाली करा.

बिदनूरच्या राणीचे वकील खंडणी घेऊन आले. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्याचा हुकुम झाला.

रहमान अली तोफखान्याचा दारोगा हैद्राबाद, याने एक लहान तोफ तयार केली होती. तशी तोफ तयार करण्याची आज्ञा करण्याची आली. या तोफेतून बंदुकीच्या गोळ्या, भाले इत्यादी उडविता येत असत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा बेडरांच्या मुलुखात सरगोल(?) डोंगरात आला आहे. हिंमतखान हा मलाखेड (मळखेड?) या मध्यवर्ती ठिकाणात आहे.

### २६ नोव्हेंबर १६९३

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : लखोजीने जलेश्वर लुटले.

शहाजादा मुइजुद्दीन याच्या लष्करातून बातमी आली की : पन्हाळगडाच्या युद्धात अहमद तरीन हा जखमी होऊन पडला : मराठे त्याला पन्हाळगड किल्ल्यात घेऊन गेले. त्याची जहागीर बहाल ठेवण्यात आली होती. पण आता समजले की, मराठ्यांच्या कैदेत त्याचा मृत्यु झाला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : मन्सबदारांच्या यादीतून त्याचे नाव वगळण्यात यावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा करनूल(?) च्या डोंगरातून निघून हैद्राबादकडे गेला आहे.

### २७ नोव्हेंबर १६९३

बिदनूरच्या राणीचे दिवाण शंकर नारायण व वकील भागोपंडित हे बादशहाला भेटले.

हैद्राबादेत चार मोठ्या तोफा मोडून पडल्या होत्या. त्या पुन्हा तयार कराव्या अशी आज्ञा देण्यात आली.

बादशहांनी जिंजीच्या किल्ल्याचा नकाशा (तरह, प्लॅन) मागविला आणि तो पाहिला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संतकोटा (सातगड) किल्ल्याचा किल्लेदार याने

किल्ला (मोगलांना) देऊ म्हणून सांगितले होते. जुल्फिकारखान तेथे गेला. किल्लेदार अच्चप्पा नायक याची गाठ पडली. जुल्फिकारखानाने त्याला भेटी दिल्या. अद्याप किल्लेदाराने किल्ला हवाली केला नाही.

अहमद तरीन हा पन्हाळगडाच्या युद्धात वारला होता. त्याचा काका मुहंमद आज्जम, भाऊ मुहंमद अश्रफ व मुलगा मुहंमद अफजल यांना मन्सबी देण्यात आल्या.

जालन्याच्या एका माणसाने दरबारात पुढीलप्रमाणे फिर्याद केली :– एका हिंदु माणसाने माझे घर आणि घराजवळची मशीद ही उध्वस्त केली. तेथील फौजदारापाशी मी तक्रार केली. फौजदाराने म्हटले, 'त्या माणसाला शिक्षा करणे माझ्याने शक्य होणार नाही.' बादशहांनी आज्ञा केली की : फौजदाराची बदली करा आणि त्याची मन्सब काय आहे कळवा.

## २९ नोव्हेंबर १६९३

देवगडचा जमीनदार बख्तबलंदयाला बहरामंदखानाच्या हवाली करण्याचा हुकुम झाला.

अब्दुल्वासे याला हनमंतगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले होते. तो जाता जाईना. त्याला जबरदस्तीने लष्कराच्या बाहेर घालवून हनमंतगडकडे पाठविण्यात आले.

करावलखान हा विजापूर ते पन्हाळगड किती टप्पे होतात हे पाहण्यास गेला होता. तो परत आला. त्याने अर्ज केला की : मी ऐनापुरापुढे गेलो होतो. इतक्यात काफरांची (मराठ्यांची) तुकडी चालून येताना दिसली. मी त्यांच्याशी लढलो. त्यांची काही माणसे मारली गेली. मी त्यांचा पराजय करून मिरजेला पोहोचलो. सय्यद अब्दुल्लाखान याने पिडनायक (बेडर) याला लिहिले की, संताजीचा मोड करण्यासाठी तुम्ही माझ्याकडे आपले पायदळ पाठवा. त्याप्रमाणे पिडनाइकाने आपले पायदळ घेऊन जाण्यासाठी आपला कारभारी नरसिंग याला सांगितले आहे.

वऱ्हाड सुभ्यातून बातमी आली की : मराठ्यांविरुद्ध लढण्यासाठी म्हणून एदलाबादचा फौजदार मुहंमद अफजल, जामोदचा फौजदार शेख मुहंमद इस्माईल, खानदेशातील बोदूर(?)चा फौजदार मुहंमद हुसेन हे बाळापूर परगण्याच्या कनोरा या गावास गेले. त्यांनीच ते गाव लुटून जाळले. नंतर ते आपापल्या ठिकाणी गेले. बादशहांनी आज्ञा केली की : बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान याने चौकशी करून कळवावे.

## ३० नोव्हेंबर १६९३

हिंमतखानबहादुर याजकडून पुढील बातमी कळली की : हिंमतखान आणि सय्यद अब्दुल्लाखान यांनी संताजीला चितापूरजवळ अलूरच्या गढीत कोंडले असून किल्ल्याला वेढा घातला आहे.

संताजीला आम्ही बाहेर पडू देणार नाही अशा अर्थाचे मुचलके तिकडील जमीनदारांकडून घेण्यात आले आहेत.

## १ डिसेंबर १६९३

बादशहांनी खानजमान फत्तेजंग (संभाजीराजांना पकडणारा) याला सांगून पाठविले

की, 'तुम्हाला अकलूजवर नेमण्यात येत आहे.'

**२ डिसेंबर १६९३**

साहेबराय हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

सादतमंद उर्फ चैतसिंग याला खानाजादखान याजपाशी तैनात करण्यात आले. तुकोजी मन्सबदार हा अब्दुलरसूलखानाच्या तैनातीत होता. तो आजारी पडला. सबब त्याला बादशहांनी आपल्या तैनातीत घेतले.

शहाजादा मुइजद्दीन याच्या तैनातीत असोजीचा भाऊ महादजी होता. आपल्या मुलीचे लग्न आहे म्हणून त्याने महिन्याची रजा मागितली. शहाजाद्यांनी रजा मंजूर केली.

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याच्या लष्करातून कळले की : त्याने माहुलीजवळ असलेला सिद्धगडचा किल्ला मराठ्यांच्याकडून ताब्यात घेतला. या कामात खर्च आला आहे. किल्ल्याच्या सोन्याच्या किल्ल्या पाठविल्या आहेत.

पुण्याचा ठाणेदार मकारमखान याला कमी करून त्याच्या जागी नाहरखानाचा मुलगा घोरीखान याची पूर्वीप्रमाणे नेमणूक करण्यात आली व त्याची मन्सब वाढविण्यात आली.

मुख्तारखानाने अर्ज केला की : कामाठी हे माझ्या जहागिरीत आहे. तेथील फौजदारी माझ्याकडे आहे. त्या भागात बंड माजले आहे. माझी ५० माणसे माझ्या पथकातून तिकडे पाठविण्याची परवानगी द्यावी. विनंती मंजूर करण्यात आली.

सगरचा जमीनदार पिडनायक याने नजर पाठविली.

**३ डिसेंबर १६९३**

बागराम हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. हमीदुद्दीनखानाने विनंती लिहून पाठविली की : मराठ्यांशी झालेल्या युद्धात आमची घोडी जाया झाली. मराठ्यांची घोडी आमच्या हाती लागली. त्यांना डाग देण्यात (रजिस्टर करण्याचा, नोंदण्याचा एक प्रकार) यावेत. फौजेचे बक्षी हुकुम आल्याशिवाय हे काम करू इच्छीत नाहीत. बादशहांनी हमीदुद्दीनखानाच्या विनंतीप्रमाणे करण्याची आज्ञा केली.

कल्याण भिवंडीच्या बातमीवरून समजले की : मातबारखानापाशी तैनात असलेला गोकुळराम मन्सबदार मरण पावला.

अथणीचा फौजदार हैबतराव याने विनंती केली की : मला खर्चासाठी पाच हजार रुपये मंजूर झाले होते. त्यापैकी अद्याप एक हजार मिळावयाचे आहेत. ते देण्यात यावेत. विनंती मंजूर करण्यात आली.

* * *

# तीन

## ६ मार्च ते २१ जुलै १६९४

### ६ मार्च १६९४

हिंमतखान बहादुर याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :— मी संताजीच्या पाठलागावर तालुके कालकुर्ती मौजे भरमच्या जवळ सात कोसावर होतो. मराठे चालून आले. युद्ध झाले. मराठ्यांचा आम्ही पराजय केला. यात बहिर्जी पांढरे इत्यादींनी चांगली कामगिरी बजाविली. हिंमतखानाच्या पुढील अधिकाऱ्यांना मनसबीची वाढ इत्यादी बक्षिसे देण्यात आली :— बहिर्जी पांढरे, सियादतखान, शफीबेग आणि मानसिंग राठोड.

गुप्तचरांच्या बातमीवरून कळले ते असे :— रानानिरमल (तिरूमल?) याने बेडर सरदारांना घेऊन देवगीरवर हल्ला केला. त्याने चिटगुप्पा येथे आपली ठाणी बसविली. खेड्यापाड्यातून तो आपला जम बसवीत आहे. मुहंमद इब्राहीम फौजदार याच्या जहागिरीच्या उटहळ्ळी गावावर तो चालून आला. त्याने दोन माणसे जखमी करून चौथाई वसूल केली. त्याने चिंचोळी तालुक्यातील रेवतीगाव लुटून फस्त केले. बादशहाने आज्ञा केली की : फौजदारांना लिहून बंडखोरांचा मोड करण्याचा हुकुम द्यावा.

जगदेवराव (जाधव) हा हमीदुद्दीनखानापाशी तैनात होता. त्याला इंडीच्या ठाण्यावर आणि त्याच्या भावाला सनोल्या (?) च्या ठाण्यावर पाठविण्यात आले.

### ७ मार्च १६९४

हुकुम झाला की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त याला हुजुरात बोलाविण्याचे फर्मान पाठविण्यात यावे.

फतेहजंग खानजमान, त्याची मुले, राजा अवधूतसिंग (ओर्छा) वगैरे सहा हजार

स्वार यांनी पन्हाळगडाकडे मुइजुद्दीनपाशी रवाना व्हावे असा हुकुम देण्यात आला.

पन्हाळगडाचा किल्ला मराठे देत असतील तर उत्तम. नाही तर पुन्हा मोर्चेबंदी करून पन्हाळ्याला वेढा द्या अशा अर्थाचा हुकुम शहाजादा मुइजुद्दीन याजकडे पाठविण्यात आला.

हिंमतखान बहादुर याजकडे एक हजार स्वार पाठवून देण्याची बादशहांनी आज्ञा केली.

बादशहांनी हुकुम दिला की : मराठ्यांचा मोड केल्यावर हमीदुद्दीनखान यांनी हुजुरात यावे. त्याच्यापशी तैनात असलेली मानसिंग राठोड व दिलेरखानाची माणसे यांनी मतलबखानाकडे जावे.

मतलबखान याने अडगाव ते मसूर आणि वांगी ते नळदुर्ग या भागाचे संरक्षण करण्यासाठी जेथे आवश्यक वाटेल तेथे तळ करावा.

### ८ मार्च १६९४

सय्यद अब्दुल्लाखान (सय्यदबंधूंचा बाप) याचा मुलगा सय्यद हसन अली याने विनंती केली की : मला आपल्या वडिलांची पथके घेऊन हिंमतखानाला जाऊन मिळावे असा हुकुम झाला आहे. पण माझा भाऊ नूरुद्दीन हा माझ्या वडिलांपाशी आहे. त्याला हिंमतखानाकडे जाण्यास सांगावे. मला आपल्या चरणापाशी राहू द्यावे. विनंती मंजूर करण्यात आली.

### १० मार्च १६९४

हामिदखानाला शहाजादा मुइजुद्दीन याच्या लष्करात पाठविण्यात यावे म्हणून अमानुल्लाखानाला खास याच कामासाठी नेमण्यात आले.

शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात असलेले शंभर बर्कंदाज आणि शंभर अहदी (शिलेदार शिपाई) यांना हिंमतखान बहादुर याजपाशी तैनात करण्यात यावे असा बादशहाने हुकुम दिला.

रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुलऱ्हमानखान याने पुढीलप्रमाणे वृत्त पाठविले :–

(१) जोकीबेग वगैरे जमीनदार मला सोडून गेले. मी त्यांना लिहिले की, तुम्ही येऊन लष्करात दाखल व्हा. ते पालीखेडच्या किल्ल्याजवळ उतरले होते. मराठ्यांनी रात्री त्यांच्यावर छापा घातला. जोकीबेगसहित अकरा माणसे ठार व सतरा माणसे जखमी झाली. या लोकांनी पाचाडच्या सावकराकडून कर्ज काढले होते. माझेही चार हजार पाचशे, त्यात रोख्याच्या कागदाशिवाय दोन हजार पाचशे होते. त्यांनी सावकरांकडून बारा हजार रुपये कर्ज घेतले. मी मध्यस्थी होतो. सावकार मला तगादा करीत आहेत व हुजुरात येऊन तक्रार गुदरण्याच्या विचारात आहेत. बादशहांनी एतिमादखानाला (सुरतेचा अधिकारी) हुकुम द्यावा की, माझी व सावकारांची बाकी देण्यात यावी.

(२) मरहूम फतेह जंगच्या माणसांच्या मोबदल्यात अद्याप कोणी येथे तैनात होऊन आले नाही. लवकर पथक तैनात व्हावे. नानाराव वगैरे मराठे तैनात आहेत. त्यांच्या ऐवजी दुसरे तैनात व्हावेत. तोफखान्याच्या रक्षणासाठी आणि देखरेखीसाठी ही

व्यवस्था व्हावी. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यांनी चौकशी करून कळवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

११ मार्च १६९४

बनवार हिंदू आणि लोखराज हिंदू हे मुसलमान झाले. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मतलबखानाचा अर्ज आला. त्यात पुढील मजकूर होता :– मराठ्यांची तुकडी इकडे (बीड भागात) आली होती. मी त्यांच्यावर चालून गेलो. शत्रूची बरीच माणसे मारली गेली. त्यांचा पराजय झाला. त्यांनी रयतेकडून गुरेढोरे आणि इतर माल पळविला होता. तो सोडवून घेऊन मालकांना परत केला. अर्ज ऐकून बादशहा म्हणाले, 'मजुरा (कौतुक) झाला.'

१३ मार्च १६९४

गाजिउद्दीनपाशी तैनात असलेल्या पुढील सहकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली :– अचलोजी, शिवाजीचा जावई (वास्तविक पाहता शिवाजी महाराजांचा जावई हरजीराजे महाडीक याचा अचलोजी हा भाऊ), जनकोजी पाच हजारी (जानोजी? ).

शहाजादा बेदारबख्त याने आपल्या इलाख्यात अब्दुल्रसूलखान मियाना याला ठेवून स्वत: हुजुरात यावे असे त्याला लिहिण्यात आले.

शहाजादा मुइजुद्दीन याजकडे हुकुम पोहोचविण्यात आला होता. परत आलेल्या गुर्जबर्दारने सांगितले की, 'शहाजादा मुइजुद्दीन आपल्या आज्ञेप्रमाणे हुजुरात येण्यास निघाले असून पन्हाळयाच्या अलीकडे सात कोसावर ते वळकापूर या ठिकाणी आले आहेत.' लुत्फुल्लाखान वगैरेंना बजावण्यात आले होते की, 'पन्हाळयाच्या आसपास रहावे.' लुत्फुल्लाखान आणि इतर हे धान्य टंचाईमुळे चिंतित होऊन पन्हाळयाहून निघून शहाजाद्यापाशी आले. शहाजाद्यांनी ठरविले की, कृष्णा येथून तीन कोसावर आहे. तेथे पोहोचून मुक्काम करावा. बादशहांनी मुहंमद नसीरला शहाजाद्याकडे पाठविले आणि निरोप केला की, शहाजाद्यांनी तेथूनच पन्हाळयाकडे जावे. मराठे पन्हाळा देत असतील तर बरे, नसल्यास पन्हाळयाला पुन्हा वेढा घालावा.

गाजिउद्दीनखान बहादुर यांनी लिहून पाठविले की : आपल्या लष्करात अनेकांची घोडी मेली आहेत. त्यांच्या जागी दुसरी घोडी देण्यात यावी. दोनशे घोडे गाजिउद्दीनकडे पाठविण्याचा हुकुम देण्यात आला.

श्रीरंगपट्टणचा जमीनदार (राजा) रावजगदेव याला पाचशे स्वार व एक हजार पायदळ शिपाई जुल्फिकारखानाकडे पाठवून देण्याचा हुकुम देण्यात आला.

अब्दुल्लाखान, (सय्यद बंधूंचा बाप), बीदर (नांदेडचा सुभेदार) याने लिहिले की : माझी पथके माझा मुलगा सय्यद नूरुद्दीन अली याजबरोबर हिंमतखानाकडे पाठविण्यात यावी असा हुकुम झाला. पण मी अकार्यक्षम आणि माझ्यापाशी पथके नाहीत. मी शत्रूचा (मराठ्यांचा) कसा मोड करू शकणार? बादशहांनी आज्ञा केली की : हुकुम मागे घेण्यात यावा.

### १४ मार्च १६९४

आज उपवासाचा दिवस असल्यामुळे बादशहांनी दिवाने अदालत (न्यायकचेरी) बंद ठेवण्याची आज्ञा केली.

### १५ मार्च १६९४

हमीदुद्दीनखान हा मराठ्यांच्या विरुद्ध वऱ्हाड प्रांताकडे गेला होता. तो आपल्या सहकाऱ्यांसह बादशहाच्या सेवेत हजर झाला. बादशहा म्हणाले, 'आफरीन बाद, धन्य धन्य. गनिमांना (मराठ्यांना) चांगले खडे चारलेत (गनीमरा खूब तंबी नमूदा).'

असोजी हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

अकबराबाद (आग्रा) सुभ्यातील ईरज येथून आलेल्या बातम्यावरून कळले की : ओर्छा येथे अतिशय दारु (पिण्याची) तयार होते आणि तिची बाजारात विक्री होते. हुकुम झाला की : ओछर्याचा राजा अवधूतसिंग याच्या वकीलाकडून आपण दारु वगैरे निषिद्ध वस्तू तयार करू देणार नाही अशा अर्थाचे मुचलके घ्या.

ईरजहून बातमी आली की : ओछर्याच्या राजाचा कारभारी दहा गढ्या बांधून त्यात दारुगोळा भरून, गढ्याभोवती खंदक खणून गढ्यांची मजबुती करीत आहे. राजाला लिहून गढ्या बांधण्यात येऊ नये अशी ताकीद करण्याचा हुकुम देण्यात आला.

### १७ मार्च १६९४

यादगारबग हा उमदीचा ठाणेदार होता. आतिशखानाकडे एक यसावल (तातडीचा शिपाई) देऊन त्याला त्या ठाण्यावर पाठविण्यात यावे असा हुकुम झाला.

शहाजादा बेदारबख्त याला हुजुरात बोलावण्यात आले होते. आता त्याने आपल्या इलाख्यातच रहावे असा हुकुम देण्यात आला.

रायरी (रायगड)चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याने अर्ज पाठविला की :

(१) अब्दुर्रहीम वगैरे माझ्याशी तैनात होते. त्यांची येथून बदली होऊन ते गेले आहेत. त्यांच्या जागेवर अद्याप कोणी आले नाहीत. आज्ञा झाली की : जितकी माणसे कमी झाली असतील त्यांच्या जागी दखनी माणसे नेमण्यात यावी.

(२) शिसेचे गोळे व दारू अद्याप आली नाही. आज्ञा झाली की : खान फीरोज जंग (गाजिउद्दीन)च्या लष्करातून दोनशे बाण, अहमदनगर आणि बहादुरगड येथून शिसेचे गोळे, व सुरतेतून वर्षभराचा दारुगोळाही पाठवावा.

(३) पाचाडच्या ठाण्यासाठी दहा तोफा दंडराजपुरीच्या किल्ल्याहून व सरंजाम सुरतेहून मागवून द्यावा. आज्ञा झाली की : सुरतेचा अधिकारी एतिमादखान याने व्यवस्था करावी.

(४) माझ्या पायदळातील बरेच शिपाई इस्लामगड (रायगड)च्या मोरचेलवर नेमले आहेत. मला त्यांची खात्री वाटत नाही. त्यांच्या ऐवजी इतर माणसे नेमण्याविषयी फौजेच्या दिवाणाला हुकुम व्हावा. आज्ञा झाली की : तोफखान्याच्या दारोग्याच्या सल्ल्याने माणसे नेमावी.

शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन याला पुढीलप्रमाणे आज्ञा करण्यात आली :– त्याने सफशिकनखान व चांद्याचा जमीनदार किशनसिंग इत्यादींना बरोबर घेऊन हुजुरात यावे. हामिदखानाने अबापूरला जावे. लुत्फुल्लाखान याने सैन्य घेऊन पन्हाळगडाला वेढा (पुन्हा) घालण्यासाठी तिकडे जावे.

### १८ मार्च १६९४

इखलासखान मियाना हा मराठ्यांच्या कैदेत होता. तो सुटून आला. त्याची पूर्वीची चार हजारी (जात), दोन हजार स्वार ही मन्सब बहाल करण्यात येऊन त्याला खानदेशाच्या सुभ्यात तैनात करण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : आतिशखान हा उमदी ठाण्यावरून मराठ्यांच्या पाठलागावर गेला आहे.

मराठ्यांशी झालेल्या युद्धात तुमच्या सहकाऱ्यांपैकी कुणी कुणी कामगिरी बजाविली ते कळवा असे हमीदुद्दीनखानाला सांगण्यात आले.

मतलबखानाने पुढील वृत्त पाठविले :– औरंगाबादेहून नऊ तोफा आणाव्या अशी हुजुरांची आज्ञा होती. त्या तोफा माझ्या इलाख्यात पोहोचल्यावर त्यांना पुढे रवाना करण्यासाठी सत्रसाल राठोड यास मी पाठविले. त्याने तोफा कल्लर (?) पर्यंत आणल्या. तोच संताजी चालून आला. मला बातमी कळताच मीही तेथे पोहोचलो. युद्ध झाले. मराठे पराजय पावून महादेवाच्या डोंगराकडे निघून गेले.

बादशहाने आज्ञा केली की : आतिशखानाने संताजीच्या पाठलागावर जावे.

### १९ मार्च १६९४

बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने अर्ज केला की : आतिशखान हा उमदी गावाकड (इंडी?) मराठ्यांच्या पाठलागावर गेला होता. तो परत आला.

### २० मार्च १६९४

दंडाराजपुरीचा फौजदार शिद्दी जरीबखान, याने हजार (?) मेणबत्त्या पाठविल्या.

हिंमतखानाचा अर्ज आला की : माझ्यापाशी दौलतबेग तैनात होता. त्याचा घोडा मारला गेला आहे. एक घोडा देण्यात यावा. अर्ज मंजूर झाला.

अधोनीचा फौजदार रादअंदाजखान याने कनगलचा किल्ला जिंकून घेतला. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या त्याने पाठविल्या.

हरकाऱ्याच्या तोंडून पुढील वृत्त कळले :– शहाजादा आज्जम याजपाशी तैनात असलेला किफायत अफगाण हा बादशाही हत्ती घेऊन अक्कलकोटला आला होता. मराठ्यांनी त्याच्यावर हल्ला केला. सहा दिवस चकमकी चालू होत्या. अनेक मराठे मारले गेले. आपलीही अनेक माणसे जखमी झाली. बादशहा म्हणाले, ' मजुरा (कौतुक) झाला .' बादशहांनी त्याच्याबद्दल चौकशी केली आणि म्हटले, ' माणूस कामाचा आहे.'

### २१ मार्च १६९४

वैसखान हा मराठ्यांच्या मोहिमेवर उंदी (औंधी, औंध?) कडे गेला होता. तो

आपल्या सहकाऱ्यांसहित बादशहाच्या सेवेत हजर झाला.

शहाजादा बेदारबख्त हा गदगकडे रवाना झाला असे कळविण्यात आले.

सुभान हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. इहितिशामखानाचा मुलगा शेख शम्सुद्दीन हा पन्हाळा भागातून येऊन बादशहांना भेटला.

मुख्तारखानाचे दोनशे स्वार मतलबखानापाशी तैनात करण्यात यावेत असा हुकुम झाला.

नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार याला अलानेर(अळंद?) फौजदारीवर नेमण्यात आले.

परंडा(मराठवाडा) येथील बातम्यांवरून पुढीलप्रमाणे कळले :– मराठा सरदार मल्हारराव हा पाच हजार स्वारांचे सैन्य घेऊन या प्रांतात आला. त्याने इकडील खेडी उध्वस्त केली. मराठे नळदुर्गच्या दिशेने जाण्याच्या बेतात आहेत.

बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'तयार रहा. मराठ्यांचा मोड करण्यासाठी मी तुम्हाला पाठविणार आहे.'

अलीमर्दानखानाने लिहिले की : शेख अब्दुल्ला हा अस्करखानाच्या बरोबर मराठ्यांच्या कैदेत सापडला होता. तो आता सुटून आला आहे. त्याला पूर्वीप्रमाणे मन्सब बहाल करण्यात यावी. बादशहांनी त्याला मन्सब दिली.

## २४ मार्च १६९४

गजेंद्रगडचा किल्लेदार सय्यद फरुख याला कलोरीची (?) ही किल्लेदारी सांगण्यात आली. हशमाची पन्नास माणसे कलोरीवर तैनात व्हावीत असा हुकुम देण्यात आला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : शहाजादा मुइजुद्दीन हा बादशहाकडे येण्यासाठी मिरजेहून निघाला आहे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : गवत वगैरे आणण्यासाठी लष्करातील उंट गेले होते. मराठ्यांचा सरदार शिवाजी याने हल्ला करून उंट व इतर जनावरे धरून नेली. बादशहांनी आज्ञा केली की : तिकडच्या फौजदारांना लिहून जनावरे सोडवून मालकांना परत देण्याची व्यवस्था करावी.

## २६ मार्च १६९४

हमीदुद्दीनखानाला मराठ्यांचा मोड करण्यासाठी पाठविण्यात आले. निरोपाच्यावेळी बादशहा फातेहा खैर(कुशल इच्छिणाऱ्या कुराणातील) ओळी पढले. हमीदुद्दीनखानाचा मुलगा गुलमुहंमद याला एक घोडा आणि खानाला वीस घोडे देण्यात आले.

खान बेग याने अर्ज पाठविला की : ऐनापूरजवळ मराठ्यांशी युद्ध झाले. शत्रूची दोनशे माणसे ठार झाली. आपले काही लोक जखमी झाले. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.'

बादशहांनी आज्ञा केली की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त यांनी पंचवीस हजार स्वार घेऊन पन्हाळगडाला वेढा घालण्यासाठी जावे.

लुत्फुल्लाखानाने दोन हजार चारशे स्वार घेऊन अकलूजकडे जावे असा हुकुम झाला.

चांद्याचा जमीनदार किशनसिंग याने हमीदुद्दीनखानाबरोबर उमदीला जावे अशी आज्ञा झाली.

मलिकशाह घोरी याने सांगितले की, 'परगणे मद्रूत (मसूर?) येथे मराठे चाल करून आले. त्यांच्याशी युद्ध करून मी त्यांचा पराजय केला. वीस घोडी, पन्नास भाले व दोन निशाने (झेंडे) हस्तगत केली आहेत.' बादशहांनी त्या वस्तू खानसामानच्या हवाली करण्याची आज्ञा केली.

## २७ मार्च १६९४

शहाजादा आज्जमच्या तैनातीत असलेला बहादुर हरानी याला शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी तैनात करण्यात आले. पन्हाळगडाकडे तोफा रवाना करण्यात आल्या. त्यांच्याबरोबर त्याला पाठविण्यात आले.

ख्वाजाखान अबादुल्ला याने मोठ्या तोफा पन्हाळगडाकडे पोहोचवाव्या असा हुकुम देण्यात आला.

बादशहांना कळविण्यात आले की : शहाजादा मुइजुद्दीन येत आहे. परवानगी नसताना त्याच्याबरोबर नेकनिहादखान वगैरे येत आहेत. हुकुम झाला की : त्यांना तातडीने पन्हाळ्याकडे परत पाठविण्यात यावे.

## २८ मार्च १६९४

मुहंमद इसहाक किल्लेदार भुवनगड याला पंधरा महालांची फौजदारी देण्यात आली.

जयराम हिंदु हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

गुलबर्ग्याच्या देशमुखाकडून कळले की : बेडरांनी भोवताली बादशहाची ठाणी काढून आपली ठाणी बसविली आहेत. आज्ञा झाली की : बंडखोरांचा मोड करण्यासंबंधी तेथील फौजदारांना लिहिण्यात यावे.

मतलबखानाच्या आजारावर उपचार करण्यासाठी अब्दुल्हादी याने सोलापूरला जावे असा हुकुम झाला.

## २९ मार्च १६९४

आज शहाजादा मुइजुद्दीन (पन्हाळ्याहून परत आलेला) बादशहाला भेटला.

## ३१ मार्च १६९४

मुद्गलचा किल्लेदार नसीरखान उर्फ मीर जलालुद्दीन याची मन्सब वाढविण्यात आली.

## २ एप्रिल १६९४

गाजिउद्दीन फीरोजजंग याचा भाऊ हामिदखान याला आज्ञा झाली की : त्याने बादशाही छावणीतीला तोफा मिरजेच्या वाटेने पन्हाळगडाला बेदारबख्ताच्या छावणीत पोहोचवाव्या.

वऱ्हाडचा सुभेदार नवाजिशखान रूमी याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली :–

मी गेले चार महिने आजारी आहे. मराठे या प्रांतात घुसले की, मी चहूकडून त्यांच्यावर माझी पथके पाठवीत असे. एलीचपूर(अचलपूर)ला सरकारी खजिना आहे. मी शहराचे रक्षण तत्परतेने करीत आहे. मला औषधोपचार करण्यासाठी एक हकीम पाठवावा. बादशहांनी आज्ञा केली की : हकीम मुहंमद मोमिन याने त्याच्याकडे जावे. नवाजिशखानाला तेथील हवापाणी मानवत नाही असे दिसते. मी त्याला मुरादाबादच्या फौजदारीवर पाठवतो व वऱ्हाडच्या सुभेदारीवर अलीमर्दानखान याची नेमणूक करतो.

औगड(?)चा किल्लेदार जानचंद याची मन्सब वाढविण्यात आली.

सुरतसिंग हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. छत्रसिंग हा मुसलमान झाला. त्यालाही खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

### ३ एप्रिल १६९४

शहाजहानाबाद(दिल्ली)च्या गुप्तचरांकडून पुढील बातमी समजली :– दुर्जनसिंगपुऱ्यात बैरागी मूर्तिपूजा करीत होते. ही बातमी कळल्यावर मुहतसिब(नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारा अधिकारी) हा तिकडे गेला. त्याने श्रीकृष्ण बैरागी यास कैद केले आणि पंधरा मूर्ती स्वतःच्या घरी आणल्या. रजपुतांनी जमाव करून मुहतसिबच्या घरावर हल्ला केला आणि त्याला जखमी केले. रजपूत त्याला पकडून नेऊ इच्छित होते. मुहतसिबने बैराग्यांना सोडून दिले आणि मूर्ती सुभेदाराकडे पाठविल्या. बादशहा म्हणाले, ' (दिल्लीचा) सुभेदार आकिलखान याला लिहा की, मारामारीच्यावेळी मुहतसिबला मदत देणे आवश्यक आहे.'

अब्दुलरसूलखान मियाना याला मन्सब व जहागीर मिळाली. तो शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी तैनात होता. त्याच्या इलाख्यात जमीनदारांनी पुन्हा डोके वर काढले असे कळले. बादशहांनी आज्ञा केली की : फजलखान यांनी पूर्वीप्रमाणे आपल्या जागेवर राहून खबरदारी बाळगावी.

परगणे कांडापूर(गंगापूर, जिल्हे औरंगाबाद)येथून बातमी आली की : वेंकट व गोंदानायक हे दोन भाऊ दीड हजार स्वार घेऊन जवळच्या घाटातून उतरून खानदेशच्या सुभ्यात घुसले आहेत. बादशहांनी म्हटले, 'बुऱ्हाणपुरचा सुभेदार मरहमतखान याला लिहून त्यांना बादशाही इलाख्याच्या बाहेर हाकलून लावण्यास सांगा.'

बादशहांनी आज्ञा केली की : विजापूरहून बेलदार आणि इतर माणसे पाठवून इंडीची गढी दुरुस्त करण्यासाठी त्यांना रवाना करा.

### ४ एप्रिल १६९४

गुर्जबर्दारच्या तोंडून कळले की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त हे एकोणीस शाबान (पाच एप्रिल) रोजी पन्हाळगडाकडे रवाना होणार आहेत.

शंकराजी व हेमराज हे मुसलमान झाले. त्यांना प्रत्येकी खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

नळदुर्गच्या बातम्यावरून कळले की : परगणे भिका येथे शंभर मराठे स्वार आले आणि ते तेथील गुरेढोरे घेऊन गेले. सरफराजखान जहागिरदार याचा गुमास्ता व फौजदार

यांनी त्यांचा पाठलाग केला नाही. त्यामुळे त्यांचा मोड करणे शक्य झाले नाही. बादशहा म्हणाले, 'गुमास्त्याला ताकिदीचे पत्र लिहा.'

फीरोजगडचा किल्लेदार व फौजदार अब्बासखान याने राजिनामा दिला. बादशहा म्हणाले, 'त्याला लिहा की, तुमचे काम चांगले आहे. मी तुम्हाला बदलत नाही. राजिनाम्याचा काय अर्थ आहे?'

### ५ एप्रिल १६९४

बादशहांना कळले की : हमीदुद्दीनखानाबरोबर तैनात असलेली माणसे त्याला सोडून बादशाही छावणीत येत आहेत. हुकुम झाला की : त्यांना परतवून हमीदुद्दीनखानाकडे पोहोचवावे.

हमीदुद्दीनखान हा मराठ्यांच्या मोहिमेवर इंडीला गेला होता. तो विजापूरला आला असे कळले. त्याला तेथेच थांबण्यासाठी सांगण्यात आले.

### ७ एप्रिल १६९४

हिंमतखानाने लिहिले की : संताजी (घोरपडे) हा महादेवाच्या डोंगरात आहे. माझ्यापाशी सैन्य थोडे आहे. मला अधिक सैन्याची कुमक आली तर मी महादेवाच्या डोंगरात जाऊन मराठ्यांचा मोड करीन. बादशहांनी आज्ञा केली की : मराठ्यांची वाट अडवा. ते डोंगरातून बाहेर पडले की त्यांचा मोड करा.

### ८ एप्रिल १६९४

मरहूम दौलतमंदखानाचा (बागलाणा) मुलगा बख्तमंद याची मन्सब वाढविण्यात आली.

यक्काताजखानाला पाच कोसाच्या परिघात गस्त घालण्यासाठी बदरी (विजापूर, जिल्हा) कडे पाठविण्यात आले.

इंडीचा ठाणेदार, आपल्याला कुमक म्हणून, जानोजी ठाणेदाराची पथके पाठवावीत, असे म्हणत आहे. तर पथके पाठवावीत अशी आज्ञा झाली.

### १० एप्रिल १६९४

रायबाग हुक्केरीचा ठाणेदार सय्यद इब्राहीम याला शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी तैनात करण्यात आले.

परंड्याचा किल्लेदार व फौजदार इज्जतखान याची मन्सब वाढविण्यात आली.

मेहकर (वऱ्हाड) चा फौजदार शम्सुद्दीन याचा अंमल वाईट आहे अशी बातमी गुप्तचरांकडून कळली. त्याच्या जागी हसनबेगखान याची नेमणूक करावी अशी आज्ञा झाली. मुहंमद नसीर याने शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजकडे तोफा पोहोचवाव्या अशी आज्ञा झाली.

किशनराव मन्सबदार हा जुल्फिकारखानाला सोडून हुजुरात आला असे कळले. त्याची जहागीर काढून घेण्याची आज्ञा झाली.

खटावचा ठाणेदार रामचंद याने लिहिले की : मीही मतलबखानाबरोबर मराठ्यांच्या मोहिमेत होतो. या मोहिमेत अनेक मराठे मारले गेले. त्यांचे घोडे, निशान इत्यादी आमच्या हाती लागले. आज्ञा झाली की : हत्ती हुजुरात पाठवा.

१४ एप्रिल १६९४

जादून हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

१५ एप्रिल १६९४

बादशहांनी आज विजापूर येथे येऊन शहापूर जवळ मुक्काम केला.

१६ एप्रिल १६९४

बादशहांनी आज्ञा केली की : पुढील उमरावांनी पुढे नेमलेल्या दिवशी बादशाही निवासस्थानाभोवती चौक्या पहाऱ्यांची जबाबदारी घ्यावी :–

| | | |
|---|---|---|
| खानजहान बहादुर | — | रविवार |
| बहरामंदखान | --- | सोमवार |
| मुखलिसखान | — | मंगळवार |
| खानाजादखान | — | बुधवार |
| मुहंमदयारखान | — | गुरुवार |
| मानसिंग राठोड | — | शुक्रवार |

इखलासखान मियाना हा मराठ्यांच्या कैदेतून सुटून आला होता. तो येऊन भेटला. त्याने पाच मोहरा नजर केल्या.

२१ जून १६९४

हमीदुद्दीनखान हा ठाणी बसविणे आणि कही (घासदाणा, रसद) आणणे या उद्देशाने गढीसंख (जत तालुका) च्या दिशेने गेला होता. ठाणी बसवून व कही बरोबर घेऊन तो परत आला. त्याने आपले पथक मोतीगाव येथील फौजेच्या तळावर ठेवले.

२२ जून १६९४

मुहंमद रफी दारोगा याला आदिलशाही तळकोकणची दिवाणी सांगण्यात आली. शेखुल् इस्लामचा मुलगा फखरुल् इस्लाम हा स्वदेशाहून आला. विजापूरच्या तोफखान्याची मुशरफी महाचंदाच्या जागी नेकराम यास देण्यात आली.

तळकोकणहून बदललेला दिवाण मुहंमद यार यास रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याच्या फौजेचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : अहमद तरीनचे भाऊ हबीबुल्ला वगैरे यांनी, पन्हाळ्याच्या वेढ्यात युद्ध झाले त्यावेळी उत्कृष्ट कामगिरी केली. त्यापैकी बरेचजण जखमी झाले. त्यांची आर्थिक परिस्थिती चांगली नाही. त्यांच्यावर कृपा होईल अशी त्यांना आशा आहे. त्यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली आणि मदत म्हणून त्यांना एक महिन्याचा पगार द्यावा असा हुकुम देण्यात आला.

जुन्नरचा फौजदार व शिवनेरीचा किल्लेदार फखरुद्दीनखान याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :– मी नेहमी आजारी असतो तर माझा नायब जुन्नरला राहील व मी शिवनेरीला राहीन. मान्यता द्यावी. बादशहांनी मान्य केले नाही. त्याच्याकडे एक हकीम पाठवावा असा हुकुम झाला.

गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात असलेला दिलेरखान विजापूरी याने अर्ज पाठविला की : गोकाक उर्फ रहीमगड हा किल्ला माझ्या कडून काढून घेऊन खालशात घेण्यात आला आहे.

## २३ जून १६९४

इखलासखान मियाना याला आदिलखानी तळकोकणची फौजदारी देण्यात आली. तो चार हजारी (जात) व दोन हजारी स्वार असा मन्सबदार होता. त्याला निरोप देण्यात आला.

बळगावचा किल्लेदार व फौजदार बसालतखान याचा अर्ज आला. त्यातील विनंत्या मान्य करण्यात आल्या.

हरकाऱ्याच्या तोंडून कळले ते असे : तुकोजी व आनंदराव, तीन हजारी (जात) व दोन हजार स्वार आणि दादजी दोन हजारी (जात) व पाचशे स्वार असे तिघे मन्सबदार हे जुल्फिकारखानबहादुर याच्या फौजेत तैनात होते. तेथून निघून ते स्वतःच्या जहागिरीत येऊन बसले आहेत. हुकुम झाला की : त्यांच्या जहागिरी काढून घेण्यात याव्यात.

नाहरखानाचा मुलगा मलिकशाह याला आनंदापूर (इंदापूर)ची ठाणेदारी देण्यात आली. त्याला बक्षीस देऊन निरोप देण्यात आला.

बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने अर्ज केला की : मछिद्रगडचा किल्लेदार सय्यद नूर महंमद हा विपन्नावस्थेत आहे. मदतीची आशा बाळगून आहे. त्याला एक हजार रुपये द्यावे असा हुकुम झाला.

अजमीरच्या बातम्यावरून समजले की : जलंबरा या खेड्यात विजयसिंह वगैरे हिंदू आले असून ते तेथे मूर्तिपूजा करू लागले आहेत. बादशहांनी हुकुम केला की : तेथील अधिकाऱ्यास देऊळ उध्वस्त करण्यासाठी लिहिण्यात यावे.

इरादतखानाचा मुलगा मुबारकुल्लाह हा कोठरीपियाराचा (माळव्यात) फौजदार होता. किल्ल्याच्या विजयाबद्दल त्याने सोन्याच्या किल्ल्या आणि पाच मोहरा पाठविल्या. बादशहांनी त्याला इरादतखान ही पदवी दिली. (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे.)

गोकाकच्या किल्ल्याचा ताबा मुहंमद अमीन याजकडे देण्यासाठी दिलेरखानाचा वकील जमालुद्दीन याला पाठविण्यात आले.

हमीदुद्दीनखान याने अर्ज केला की : नारो राघोचा मुलगा नेमाजी माझ्या फौजेत तैनात आहे. त्याची पाचशे जात व तीनशे स्वार ही मन्सब विनाअपराध काढून घेण्यात आली आहे. त्याच्यापाशी चांगले पथक आहे. तो कृपेची आशा बाळगून आहे. तो एक हजारी जात व एक हजारी स्वार असा मन्सबदार होता. बादशहांनी त्याच्या मन्सबीत पाचशे (जात)ची वाढ फर्माविली.

मरहूम दिलेरखान याचा मुलगा पुरदिलखान याला फीरोजगड (यादगीर)ची किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली होती. ती त्याने कबूल केली नाही. बादशहांनी त्याची मन्सब कमी केली आणि दुसऱ्याची नेमणूक करण्यासंबंधी हुकुम केला.

जुल्फिकारखानाच्या फौजेतून बातमी आली की : हरजीचा भाऊ रूपाजी शिंदे हा तेथून परंड्याकडे गेला आहे. या संबंधी तेथील किल्लदार इज्जतखान याला लिहिण्यात यावे असा हुकुम झाला.

### २४ जून १६९४

तळकोकणचा बदललेला फौजदार सरबाजखान याला दरबारात येण्याची आज्ञा झाली.

मुराजी मराठा (कागलचा पिराजी?) ठाणेदार याचा अर्ज आला की : आपल्याला हुजुरात बोलवावे. बक्षीने त्याला आपल्याकडे आणण्याचे करावे असा हुकुम झाला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी (घोरपडे) परळीहून नरगुंदकडे आला होता. तो सावळगावाहून परत फिरून महादेवाच्या डोंगराकडे गेला.

मानशहा हा मुसलमान झाला. त्याला वस्त्रे देण्यात आली. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला हुकुम झाला की : परंड्याचा फौजदार व किल्लेदार इज्जतखान यास पुढीलप्रमाणे लिहावे :– गनिमांचा सरदार महादजी नोकरीच्या उद्देशाने येथे आला आहे. त्याला म्हणावे की, चांगली मन्सब हवी असल्यास गाजिउद्दीनखान बहादुर याजकडे जाऊन मन्सबीची तजवीज करून घ्यावी.

रघुनाथचा भाऊ येसाजी याला त्याच्या भावाच्या मृत्यूनंतर नव्याने मन्सब देण्यात आली.

### २५ जून १६९४

जानोजी यास चारशे आणि जगदेवरावचा मेहुणा मानजी यास दीडशे अशा मन्सबी देण्यात आल्या.

खानजमान फतेहजंग याला एक तलवार व त्याची खाने आलम इत्यादी मुले यांना वस्त्रे पाठविण्यात आली होती. ही माणसे शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होती. भेटी त्यांच्याकडे पोहोचवून मुहंमद तकी गुर्जबर्दार हा परत आला.

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त याजकडे आब्यांच्या दोन करंड्या पाठविल्या. पेमगडचा किल्लेदार बराकदास हा मरण पावला अशी बातमी आली.

सुभानगडचा किल्लेदार व फौजदार सय्यद लतीफ याने अब्दुलगनी या घोड्याच्या सौदागराकडून राहदारीच्या निमित्ताने एक घोडा घेतला. त्याची मन्सब शंभरने कमी करण्यात यावी असा हुकुम देण्यात आला.

इंदापूरच्या बातम्यावरून कळले की : मराठे गनीम हे गोविंद नावाच्या देसायाबरोबर एक होऊन नीरा आणि कृष्णा या नद्यांच्या मधील प्रदेशात ठाण मांडून आहेत. आज्ञा झाली की : त्या प्रदेशाच्या फौजदारांना लिहावे की : त्यांनी हल्ला करून गनिमांना हाकलून लावावे.

रावबी (?) रच्या बातम्यावरून कळले की : तेथील फौजदार इस्माईल याचा नायब हा धार्मिक (शरई) प्रकरणाचे निकाल स्वतः लावीत असतो. शरई प्रकरणात त्याने हस्तक्षेप करू नये अशी त्याला ताकीद करण्यासाठी बक्षीउल्मुल्क सय्यद अमीरखान यास आज्ञा झाली.

नूरुल्लाचा मुलगा जुहुरुल्ला हा कल्याणचा जमीनदार होता. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## २७ जून १६९४

लष्करखानाच्या सैन्यातील बातम्यावरून कळले ते असे : वाकिणखेडचा जमीनदार पिड्या(पिडनायक बेडर) याचा जमादार अब्दुलरसूल् हा मोठी तुकडी घेऊन आला. त्याने गढ परगणा उध्वस्त केला आणि तो सुमारे हजार गुरेढोरे पळवून घेऊन गेला. हुकुम झाला की : बहरामंदखानाने याचा वृतांत (चौकशी करून) सादर करावा.

जानोजी हा पाच हजारी(जात) व दोन हजारी(स्वार) मन्सबदार होता. त्याला हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मलालजीचा मुलगा मुधाजी हा जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. तेथून त्याला काढून सय्यद लष्करखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. तो दीड हजार (जात) आणि चारशे(स्वार)असा मन्सबदार होता.

मनोहरदास गौडचा मुलगा लक्ष्मीराम हा शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले. त्याला पाचशे जात व तीनशे स्वार अशी मन्सब होती.

## २८ जून १६९४

हरनारायण व मतलाजी हे मुसलमान झाले. त्यांना बादशहाने वस्त्रे दिली. तळकोकणचा फौजदार इखलासखान याजकडे एक हजार चारशे पंच्याहत्तर सैनिक आणि सामग्री पाठविण्याचा हुकुम झाला.

बेलाजी व रामजी हे मुसलमान झाले. बादशहांनी त्यांना प्रत्येकी बक्षीस व वस्त्रे दिली. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : पूर्वी खानजमान फतेहजंग याचे मोर्चे परकडगड (नरगुंद ? ) किल्ल्यापासून सहा साखळ्या अंतरावर होते. या सुमारास गनीम किल्ल्याच्या बाहेर येऊन चाल करून आले. खानाने त्यांचा पराजय केला आणि मोर्चे किल्ल्याच्या दोन साखळ्याच्या अंतरावर नेले. खानाला दगडाच्या जखमा आणि त्याचा मुलगा मुनव्वरखान याला बाणाच्या जखमा झाल्या. हे ऐकून बादशहांनी बक्षीउल्मुल्क सय्यद अमीरखान यास म्हटले, 'शाबास, खानाने उत्कृष्ट कामगिरी केली.'

सय्यद लष्करखानाच्या फौजेच्या बातम्यावरून कळले की : वाकिणखेडचाचा जमिनदार पिडनाइक याचा अब्दुल्रसूल नावाचा ठाणेदार होता त्याने आपले पथक घेऊन उतगीर(उदगीर ?)चा परगणा उध्वस्त केला आणि तो जवळजवळ एक हजार गुरेढोरे घेऊन गेला. आज्ञा झाली की : सय्यद अमीरखान बक्षीउल्मुल्क याने सय्यद लष्करखानाला लिहावे की, त्यांच्यावर(गनिमांवर) हल्ला चढवावा.

## ३० जून १६९४

बादशहांनी इस्माइलखान याला फळे बक्षीस दिली. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांनी(मराठ्यांनी) औंदच्या किल्ल्यावर हल्ला चढविला. जहानखानाचा

मुलगा मुहंमद मुबारक काकड हा तेथे किल्लेदार होता. गनिमांनी त्याला पकडले आणि किल्ला ताब्यात घेतला. किल्लेदाराला चारशे जात आणि तीनशे स्वार अशी मन्सब होती.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : राजारामाचा सेवक रामचंद्र(रामचंद्रपंत अमात्य) याने सैन्य गोळा केले आहे. सोलापूरवर हल्ला करून ते गाव आणि भोवतालचा प्रदेश हे लुटण्याचा त्याचा उद्देश आहे. बादशहांनी यारखान याला म्हटले, 'तयार रहा. गनिमांवर हल्ला चढविण्यासाठी मी तुम्हाला सोलापूरकडे रवाना करणार आहे.'

शहाजादा मुहंमद अजीम याने बादशहांना सांगितले की, 'परंड्याच्या किल्ल्यात रोगाची मोठी साथ पसरली आहे.'

बादशहांनी शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजकडे मेणे पाठविले. मुहंमदाबाद बीदरच्या बातम्यावरून समजले की : सावंत नावाचा गनिम हा सैन्य गोळा करून कर्नाल गावावर चालून गेला. त्याने चार वेळा वडवाळचा परगणा उध्वस्त केला. त्याने गुरेढोरे व संपत्ती लुटून नेली. बादशहाने आज्ञा केली की : सय्यद हुसेन अलीखान याला लिहावे की, त्याने बंडखोरावर हल्ला चढवावा. (आणखी एका बातमीत हुसेन अलीचा बाप अब्दुल्लाखान याचा उल्लेख आहे.) मरहूम लोदीखान याचा मुलगा अब्दुल्‌रसूल्‌ याला मन्सबीची वाढ देण्यात आली. शंभर(जात)चे दीडशे केले.

### एक जुलै १६९४

विरागदासाचा मुलगा सहसराम गौड याला पेमगढ(जुन्नर सरकार)ची किल्लेदारी देण्यात आली.

नीलख उंबऱ्याचा ठाणदार दलसिंग(खानचंदचा मुलगा) हा गाजीउद्दीनपाशी तैनात होता. त्याला लग्नासाठी स्वदेशी जायला मिळावे म्हणून आठ महिन्याची रजा देण्यात आली.

तळकोकणचा फौजदार इखलासखान मियाना याला पाच हजार रुपये व एक घोडा हे देण्यात आले.

खटावच्या बातम्यावरून समजले की : नारो राघोचा मुलगा रघोत्तम हा मरण पावला. तो चारशे जात व शंभर स्वार असा मन्सबदार होता.

### २ जुलै १६९४

जुल्फिकारखान व अहमदनगरचा किल्लेदार व फौजदार मुहमद गफूर यांचे अर्ज आले. ते बादशहा समोर ठेवण्यात आले.

तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याला तीन हजार रुपये देण्याचा हुकुम झाला.

### ३ जुलै १६९४

विजापुरी कर्नाटकच्या बातम्यांवरून समजले की : तेथील फौजदार कासिमखान हा आजारातून बरा झाला आहे.

आज्जमगड(पुरंदर)चा आज्जमगीर असा यापुढे उल्लेख करण्यात यावा अशी आज्ञा झाली.

बहादुरगडचा किल्लेदार मुहंमद मुरादखान याच्या मुलीचे लग्न ठरले. आपल्याला रजा मिळावी म्हणून त्याचा भाऊ मुहंमद मुहसिन(मुर्शद कुलीखानाचा मुलगा) याने अर्ज केला. तो दोनशे (जात) चा मन्सबदार होता. त्याला तीन महिन्याची रजा देण्यात आली.

इखलासखान मियाना याला आणखी रक्कम(एक लाख रुपये) देण्यात आली.

## ४ जुलै १६९४

बादशहांनी मुहंमद हादी हकीम याला सय्यद अब्दुल्लाखान(नांदेडचा सुभेदार) याच्या उपचारार्थ रवाना केले.

खटावचा ठाणेदार रामचंद्र याचा भाऊ किशनराव याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. त्याला सातशे जात व चारशे स्वार अशी मन्सब होती. जातमध्ये पन्नास आणि स्वारात दोघोडी दोनशे अशी वाढ झाली.

हिंमतखानाच्या फौजेतील बातम्यांवरून कळले की : बहर्जी पांढरे याचा भाऊ तुकोजी हा दीड हजार जात व पाचशे स्वार असा मन्सबदार तेथील फौजेत तैनात होता. तो मरण पावला.

ताळीकोटचा ठाणेदार व मरहूम फतेहजंगखान याचा मुलगा कादरदादखान व देवदुर्गचा किल्लेदार व मरहूम लोदीखान याचा मुलगा वलीदादखान यांच्या आपसातील भांडणाचा वृत्तांत आणण्यासाठी हिदायतुल्ला गुर्जबर्दार याला पाठविण्यात आले होते. त्याने येऊन वृत्तांत सादर केला.

## ७ जुलै १६९४

कंबा(?)चा ठाणेदार पीर मुहंमद याने कळविले की : धनाजी जाधवच्या भाऊबंदापैकी बहिर्जी जाधव हा आपल्याकडे आला असून मन्सबीची आशा बाळगून आहे. बादशहाने आज्ञा केली की : बहिर्जीला हुजुरात पाठविण्यात यावे.

माहूरच्या ठाण्याचा मुस्ताफा खतीब याने कळविले की : येथील जुम्मा मशीद मोडकळीस आली असून ती पडेल या भीतीने मुसलमान नमाजासाठी येत नाहीत. हुकुम झाला की : वाकियानिगारला मशिदीची दुरुस्ती करण्यासंबंधी लिहावे.

## ८ जुलै १६९४

नुसरताबाद उर्फ धारवाडचा बदललेला किल्लेदार मुईनुद्दीन हा हुजुरात आला.

नुसरताबाद उर्फ धारवाडचा किल्लेदार मुहंमद इस्माईलबेग रोजबानी याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले :– गनिमांचे सरदार मलजी(?) वगैरे येथून दहा कोसावर असलेल्या खुदावंदपूर येथे छावणी करून होते. मी आपल्या नायबाला पथक बरोबर देऊन त्यांचा मोड करण्यासाठी नेमले. माझा नायब तेथे पोहोचला. गनिमांचा संता नावाचा सरदार होता. त्याला आणि छत्तीस गनिमांना ठार मारले. अनेकांना जखमी केले. गनिमांचा पराजय केला. वीस घोडे, शंभर जनावरे व तीस भाले हस्तगत केले. कामगिरीचा मजुरा व्हावा. हुकूम झाला की : बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने याबद्दल वृत्त सादर करावे.

जुल्फिकारखानाने कळविले की : सय्यद जलालुद्दीनचा मुलगा सय्यद कबीर हा आजारी

असल्यामुळे उपचारासाठी आपल्याकडे पाठवीत आहे. मुहंमद मोमिन हकीम याने सय्यद कबीरवर औषधोपचार करावा अशी आज्ञा झाली.

एक फकीर म्हणू लागला की : मी परमेश्वर आहे. त्याला पकडून काजी अब्दुल्ला याजकडे नेण्यात आले. काजीने त्याला मुफ्तीकडे पाठविले. मुफ्तीच्या समोरही फकीर तेच बडबडू लागला. मुफ्तीने त्याला विचारले, 'तू परमेश्वराचा प्रेषित मुहंमद याचा अंकित आहेस की नाही?' फकीर म्हणाला, 'मी परमेश्वर आहे आणि मुहंमद माझा अंकीत आहे.' मुफ्तीने निर्णय दिला की : फकीर हा देहान्त शिक्षेस पात्र आहे. ही हकीकत बादशहांना कळविण्यात आली. रात्री चार घटिका गुजरल्या असता शरीयतपनाह (बादशहा) यांनी कचेरी भरवून हुकुम केला की : फकीराचा वध करण्यात यावा. त्याप्रमाणे जल्लादांनी (वधकांनी) त्याचा वध केला.

हसनाबाद उर्फ गुलबर्गा येथील किल्लेदार व फौजदार अलफखान (शरीफखान) याने कळविले की : बेडरांनी होबर या खेड्यात ठाणे बसविले व ते प्रवाशांना लुटीत असत. मी आपला मुलगा नस्रुल्ला याला बंडखोरांचा मोड करण्यासाठी नेमले. माझ्या मुलाने बंडखोरांचा मोड केला. खेड्याचा पाटील हा बंडखोरांना मिळाला होता. तो माझ्या मुलाला येऊन भेटला. बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउल्मुल्क बहारामंदखान याने वृत्तांत सदर करावा.

अदारु हिंदू हा मुसलमान झाला. त्याला वस्त्रे देण्यात आली.

जुल्फिकारखानाच्या शिफारसीप्रमाणे मिर्जा मुहंमदचा मुलगा बहादुर याला गडीसागरची (?) किल्लेदारी देण्यात आली.

## ९ जुलै १६९४

बलवंतरावचा मुलगा यादवराव हा परगणे माहूरची जहागीर व जमीनदारी या बाबत रुजू झाला. त्याची जहागीर बहाल झाली. जमीनदारीबद्दल त्याने काजीच्या समोर रुजू व्हावे अशी आज्ञा झाली. त्याच्या मन्सबीत तोनशे जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली.

चौलागडच्या जमीनदारीवर दौलतमंदच्या ऐवजी त्याचा भाऊ तालेमंद गोंड याची नेमणूक करण्यात आली.

फतेह मुहंमदला पाचशे जात व शंभर स्वार व लाल यास दोनशे जात व पन्नास स्वार अशा मन्सबी बहाल करून तळकोकणचा फौजदार इखलासखान याजकडे पाठविण्यात आले.

शहाजादा बेदारबख्त याच्या तैनातीतील राजा भीम याचा अर्ज आला. तो बादशहा पुढे ठेवण्यात आला.

## १० जुलै १६९४

बुऱ्हाणुल्ला हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. तो हुजुरात आला. त्याला चाकणची किल्लेदारी देऊन तिकडे जाण्यास निरोप देण्यात आला. मरहूम सुल्तान अलीखान याचा जावई मुहंमद शरीफ याला दर्गाकुलीच्या जागी सिरागडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

मुकुंदसिंग गौड याला सिद्धगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

पदमसिंगचा नातू साहेबसिंग याचे मुहकमसिंगचा मुलगा गोपाळसिंग याच्या मुलीशी लग्न ठरले. त्याला देशी जाण्यासाठी रजा देण्यात आली. ती तीन महिन्यासाठी होती.

बजाजी (निंबाळकर) चा मुलगा आणि महादजीचा भाऊ शिवरघोजी (?) हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. तो हुजुरात आला. तो दीड हजार जात व एक हजार स्वार असा मन्सबदार होता. त्याला शंभर स्वारांची बढती देऊन बादशहाने विचारले, 'तू कुठला जमीनदार आहेस?' त्याने म्हटले, 'माझे वडील बजाजी यांना फलटणची जमीनदारी होती. बादशहांनी विचारले, 'त्या गावात तू गढी बांधू शकशील काय?' त्याने म्हटले, 'आज्ञा होत असेल तर मी त्या जागेत गढी बांधीन.' बादशहांनी ते मान्य केले.

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

## ११ जुलै १६९४

बहलहारी हिंदू हा मुसलमान झाला. त्याला वस्त्रे देण्यात आली.

सिरागडहून बदलेला किल्लेदार दरगाहकुलीखान याला बलकोंडाच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

छत्रसाल बुंदेला याला पुन्हा मन्सब बहाल करण्यात आली. तो पाचशे जात व सातशे स्वार असा मन्सबदार होता. त्यापैकी पाचशे दुघोडी स्वार होते. त्यापैकी शंभर जात आणि तीनशे स्वार कमी करण्यात येऊन छत्रसालला हुजुरात बोलावण्यात आले.

अबाबकरचा मुलगा मुहंमद आदम याला कडेकलीच्या (?) किल्लेदारीवर नेमण्यात आले.

अहमदनगरचा किल्लेदार व फौजदार अब्दुलगफूर याने लिहून कळविले की : गनिमांचे सैन्य या परिसरात आले होते. मी हल्ला करून त्याचा मोड केला. सर्व काही व्यवस्थित केले. पण येथील बातमीदार मुहंमद जमील हा माझ्या विरुद्ध असून माझ्या कामगिरीचा वृत्तांत देत नाही. तो उलट बातम्या देतो आणि खोटेनाटे आळ घेतो. आज्ञा झाली की : यारअलीबेग याने दुसरा बातमीदार नेमावा.

छावणीतील हत्ती चरविण्यासाठी जफराबाद बीदरकडे पाठवावे आणि त्यासाठी पन्नास गुर्जबर्दार (दंडधारी) नेमण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

नांदेडच्या बातम्यावरून समजले की : सावंतजी (?) हा सैन्य घेऊन आला. बरवाळ परगण्यात त्याने तेथील बागा उध्वस्त केल्या आणि तो बंदरी (?) कडे निघून गेला. आज्ञा झाली की : या संबंधी तेथील (नांदेड) सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान याला लिहावे.

तळकोकणचा फौजदार इखलासखान मियाना याजकडे मदत म्हणून पाच हजार रुपये आणि पाच घोडे देण्यात आले.

बातमी आली की : नरकवासी संभाजीचा मुलगा राजा शाहू याचा गुमास्ता हा (शाहूच्या) परगण्याच्या रयतेवर जुलूम करीत आहे. आज्ञा झाली की : गुर्जबर्दार (दंडधारी) पाठवून त्याला दरबारात आणण्यात यावे.

### १२ जुलै १६९४

आज दरबारचे कामकाज झाले नाही.

### १३ जुलै १६९४

शेख इनायतुल्लाचा मुलगा शेख अबुल्कासम याला सावंद(राबंद?)ची किल्लेदारी देण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याच्या लष्करातून बातमी आली की : राजा भीम (उदयपूरचा) याचे भाऊबंद, फत्तेसिंग, पाचशे जात व चारशे स्वार यांचा मन्सबदार व भारतसिंग, चारशे जात व दोनशे स्वार यांचा मन्सबदार हे लष्कर सोडून आपल्या देशाकडे निघून गेले त्यांना फरारी म्हणून नोंदण्याची आज्ञा झाली.

जानोजीच्या बाबतीत आज्ञा झाली की : आपल्या दोनशे स्वारांनिशी त्याने हमीदुद्दीनखानाच्या लष्करात रुजू व्हावे.

विनंती करण्यात आली की : मातबरखानाच्या तजविजीप्रमाणे चंपतराम याची कोरंग(कुरंग?) या किल्ल्यावर नेमणूक झाली होती. पण तो अद्याप तेथे पोहोचला नाही. त्याची मन्सब तीस स्वारांनी कमी करण्यात येऊन त्याला हुजुरात बोलावण्याचा हुकुम देण्यात आला.

बुऱ्हाणुल्ला याला चाकणच्या किल्लेदारीवर नेमण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला होता. त्याच्या मन्सबीत बढती देण्यात आली.

हमीदुद्दीनखान कोतवाल हा कही(घासदाणा इत्यादी)आणण्यासाठी गढीसंक(?)कडे गेला होता. त्याने विनंती पाठविली की : संताजीचे सैन्य इकडे आले आहे. माझ्या जवळचे सैन्य जुजबी आहे. दुसरे एखादे पथक तैनात व्हावे. आज्ञा झाली की : शहाजादा मुहंमद आज्जमशहाच्या तैनातीतील दोनशे स्वार व दोनशे बहेलिये पाठविण्यात यावे.

### १४ जुलै १६९४

सिद्धगडहून बदललेला किल्लेदार, जगतसिंगाचा मुलगा किशनसिंग याची नेमणूक कुरंगच्या किल्ल्यावर करण्यात आली.

गाजिउद्दीनखान याच्या फौजेतील खिदमत जफरखान याने विनंती केली की : राघो व रामचंद्र हे जहागिरीच्या बंदोबस्तासाठी अहमदनगर जवळ आले आहेत. त्यांना इकडील प्रदेशाची संपूर्ण माहिती आहे. ते माझ्याबरोबर राहून बंदोबस्ताचे काम चोख बजावतात. त्यांना गाजिउद्दीनखानाच्या फौजेत तैनात करावे. आज्ञा झाली की : त्या दोघांना हुजुरात बोलवावे. राघोला हजारी व पाचशे स्वार यांची मन्सब तर रामचंद्रला अकराशे पन्नास आणि सहाशे स्वार यांची मन्सब आहे.

बातमी आली की : उग्रसेन कछवाहा(याने जयसिंग शिवाजी महाराज भेटीच्यावेळी महाराजांचे स्वागत केले होते) याचा नातू कल्याणसिंग हा काबूल येथे तैनात होता. तो मरण पावला.

## १५ जुलै १६९४

जाफरखानाचा मुलगा हातमबेग याला आज्ञा झाली की : सजावली (अंमलबजा-वणीची माणसे) ची माणसे पाठवून आतिशखानाच्या सैनिकांना गोळा करावे आणि त्यांना आतिशखानाकडे पोहोचवावे. आतिशखानाला बेडरांचा प्रतिकार करण्यासाठी गुलबर्ग्याकडे पोहोचवून परत यावे.

गदगचा फौजदार शेरखान याने विनंती लिहून पाठविली की : मी आपल्या जवळचे बरेचसे पथक बादशहाच्या रक्षणासाठी ठेवले असून थोडी माणसे बरोबर घेऊन शहाजादा बेदारबख्त याच्या तैनातीत चाकरी बजावीत आहे. कृपा व्हावी.

बीडचा फौजदार मामूरखान याच्या लष्करच्या दिवाणगिरीवर सफीउद्दीनचा मुलगा मुहंमद बाकर याची नेमणूक करण्यात आली.

गंगाराम हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलत व बक्षिसे ही देण्यात आली.

बीडचा फौजदार मोतिमदखान याने पालखू बंजारा याचा मुलगा धर्मा याचा पुढीलप्रमाणे अर्ज बादशहाकडे पाठविला :– माझ्या बापाला निजामशहा बहरी (अहमद-नगरचा निजामशहा) याजकडून बीड परगण्यात पाच गावे मिळाली होती. ती मला पण मिळावीत. माफीचा कौलही मिळावा. बादशहाने हुकुम केला की : जुन्या सनदा पाहून वरील गावांच्या पाटीलकीच्या सनदा मोतिमदखान याजकडे पाठवून देण्यात याव्या. बंजारा मजकूरला माफीचा कौलनामाही पाठविण्यात यावा.

धर्माने विनंती केली होती की : माझी आई असीरगडच्या किल्ल्यात कैद आहे. तिला बंधमुक्त करण्यात यावे. हुकुम झाला की : असीरगडचा किल्लेदार जाबिताखान याला लिहावे की, बाई मजकूरला औरंगाबादेचा किल्लेदार इनायतखान याजकडे पाठवावी. इनायतखान याने तिला बीडचा फौजदार मोतिमदखान याजकडे पाठवावी. त्याने धर्माकडून मातबर जामीन घेऊन आईला त्याच्या हवाली करावी. धर्माला ताकीद करण्यात यावी की, बीड भागात गनिमांना छावणी करू देऊ नये, त्यांच्याशी संघटन ठेवू नये धर्माचे भाऊ अंबा वगैरे यांनी त्या भागात दंगेधोपे करू नयेत.

## १६ जुलै १६९४

शहाजादा रफीउलकदरच्या पथकापकी पन्नास स्वार तळकोकणचा फौजदार इखलास-खान याजकडे तैनात करण्याचे ठरले होते. ते स्थगित करण्यात आले. अब्दुल्ला ठाणेदार कर्नूल (?) याने अर्ज पाठविला की : माझ्यापाशी फार थोडे सैन्य आहे. आणि या जिल्ह्यात गनिमांची वर्दळ फार आहे. बादशहांनी त्याला कळविण्यास सांगितले की, 'तुझ्याने काम निभत नसल्यास इतर कुणाची तरी नेमणूक करण्यात येईल.'

गुलबर्गा परगण्याचा देशमुख भीमराव याला तीनशे जात व दीडशे स्वार अशी मन्सब होती. नरसोजी देशमुखाला शिबंदीची देखरेख करण्यासाठी त्याने सांगावे अशी आज्ञा झाली.

### १७ जुलै १६९४

रायपूरचा किल्लेदार सरूपसिंग याच्या भाउबंदापैकी छत्रसिंगाचा मुलगा कुंवरसिंग याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

नांदेडचा सुभेदार अब्दुल्लाखान याचा मुलगा सय्यद हुसेनअलीखान याला गुलबर्गा भागातील बेडरांवर हल्ला करण्यासाठी तिकडे रवाना करावे म्हणून गुर्जबर्दार (दंडधारी) याला पाठविण्याची आज्ञा झाली.

जुल्फिकारखानाच्या सैन्यातील सरदारखान, शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेतील राजा भीम आणि बेळगावचा किल्लेदार बसालतखान यांचे अर्ज आले.

बादशहा हे ख्वाजा याकूतला म्हणाले की, 'अननस व इतर फळे यांच्या बिया मुहंमद अन्वरच्या बागेतून घेऊन औरंगाबादेच्या बागेत लावण्यासाठी पाठविण्यात याव्या.'

जुल्फिकारखानाने विनंती लिहून पाठविली की : मरहूम बहादुरखान याचा मुलगा अजीजखान याने गनिमांच्या लढाईत उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे. त्याला बढती देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

रामराय वाणी हा यारअलीबेगच्या तैनातीत होता. तो मुसलमान झाला. बादशहांनी स्वतः त्याला कलमा वदविला व त्याला खिलत (वस्त्रे) देण्यात आली.

शाही बाजारचा करोडी शरीफखान याने विनंती केली की : हैदराबादेहून वंजारी हे रसद (धान्य) आणीत होते. वाटेवरील जिल्ह्यांचे फौजदार हे त्यांच्याकडून राहदारी-(जकात कर) घेतात. बादशहांनी आज्ञा केली की : वंजाऱ्याबरोबर एक गुर्जबर्दार (दंड-धारी) नेमण्यात यावा. ज्यांनी हा कर वसूल केला असेल त्यांच्याकडून तो वंजाऱ्यांना परत देण्यास लावावा आणि असा कर वंजाऱ्यांकडून वसूल करण्यात येऊ नये.

राघोरामचंद्र हा फौजेतून निघून आपल्या जहागिरीत जाऊन बसला होता. हुकुम झाला की : मुहंमद सालेह याला पाठवून त्याला (राघोरामचंद्र याला) गाजिउद्दीनच्या फौजेत पोहोचवून यावे.

बादशहा बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला म्हणाले, 'आतिशखान हा खजिना आणण्यासाठी गेला आहे. त्याला लिहावे की, गुलबर्गा भागात बेडरांनी दंगा मांडला आहे आणि त्यांनी आपली ठाणी कायम केली आहेत. तर तू त्यांच्यावर हल्ला करण्यासाठी गलबर्ग्याकडे जा व त्यांची ठाणी काढून टाक.' खजिना आणण्यासाठी बादशहांनी लती-फुल्लाखान, इफ्तिखारखान व मुहंमद तकी उर्फ पुरदिलखान यांना साडेतीनशे स्वार बरोबर देऊन रवाना केले.

### १८ जुलै १६९४

आदिलखानी तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याने तळकोकणमधील जमीनदार मुहंमद हुसेन याजसाठी व निजाम सौदागर याजसाठी कौलनामे व बक्षिसी मागितली होती. मुहंमद हुसेनला खिलत व घोडा आणि निजाम सौदागरला एक हजार रुपये खिलत आणि कौलनामा ही देण्याची आज्ञा झाली.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या सैन्यातील मुहंमद बरी बख्शी याच्या लिहिण्यावरून कळले की : सैन्यात तैनात असलेला राणाजी पाचशे जात व एक हजार स्वार असलेला मन्सबदार हा सैन्य सोडून निघून गेला आहे. त्याची फरारी म्हणून नोंद करण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखान याने जिंजी प्रांतातील पालमकोटा याला वेढा घातला होता. या सुमारास तेथील किल्लेदार हा दाऊदखानाच्या मार्फतीने जुल्फिकारखानाला भेटला. आणि त्याने किल्ला हवाली केला.

सय्यद लष्करखान याने लिहून कळविले की : माझ्या फौजेत तैनात असलेला राघोजी याने उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे. त्याची जहागिर बदलण्यात आली आहे. ती बहाल व्हावी. राघोजीच्या वकीलाकडून मुचलका घेऊन जहागीर देण्यात यावी अशी आज्ञा झाली. राघोजीला अडीच हजार जात आणि पाचशे स्वार अशी मन्सब होती.

बादशहा बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला म्हणाले, 'आतिशखानाच्या बरोबर चार हजार सातशे एक्याऐंशी सैनिक स्वारांचे सैन्य तयार करून देण्यात यावे.'

## १९ जुलै १६९४

नळदुर्गचा किल्लेदार कामिलखान याने अर्ज पाठविला की : या भागात बेडरांचे सैन्य (जमीयत, टोळया, पथके) आले आहे. आणि धामधूम करीत आहे. मला किल्ल्यात कोंडून पडावे लागत आहे. बादशहांनी आज्ञा केली की : आतिशखानाने त्यांच्यावर चालून जावे.

मुहंमद मुरादखान किल्लेदार बहादुरगड याच्या मुलीचे कामबक्षाच्या तैनातीतील सुल्तान हुसेन याच्याशी लग्न ठरले. बादशहांनी यासाठी मुरादखानाचा (हा इतिहासकार खाफीखान याचा आश्रयदाता) भाऊ मुहसिन आणि सुल्तान हुसेन यांना तीन महिन्याची रजा दिली.

बादशहांनी गाजिउद्दीनखान बहादुर याजसाठी दहा तोळे अत्तर पाठविले.

बादशहांनी आज्ञा केली की : आतिशखानाबरोबर पाचशे पायदळ शिपाई, तीनशे बंदूकची, दोनशे बहेलिये, दहा मण सरब, वीस मण दारू, शंभर बाण ही तोफखान्यास लागणारी आवश्यक सामग्री आतिशखानाबरोबर देण्यात यावी.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : अनेक मराठे गनिमांची कुटुंबे इंदापूर परगण्यात आहेत. बादशहांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान यास आज्ञा केली की : तुम्ही मुहंमदखान(?) बहादुर यास लिहून पाठवावे की, गनिमांच्या कुटुंबियांना कैद करावे.

परंड्याच्या बातम्यावरून कळले की : तेथील किल्लेदार व फौजदार इज्जतखान याने किल्ल्याच्या रेवणीच्या (प्रवेशद्वाराजवळची संरक्षक भिंत) पासून एक दोन बाणाच्या टप्प्यावर एक पुरा बसविला असून त्याने त्याचे नाव इज्जतपुरा असे ठेवले आहे. हा मजकूर दिवाणाकडे पाठविण्यात यावा अशी बादशहाने आज्ञा केली.

हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान आणि बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान यांच्या नावे बादशहाचे हुकुम पाठविण्यात आले.

## २० जुलै १६९४

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : खानजमान फतेहजंग याने नरगुंद घेण्यासाठी त्या किल्ल्यावर हल्ला चढविला. पण बादशाही सरदारांपैकी कोणीही त्याच्या मदतीस गेले नाही. यामुळे खिन्न होऊन मोर्चे टाकून तो छावणीत परत आला. हे कळल्यावर शहाजादा बेदारबख्त याने मोर्चे सांभाळण्यासाठी शमशेरखान आदि सरदारांना पाठविले.

बागांचा अधिकारी ख्वाजा याकूत याला बेगमहौदातून विजापूरच्या किल्ल्यात वाहाणारा कालवा स्वच्छ करण्यासाठी पाठविण्यात आले. त्याच्या बरोबर तीनशे जात व शंभर स्वार यांचा मन्सबदार सादतमंद याला पाठविण्यात आले.

कही (घासदाणा ) आणण्यासाठी हमीदुद्दीनखान हा गढीसंक (जत तालुका) कडे गेला होता. तो परत आला.

## २१ जुलै १६९४

आज बादशहांनी शहाजादा आज्जम व बक्षीउल्मुल्क बहरामंदखान यांजबरोबर खलबते केली. पाथरीचा फौजदार सिराजुद्दीन याला गाजिउद्दीनखानाच्या फौजेत पोहोचवून यावे असा हुकुम देण्यात आला.

* * *

# चार

# मोगल दरबारची बातमीपत्रे : पुरवणी नोंदी

## एप्रिल १६९४ ते एकोणीस जून १६९४

### एप्रिल मे १६९४

अजमीरच्या बातम्यावरून कळले की : मनोहरपुरच्या जुम्मामशिदीत तेथील जमीनदार जगतसिंग हा मुसलमानांना जुम्म्याची (शुक्रवारची) नमाज पढू देत नाही. याचा बंदोबस्त करण्यासाठी तेथील सुभेदार सफीखान (?) याला लिहावे अशी आज्ञा झाली.

लत्फुल्लाखान व (सफशिकनखान याचा भाऊ) मुहंमद अस्करी यांनी हुजुरात यावे व लुत्फुल्लाखानाच्या सैनिकांना हिंमतखान बहादुर याजकडे तैनात करावे अशी आज्ञा झाली.

आग्र्याचा सुभेदार फिदाईखान, गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार अलफखान व बार्शीचा ठाणेदार यासीनखान यांची पत्रे बादशहांनी नजरेखालून घातली.

सगर (गुलबर्गा जिल्हा)चा ठाणेदार खिदमत तलबखान याला गाजिउद्दीनखान बहादुरापाशी तैनात करावे अशी आज्ञा झाली.

कोहीरचा फौजदार मुजफ्फरखान याने लिहिले की : गनिमांचा मोड करण्यासाठी रामगीर व चांदा या मार्गाने जावे अशी आज्ञा झाली आहे. बंडखोरांनी या जिल्ह्यात उपद्रव करण्यास सुरवात केली आहे. आज्ञा झाली की : सावध राहावे.

दक्षिणच्या किल्ल्यातील इहशाम (शिबंदी)च्या पगारबाकी बाबत एक लाख रुपये द्यावे अशी आज्ञा झाली.

मरहूम याकूतखान याचा मुलगा अली याला सगर(गुलबर्गा जिल्हा) येथील ठाणेदारीवर नेमण्यात आले.

काबुलचा सुभेदार अमीरखान याने दोनशे घोडे पाठविले असून ते बुऱ्हाणपुरा-पर्यंत आले आहेत असे खानाजादखान याने कळविले. खजिन्याबरोर ते पुढे छावणीत पाठविण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेला तुर्कताजखान याची मन्सब वाढविण्यात आली.

मुहंमद अस्करी याला लुत्फुल्लाखानाच्या बरोबर हुजुरात बोलावण्यात आले होते. आता आज्ञा झाली की : मुहंमद अस्करी याने शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात तैनात व्हावे.

मकहूर(मराठे, राजाराम महाराज) याच्या पुढील नोकरांच्यावर कृपा झाली. रसमानजो(?) याला पाचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब देण्यात आली. यशवंतराव याला चारशे जात व पन्नास स्वार अशी मन्सब मिळाली.

इनायतुल्लाच्या हवाली पन्नास हजार रुपये होते. शहाजादा बेदारबख्त याच्या विनंतीवरून बादशहांनी आज्ञा केली की : करकर(?) व खालीहाळ(जाळीहाळ) च्या जमीनदारांकडून येणारी पेशकश(खंडणी) ही पगारावर खर्च करण्यात यावी.

जेबुन्निसा बेगम हिने(दिल्लीहून) खरबुजाच्या करंड्या पाठविल्या होत्या. त्या बादशहांनी नजरेखालून घातल्या.

हिंमतखान बहादुर हा अकलूज येथे होता. हरकाऱ्याकडून कळले की : त्याच्या फौजेत तैनात असलेला बहिर्जी पांढरे याची माणसे आणि हिंमतखानाची माणसे यात मारामारी झाली. एक ठार व एक जखमी अशी हानी झाली. हिंमतखानाने मध्ये पडून बहिर्जी पांढऱ्याचे सांत्वन केले.

औशाचा फौजदार ख्वाजा नस्रुल्ला व फीरोजगडचा फौजदार अब्बास यांना काय मन्सब आहे याची चौकशी करण्यात आली.

नस्रुल्लाह हा पन्हाळा भागात होता. तो येऊन भेटला. गाजिउद्दीनखान बहादुर याने गनिमांवर जय मिळविला अशा अर्थाचे पत्र बाबाख्वाजा याने आणले होते. त्याला खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याच्या फौजेतील तेजसिंग(?) झाला व अजबसिंग झाला यांची मारामारी झाली. दोघेही मारले गेले.

औशाचा किल्लेदार व फौजदार नस्रुल्ला याला फीरोजगडच्या(यादगीर) किल्लेदारी व फौजदारी याजवर नेमण्यात आले. त्याच्या जागी मुहंमद सादुल्लाखान याला औशावर नेमण्यात आले. मुहंमद सादुल्लाखान याला पाचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती. तीत दोनशे स्वारांची भर घालण्यात आली.

नळदुर्ग कडील बातम्यांवरून कळले ते असे : मराठयांचे सरदार अलाउद्दीन व जसवंत(हणमंतराव) हे सैन्य घेऊन या प्रदेशात आले. नळेगाव(?)च्या जहागिरीच्या

गुमास्त्याने त्यांच्याशी युद्ध केले. पण कच खाऊन तो गडीत जाऊन बसला. बंडखोरांनी नळदुर्गावर चालून जाऊन तेथे लुटालूट केली. बादशहाने आज्ञा केली की : बंडखोरांचा मोड करण्यासाठी अब्दुल्लाखान याला लिहा.

मच्छिद्रगडचा किल्लेदार व फौजदार सय्यद नूरमुहंमद याला खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

कळंब(वऱ्हाड?)चा फौजदार हाजी अहमदबेग याची मन्सब कमी करण्यात आली.

विजापुरात तैनात असलेल्या मन्सबदारांपाशी पथकेच नाहीत असे कळविण्यात आले. चौकशी करण्याची आज्ञा देण्यात आली.

देवीदास व आणखी एक हिंदू हे मुसलमान झाले. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

घोडपगडाचा किल्लेदार अबुल्हसन याचे पत्र बादशहांनी नजरेखालून घातले.

विजापूरचा सुभेदार सय्यद लष्करखान हा बेडरांचा उपद्रव दूर करण्यासाठी नुस्रताबादेकडे गेला होता. त्याला हुजुरात यावे म्हणून लिहिण्याची आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : छावणीतील बैल चरण्यासाठी अंबापूरकडे गेले होते. शिवा बंडखोर याच्या सैनिकांनी दोनशे बैल पळविले.

• बादशहा काही दिवस विजापुरात होते. सहा शव्वाल(मे १६९४ च्या मध्यात)ला ते गलगलीला पोहोचले.

यलंगतोशखान(औरंगजेबाला एका दासीकडून झालेला मुलगा?) याचा मुलगा सुभानवर्दी याने नऊ मोहरा नजर म्हणून बादशहापुढे ठेवल्या.

राजा विजयसिंग याचा मुलगा उदयसिंग याला बदरी(छावणी जवळ)गावाहून तोफा बेदारबख्ताच्या छावणीत पोहोचविण्याची आज्ञा झाली.

त्र्यंबकगडचा बदललेला किल्लेदार व मरहूम कदीमकुलीखान याचा मुलगा हादीकुली हा बादशहाला येऊन भेटला.

मणूरचा ठाणेदार जगदेव याने लिहिले की : गनिमांची तुकडी इकडे आली होती. मी त्यांच्यावर चालून गेलो. शत्रुपैकी अनेकजण मृत अगर जखमी झाले. घोडे, भाले व कटयारी हाती लागल्या. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.' जगदेवरावला(जाधव) तीन हजारी मन्सब होती. ती वाढविण्यात आली.

सगर(गुलबर्गा जिल्हा)चा ठाणेदार हयातखान याला आपल्या ठाण्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

हिंमतखान बहादूर याने लिहिले की : आपल्या आज्ञेप्रमाणे मी खटावचा ठाणेदार रामचंद याच्या कुमकेला गेलो. गनीम त्या ठाण्यावर नाहीत. काय आज्ञा ? आज्ञा झाली की : अकलूज असदनगरवर जाऊन सावध राहावे.

दिलेरखान विजापूरी याला गोकाकच्या ऐवजी बुधनवाडी(?) परगणा तनखा जहागीर म्हणून देण्यात आला.

शहाजादा बेदारबख्त याच्या लष्करातील बातम्यांवरून कळले की : शहाजाद्याने पन्हाळ्याला वेढा घातला आहे. किल्ल्याचा एक बुरूज मोडला असून किल्ला आज उद्या हाती येईल.

गुलबर्ग्याच्या बातम्यांवरून कळले की : बेडर बंडखोर हे प्रवाशांना लुटत असतात. फौजदाराला याबाबतीत निक्षून लिहावे अशी आज्ञा झाली.

अब्दुस्सलाम हा रायबाग हुक्केरीचा फौजदार होता. ती जागा तेरदळचा फौजदार शेख फरीद याला देण्यात आली.

संगमनेरच्या गुप्त बातम्यावरून समजले की : अकोल्याचा ठाणेदार सय्यद नूरखान याचा नायब मुहंमद लुत्फ हा आपली जागा सोडून पट्टयाच्या किल्ल्याकडे गेला आहे. त्याला बदलण्यात यावे असा हुकुम देण्यात आला.

इस्माईलखानाचा मुलगा परवरिशखान याला दोन हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. त्याला जुल्फिकारखानाच्या फौजेतून बोलावून घ्यावे अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखानाकडून कळले की : राजारामाचा अधिकारी संताजी जाधव हा नोकरीच्या आशेने माझ्याकडे आला. त्याला तीन हजार जात व तीन हजार स्वार अशी मन्सब मिळावी. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली. जुल्फिकारखानाने सुचविल्याप्रमाणे बादशहांनी मन्सब (संताजी जाधवाला ?) दिली. त्याचे मुलगे महादजी व अनाजी (?) यांनाही मन्सबी देण्यात आल्या.

बाळापुर (कर्नाटकात) चा किल्लेदार शेख साबर (?) हा नेहमी दारूच्या नशेत धुंद असतो. जुन्या सदीवालांना (शिबंदीची माणसे) त्याने काढून टाकले असून नवीन नोकर भरती केले आहेत. ते इतरांशी फितूर करीत आहेत. आज ना उद्या किल्ला हातून जाण्याचा संभव आहे. बादशहांनी आज्ञा केली की : याबाबतीत कर्नाटकचा फौजदार कासिमखान याला निक्षून लिहिण्यात यावे.

धरमावरम किल्ल्याच्या प्रकरणाची चौकशी करून इम्तियाजगड अधोनीचा किल्लेदार रादअंदाजखान याच्या हाताखालचा अधिकारी लक्ष्मीकांत याने वृत्तांत सादर करावा अशी आज्ञा झाली.

बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'तयार रहा. गनिमांचा मोड करण्यासाठी तुम्हाला पाठविणार आहे.' त्याची तुकडी तयार करून द्यावी असे बहरामंदखानाला सांगण्यात आले.

चांदवडच्या बातम्यांवरून समजले की : महिपतसिंगाची नेमणूक नाशिक (?) च्या किल्लेदारीवर झाली होती. पण पूर्वीचा किल्लेदार रघुनाथसिंग याने किल्ला हवाली करण्याचे नाकारले. मातबरखानाने ताकीद दिली तरी उपयोग झाला नाही.

इस्माईलखान मका याने विनंती केली की : माझ्या भाऊबंदापैकी जलालखान वगैरेंनी गनिमांशी झालेल्या युद्धात कामगिरी बजाविली आहे. माझा मुलगा परवरिशखान

याच्या बरोबरच त्यांनाही जुल्फिकारखानाच्या छावणीतून बोलावून घ्यावे. विनंती मान्य करण्यात आली.

कळंबचा बदललेला किल्लेदार मुहंमद जाफर हा येऊन बादशहांना भेटला.

परगणे गोकाकचा फौजदार व अमीन ख्वाजा मुहंमद अमीन याला एक घोडा बक्षीस देऊन गोकाककडे पाठविण्यात आले.

देवगड(नागपूर)चा जमीनदार राजा दीनदार याचे विनंतीपत्र बादशहांनी नजरेखालून घातले.

बादशहांना कळविण्यात आले की : छावणीत अन्नधान्याचा तुटवडा असून धान्य महाग झाले आहे. गहू व चणे रुपयाला सात आठ शेराच्या भावाने विकले जात आहेत. बादशहांनी जुम्लतुल्मुल्क असदखान याला म्हटले, 'बाजारचा अधिकारी शरीफखान याला विचारा की, महागाईचे कारण काय? लक्ष ठेवता की नाही.' जुम्लतुलमुल्काने चौकशी करून कळविले की : शरीफखानाचे म्हणणे आहे की, वंजारी लोक डोंगराळ भागातून धान्य आणतात. वाटेत बंडखोरांचे स्वार वाटमारी करून त्यांना लुटतात. म्हणून छावणीत महागाई आहे. वाटेत ठाणी बसवून कुमक पोहोचविली तर वंजारी लोक सुरक्षितपणे धान्य आणू शकतील व धान्य स्वस्त होईल.

बादशहा म्हणाले, 'कुठे कुठे ठाणी बसविणे आवश्यक आहे हे चौकशी करून कळवा.'

शरीफखानाने कळविले की : कागलचा ठाणेदार पिराजी याने पुढीलप्रमाणे लिहिले आहे :– आज्ञेप्रमाणे मी लुत्फुल्लाखानाच्या तोफखान्यासाठी शिसे, दारू इत्यादि गोळा करण्यासाठी गेलो होतो. कोल्हापूरचा ठाणेदार अन्वरखान याने माझ्या ठाण्यावर येऊन हल्ला चढविला. माझी काही माणसे मारली. रयत पकडून नेली. गुरेढोरे व मालमत्ता लुटली. तिची किंमत जवळ जवळ पंचवीस हजार रुपये आहे. अन्वरखान याने कागलला ठाणे बसविले आहे.

बादशहांनी आज्ञा केली की : लुत्फुल्लाखानाने चौकशी करून वृत्तांत सादर करावा.

पवनारचा फौजदार व चांद्याच्या खंडणी वसुलीचा अधिकारी सद्रुद्दीन मुहंमदखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

होशंगाबादेचा फौजदार मुहंमदखान विजापुरी हा शुक्रवारच्या नमाजासाठी घरातून बाहेर पडत नाही. तसेच तो आपल्या कचेरीतही येऊन बसत नाही असे कळले. कचेरीत बरोबर येऊन बसत जावे अशी ताकीद त्याला देण्याची आज्ञा झाली. मणूर (बनूर?) ते भूम या रस्त्याचा मार्गरक्षक(राहदार) मतलबखान याने गनिमावर हल्ला केला. पाडाव केलेल्या वस्तूत एक घोडा होता. तो बादशहाकडे पाठविण्यात आला. जाननिसारखान उर्फ ख्वाजा अबुल्मकारम हा गाजिउद्दीनखान बहादुराच्या फौजेत तैनात होता. त्याची बदली जम्मूचा फौजदार म्हणून करण्यात आली.

बहरामंदखानाने सांगितले की : सय्यद गजनफर याची विनंती अशी आहे : गलगलीचे आणि कृष्णेच्या पलीकडचे जमीनदार म्हणत आहेत की, आम्हाला तीन

वर्षांसाठी जिझिया माफ व्हावा. कृष्णेच्या पलीकडे धान्याचा एक गंज(बाजार) कायम व्हावा म्हणजे कोकण व गोवेबंदर वगैरे ठिकाणाहून धान्य आणून जमा करता येईल. त्यामुळे बादशाही छावणीत स्वस्ताई होईल. त्या गंजाचा दारोगा(व्यवस्थापक) म्हणून आपली नेमणूक व्हावी. मी अमुक अमुक प्रमाणात धान्य पुरवीन असा मुचलका लिहून देण्यास तयार आहे. बादशहांनी आज्ञा केली की : शरीफखानाला(छावणीतील बाजाराचा व्यवस्थापक) विचारा. तो कबूल असेल तर गजनफरला नेमा.

खटावच्या हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी(घोरपडे)चा मुक्काम परळीला(साताऱ्याजवळ) आहे. त्याने आपले पुतणे, बहिर्जीचे दोन पुत्र यांची लग्ने साजरी केली. बहिर्जी हा रामा मकहूर(राजाराम) याजबरोबर जिंजीला आहे. संताजी सैन्य गोळा करीत असून आक्रमण करण्याच्या विचारात आहे.

गढीसंकचा ठाणेदार पुरदिलखान याला अब्बासच्या जागी फीरोजगडची किल्लेदारी देण्यात आली.

अर्जुनवाडचा ठाणेदार मंबाजी(?) याला हमीदुद्दीनखान याजकडे तैनात करण्यात आले.

दिलेरखान हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. त्याने गोकाकचा किल्ला ख्वाजा मुहंमद अमीनच्या हवाली करावा अशा अर्थाचे फर्मान पाठविण्याची आज्ञा झाली.

सात हजारी पासून एक हजारी मन्सबदारांपर्यंत सर्वांना आंबे देण्यात यावेत अशी आज्ञा झाली. (मे अखेर) हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मकहूर रामा(राजाराम) याचा दिवाण रामचंद्र हा सातारा येथे असून त्याने आपल्या एका आप्ताचा लग्न समारंभ साजरा केला. आता तो परळीत आहे. नारोराघोचा मुलगा व अर्जुनवाडहून बदललेला ठाणेदार मंबाजी हा येऊन बादशहाला भेटला.

घासीराम व भीकनदास हे मुसलमान झाले. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

सोलापुराहून 'खजिना' आणावयाचा होता. त्यासाठी आतिशखान याजबरोबर देण्यासाठी पाचशे स्वारांची तुकडी तयार करण्याची आज्ञा देण्यात आली.

कळविण्यात आले की : सय्यद अब्दुल्लाखान हा आजारी आहे. त्यामुळे बेडरांचा मोड करण्याचे काम त्याच्याकडून होत नाही. बादशहांनी आज्ञा केली की : या कामासाठी सय्यद लष्करखान यास तांतडीने पोहोचविण्यासाठी गुर्जबर्दार(दंडधारी) पाठविण्यात यावा.

हैद्राबाद शहराभोवती तटबंदी बांधण्यासाठी ऐंशी हजार रुपयांच्या खर्चाचा आराखडा पाठविण्यात आला होता. तटबंदी बांधण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

रायरी(रायगड)चा फौजदार अब्दुर्रज्जाक याने आपल्या वकीलामार्फत बादशहांना अर्ज केला की : माझा कारभारी अबुल्फजाइल हा चांदवड

परगण्याला गेला होता. वाटेत मुहंमद अब्बास लिबासी याच्या माणसांनी त्याच्यावर हल्ला केला. मुहंमद अब्बास मारला गेला. माझी दोन माणसे मारली गेली व माझा कारभारी जखमी झाला. त्या प्रदेशातील मरहमतखान आदि फौजदारांना आज्ञा व्हावी की : त्या लोकांचा मोड करून त्यांना पकडावे. बादशहांनी जुम्लतुल्मुल्क असदखान याला वृत्तांत सादर करण्याची आज्ञा केली.

दलपतचा मुलगा गजपत कंबू हा हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात होता. हमीदुद्दीनखानाने एक ठाणे कायम केले होते. तेथे दलपतने चांगली कामगिरी बजावली. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

सुभे वऱ्हाडचा दिवाण हाजी अब्दुल्ला याने विनंती केली की : पंचमहाल बालाघाटची दिवाणी माझ्याकडेच होती. ती येथील जिझियाचा अमीन मुहंमद मुजीब याला देण्यात यावी. मान्यता देण्यात आली.

जिझियाचा अमीन मुहंमद बाकर याने कळविले की, माझा नायब सुभे मुहंमदाबाद उर्फ बीदरहून पुढीलप्रमाणे कळवितो :– परगणे नांदेड(?) तालुके कंधार येथील जिझियाची तीस हजार रुपये रक्कम वसूल झाली आहे. अद्याप वसुली चालू आहे. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : अब्दुल्लाखान याला लिहा. संरक्षक पथक देऊन ती रक्कम हुजुरात रवाना करावी.

नुस्रताबाद उर्फ सगर(गुलबर्गा जिल्हा) येथील किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग यांजपाशी किल्ल्यात चार हजार अश्रफ्या अमानत होत्या. त्या हुजुरात पाठविण्याविषयी मुहंमद मासूम गुर्जबर्दार(दंडधारी) याजबरोबर ताकीदपत्र पाठविण्याची आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा सहा हजार स्वार व सात हजार पायदळ असे सैन्य घेऊन या महिन्याच्या चवदा तारखेस (शव्वाल, मे अखेर, १६९४) नरगुंदकडे रवाना झाला आहे.

बुऱ्हानुल्ला हा गड नमुन्याचा(करडे निमोणे) ठाणेदार होता. त्याला असदखान (?) याच्या जागी चाकणच्या किल्लेदारीवर व फौजदारीवर नेमण्यात आले. चाकणच्या माजी किल्लेदाराला गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

सियादतखान हा बादशहास भेटण्यास गेला. त्यावेळी बादशहा कॉफी पीत होते. त्यांनी सियादतखानाला विचारले की, 'तुम्ही कॉफी पिता ना.' ते हो म्हणाले. यानंतर बादशहांनी सियादतखानाला निरोप देताना कॉफी बरोबर दिली आणि खोजासराला म्हटले, 'यांना कॉफी पाजून परत ये.' त्याप्रमाणे करण्यात आले. खोजासरा म्हणाला, 'मला सियादतखान यांनी या कामगिरीबद्दल दोनशे रुपये दिले.' ते खोजासराला स्वतःपाशी ठेवण्याची परवानगी देण्यात आली.

अबुल्हसन याला परगणे अलमला व तांबे याची फौजदारी देण्यात आली.

भूम ते मणूर या मार्गावरील मार्गरक्षक(राहदार) मतलबखान याने सहा वाट-

मारे पकडून पाठविले. बादशहाच्या आज्ञेने कोतवाली चबुतऱ्यावर(ओटयावर) त्यांचा वध करण्यात आला.

चांद्याचा जमीनदार राजा किशनसिंग याने पुढीलप्रमाणे अर्जी पाठविली :–

(१) मी या भागातील बंडखोरांचा मोड केला आणि त्यांना हाकलून लावले. ते पळून परगणे रामगीर व हैद्राबाद प्रांतात गेले. खानजमान फतेहजंग(मुकरबखान) याचा कारभारी रामगीर परगण्यात आहे. बदरुल्ला हा एलगंदल(करीमनगर)ला फौजदार आहे. त्यांना माझी मदत करण्यासाठी लिहावे. बहरामंदखानाने वृत्तांत सादर करावा अशी बादशहाची आज्ञा झाली.

(२) चांदा हे गाव उघडया मैदानात आहे. बंडखोर इकडे आक्रमण करून येतात. आज्ञा झाली तर गावाभोवती कच्ची तटबंदी उभारण्यात येईल. बादशहांनी मान्य केले.

(३) चन्नापत जमीनदार हा या प्रांतात उपद्रव करतो. त्याचा मोड करण्यासाठी जावे म्हणतो. पवनारचा फौजदार व येथील तहसीलदार(खंडणी वसूल करणारा) सद्रुद्दीन मुहंमदखान आणि इतर यांना माझी मदत करण्याविषयी लिहावे. बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यांनी सद्रुद्दीनखान याला लिहावे.

बादशहांनी आबिदखान करावलबेगी याला आज्ञा केली की : शहाजादा रफी उल्कदर व शहाजादा मुहंमद खुजस्ता अख्तर यांच्यासाठी चौगान(पोलो) खेळण्यासाठी मैदानाची निवड करा.

मुद्‌गल(जिल्हा रायचूर) येथील हरकाऱ्यांच्या बातम्यावरून कळले की : शंकराजी देसाई याने मुद्दीकल(?) गावावर हल्ला करून तेथून लूट नेली. तेथील फौजदार नस्रखान याने आपला नायब अब्दुल्करीम याला त्याजविरुद्ध पाठविले. चकमकीत बंड-खोरांची अनेक माणसे ठार झाली. पळवून नेलेली गुरेढोरे सोडवून नेण्यात आली.

मरहूम सैफखान याचा मुलगा बसालतखान याने लिहिले की : आपल्या आज्ञप्रमाणे मी आजमनगर बेळगावच्या किल्ल्यात दाखल झालो. तेथील किल्लेदार व फौजदार म्हणून त्याची नोंद करण्यात यावी अशी आज्ञा करण्यात आली.

कागलचा जमीनदार पिराजी(घाटगे) यान शरीफखानाच्या मार्फतीने पुढीलप्रमाणे विनंती केली :– कोल्हापूरचा ठाणेदार अन्वरखान याने माझ्या कागलच्या जमिनदारीवर व ठाण्यावर हल्ला केला. त्याने मालमत्ता, गरेढोरे लुटली. अशारीतीने जवळजवळ एक लाख रुपयाच्या चीजवस्ता त्याने ताब्यात घेतल्या आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : लुत्फुल्लाखान याने चौकशी करावी. त्याने चौकशी केली नाही. आता त्याची दरबारात नेमणूक झाली आहे.

बादशहाने आज्ञा केली की : एक गुर्जबर्दार(दंडधारी) नेमा. त्याने जाऊन अन्वर-खानाने ताब्यात घेतलेली सगळी मालमत्ता पिराजीला द्यावी. तसेच कागलचे ठाणे पिराजीच्या माणसांच्या हवाली करावे.

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याच्या विनंतीवरून सय्यद मुहंमदचा मुलगा अब्दुऱ्रीफ याला जुल्फिकारखानाच्या तैनातीतून काढून अलीमर्दानखानाच्या तैनातीत देण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : आदिलखानी कोकणचा फौजदार सरबाजखान याने चार डच व्यापाऱ्यांची सुमारे एक लाख रुपयांची मालमत्ता लुटली. बादशहा म्हणाले, 'या माणसाने यापूर्वीही अशीच दंडेली केली होती. हा बंडखोरीचा उद्देश बाळगून आहे असे दिसते. हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) लोकांशी मिळालेला दिसतो.' बादशहा यारअलीबेगला म्हणाले, 'तुम्ही त्याला आज्ञापत्र पाठवून हुजुरात बोलावून घ्या. त्याचा मुलगा पथकांसहित तेथे नायब म्हणून राहील.'

सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार मुहंमद यूसुफ याचा भाऊ रुस्तमबेग (उजबेक खानाचा मुलगा) हा येऊन बादशहांना भेटला.

अथणीच्या फौजदारीवर मीर शहाबुद्दीनच्या ऐवजी फिदाई खानाचा आप्त मीर मुहंमद रजा याची नेमणूक करण्यात आली.

सोलापुराहून खजिना आणण्यासाठी आतिशखानाला रवाना करण्यात आले.

किल्ले औरंगगड (मुल्हेर) मधील सामग्रीचा दारोगा हाजी मुहंमद याची मन्सब वाढविण्यात आली.

दौलताबादेचा किल्लेदार मुर्तजाखान, बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान इत्यादींना आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या तैनातीतील खानजमान फतेहजंग (मुकर्रबखान), त्याची मुले, खाने आलम, मुनव्वरखान व इख्तिसासखान, ओछर्याचा राजा अवधूतसिंग, मोतिकदखान, बक्षी व वाकनीस व शमशेरखान यांना बक्षिसे पाठविण्यात आली.

विजापूर येथील हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखानाच्या तैनातीतील अब्दुल्कादर (तीन हजार जात व दीड हजार स्वार यांचा मन्सबदार) हा छावणी सोडून आला असून परत जात नाही. त्याला परत जुल्फिकारखानाकडे जाण्याविषयी लिहिण्यात यावे अशी आज्ञा झाली.

कन्नड (?) चा फौजदार बहादुरखान हा रयतेवर जुलुम करतो अशी तक्रार सफशिकनखान याने केली. कन्नड त्याच्या जहागिरीत होते. औरंगबादेचा संरक्षक इनायतखान यास यासबंधी लिहिण्यात यावे की, असा जुलुम होऊ देऊ नये. त्याप्रमाणे आज्ञा करण्यात आली.

चांदवडच्या बातम्यांवरून कळले की : भूपतगडचा किल्लेदार शुजाअत याने माणसे गोळा करून सय्यद उमर याच्या जुन्नर मधील जहागीर गावावर हल्ला केला. दोन्ही पक्षाची बरीच माणसे मारली गेली. गावची रयत परागंदा झाली.

उमदी ठाण्याच्या बातम्यावरून कळले की : उबाजी (उमाजी, रूपाजी?)

थोरात(भोसले ? ) हा जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. तो तेथून निघून आपल्या जहागिरीत येऊन बसला आहे. त्याचा बंडखोरीचा इरादा दिसतो. गनीम त्याला मिळाले आहेत. या बाबतीत ठाणेदाराला लिहिण्यात यावे अशी आज्ञा झाली.

मुखलिसखान याने कळविले की : गजेंद्रगडचा किल्लेदार सय्यद फर्‍रुख याने पत्र लिहून पंधरा बर्कंदाज(बंदुकची) आपल्यापाशी तातडीने तैनात करण्यात यावे अशी विनंती केली आहे. विनंती मान्य करण्यात आली.

गोविंदरायचा मुलगा सेवाजी लोहार याने एक कट्यार नजर म्हणून बादशहाला दिली.

जमशीदखान याने वकीला मार्फत अर्ज केला की : परगणे निहूर व एटगीर(?) माझ्या जहागिरीत आहेत. जहांगीर कुलीखान याचा मुलगा इज्जत बेग याने माझी जहागीर लुटून नगद व मालमत्ता ताब्यात घेतली आहे. गुर्जबर्दार नेमावा. जहांगीर कुलीखानाला बक्षी बहरामंदखान याने लिहून मालमत्ता परत देण्यास ताकीद करावी व असे प्रकार पुन्हा होऊ नये. अशी आज्ञा झाली.

आजमनगर बेळगाववर सय्यद यादगार हुसेनखान हा किल्लेदार होता. त्याच्या ऐवजी मरहूम सैफखान याचा मुलगा बसालतखान याची नेमणूक करण्यात आली (अकरा जून १६९४).

अळंगचा किल्लेदार बीरसेन याने लग्न समारंभासाठी देशी जाण्यास रजा मागितली. ती मंजूर झाली.

गनिमांनी रसद लुटली होती. चंदनवंदन जवळचा प्रदेश उध्वस्त करण्यासाठी चीनकुलीजखानबहादुर याला गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याजतर्फे पाठविण्यात आले होते. चीनकुलीजखानाने गनिमांचा मोड केला व गुरेढोरे त्यांच्या हातातून सोडविली. वरील हकीकत बादशहांना कळविण्यात आली.

अथणी(?)च्या परिसरातील बंडखोर जमीनदार भूपत(हणमंत) याने हमीदुद्दीनखानाकडे निरोप धाडला आहे की, मला मन्सब दिली तर या भागात मी गनिमांना येऊ देणार नाही. त्याला हुजुरात पाठवावे अशी आज्ञा करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : बंडखोर बेडरांनी तोरगल(?) व देवदुर्ग यांना वेढा दिला होता. कादरदादखान याने देवदुर्गचा किल्लेदार मरहूम लोधीखानाचा मुलगा अहमद याच्या कुमकेस आपली तुकडी पाठविली. बंडखोर पळून गेले.

हुसेन अलीखान (पुढील प्रसिद्ध सय्यदबंधूंपैकी एक) याने पत्र पाठविले की, गनिमांचे सरदार परसोबाजी, मोर खंडो(?), जगतराव हे नागोजी पाटील याजबरोबर संगनमत करून गंगाखेड(?) पालिमच्या गढीपाशी(परभणी जिल्हा) तळ देऊन राहिले. मी तेथे जाऊन बंडखोरांचा मोड केला. ते लोक पळून गेले. गढी पाडून टाकण्यात आली. तेथील गनिमांची ठाणी काढून टाकून आपली ठाणी बसविण्यात आली. माझा भाऊ नूरुद्दीन

अली याने या मोहिमेत चांगली कामगिरी बजाविली. आपल्या कृपेची आशा बाळगून आहे. गढी जिंकल्याबद्दल सोन्याच्या किल्ल्या पाठविल्या आहेत. बादशहांनी त्या पाहिल्या. माहुलीचा ठाणेदार अहमदखान याला जैनुलआबिदीनखान ही पदवी देण्यात आली.

मरहूम मुहतरमखान याचा एक हत्ती सय्यद अब्दुल्लाखान याने नळदुर्गला पाठविला. नळदुर्गचा किल्लेदार कामिलखान याने हत्ती हुजुरात पाठविण्यासंबंधी यारअलीबेगला लिहिले होते. आज्ञा झाली की : तो हत्ती सोलापूरचा ठाणेदार मतलबखान याजकडे पाठविण्यात यावा. तेथून मतलबखानाने तो हुजुरात पोहोचवावा.

मुहियुद्दीन कुली गुर्जदारला आज्ञा झाली की : बेडर बंडखोर गुलबर्ग्याजवळ ठाण मांडून आहेत. सय्यद लष्करखान हा फीरोजगड(यादगीर) जवळ आहे. तेथून त्याला बेडरांचा मोड करण्यासाठी गुलबर्ग्याला पोहोचवावे. गुलबर्ग्याचा किल्लेदार अलफखान याची तुकडी लष्करखानाच्या सैन्याला जोडण्यात यावी. इतके करून परत यावे.

मिरजेचा किल्लेदार व फौजदार मुहंमद अश्रफ याच्या ठाण्यावरून कळले की : लुत्फुल्लाखान याने सरकारी सामान जबरदस्तीने विकून मिळालेली रक्कम खिशात घातली आहे.

रामा(राजाराम) याचे सात अनुयायी चौसाळा (बीड जिल्हा) जवळ वाटमारी करीत. चौसाळा ते मणूर मार्गाचा राहदार(मार्गरक्षक) मतलबखान याने त्यांना पकडून हुजुरात पाठविले. आज्ञा झाली की : हमीदुद्दीनखान याने त्यांचा वध करवावा.

गुलबर्ग्याचा देशमुख परसोजी याने गनिमांचा मोड केला. त्याबद्दल त्याने नऊ मोहरा नजर म्हणून पाठविल्या.

बंडखोरांचा मोड करण्यासाठी बादशहांनी सय्यद अहमद(?) खान याला गढी संखकडे पाठविले.

पाईन विलायत(पाईन घाट)चा ठाणेदार नाहरखान याचा दिवाण मुहंमद अफजल याची दृष्टि अधु झाली. त्याच्यातर्फे दुसऱ्याकडून काम घेण्यात यावे अशी आज्ञा झाली.

सय्यद अब्दुर्रौफ याला वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याजपाशी तैनात करण्यात आले.

गाजिउद्दीनखान बहादुर, चीनकुलीजखान, रुस्तमखान विजापुरी इत्यादींना खिलतीची वस्त्रे व इतर बक्षिसे पाठविण्यात आली.

हळसंगीचा बदललेला फौजदार मुहंमदमिया व आलमलाचा बदललेला फौजदार सय्यद मुहंमद यांच्या मनसबी कमी करण्यात आल्या. दंडराजपुरीचा किल्लेदार सिद्दी खैरियत याने उंधेरीच्या किल्ल्यावर सिद्दी अंबर(?)ची नेमणूक व्हावी असा विनंती अर्ज पाठविला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : पिडनाईक बेडर याचे अल्लाउद्दीन वगैरे अधिकारी हे दोन हजार स्वार व दोन हजार ऐंशी पायदळ घेऊन देवदुर्ग व कोदमक(?)या ठाण्यांना वेढा देऊन आहेत. लवकर कुमक पाठवावी असे किल्लेदाराने लिहिले. सय्यद लष्करखान याने

तातडीने जाऊन कुमक करावी अशा अर्थाची पत्रे हरकाऱ्यांबरोबर पाठविण्याची आज्ञा झाली.

कल्याणचा ठाणेदार मातबरखान याने विनंती पत्र पाठविले की: सिद्धगडचा किल्ला मी जिंकला त्याला सहा महिने झाले. (सिद्धगडचा किल्ला मोगलांनी वीस ऑक्टोबर १६९३ रोजी घेतला) त्यावर आपण कुलंगचा किल्लेदार किशनसिंग याची नेमणूक केली. पण तो अद्याप येऊन पोहोचला नाही. बादशहांनी आज्ञा केली की: गुर्जबर्दार(दंडधारी) याने जाऊन किशनसिंगला सिद्धगडला पोहोचवून परत यावे.

मातबरखानाने लिहिले होते की: सिद्धगडमध्ये सामग्री सरंजाम काही नाही. त्याची-व्यवस्था करण्यास सरंजामचा दारोगा मुहंमद जाफर याला आदेश द्यावा, अशी आज्ञा झाली.

ताळीकोटचा फौजदार आणि मरहूम फतेहजंगखान याचा नातू कादरदादखान याच्या-बद्दल चौकशी करण्यासाठी गुर्जबर्दाराला पाठविण्यात आले.

(बारा जून १६९४) माहुलीचा किल्लेदार जैनुल आबिदीन याने लिहिले की: गुल्श-नाबाद(नाशिक) वगैरेचा ठाणेदार मातबरखान याने अठरा हजार रुपयांचा सरंजाम या किल्ल्यात ठेवला होता. दारुगोळ्याच्या कोठारात आग लागून सरंजाम व खिलतखाना ही जळून गेली. औरंगाबादेचा सुभेदार दियानतखान याला चोकशी करून सामग्रीचा सरंजाम सिद्ध करून देण्यासाठी आज्ञा व्हावी.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की: गनीमांचे सैनिक आष्टी जवळ आले. त्यांनी शहाजादा आज्जम याचा शुतरखान(उंटखाना) व शेख हिदायतुल्ला याचे उंट लुटून नेले. तेथील ठाणेदार हणमंतराव (?) कोळी व जमीनदार यांनी पाठलाग करून शहाजादा आज्जम यांचे उंट आणले. पण शेख हिदायतुल्ला याचे उंट गनिमांनी पळवून नेले.

छावणीतील फळविक्यांनी तक्रार केली की: आमच्याकडून दोन्ही बाजाराचे दोन अधि-कारी गजनफर व शरीफखान हे वेगळे कर वसूल करतात. एकाच वस्तूसाठी दुप्पट कर द्यावा लागतो. मनाईचा हुकुम देण्यात आला.

चाकणचा किल्लेदार बुऱ्हाणुल्ला याच्या मन्सबीत सूट देण्यात आली.

सफशिकनखान याने अर्ज केला की: भालकी परगणा हा माझ्या व सय्यद लष्करखा-नाच्या जहागिरीत आहे. बेडरांच्या टोळ्या तेथे येऊन लुटालूट करीत आहेत. बादशहांनी आज्ञा केली की: एक गुर्जदार मुद्दाम पाठवा. त्याने सय्यद अब्दुल्लाखान याला बंडखोरांचा मोड करण्यासाठी पाठवून परत यावे.

इंदापूरच्या ठाणेदारीवर अब्दुल्ला होता. त्याच्या जागेवर मलिकशहा याला नेमण्यात आले.

(सतरा जून १९६४) सिद्दी अंबर याला उंदेरीची किल्लेदारी देण्यात आली. यज-दान बक्ष याला इंडीच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले.

छावणीतील दुसऱ्या गंजाचा(बाजाराचा) दारोगा सय्यद गजनफर याने विनंती केली की: पहिल्या गंजाचा करोडी शरीफखान याने चाळीस स्वार व प्यादे माझ्या बाजा-

रात पाठवून व्यापाऱ्यांना तेथून हलविण्यास सुरवात केली. मना केले तर मारामारीस उद्युक्त होतात. पूर्वी दुसरा बाजार नव्हता मी तो कायम करविला. त्यामुळे गलगलीतून बाजार कराचे उत्पन्न पंधरा हजार रुपये मिळू लागले आहे.

बादशहांनी आज्ञा केली की : कृष्णेच्या दोन्ही काठावर गंज कायम ठेवावेत. शरीफखानाने नदी पलीकडील गंजात ढवळाढवळ करता कामा नये.

सय्यद नूर मुहंमद याला आज्ञा झाली की : देगलूर(?)च्या किल्ल्यात दारुगोळा पोहोचवून परत या.

(अठरा जून १६९४) कळविण्यात आले की : अधोनीचा किल्लेदार रादअंदाजखान हा तोफखान्याचा दारोगा फतेह अली याला किल्ल्यावर जाऊ देत नाही. त्याला कैदेत ठेवले असून तो फतेह अलीला ठार मारू इच्छितो. बादशहांनी आज्ञा केली की : गुर्जबर्दाराने (दंडधारी) जाऊन फतेह अलीला सोडवून हुजुरात आणावे.

कळविण्यात आले की : गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार अलफखान याचा नायब याने सिद्दीमिफ्ताहच्या जहागिरीच्या आमिल (कारभारी) ला कैद करून त्याची मालमत्ता बळकावली आहे. आज्ञा झाली की : गुर्जबर्दार (दंडधारी) नेमा. त्याने आमिलाला कैदेतून सोडवावे, मालमत्ता परत करवावी व आमिलाला हुजुरात आणावे.

इंडीचा ठाणेदार यादगारबेग याने पुढीलप्रमाणे कळविले :– बंडखोर सरदार करमन्या (?) हा बंडखोर डफळे याच्याबरोबर मिळाला आहे. त्याचा एक मराठी अधिकारी स्वतः-च्या लग्नासाठी इकडे आला होता. मला बातमी लागताच मी हल्ला करून त्याला व अठ्ठावीस स्त्री पुरुष यांना पकडले. संता (संताजी घोरपडे) याचे एक हजार स्वार हे या प्रांतात संचार करीत आहेत. माझ्याजवळ फार थोडे सैन्य आहे. त्यांनी (संताजीच्या स्वारांनी) हल्ला केला तर मी प्राणास मुकेन. बादशहांनी आज्ञा केली की : त्याच्या सेवेचा मजुरा झाला. या नंतर त्यांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला आज्ञा केली की : यादगारबेगकडे अडीचशे स्वार नेमा आणि तीनशेचा मन्सबदार तैनात करा. त्याने जाऊन यादगारबेगचे सहाय्य करून यावे. गनीम सापडला तर त्याचा मोड करावा.

मुख्तारखान याने परंडा सरकार मधील करकंब परगणा आपल्याला तनखाजहागीर म्हणून मिळावा अशी विनंती केली.

मरहूम वजीरखान याचा पुतण्या महंमद रफी याला तळकोकणची दिवाणी देण्यात आली.

आदिलखानी तळकोकणवर सरबाजखान हा फौजदार होता. त्याच्या ऐवजी इखलासखान मियाना यास नेमण्यात आले (१८ जून १६९४). एकोणीस जून १६९४ रोजी हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी (घोरपडे) हा भूपालगडाहून महादेवाच्या डोंगराकडे रवाना झाला. मरहूम जुल्फिकारखान याचा मुलगा फतेहुल्ला हा परवानगी वाचून पन्हाळगडाच्या वेढ्यातून परत आला होता. त्याची व त्याचा मुलगा मुहंमद शुजा यांच्या मन्सबी कमी करण्यात आल्या.

मरहूम सुल्तान अलीखान याचा मुलगा व फिरोजगड (यादगीर) चा बदललेला किल्लेदार अब्बासखान याची खान ही पदवी काढून घेण्यात आली.

दिलेरखानाला परगणे गोकाकच्या ऐवजी परगणे माजकनूर(?)तनखा जहागीर म्हणून देण्यात आले.

परंड्याचा किल्लेदार इज्जतखान याने पुढीलप्रमाणे लिहिले :– मराठ्यांचा अधिकारी महदाजी नारायण हा संताजी(घोरपडे) याच्या बरोबर होता. त्याच्यापाशी तीनशे स्वार असून तो बादशहाची चाकरी करण्याच्या उद्देशाने माझ्याकडे आला आहे. त्याला मन्सब मिळावी. आज्ञा झाली की : बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने हे प्रकरण मांडावे.

मुहंमद शरीफने पुढीलप्रमाणे विनंती केली :– माझा एक वाडा बुऱ्हाणपूरच्या तोफखान्याचा दारोगा सुलतान इब्राहीम याला राहाण्यासाठी दिला. आता तो रिकामा कर म्हटले तर म्हणत आहे की, 'तू कोण आहेस? वाडा माझा आहे.' चौकशी करून वाडा परत द्यायला लावावा अशी आज्ञा झाली.

यानंतर बादशहा मुहंमद शरीफला म्हणाले, 'थाळनेर सरकार(जिल्हा) मध्ये एरंडोल येथे मरहूम मीर अहमदखान यांनी बाग लावली होती. त्या बागेत आंब्याचे एक झाड होते. त्याला अंबकेळा म्हणत. शहाजहान बादशहांनी त्या आंब्याचे नाव बादशहापसंद ठेवले होते. त्या झाडाचे आंबे तुम्ही आमच्याकडे का पाठवीत नाही.' त्याने चौकशी करून सांगितले की, 'माझे काका मीर अहमदखान हे वारल्यावर त्यांच्या मुलांची, मीर अब्दुल्ला व अबुल्हसन यांची स्थिती खालावली. त्यांना मन्सब राहिली नाही. इतरांनी बागेचा ताबा घेतला असून ती बाग आमची आहे असे ते म्हणत आहेत.'

बादशहांनी मीर अब्दुल्ला याला अडीचशे व अबुल्हसनला दोनशे मन्सब नव्यान दिली. बादशहा म्हणाले, 'बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान याला लिहून ती बाग आणि आंब्याचे झाड याची चौकशी करून वृत्तांत पाठविण्यास सांगा.

बादशहांनी आज्ञा केली की : सय्यद अब्दुल्लाखान याने गुलबर्ग्याहून नांदेडच्या आपल्या सुभेदारीकडे जावे आणि आपला मुलगा हसनअली यास हुजुरात पाठवावे.

रायबाग हुकेरीचा बदललेला ठाणेदार मुहंमद इब्राहीम विजापुरी याला हुजुरात बोलावण्यात आले.

* * *

Maratha.Exe

# पाच

## २२ जुलै १६९४ ते २७ ऑगस्ट १६९४

### २२ जुलै १६९४

तळवीडचा ठाणेदार आणि नाहरखानाचा मुलगा अदानी याने लिहिले की : धनाजी जाधव व हणमंतराव हे आठ हजार स्वार व दोन हजार पायदळ असे सैन्य घेऊन तळबीड जवळ आले असून त्यांनी धामधूम चालविली आहे. संताजी हा दोन कोसावर येऊन उतरला आहे. ते लोक राजारामाचा दिवाण रामचंद्र याच्या येण्याची वाट पाहात आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : हिंमतखानाने जाऊन गनिमांवर हल्ला चढवावा.

जुन्नरकडील हरकाऱ्यांकडून कळले की : रामा मावळा हा गाजिउद्दीनच्या फौजेतून पळून गेला. तो मकहूरांकडे (मराठ्यांकडे) गेला. त्याने एक हजार पायदळ सैन्य जमविले आहे.

### २३ जुलै १६९४

शहाजादा बेदारबख्ताच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की : खानजमान फतेहजंग हा नरगुंद किल्ल्याच्या वेढ्यात मोर्च्यावर होता. त्याने तोफखान्यासाठी मसाला (दारु गोळा-वगैरे) आणखी हवा म्हणून मागणी केली. यावरून शहाजाद्याने त्याला छावणीवर बोलाविले व त्याच्या जागेवर अवधूतसिंग बुंदेला याची नेमणूक करून त्याला वस्त्रे देऊन पाठविले.

### २४ जुलै १६९४

सुभानगडचा फौजदार व किल्लेदार सय्यद लतीफ याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

२५ जुलै १६९४

लुत्फुल्लाखान हा सोलापुराहून खजिना घेऊन आला. साठ हजार अश्रफया व चौतीस लाख रुपये सरकारी खजिन्यात दाखल करण्याचा हुकुम देण्यात आला.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान हा बादशहाच्या छावणीत आला.

२६ जुलै १६९४

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याने विनंती केली की : मनसुख याचा मुलगा मुनशीसिंग व अनुपसिंग (मरहूम बहारसिंग याचा मुलगा) यांना मन्सब देऊन माझ्याजवळ तैनात करावे. त्यांना हुजुरात पाठवावे असा हुकुम देण्यात आला.

खटावचा ठाणेदार रामचंद्र याच्या पैकी नारोराघो याचा आप्त आनंदराव हा भेटीस आला. त्याने दोन मोहरा नजर म्हणून दिल्या. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

२८ जुलै १६९४

सुरतेचा किल्लेदार कदीमुल्खिदमतखान याचा मुलगा मुहंमद इसहाक हा सुरतेहून आला. त्याने नजर आणि आपल्या बापातर्फे पेशकश म्हणून घोडा, मोत्यांची माळ, पुस्तक, तल्वार, बंदूक इत्यादी वस्तू बादशहापाशी दिल्या.

नारोराघो याचा मुलगा शहाजी याला त्याच्या भावाबद्दल दुखवटयाची वस्त्रे देण्यात आली.

धारवाडचा किल्लेदार इस्माईलबेग याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

दरगाहकुली याला सिरागडची किल्लेदारी देण्यात आली. सत्रसाल (छत्रसाल राठोड) याला नलगोंडा (बलकोंडा?)ची किल्लेदारी देण्यात आली.

बीडपासून मणूरपर्यंत रस्ते रक्षणासाठी मतलबखान याला नेमला होता. त्याच्या जागी मामूरखान याला नेमण्यात आले. मतलबखान, त्याचा मुलगा, जावई कामयाब यांना हुजुरात बोलावण्यात आले. मतलबखानाच्या मोठया मुलाने मतलबखानाच्या तैनातीतील माणसांना मामूरखानाकडे पोहोचवावे असा हुकुम देण्यात आला.

मुहंमद बाकर यास सरकार (जिल्हा) वाशीम (विदर्भ) मधील औंढा (नागनाथ)च्या फौजदारीवर पूर्वीप्रमाणेच बहाल करण्यात आले.

मुहंमद शरीफ हा सीरागडचा किल्लेदार होता. त्याला काढून त्याच्या जागी दरगाहकुलीखान यास नेमण्यात आले. त्याची मन्सब सातशे जात व सहाशे स्वार अशी बहाल ठेवण्यात आली. नलगोंडयाचा किल्लेदार सत्रसाल याच्याकडे सातशे जात व आठशे स्वार (त्यापैकी पाचशे दोअस्पा) अशी मन्सब बहाल ठेवण्यात आली.

गाजिउद्दीनखान बहादुर (फीरोजजंग) याजपाशी तैनात असलेल्या रुस्तमखानाने अर्ज केला की : माझा मुलगा गालिबखान यास बढती मिळावी. त्याचे सय्यद हुसेनच्या मुलीशी लग्न ठरले आहे. तर त्याला विजापूरला जाण्यासाठी रजा मिळावी. बादशहांनी रजा मंजूर केली व गालिबखानाला खिलतीची वस्त्रे, ध्वज व नगारे नौबतीचा मान द्यावा अशी आज्ञा केली.

औरंगाबादेच्या बातमीपत्रावरून कळले की : तेथील किल्लेदार दियानतखान हा मदिरासक्त आहे. बादशहांनी त्याला हुजुरात बोलाविले. इतक्यात अमानतखान याने कळविले की : आळ खोटा आहे. वाकेनविसाने आकसाने खोटे लिहून पाठविले आहे. त्याला तेथेच राहू द्यावे. बादशहाने ते मंजूर केले.

फतेहाबाद(धारुर, मराठवाडा)च्या बातम्यावरून कळले की : बळवंत, चारशे जात व शंभर स्वार यांचा मन्सबदार हा जिंजी(वेढा) सोडून इकडे आला आहे. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

सत्रसालसिंगाचा भाऊ भारतसिंग याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बाकरअलीबेगने अर्ज केला की : मुंहमदरजाचा मुलगा मुहंमदबक्ष हा पूर्वी छावणीत नोकरीवर होता. त्याने फार अफरातफर केली. तो आता शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात आहे. बादशहांनी त्याची मन्सब दहानी कमी करण्याचा हुकुम दिला. बादशहा म्हणाले की, 'अशी माणसे यापुढे नोकरीवर ठेवण्यात येऊ नयेत.'

## २९ जुलै १६९४

कुंजीराम हा तोरगलचा किल्लेदार होता. तो बेदारबख्ताच्या फौजेतून आला. पट्टा येथील किल्लेदारी व फौजदारी या जागावर त्याला नेमण्यात आले. तेथे पूर्वी सय्यद-नूरखान होता. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन त्याला वस्त्रे देण्यात आली.

लष्करखानाच्या फौजेतील वाकेनवीस ख्वाजा इबादुल्ला याला कामावरून बदलण्यात येऊन हुजुरात बोलावण्यात आले.

इंदापूरहून बदललेला ठाणेदार मलिक मुहंमद(नाहरखानाचा मुलगा) याची मन्सब शंभरने कमी करण्यात आली.

मुस्ताफाबाद(दाभोळ?)चा फौजदार मुम्ताजुद्दीन याने कळविले की : नेमलेल्या माणसाहून अधिक जमात(माणसे) स्वतः बाळगून मी इकडचा बंदोबस्त करीत आहे.

हरकारा भास्करराव याची मुले किशनराव व शंकरराव ही बादशहाच्या सेवेत हजर झाली.

## ३० जुलै १६९४

कासिमखानाच्या फौजेत पुढील मन्सबदार तैनात होते :– मुहंमद सादिक, अब्दुलल्फताह, हसनबेग, खंडेराव, सरीगर. ते कासिमखानाची छावणी सोडून निघून गेले. फरारी म्हणून त्यांची नोंद व्हावी असा हुकुम झाला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हिंमतखान बहादुर याने मकहूर रामा(राजाराम) याचा दिवाण रामचंद्र(रामचंद्रपंत अमात्य) याचा मोड करण्यासाठी भाळवणहून सैन्याची तुकडी पाठविली. रामचंद्र हा वारुगडच्या किल्ल्याच्या दिशेने रवाना झाला.

बारामतीचा ठाणेदार यासीनखान याने अर्ज पाठविला की : रहमतपूरची ठाणेदारी रिकामी पडली आहे. ती पत्करण्यास कोणीच तयार नाही. त्यासाठी योग्य सामग्री, माझ्या मन्सबीत शंभरची वाढ व फतेजंहगखान ही पदवी मिळत असेल तर ती ठाणेदारी पत्करण्यास मी

तयार आहे. बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान यास म्हटले, 'त्याला काय सामग्री हवी आहे ती कळविण्यास सांगा.'

**३१ जुलै १६९४**

विजापूरचा किल्लेदार व सुभेदार नस्रुल्लाखान याने आज्ञेप्रमाणे रहमदाद याला तेथील तुरुंगातून काढून हुजुरात पाठविले आहे. जामीन घेऊन त्यांची सुटका करण्यात यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

बीड(मराठवाडा)चा फौजदार मामूरखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. तो दीड हजारी (जात) व सातशे स्वार यांचा मन्सबदार होता. त्र्यंबकगडच्या बातम्यावरून कळले की : खानबेग व मुजफ्फरबेग गुर्जदार यांना किल्ल्याच्या संरक्षणासाठी नेमले होते. ते अद्याप तेथे पोहोचले नाहीत. फरारी म्हणून त्यांची नोंद करावी अशी आज्ञा झाली.

बादशहांनी तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याच्यापाशी मुहंमदतकीचा मुलगा हाजी मुहंमद मासूम व रहमत अलीबेग याचा मुलगा इस्माईलबेग यांना तैनात केले.

औरंगाबादेहून बातमी कळली ती अशी : मरहूम मुहंमदखान याची मुले तेथे तैनात होती. त्यांनी औरंगाबादेतील बांधकाम खात्याचा मुख्य (दारोगा) याला कैद करून मारहाण केली. सुभेदाराने त्यांना पुष्कळ समजाविले पण त्यांनी ऐकले नाही. बादशहाने आज्ञा केली की : तेथील किल्लेदार इनायतखान याने त्यांना हुजुरात पाठवावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : या महिन्याच्या अकरा तारखेस हिंमतखान हा रवाना झाला. तो भाळवणी (बहावनी)च्या ठाण्याहून निघाला. दावरगड (बारूगड?)चा किल्लेदार संभाजी याचा मोड करणे हा त्याचा उद्देश होता.

**१ ऑगस्ट १६९४**

काल बादशहांनी विजापूरचा माजी बादशहा सिकंदरखान याला बोलावू पाठविले. बादशहांनी दक्षिणच्या प्रदेशासंबंधी त्याला माहिती विचारली. एका घटकेनंतर बादशहांनी त्याला निरोपाचा विडा दिला.

तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याचा मुख्य कारकून (पेशदस्त, हुजूर शिरस्तेदार) म्हणून प्राणनाथ याची नेमणूक करण्यात आली.

कमालुद्दीनखान याची ग्वाल्हेरच्या फौजदारीवर नेमणूक करण्यात आली.

आतिशखान (गुलबर्गा भागातील मोगल सरदार) याने विनंती केली की : आपले पायदळ पाचशेनी वाढवावे. तसेच दोन हजार बंदुकची नेमण्यात यावेत. दोन हजार माणसे नेमण्यात यावीत असा हुकुम दण्यात आला.

गुलबर्ग्याहून पुढील बातमी आली : पिडनाईक बेडर याचा सरदार तिरुमल हा आपली तुकडी घेऊन चिटगोपा किल्ल्याच्या जवळ असलेल्या देवगीर(?) गावात आला. तेथे त्याने आपले ठाण मांडले. त्याने गाव लुटले व मालमत्ता नेली. त्याने सात माणसे ठार मारली. काही माणसे जखमी झाली. आतिशखानानें शत्रूवर हल्ला करून त्याचा मोड करावा असा बादशहाने हुकुम दिला.

जानोजी हा चारशे जात व एकशे स्वार असा मन्सबदार होता. त्याने गाजिउद्दीनखान बहादुरपाशी तैनात व्हावे असा हुकुम देण्यात आला.

पदमसिंगाचा (बीकानेरचा राजा राव कर्ण राठोड याचा मुलगा पदमसिंग हा टिटवाळचाच्या लढाईत मारला गेला होता) नातू साहेबसिंग याला स्वतःच्या लग्नासाठी तीन महिन्याची रजा देण्यात आली.

महिमान (महिमानगड, महिपतगड, बेळगावजवळ)चा किल्लेदार किल्लेदारखान याने कळविले की : संताजी व धनाजी जाधव हे सैन्यासहित वारूगडजवळ होते. त्यांनी किल्ल्याला वेढा घालण्याच्या उद्देशाने तुकड्या रवाना केल्या असून रस्ते अडवून धरले आहेत. कुमकेवाचून आमचा सर्वनाश होईल. लवकर कुमक धाडावी. यावर कार्यवाही करण्यासाठी बक्षीउलमुल्क मुखलिसखान यास सांगण्यात आले.

मरहूम गजनफरखान याचा मुलगा हातमबेग याला निरोप देण्यात आला. बादशहांनी निरोपाचेवेळी त्याला सांगितले की, आतिशखान (गुलबर्ग्याकडील मोगल सरदार) याचे सैनिक व अधिकारी हे त्याच्यापाशी (आतिशखान) रुजू होऊन बेडरांवरील मोहिमात काम करतील अशी कडक व्यवस्था करा.

### २ ऑगस्ट १६९४

बिदनूरच्या जमीनदाराने पुढीप्रमाणे लिहिले :- शहाजादा बेदारबख्त याने नरगूंदवरील हल्ल्यासाठी व मराठ्यांशी लढण्यासाठी आमच्याकडे एक हजार स्वार व एक हजार पायदळ मागितले आहेत. आपल्या हुकुमाशिवाय पाठविता येत नाही. बादशहांनी आज्ञा केली की : शहाजाद्याच्या मागणीप्रमाणे सैन्याची तुकडी पाठवावी.

### ३ ऑगस्ट १६९४

शुक्रवार. आज दरबार झाला नाही.

### ४ ऑगस्ट १६९४

सोलापूरचा किल्लेदार मिहदी अलीखान व धोमचा(?) देशमुख अर्जुन हे आज बादशहांना भेटले.

लष्करखान याला मन्सबीत वाढ देण्यात आली. त्याचा मुलगा वजीहुद्दीन याला मन्सबीत वाढ व खान ही पदवी देण्यात आली.

### ५ ऑगस्ट १६९४

हिंमतखान बहादुर याच्याकडे खजिना पोहोचवून मुहंमद जानबेग हा बादशहाला भेटला.

बूधपाचगावचा ठाणेदार पदाजी हा तीन हजार जात व एक हजार स्वार असा मन्सबदार होता. त्याची मन्सब पाचशेनी कमी करण्यात आली.

विजापुराहून आलेल्या बातम्यावरून कळले की : शहबाज, पाचशे जात व दीडशे स्वार असलेला मन्सबदार हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या सैन्यात तैनात होता. तो छावणी सोडून आला. फरारी म्हणून त्याची नोंद करण्यात आली.

हिंमतखान बहादूर याने लिहिले की : मी अकलूजला पोहोचलो. मराठ्यांचे सैन्य फार आहे. माझ्यापाशी एक हजार स्वार आहेत. इतर तुकड्या कुमकेसाठी नेमाव्या. बादशहांनी आज्ञा केली की : आतिशखानाला मराठ्यांचा मोड करण्यासाठी हिंमतखानाच्या मदतीस जाण्यासाठी लिहावे.

आज्ञेप्रमाणे मुहिउद्दीन गुर्जबर्दार(दंडधारी) याने गाजिउद्दीनखान यास बहादुरगडपासून चार मजलावर मराठ्यांचा मोड करण्यासाठी रवाना केले. बादशहांनी त्याच्यांबरोबर गाजिउद्दीनसाठी अत्तराच्या दहा कुप्या पाठविल्या.

बादशहांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनच्या फौजेतील बाराशे स्वार हिंमतखानाच्या फौजेत तैनात करण्यात यावेत.

बादशहा बहरामंदखानाला म्हणाले, 'तुम्ही इस्माईलखान मका याला सांगावे की, मी त्याला मराठ्यांचा मोड करण्यासाठी हिंमतखानाकडे पाठवीत आहे. हे मान्य नसेल तर तुमच्यावर बादशहाचा कोप होईल हे लक्षात ठेवा.'

### ६ ऑगस्ट १६९४

बारामावळचा जमीनदार बाळाजी हा पाच हजार जात व दोन हजार स्वार असा मन्सबदार होता. त्याला भेट देऊन बादशहांनी आज्ञा केली की : एका दंडधाऱ्याने (गुर्जबर्दार) बाळाजीला गाजिउद्दीनखानाच्या छावणीत पोहोचवून यावे.

मुहंमद हैदर, अबुल्फतह व नागोजी (शहापूरचा जमीनदार) यांना तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याजपाशी तैनात करण्यात आले.

हिंमतखान बहादुर याने मराठ्यांचा मोड करण्यासाठी पाच रेहकले (लहान तोफा) यांची मागणी केली. ती मान्य करण्यात आली.

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेला आकाकुलीखान रुमी (तूर्क) याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

### ९ ऑगस्ट १६९४

बादशहांनी आज्ञा केली की : हिंमतखान बहादुर याच्या सैन्यात पूर्वीचे आणि नवीन दिलेले असे मिळून चार हजार स्वार तैनात असायला पाहिजेत.

### १३ ऑगस्ट १६९४

बादशहांनी मुहंमद नझीर करावल(बिनीचा) याला तोरण्याकडे जाण्यास निरोप दिला. बादशहांनी त्याला आज्ञा केली की : तेथील फौजदार व किल्लेदार जानबाजखान याजकडे तुम्ही जावे. पूर्वी किल्ला घेण्यासाठी मराठ्यांनी ज्या ठिकाणी दोराच्या शिड्या फेकल्या होत्या ती जागा सुरक्षित करावी. बादशहांनी मुहंमद नझीर बरोबर पाचशे बंदूकची व काही पाथरवट तैनात केले.

कर्नाटकचा फौजदार कासिमखान याजकडे खजिना पाठवावयाचा होता. बादशहांनी या बद्दल पुढीलप्रमाणे आज्ञा केली की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान याच्या तुकडीने खजिना विजापूरपर्यंत न्यावा. नंतर विजापूरचा सरदार नस्रुल्लाखान याने खजिना नुस्रताबादे

(सगर, गुलबर्गा जिल्हा)चा किल्लेदार राजा अनूपसिंग याजकडे न्यावा. त्याने तो कासिमखानापर्यंत पोहोचवावा.

खजिन्यातील काही रक्कम लष्करखान (मोगल सरदार) व शिऱ्याचा (जिरा) किल्लेदार सय्यद लतीफ याजकडेहि पाठवायची होती. कासिमखानाकडे नऊ लाख रुपये पाठवायचे होते.

## २५ ऑगस्ट १६९४

गाजिउद्दीनखान बहादुरच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : रामाजी, सीताराम इत्यादींच्यापाशी स्वतःची तुकडी नाही. त्यांच्या जहागिरी काढून घेण्याची आज्ञा झाली. बादशहांनी आज्ञा केली की : राजा शाहू याच्या पथकापैकी वीस माणसे व यादगार हुसेनखान याच्या पथकापैकी पाच माणसे यांनी मुहंमदतकी ठाणेदार नकरहसंघ (?) याच्यापाशी तैनात करण्यात यावे.

## २६ ऑगस्ट १६९४

बादशहांनी हमीदुद्दीनखान यास मराठ्यांचा मोड करण्यासाठी लष्करात जाण्यास निरोप दिला. बादशहा यावेळी फातेहा पढले. हमीदुद्दीनखान याला उंची खोगीर असलेला घोडा देण्यात आला.

गंजाच्या (बाजाराच्या) मुश्रफीवर (देखरेखीवर) बलराम होता. तो मरण पावला. त्याच्या जागेवर नुकताच मुसलमान झालेला अब्दुल्ला कौल याला नेमण्यात आले. बादशहांनी त्याला एक शाल बक्षीस म्हणून दिली.

उदगीर कंधारच्या किल्ल्याच्या तोफखान्याचा दारोगा याला मन्सबीत वाढ देण्यात आली.

मीर अब्दुलरसूल याला कोतला (कोथळज)ची किल्लेदारी देण्यात आली होती. त्याला तिकडे पाठविण्यात आले.

जानोजीला हिंमतखान बहादुरच्या फौजेत हमीदुद्दीनखानाच्या बरोबरीने तैनात करण्यात आले.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यांवरून कळले की : राजा भीम (उदयपूरचा राजपुत्र) हा वारला. त्याची पत्नी ही पदमसिंगाची मुलगी ती सती गेली. शहाजाद्याने ती सती जाऊ नये म्हणून तिचे मन वळविण्याचा प्रयत्न केला पण तिने मान्य केले नाही.

राजा भीमचा मुलगा सूरजमल हा स्वतःच्या विवाहासाठी देशी गेला होता. तो परत आला नाही. बापाच्या मृत्यूमुळे त्याला एक हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब देण्यात आली.

## २७ ऑगस्ट १६९४

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार समिंदरखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

फतेपुरीमहलचा भाचा लालचंद याला शंभर रुपये बक्षीस म्हणून देण्यात आले.

फीरोजगडच्या किल्लेदारीवर मुहंमद अब्बासच्या ऐवजी मुहंमद शरीफ याला नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

खिलतखाना (वस्त्रागार) चा दारोगा अब्दुल्कादर याला बादशहानी म्हटले, 'तंजावरचा जमीनदार शाहू भोसला याच्यासाठी खिलतीची वस्त्रे तयार करून आणा.' अब्दुल्कादरने दोन वस्त्रे आणली. बादशहाने त्यापैकी एक पसंत केले.

आज्ञा झाली की : जुल्फिकारखानाच्या फौजेसाठी तीन लाख रुपये पाठवावे. बहरामंदखानाने हा खजिना सगरचा किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग याजकडे पाठवावा. त्याने तो अधोनीचा किल्लेदार व फौजदार रादअंदाजखान याजकडे रवाना करावा. त्याने तो कंजीकोट (गंजीकोट?) ला पाठवावा. तेथून जुल्फिकारखानाने आपली पथके पाठवून न्यावा असे ठरले.

* * *

# सहा

## २९ ऑगस्ट १६९४ ते २३ सप्टेंबर १६९४

**२९ ऑगस्ट १६९४**

शहाजादा आज्जम याची मुलगी गीती अफरोज बेगम ही प्लेगने मरण पावली.

**३१ ऑगस्ट १६९४**

आनंद शेखावतचा नातू गोपाळचंद हा तळकोकणचा फौजदार इखलासखान मियाना याजपाशी तैनात होता. बादशहांनी त्याला आपल्याकडे घेतले.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार समिदरखान याने विनंती केली की : काम पडल्यास मला किल्ल्याच्या बाहेर येण्याजाण्याची परवानगी असावी. बादशहांनी मान्य केले नाही. जरूर पडल्यास किल्लेदाराचा नायब जियाउद्दीनखान हा बाहेर येणेजाणे ठेवू शकेल. किल्लेदाराने बाहेर जाण्याची जरूर नाही अशी त्यांनी आज्ञा केली.

मराठ्यांनी होरसी(?)चा किल्ला घेतला होता. गाजिउद्दीनखान बहादुर याने वेढा घालून तो परत जिंकून घेतला असे वृत्त यारअलीबेग याने बादशहांना कळविले.

**२ सप्टेंबर १६९४**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : रामा (राजाराम) याचा सरदार लखमाजी हा दोन हजार स्वारांनिशी भीमा उतरून अलीकडे आला आहे.

**३ सप्टेंबर १६९४**

महाजी(?)ला एक तलवार बक्षीस देण्यात येऊन त्याला हिंमतखान बहादुर याच्या

फौजेत तैनात म्हणून जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

यारअलीबेग याने जाखबारसिंग याचा मुलगा नेकनाम याला बादशहासमोर आणले. नेकनामने इस्लामधर्म स्वीकारला. हिंमतखान बहादुर याने अर्ज केला की : इस्माइलखान मका, हमीदुद्दीनखान व सरमद सराले(?) यांना माझ्यापाशी तैनात करावे. बादशहांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनखान येतच आहे. सरमद(?) हा लष्करखानाच्या फौजेत आहे आणि इस्माईलखान हा अद्याप जिंजीहून आला नाही.

बादशहांनी शहाजादा मुहंमद आज्जम याला म्हटले, उदयपूरचे जमीनदार(उदयपूरचा महाराणा) यांना लिहा की : तुमचे एक हजार स्वार दक्षिणच्या सुभ्यात कामगिरी करीत आहेत. त्यांना हुजुरात पाठवा. राण्याच्या वकिलाने स्वतः राण्याकडे जाऊन ही व्यवस्था करावी.

आज्ञा झाली की : शाहू भोसला(तंजावरकर) याच्याकडे एक बंदूक व एक हत्ती ही पाठविण्यात यावी. ही आज्ञा जुल्फिकारखानाच्या विनंतीवरून झाली.

### ४ सप्टेंबर १६९४

बादशहांनी आज्ञा केली की : उत्तर हिंदुस्थानातून खजिना येत आहे. बीड वरून तो हुजुरात आणावा. सोलापूर रस्त्याचा माजी राहदार(रक्षक) मतलबखान याने खजिन्याबरोबर हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

आज्ञा झाली की : छावणीतील नायब कोतवाल ख्वाजा मुहंमद सादिक याने तमाम लष्करात पुढीलप्रमाणे दवंडी द्यावी. उद्या गुरुवारी हिंदु व मुसलमान यांनी प्रार्थनागृहात जमावे व प्लेगची साथ नाहीशी व्हावी म्हणून प्रार्थना करावी.

### ५ सप्टेंबर १६९४

सागरगडचा किल्लेदार जगतसिंग याची मन्सब कमी करण्यात येऊन त्याला हुजुरात बोलावण्यात आले. मंगळवेढयाच्या बातमीवरून कळले की : गोविंदराव नावाचा एक बंडखोर(मुफसिद, उपद्रवी) हा भीमेच्या काठावर एक गढी बांधीत आहे. तेथील फौजदाराला यासंबंधी ताकीद देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेतील बातमीदाराने (सवानेहनिगार) पुढीलप्रमाणे लिहून पाठविले. लष्करातील खानजमान फतेहजंग याने मला बोलावू पाठवून म्हटले की : तू आपल्या बातमीत पुढील मजकूर लिही :– अब्दुलकादर हा माझ्या बरोबर(फतेहजंगबरोबर) आहे. हा मनुष्य कामाचा आहे त्याची आर्थिक स्थिती बरोबर नाही. त्याला खान ही पदवी व योग्य जहागीर मिळेल अशी आशा बाळगन आहे.
आज्ञा झाली की : खान ही पदवी देण्यात यावी. इतर बाबतीत त्याने उमेदवार राहावे. त्याची जहागीर त्याला देण्यात यावी.

### ७ सप्टेंबर १६९४

मुहंमदखान बेग यास हनमंतगड(?)ची किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बहरामंदखानाला बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली :- हैद्राबादचा सुभेदार जानबाजखान (जानसिपारखान) याला हुकुम पाठवा. त्याने आपला मुलगा रुस्तमदिलखान याच्या बरोबर पथक देऊन बेडरांचा मोड करण्यासाठी त्याला बीदर सुभ्यात पाठवावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : आज्ञेप्रमाणे हिंमतखान बहादुर हा मराठ्यांचा मोड करण्यासाठी अकलूजहून महस (म्हसवड?) कडे तातडीने कूच करीत आहे.

## ८ सप्टेंबर १६९४

कागलचा ठाणेदार पिराजी व कोल्हापूरचा ठाणेदार अन्वरखान हे बादशहांना भेटले. त्यांनी नव्वद मोहरा नजर म्हणून दिल्या.

हीरु हिंदू मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मुहंमद हसन सौदागर याने दावा लावला की : मुअज्जमखान याने तीन घोडे माझ्याकडून घेतले. दोन हजार रुपये किंमतीपैकी फक्त एक हजार दिले. बाकीचे देत नाही. आज्ञा झाली की : यारअलीबेग याने ती रक्कम द्यायला लावावी.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मराठ्यांनी औशानजीक (उस्मानाबाद जिल्हा मराठवाडा) मुरदापूर या गावावर धाड घालून गुरे पळविली.

## ९ सप्टेंबर १६९४

विजापूरचा देशमुख खवासखान याला हुजुरात घेऊन येण्याविषयी विजापूरचा कोतवाल मुहंमद अमीन कौल याला लिहिण्याविषयी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : हिंमतखान बहादुरच्या फौजेसाठी लागणाऱ्या दारुगोळा वगैरेसाठी आठ हजार अश्रफया वारूगड जवळील हिंमतखानाच्या छावणीत पोहोचवाव्या.

रमजान महिना विजापुरात घालवायचा असल्यामुळे बदशहांनी राहाण्याची जागा निवडण्यासाठी शिकारखान करावल यास आज्ञा केली.

सोलापूरचा माजी राहदार (मार्गरक्षक) मतलबखान आजारी असल्याचे कळले. बादशहांनी हकीम मुहंमद मसीह याला तीनशे रुपये देऊन मतलबखानाचा इलाज करण्यासाठी पाठविले.

## १० सप्टेंबर १६९४

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेल्या फतेहुल्लाखानाला हुजुरात येण्याविषयी लिहिण्याची आज्ञा झाली.

सोलापूरचा किल्लेदार मिहदीखान याला सोलापूरला परत जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

आज्ञा झाली की : फाजिलबेग याने मुहंमदखान याला खजिना व तोफखाना ही बरोबर घेऊन आतिशखानापाशी पोहोचवून परत यावे.

विजापूरच्या विहिरीत पाणी आहे की नाही हे पाहण्यासाठी ख्वाजा याकूत याला पाठविण्यात आले होते. त्याने येऊन सांगितले की : विजापुरात पाऊस खूप पडला. विहिरीत आणि बेगम हौदात पाणी भरपूर आहे.

व्यापाऱ्यांनी दावा केला की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या शिकारीच्या वेळी आमच्याकडून माल घेतला जातो पण पैसे दिले जात नाहीत. बादशहांनी हिशेब तपासून चुकता करण्याची आज्ञा केली.

### १२ सप्टेंबर १६९४

गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याने (मरसाना?)चा किल्ला जिंकला. सोन्याच्या किल्ल्या व पत्र घेऊन दोस्तबेग वगैरे मनसबदार हे त्याच्याकडून आले.

### १४ सप्टेंबर १६९४

सिद्दी सालमखानाची जहागीर इंदापूर तालुक्यात होती. त्याच्या गुमास्त्याने आसपासच्या करोडीच्या (देशमुख देशपांडे) संगनमताने भोवतालचा प्रदेश लुटला. खंडी (जमखंडी?)चा किल्लेदार कामिलखान याने त्याचा गुमास्ता आणि एक सहकारी ताजुल्ला याला पकडून हुजुरात पाठविले. त्यांना कैदेत ठेवावे अशी आज्ञा झाली.

### १८ सप्टेंबर १६९४

राजा भीमा याचा मुलगा सूरजमल व खानसिंग व अर्जुनसिंग यांना एक कोटी पन्नास लाख दाम (दाम म्हणजे एक पैसा) देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

तळकोकणचा माजी फौजदार सरबाजखान याच्या छावणीतील बातमीवरून पुढील हकीकत कळली : मराठ्यांचा सरदार श्यामराव हा बेळगावजवळ जांभोळी गावात ठाण मांडून बसला असून त्याने व्यापाऱ्यांच्या वाटा अडविल्या आहेत. तेथील फौजदाराला या बाबत लिहावे अशी आज्ञा झाली. मळखेडच्या बातम्यावरून कळले की : कहल(?)चा फौजदार दत्ताजी(?) याच्या भावकीचा किसनराव याने बेडरांबरोबर संगनमत करून दंगा माजविला आहे. यावर वकिलाकडून मुचलके घेण्याचा हुकुम झाला.

### २१ सप्टेंबर १६९४

नोकरदार(?)चा किल्लेदार इस्माईल बेग याला त्या भागाची फौजदारी देण्यात येऊन मन्सबीत वाढ करण्यात आली.

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याने लिहिले की : या प्रदेशात दंगेखोर फार आहेत. मी त्यांच्या विरुद्ध स्वारी करीन तेव्हा या प्रदेशातील फौजदारांनी सहकार्य करावे. त्याप्रमाणे फौजदारांना लिहिण्याची आज्ञा देण्यात आली.

आतिशखानाचा भाऊ मन्सूरखान हा गाजिउद्दीनच्या छावणीत होता. किल्ल्याच्या विजयासंबंधी त्याचा अर्ज बादशहाकडे आला.

तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याने लिहिले की : इखलासखान आणि पाचशे स्वार व पाचशे प्यादे माझ्याकडे तैनात करण्यात आले होते. ते अद्याप आले नाहीत. लवकर पाठविण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

माझा दिवाण म्हणून शम्सुद्दीन ऐवजी अब्दुलरहीमखानाचा जावई शहामुहंमद याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखान याने जिंजीजवळ शत्रूच्या रसदेच्या वाटा रोखून धरल्या आहेत. त्यामुळे शत्रू अडचणीत आहे.

**२३ सप्टेंबर १६९४**

रामसिंगाचा मुलगा पानसिंग हा मुसलमान झाला. त्याला खिलतीचा पोषाख देण्यात आला.

वऱ्हाडच्या गुप्त बातम्यावरून कळले की : तेथील सुभेदार अलीमर्दानखान याने ठिकठिकाणी ठाणेदार नेमले आहेत. ते रयतेवर जलुम करीत आहेत. रयत तक्रार करीत आहे. पण अलीमर्दानखान तिकडे लक्ष देत नाही. यावर बादशहाने आज्ञा केली की : बहरामंदखानाने चौकशी करून वस्तुस्थिती काय आहे याचे वृत्त सादर करावे.

लोहगडच्या बातम्यावरून कळले की : धनाजी जाधवाचा नोकर शिवा वडकल(?) हा चाकणचा माजी किल्लेदार मुबारिजुद्दीन याजपाशी गेला आणि त्याने बादशाही नोकरी पत्करण्याची तयारी दाखविली. बादशहाने आज्ञा केली की : तिकडील फौजदाराने चौकशी करून खरे काय ते कळवावे.

गजिउद्दीनखान बहादुर(फीरोजजंग) याने किल्ले त्र्यंबक जिंकला. याबद्दल त्याच्या पुढील सहकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली. सय्यद नियाजखान, खानसाजखान, राजा इंद्रसिंग, अजबसिंग, शेवटच्या तिघांना मन्सबीत वाढ देण्यात आली.

* * *

# सात

## ४ ऑक्टोबर १६९४ ते २५ डिसेंबर १६९४

### ४ ऑक्टोबर १६९४

अब्दुल अजीजचा मुलगा मुहंमद हाशम याला गोकाक उर्फ रहीमगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. त्याला किल्ल्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

श्रीपतराव कोळी (जव्हार?) ठाणेदार रेनी (भिवंडी?) याला हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. तो तीन हजारी जात व दोन हजार स्वार असा मन्सबदार होता.

मुहंमद मुहसिनचा मुलगा मुहंमद अहसन हा सावद्याचा ठाणेदार होता. त्याला वेड लागले. त्याला दोनशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती. त्याला बडतर्फ करण्यात आले. त्याच्या जागी ख्वाजा अबुल्हसन याला नेमण्यात आले. त्याला दोनशे आठ स्वारांची मन्सब होती. तीत अडुसष्ट स्वारांची भर घालण्यात आली.

सोलापूरचा राहदार (मार्गरक्षक) मतलबखान याला हुजुरात बोलावण्यात आले होते. तो आला असे कळले. छावणीत येण्यासाठी त्याला दस्तक (परवाना) देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

### ५ ऑक्टोबर १६९४

अब्दुलमजीदखान याच्या जागी अलीकुली याला माहुलीचा किल्लेदार व परिसराचा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

### १६ ऑक्टोबर १६९४

मरहूम अमीरुलउमरा शायिस्ताखान याचा मुलगा एतिकादखान हा आपला भाऊ व मुलगा यासहित अकबराबादेहून (आग्रा) खजिना घेऊन आला. तो बादशहाला भेटला. लुत्फुल्लाखान हा खजिना आणण्यास गेला होता. तोहि खजिन्याबरोबर आला. त्याच्याबरोबर गुरशास्प, सय्यद दौलत, सय्यद यादगार हुसेनखान, अली इत्यादि मंडळी होती.

बादशहांना कळविण्यात आले की : उत्तर भारतातून सहासष्ट लाख रुपयांचा खजिना आला आहे. तो सरकारी खजिन्यात दाखल करावा अशी आज्ञा झाली.

बादशहाला विनंती करण्यात आली की : मरहूम अमीरुलउमराच्या मालमत्तेतील दहा हत्ती एतिकादखानाने आणले असून त्यापैकी आठ हत्तीवर जडजवाहीर लादलेले आहे. ते छावणीत आणून त्यावर देखरेख ठेवावी व फाजलखानाने आपल्याला ती दाखवावी असा हुकुम देण्यात आला.

### २२ ऑक्टोबर १६९४

अजमीरच्या बातम्यावरून कळल ते असे : मालपूरच्या मुहंमद जमील काजीने लिहिले की, अखीराम या सावकाराने कामी (?) नावाच्या दरवेशाला चोरीचा आळ घेऊन मारहाण केली व मालपूरमध्ये दंगेधोपे केले. त्यामुळे बांग, नमाज व जुम्म्याची (शुक्रवारची) नमाज हे बंद झाले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : मथुरेचा फौजदार राजा बिशनसिंग याला व अजमीरचा सुभेदार मुहमदखान याला ताकीदपत्रे लिहावीत.

बुऱ्हाणपूरचा कोतवाल मुहंमद रहीम याला काढून टाकण्यात आले. त्याची मन्सब कमी करण्यात आली.

### २ नोव्हेंबर १६९४

इस्माईलखान मका याचा मुलगा परवरिशखान हा जुल्फिकारखानाच्या तैनातीत (जिंजीकडे) होता. तो येऊन बादशहाला भेटला.

दासे ऐवज (?)ला तळकोकणच्या किल्ल्यांचा दारोगा व निरीक्षक म्हणून नेमण्यात आले. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : गनिमांनी (मराठ्यांनी) सोनवार ठाण्यातून (?) माणसे व गुरेढोरे नेली. ते भूपाळ गढीकडे गेले. तो (ठाणेदार) ही बातमी कळताच त्यांच्या पाठलागावर गेला. गनिमांशी चकमकी झाल्या. उभय पक्षाचे अनेक लोक ठार झाले. यानंतर गनीम पराजय पावून पळून गेले. माणसे व गुरेढोरे सोडवून मालकांच्या व फौजदारांच्या हवाली केली.

बहादुरनगर उर्फ किल्ले नरगुंद याची किल्लेदारी व परिसराची फौजदारी वलीदादखान याजकडे पूर्वीप्रमाणे ठेवण्यात आली. महामद (?) खानाला शहाजादा बेदारबख्त याच्या फोजेत तैनात करण्यात आले.

### ३ नोव्हेंबर १६९४

राजा अवधूतसिंग बुंदेला (ओर्छा) हा शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात

होता. त्याला मुलगा झाला. या निमित्त त्याने शंभर अश्रफ्या व एक हजार रुपये नजर पाठविली. बादशहाने मुलाचे नांव उदयसिंग असे ठेवले.

बादशहांनी जुल्फिकारखानाकडे पाठविण्यासाठी चार करंड्या डाळिंबे जुम्लतुल्मुल्काकडे (असदखान, जुल्फिकारखानाचा बाप) पाठविली.

अष्टीचा देशमुख आणि सिधोजीचा मुलगा भूपत हा बादशहांना भेटला. बादशहांनी त्याला दोन हजार जात, एक हजार स्वार अशी मन्सब, खिलतीची वस्त्रे, घोडा व हत्ती ही दिली. भूपतचा भाऊ गोविंद(?) यास खिलतीची वस्त्रे, घोडा असे बक्षीस मिळाले. याशिवाय त्याला पाच हजार रुपये देण्यात आले. त्याच्या भावकीचा कान्होजी यास खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

कोकटनूरचा(?) देशपांडे नरसिंग हा नोकरीच्या आशेने येऊन भेटला. त्याने पाच मोहर नजर म्हणून दिल्या. त्याला खिलतीची वस्त्रे, सातशे जात, दोनशे स्वार अशी मन्सब ही देण्यात आली.

मरहूम अब्दुल्लतीफ याचा मुलगा बहाउद्दीन याला यादवाडची फौजदारी देण्यात आली.

लष्करखान हा गुलबर्ग्याच्या परिसरात होता. त्याने लिहिले, 'आपल्या आज्ञेप्रमाणे बेडरांचा मोड करून मी नदी(भीमा) ओलांडली असून आलमेल व अफजलपूरच्या दरम्यान तळ दिला आहे.'

### ४ नोव्हेंबर १६९४

बादशहास कळले ते असे : बादशहाजादा आज्जमशहा याचे दोन अधिकारी सय्यद आलम व अमानुल्ला बेग हे सलाबतबारीतून(छावणीचा भाग) बाहेर पडले. तेथे त्यांची आपापसात बाचाबाची झाली. अमानुल्ला बेगने सय्यद आलमला कट्यारीने जखमी केले. शहाजादा आज्जम याची माणसे दोन्हीकडे जमली असून चकमक करण्याच्या तयारीत आहेत. बादशहा म्हणाले, 'कोतवालच्या अधिकाऱ्यांनी जाऊन भांडण मिटवावे.' यानंतर बादशहांनी मुख्तारखान मीर आतिश(दारुगोळ्याचा मुख्य अधिकारी), मुहंमद मतलबखान याच्या तोफखान्याची माणसे आणि बहरामंदखान बक्षी याची माणसे यांना भांडण मिटविण्यासाठी पाठविले.

बादशहांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याची आठवण काढली. त्यांना कळविण्यात आले की : बहरामंदखान हा पेशखान्यात असून त्याचे डोके दुखत आहे. यामुळे तो येऊ शकत नाही.

गाजिउद्दीनखान याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला : माझा मुलगा चीनकुलीजखानबहादुर(हाच निजाम राज्याचा संस्थापक निजामुल्मुल्क) याला शिवनेरीचा किल्ला पाहण्याची इच्छा आहे. तसेच तो आज्जमगड (पुरंदर) च्या पायथ्याशी पोहोचला तर तो किल्लाहि बघू इच्छितो. परवानगी द्यावी. बादशहाने ते मान्य केले. दोन्ही किल्लेदारांना हुकुम देण्यात आला की : त्यांनी एकदा चिनकुलीजखानाला किल्ल्याचा आतील भाग दाखवावा.

जुल्फिकारखानाच्या पुढील सहकाऱ्यांना खिलतीची वस्त्रे पाठविण्याचा हुकुम देण्यात आला :- स्वत: जुल्फिकारखान, दाऊदखान(पन्नी), जमशीदखान विजापुरी, कान्होजी (शिर्के).

दरगाहकुलीखान याचा मुलगा व सीरागड (मध्य कर्नाटक)चा किल्लेदार अल्लाहकुली याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली :- एक गुर्जबर्दार(दंडधारी अधिकारी) नेमा. त्याने जाऊन वऱ्हाड सुभ्यात व जवळपास असलेले फौजदार(जिल्हाधिकारी) यांना घेऊन वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याजकडे पोहोचवून परत यावे.

## ५ नोव्हेंबर १६९४

मिर्जा अली हा गोकाकच्या फौजदारीवर रवाना झाला. हाजी मुहंमदचा मुलगा- मिहदीकुली हा सगर(गलबर्गा जिल्हा)च्या अमिनीवर रवाना झाला.

बादशहाने आज्ञा केली की : एक दंडधारी(गुर्जबर्दार) नेमण्यात यावा. त्याने जाऊन गुलबर्ग्याच्या कुतबूद्दीन पीरजाद्याला(सुप्रसिद्ध साधू बंदेनवाज याचा वंशज)हुजुरात घेऊन यावे. गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार याने गुर्जबर्दाराबरोबर बदर्का(संरक्षक पथक) द्यावा.

तळकोकणचा फौजदार व इखलासखान याजपाशी तैनात असलेला व फतेहजंगचा मुलगा ताज हा आर्थिक दुर्दशेत असल्याचे कळले. बादशहांनी त्याला पाचशे रुपये खर्चासाठी मदत म्हणून दिले. ताज याला चारशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती.

कासिमखानाच्या फौजेत इस्माईलचा मुलगा मुहंमद यूसुफ हा तैनात होता. त्याला दोनशे जात व वीस स्वार अशी मन्सब होती. कासिमखानाच्या लिहिण्यावरून त्याच्या मन्सबीत वीस स्वारांची वाढ करण्यात आली.

देवगडचा राजा बख्तबलंद हा छावणीतील कोतवालीत नजरकैदेत होता. त्याच्याकडून भक्कम जामीन घ्यावा आणि त्याच्यावर बहरामंदखान याने देखरेख ठेवावी अशी आज्ञा झाली. बख्तबलंदला दोन रुपये रोज द्यावे असा हुकुम झाला.

परलोकवासी राजा मनोहरदास गौड याचा मुलगा व पट्टा किल्ल्याचा किल्लेदार लछीराम याने विनंती केली की : सावकार लोक कर्जफेडीबद्दल माझ्या वकिलाला त्रास देत आहेत. त्यांना मना करण्यासंबंधी नायब कोतवाल याला सांगण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

## ६ नोव्हेंबर १६९४

सुपे व पाटस येथील ठाणेदारीवर उग्रसेनचा मुलगा माधोराम होता. त्याच्या जागी देवीसिंग पहाडसिंग गौड याची नेमणूक करण्यात आली. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन त्याला निशाण देण्यात आला.

उग्रसेनचा मुलगा माधोराम याला खानचंदच्या ऐवजी लोहगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

आज्जमगड पुरंदरच्या बातम्यावरून कळले की : पुरंदरचा किल्लेदार सय्यद जानबाजखान हजारी जात व तीनशे स्वारांचा मन्सबदार हा मरण पावला. किल्लेदारीवर खानचंद बुंदेला याची नेमणूक करण्यात यावी आणि त्याला काय मन्सब आहे हे कळविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

आतिशखानाला आज्ञा झाली की : तयार रहा. तुम्हाला आज्जमगड (पुरंदर) कडे पाठविण्यात येत आहे.

## ९ नोव्हेंबर १६९४

गाजिउद्दीनच्या फौजेच्या बातम्यावरून कळले की : पुरंदरचा किल्लेदार सय्यद जानबाजखान हा मरण पावला. किल्ल्याच्या सुरक्षिततेसाठी गाजिउद्दीनने आपल्या सैन्याची एक तुकडी किल्ल्याकडे पाठविली आहे.

हमीदुद्दीनखान याच्या लिहिण्यावरून कळले की : त्याच्या तैनातीतील सैनिक हे उपासमारीमुळे आरडाओरडा करीत आहेत. शहरेवर महिन्याचा पगार त्यांना देण्यात यावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

## १० नोव्हेंबर १६९४

इस्माईलखान मका याचा दुसरा मुलगा मुहंमद असद हा येऊन बादशहास भेटला.

न्यायमूर्ति (सदर) चा हुजुर शिरस्तेदार (पेशदस्त) शेख मुहंमद अन्वर याला मक्केला जाऊन भेटी देण्याविषयीच्या कामावर नेमणूक करण्यात आली. त्याला निरोप त्याला देण्यात आला.

इस्माईलखानाचा मुलगा परवरिशखान याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

खानचंद (बुंदेला) याला पुरंदरची किल्लेदारी सांगण्यात आली. तीनशे जात व दोनशे पन्नास स्वार अशी मन्सब होती. तीत दोनशे जात व चारशे स्वार अशी वाढ करण्यात आली.

हाजी अब्दुल्लाचा मुलगा मुहंमद ऐवज याला तळकोकणचा तोफखान्याच्या दारोगा म्हणून नेमण्यात आले. त्याला अडीचशे जात व एकशे आठ स्वार अशी मन्सब होती. तीत पन्नास जात व वीस स्वार अशी वाढ करण्यात आली.

मियानाखान याजकडे बहादुरनगर नरगुंद याची किल्लेदारी होती. ती काढून घेऊन त्याची मन्सब कमी करण्यात आली.

सय्यद जानबाजखान याचा पुतण्या सय्यद फैजबक्ष हा आपल्या काकाच्या सुतकात बसला आहे असे कळले. बादशहांनी सांगितले की : त्याचे सुतक दूर करून त्याला आणण्यासाठी सय्यद जमातीचा (मुसलमानांत सय्यद हा श्रेष्ठ समजला जातो) च इसम पाठवावा.

सावळगावावर(?) अब्दुस्सलाम हा ठाणेदार होता. त्याला बेदारबख्तापाशी तैनात करण्यात आले.

## ११ नोव्हेंबर १६९४

शहाजादा मुइजुद्दीन (हाच पुढे जहांदारशहा या नावाने गादीवर आला) हा

शिकारीसाठी मुहमदापुरला गेला होता. त्याने दोन चिकारे (हरीण) मारून आणले. बादशहांनी एक चिकारा मुहंमद आज्जमशहाला व दुसरा मुहंमद मुअज्जम याला दिला.

परंड्याचा किल्लेदार इज्जतखान हा होता. त्याचा आतेभाऊ मुहंमद दाराब याने मराठे गनीम यांचा एक नोकर महिंदा(महादजी) याला बादशहाकडे(नोकरी देवविण्याचे आश्वासन देऊन) आणला होता. महादजीला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मुहंमद हुसेनचा मुलगा आकिबत महमुद याला फतेहाबाद धारूरची वाकनिसी देण्यात आली. त्याला एक शाल देण्यात आली.

सय्यद नूरुल्ला हा शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात होता. त्याला वलीदादच्या ऐवजी बहादुरनगर, नरगुंदची किल्लेदारी सांगण्यात येऊन मन्सब वाढविण्यात आली. वलीदादची मन्सब कमी करण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याचा बक्षी व वाकनीस मोतिकदखान याला इनायतखानाच्या जागी होशंगाबादचा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

हरजीचा मुलगा प्रताप हा पाच हजारी(जात) व दोन हजार(स्वार) असा मन्सबदार होता. त्याला सांगण्यात आले, 'तुम्ही आतिशखानाकडे जा.' त्याची तैनाती गाजिउद्दीनच्या सैन्यात करण्यात आली.

अमीरुलउमरा(शायिस्ताखान) याचा मुलगा एतिकादखान हा खजिन्याबरोबर अकबराबादआग्र्यास आला असून लष्करापाशी पोहोचला आहे. त्याला लष्करात येण्याचा परवाना(दस्तक) देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

शहाजादा आज्जमशहाचा अधिकारी पीर सय्यद आलम याला मदत करण्यासाठी म्हणून जल्लू(बादशहाच्या जवळपास वावरणारे) सय्यदलाल वगैरे गेले होते. बादशहांनी सय्यदलाल व सय्यद अली असगर यांची मनसब कमी केली व सय्यद मुनीम वगैरे सत्तर माणसे यांना कामावरून कमी केले.

नसीराबाद उर्फ धारवाड याचा बदललेला किल्लेदार व मरहूम मुहंमद बेगखान याचा मुलगा इस्माईलबेग याला हुजुरात बोलावण्यात आले व त्याची मन्सब कमी करण्यात आली.

साल्हेर उर्फ सुल्तानगडचा किल्लेदार सूरतसिंग हा होता. त्याला पाचशे जात व चारशे स्वार अशी मन्सब होती. ती शंभर जात व दोनशे स्वार यांनी कमी करण्यात आली. सूरतसिंगाला गाजिउद्दीनखान बहादुराच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मुहंमद मुजफ्फरचा मुलगा मुहमद सईद याला चांदवडची बक्षीगिरी व वाकनिशी देण्यात येऊन त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**१२ नोव्हेंबर १६९४**

दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा आतिशखान याला दीड हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती. त्यात शंभर स्वारांची भर घालण्यात आली. त्याला खिलतीची वस्त्रे व घोडा ही देण्यात आली. त्याच्याबरोबर आठशे अठरा स्वारांची तुकडी देण्यात

आली. त्याला सांगण्यात आले की : तुम्ही आज्जमगड पुरंदरच्या किल्ल्यात खानचंद बुंदेला याची स्थापना करावी व गाजिउद्दीनखान बहादुर याच्या तुकडीबरोबर हुजुरात यावे. आतिशखानाचा दत्तक मुलगा मुहंमद जफर याची मन्सब वाढविण्यात आली.

मरहूम जानबाजखान याच्या वारसांना तनखे देण्याची आज्ञा झाली.

लष्करखान याचा मुलगा नस्रुल्लाखान हा विजापुराहून आला. त्याला भेटीस येण्याची परवानगी देण्यात आली बदीउज्जमानचा मुलगा मीर शुक्रुल्ला याला पट्टा (किल्ला) या किल्ल्याची वाकनिसी देण्यात आली.

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेला मुहंमद मुस्लिम हा जहागीर घेण्यासाठी छावणीत आला होता. त्याला आतिशखानापाशी तैनात करण्याचा हुकुम देण्यात आला. (तिरमल) जुन्नरचा किल्लेदार फखुद्दीनखान याला मरसल (?) ची किल्लेदारी देण्यात आली. त्याची मन्सब वाढविण्यात आली. मुर्तजाकुलीखान याला मरसल (तिरमल ?) च्या किल्ल्यावर नायब म्हणून नेमण्यात आले.

अष्टीचा देशमुख शिवमल(?) याच्या भावकीचे गोविंद वगैरे यांना मन्सबी देण्यात आल्या. त्यात मालोजीलाही मन्सब मिळाली.

**१३ नोव्हेंबर १६९४**

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याची अर्जी बादशहांनी नजरेखालून घातली.

बादशहाच्या आज्ञेने बहरामंदखान याने सय्यद लष्करखान व पवनारचा फौजदार हमीदुद्दीन महमूदखान यांना आज्ञापत्रे पाठविली.

सय्यद लोकांना बादशहांनी आपल्या निकटच्या नोकरीतून बडतर्फ केले. बादशहांनी आज्ञा केली की : मोगल व शेखजादे यातून जुन्या नोकरांची निवड करावी व त्यांना सय्यदांच्या जागी नेमावे.

हमीदुद्दीनखान याचा नायब व छावणीच्या भोवतालच्या पाहाऱ्याचा फौजदार पीर मुहंमद याला मन्सबीत वाढ देण्यात आली.

मरहूम सय्यद जानबाजखान याचा पुतण्या सय्यद फैजबक्ष याच्या दोनशेच्या मन्सबीत पन्नास जात व वीस स्वार यांनी वाढ करण्यात आली.

सय्यद जानबाजच्या भाऊबंदांपैकी सय्यद जाफर आदींना हुजुरात बोलावण्यात आले. गाजिउद्दीनखानाच्या लिहिण्यावरून रामाजीचा भाऊ लक्ष्मण याला मन्सब देण्यात आली.

सोनगडच्या किल्ल्यावर करमुल्ला याची नेमणूक करण्यात आली. तो येईपर्यंत मीर अबुल्फतहने पूर्वीप्रमाणेच किल्ला सांभाळावा अशी आज्ञा करण्यात आली.

गुलबर्ग्याच्या बातम्यावरून कळले की : लष्करखानाचा दिवाण प्राणनाथ हा रबिलावल महिन्याच्या सव्वीस तारखेस गुलबर्ग्याचा किल्लेदार समंदरखान याच्या कारभाऱ्याला रात्री भेटला. पिडनायक बेडर याचे वकीलही होते.

सफशिकनखानाचा भाऊ मुहंमद अस्करी याला शहाजादा बेदारबख्त याच्या

फौजेत बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

गुलबर्ग्याच्या बातम्यावरून कळले की : पिडनाइक बेडर याचे सरदार अहमद व शिवाजी हे सातशे स्वार व इतर पायदळ या सहित अलूर व सेकूरच्या ओढयातून पार झाले आहेत. त्यांचा रोख कुणीकडे आहे, कळले नाही. बहरामंदखानाने याचा वृत्तांत सादर करावा अशी आज्ञा झाली.

### १४ नोव्हेंबर १६९४

शाही तबेल्यातील घोडे आज मुख्तारखान याने बादशहाच्या नजरेखालून घातले.

जिंजीहून जुल्फिकारखान याने लिहून कळविले की : बहादुरखान रोहिला याचा मुलगा अजीजखान याने किल्ले पुरमंगलावरील हल्ल्यात चांगली कामगिरी बजावली. तो स्वतः किल्ल्यात घुसला. त्याला पाचशे जात व पाचशे स्वार अशी मन्सबीत बढती व्हावी. बादशहाने प्रथम दोनशे व नंतर त्यावर एकशे स्वार अशी बढती दिली.

चंद्रावचा मुलगा व्यंकटराव हा शहाबंदरचा ठाणेदार होता. मराठ्यांनी त्याला कैद केला. त्याला हजार जात व सातशे स्वार अशी मन्सब होती. ती कमी करण्यात आली.

खानजमान फतेहजंग याचा मुलगा मुनव्वरखान याला साडेतीन हजार जात व अडीच हजार स्वार अशी मन्सब होती. तो शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. त्याने अर्ज केला की : बादशाही कारभारी हत्तीच्यासंबंधी बाकी काढून त्रास देत आहेत इतराप्रमाणे मला माफी देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

### १६ नोव्हेंबर १६९४

शहाजहानाबाद(दिल्ली)चा सुभेदार आकिलखान व लाहोरचा सुभेदार मुकर्रमखान यांच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली. शहाजादा बेदारबख्त याला पत्र पाठविण्यात आले.

### १७ नोव्हेंबर १६९४

शहाजादा मुअज्जम याचा अधिकारी याह्याबेग याची हुल्लीहाळ(?)चा किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात येऊन त्याच्या मन्सबीत बढती करण्यात आली.

मुहंमद ताहिर हा सुरतेत तैनात होता. साल्हेरच्या किल्ल्यावर सूरतसिंग होता. सूरतसिंगाच्या ऐवजी मुहंमद ताहिर याला साल्हेरचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. सूरतसिंगाला गाजिउद्दीनखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

जुल्फिकारखान याने(जिंजीहून) लिहिले, 'फतेहुल्लाखान हा माझ्या फौजेत तैनात होता. त्याला हुजुरांनी सडे बोलाविले होते. पण फतेहुल्लाखान हा आज्ञा नसताना आपल्या भाऊबंदांना घेऊन हुजुरात रवाना झाला आहे.' फतेहुल्लाखानाला अडीच हजार स्वारांची मन्सब होती. त्याला बडतर्फ करण्यात आले.

लोहगडचा किल्लेदार माधोराम याला आकानेर(?)चा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

राहिरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान, तळकोकणचा फौजदार इखलासखान व बीडचा फौजदार मामूरखान यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

बादशहांना कळविण्यात आले की : शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेले गोवर्धन (दोनशे जात व तीस स्वार यांचा मन्सबदार) व सूरतसिंग (दीडशे जात व वीस वीस स्वार यांचा मन्सबदार) हे त्यांच्या छावणीत हजर नाहीत. त्यांची जहागीर बदलन्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

### १८ नोव्हेंबर १६९४

मरहूम सुल्तान अलीखान याचा मुलगा व फीरोजगड (यादगीर) चा माजी किल्लेदार मुहमद अब्बास व अतल परगण्याचा माजी फौजदार सय्यद यांनी बादशहाला नजरा पेश केल्या.

बीड परगण्याचा फौजदार व सोलापूरचा मार्गरक्षक मामूरखान याने गनिमांचा (मराठ्यांचा) मोड केला. त्याला फर्मान व एक तलवार बक्षीस म्हणून पाठविण्याची आज्ञा झाली.

यारअलीबेग याने बादशहाच्यातर्फे विजापूर कर्नाटकचा फौजदार कासिमखान व मुल्तानचा सुभेदार अल्लाहयारखान यांना आज्ञापत्रे पाठविली.

मरहूम आलम शीराजी याचा मुलगा नूरुद्दीन याला दामोनी (सुभे बऱ्हाणपूर) ची फौजदारी देण्यात आली.

सौदागरांनी आणलेले हत्ती बादशहांनी नजरेखालून घातले.

### १९ नोव्हेंबर १६९४

नसीराबाद उर्फ धारवाडचा किल्लेदार मुहंमद बेगखानाचा मुलगा इस्माईल बेग हा होता. त्याच्याऐवजी मरहूम महंमद मुराद याचा मुलगा सैफुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

तोरगलचा बदललेला ठाणेदार अब्दुल्लाबेग याला शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत पोहोचवून यावे अशी आज्ञा देण्यात आली.

आतिशखानाच्या फौजेत तैनात असलेल्या मुहंमद हजारा या इसमास एक घोडा व साठ सत्तर मोहरा द्याव्या अशी आज्ञा देण्यात आली.

विजापूरचा सुभेदार व किल्लेदार सय्यद लष्करखान हा होता. त्याचा मुलगा सय्यद नस्रुल्लाखान याने विनंती केली की : माझ्या तैनातीत शिबंदी देण्यात आली तर कालीकोटपासून मुर्तजाबाद मिरजेपर्यंत मी गनिमांना (मराठ्यांना) चौथ वसूल करू देणार नाही. बादशहांनी ती मान्य केली. नस्रुल्लाखानाबरोबर एक हजार स्वार व पाचशे पायदळ अशी शिबंदी देण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा झाली. बदर बेग याने संरक्षक पथक घेऊन हमीदुद्दीनखानाच्या फौजेत खजिना पोहोचवून यावा अशी आज्ञा झाली.

आज्ञा झाली की : बेडर जमातीचे लोक मुहंमदाबाद बीदरच्या परिसरात दंगेधोपे करीत आहेत. त्यांचा मोड करण्यासाठी उजबकबेग गुर्जदार (दंडधारी अधिकारी) याने सय्यद अब्दुल्लाखान याला (नांदेडहून) बीदरला पोहोचवून यावे.

रहीमदाद अफगाण विजापुरी याला बादशाही छावणीत कैद करून ठेवले होते. सय्यद लष्करखान याचा मुलगा नसुल्लाखान याने विनंती केली की : रहीमदाद हा कामाचा मनुष्य आहे. मी त्याला जामीन होतो. माझ्यापाशी त्याला तैनात करण्यात यावे. बादशहांनी विनंती मान्य केली.

## २० नोव्हेंबर १६९४

हीरा (स्थापत्य तंत्रज्ञ) चा नातू जवाहरचंद हा स्वतःच्या लग्नासाठी शहाजहानाबाद (दिल्ली) ला गेला होता. तो येऊन भेटला. त्याने पाच रुपये नजर व एक लाकडी वाहन (तख्तासारखे, तख्ते रवां) ही भेट दिली. त्याचा भाऊ खूबचंद याने एक चौखडा नजर म्हणून अर्पण केला.

सैफुल्लाच्या मन्सबीत वाढ करून नसीराबाद धारवाडची किल्लेदारी व फौजदारी या जागेवर जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

तातारबेग याला मणीहाल (?) च्या किल्लेदारीवर नेमण्यात येऊन त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

शहजादा आज्जम हा बादशहाच्या आज्ञेने मुलांसहित शिकारीला गेला. सफशिकनखान हा बरोबर होता. शहाजाद्याने एक हरिण व एक चिकारा (लहान हरिण) यांची शिकार केली.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला राजा अवधूतसिंग व तरकानी (?) चा किल्लेदार रामसिंग यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

बेदारबख्ताच्या फौजेत खजिना व लोखंडी गोळे पोहोचविण्यासाठी अब्दुल्लाबेग गुर्जदार (दंडधारी) याच्याबरोबर बहरामंदखानाचे पथक देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

कृष्णेच्या पलीकडील मसूर या ठाण्यावर अब्दुल्लाबेग हा ठाणेदार होता. त्याच्या जागी चारशे जात, पन्नास स्वार अशी मन्सब असलेला व मरहूम अब्दुल्लाखान याचा मुलगा शुजाअतुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

मरहूम फतेहजंगखान याचा मुलगा कादरदादखान याला ताळीकोटच्या फौजदारीवर व मरहूम लोदीखान याचा मुलगा वलीदाद याला देवदुर्गच्या किल्लेदारीवर पूर्वीप्रमाणे बहाल ठेवण्यात आले.

परलोकवासी पाम नाईक याचा मुलगा जोगय्या बेडर याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– बादशहांनी मला तीन हजार जात व दीड हजार स्वार अशी मन्सब दिली आहे पण फडावरील कारभारी जामीन मागत आहेत. याची माफी देण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली.

हैदराबादच्या बातम्यांवरून कळले ते असे, मुहंमदाबाद बीदरचा किल्लेदार व फौजदार सजावारखान याने कोहीरचा फौजदार मुजफ्फरखान याला पुढीलप्रमाणे लिहिले :– हलकट गनिमांची फौज भालकी परगण्यात घुसून चहूकडे पसरली आहे. तिच्या भितीने कमठाण्याचे लोक बीदर शहरात आले आहेत.

बादशहांनी आज्ञा केली की : बहरामंदखान याने सय्यद अब्दुल्लाखान याला गनिमांच्या सैन्याचा मोड करण्यास लिहावे.

## २१ नोव्हेंबर १६९४

शहाजादा बेदारबख्त यान रामदुर्गचा किल्ला जिंकून घेतला. काल रात्री शहाजाद्याचा वकील सुल्तान नजीर याने पाचशे अश्रफ्या नजर समोर ठेवली. बादशहांनी ती माफ केली. बेदारबख्ताने पाठविलेला वृत्तांत बादशहांनी स्वतः वाचला.

खिदमतगारखानाला बादशहांनी आज्ञा केली की : जुम्लतुल्मुल्क असदखान याची प्रकृती कशी आहे पाहून यावे. त्याने पाहून येऊन सांगितले की, प्रकृती चांगली आहे. काल मुल्तफतखान याने बादशहांना पुढीलप्रमाणे कळविले होते की : जुम्लतुल्मुल्क असदखान हे आजारी आहेत. परवानगी असेल तर त्यांच्या समाचारासाठी जाऊन येईन, असे खानजहान बहादुर म्हणतात. बादशहांनी परवानगी दिली.

पटण (पैठण) चा फौजदार मुहंमद बाकर याला बदलण्यात येऊन हुजुरात बोलवण्यात आले. त्याची मन्सब दोनशे स्वारांनी कमी करण्यात आली.

लोहगडचा किल्लेदार माधोराम याची दोनशे माणसे सरकारात होती. ती बदलण्यात आली.

देवदुर्गचा किल्लेदार मरहूम लोधीखान याचा मुलगा वलीदाद हा होता. त्याच्या जागी चित्रांगदचा मुलगा त्रिलोकसिंग याला पूर्वीप्रमाणे नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

सुल्तानगड साल्हेरचा बदललेला किल्लेदार सूरतसिंग गौड याची मन्सब शंभर जात व दोनशे स्वार अशी कमी करण्यात आली. नसीराबाद उर्फ धारवाडचा किल्लेदार इस्माईल बेग याचीही मन्सब कमी करण्यात आली.

## २२ नोव्हेंबर १६९४

रामदुर्गचा किल्ला जिंकून घेण्याबद्दल शहाजादा बेदारबख्त, भीमराव उर्फ अलूजी, शमशेरखान व तीरअंदाजखान यांना बक्षिसे देण्यात आली.

मुर्तजाबाद मिरजचा ठाणेदार इस्माईलखान मका याच्या बक्षीगिरीवर व वाकिनिसीवर रुस्तुमजंग याचा मुलगा दाऊद याची नेमणूक करण्यात आली.

रामदुर्ग उर्फ शमशेरगड याच्या किल्लेदारीवर मरहूम लोधीखान याचा मुलगा वलीदाद याची नेमणूक करण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली.

आजमनगर बेळगावचा किल्लेदार बसालतखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

शहाजादा मुहंमद मुअज्जम याचा अधिकारी मुहंमदखान हा बेदारबख्ताच्या फौजेत तोफा पोहोचवून आला व बादशहांना भेटला.

रामदुर्गला शमशेरगड म्हणावे अशी आज्ञा झाली. मुहंमद बाकी यसावल हा तळकोकणचा दिवाण मुहंमद रफी याच्यावर सजावली (हुकुमाची अंमलबजावणी तातडीने करवून

घेणे) म्हणून गेला होता. काम करून तो मुहंमद रफीचे विनंती पत्र घेऊन परत आला. पत्र बादशहासमोर ठेवण्यात आले.

## २३ नोव्हेंबर १६९४

फतेहुल्लाखान हा जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला हुजुरात बोलाविले होते. त्याची सगळी मन्सब काढून घेण्यात आली होती. आता त्याला एक हजार जात व दोनशे स्वार अशी मन्सब देण्यात आली.

## २५ नोव्हेंबर १६९४

सय्यद लष्करखानाच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : अमृतराव (खंडोजीचा मुलगा) याला हजार जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तो लष्करखानाची छावणी सोडून निघून गेला. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

## २६ नोव्हेंबर १६९४

बादशहांनी आज्ञा केली : बहरामंदखान (बक्षी) हा आपले आज्ञापत्र हिंमतखान बहादुराच्याकडे पाठवीत आहे. ते फाजलबेग याने स्वतः नेऊन द्यावे. बादशहाच्या आज्ञापत्रात लिहिले होते ते असे : संता (संताजी घोरपडे) हा हैदराबाद प्रांतात आहे. हिंमतखान बहादुराने त्याचा पाठलाग करून त्याला हैद्राबाद प्रांतातून बाहेर काढावे.

हैद्राबाद प्रांताचा सुभेदार रुस्तमदिलखान व पीडित जिल्ह्याचा फौजदार बिंद्राबन यांनी हिंमतखान बहादुर (बहादुरखान खानजहान याचा मुलगा) याला सहकार्य द्यावे अशा अर्थाची आज्ञापत्रे त्यांना पाठविण्याची आज्ञा झाली.

हिंमतखान बहादुर याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला :– आपल्या (बादशहाच्या) निकटचे (जल्लू, खास जवळ वावरणारे) अधिकारी आपण माझ्यापाशी तैनात केलेत. पण ते मला सोडून पुन्हा आपल्या (बादशहाच्या) छावणीत निघून गेले आहेत.

बादशहांनी आज्ञा केली की : मुद्दाम अधिकारी नेमून अशा निघून आलेल्या अधिकाऱ्यांना हिंमतखानाच्या छावणीत पोहोचवावे.

## २७ नोव्हेंबर १६९४

ख्वाजा उर्फ करोडामल याची नेमणूक शहाजादा कामबक्षच्या खवासचा दारोगा म्हणून करण्यात आली.

हिंमतखान बहादुर, सगर (गुलबर्गा जिल्हा) चा किल्लेदार व फौजदार अनूपसिंग व अधोनीचा फौजदार व किल्लेदार रादअंदाजखान यांना यारअलीखानाच्या शिक्क्याने आज्ञापत्रे डाक चौकीने रवाना झाली.

बीड परगण्याचा फौजदार व सोलापूरचा राहदार (मार्गरक्षक) मामूरखान याच्याकडे काफरांचा (मराठ्यांचा) पाठलाग करण्याचे काम देण्यात आले. बादशहाने आज्ञा केली की : सोलापूरच्या जवळपासच्या ठाणेदारांना व फौजदारांना मामूरखानाशी सहकार्य करण्याविषयी हुकुम देण्यात यावेत. त्याचप्रमाणे एक गुर्जबर्दार (दंडधारी) नेमून सदर फौजदार व ठाणेदार यांना मामूरखानाकडे पोहोचविण्यात यावे अशी आज्ञा देण्यात आली.

फाजलबेगने हिंमतखान बहादुर याजकडे सजावली(सक्तीने अंमलबजावणी करविणारा अधिकारी) म्हणून जावे असे ठरले होते. पण फाजलबेग आजारी पडला. त्यामुळे पाचशे जात व वीस स्वार अशी मन्सब असलेला मीर कुलीज याने सजावली म्हणून जावे अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखानाच्या फौजेत दमाजी तैनात होता. त्याला तीन हजार जात व पंधराशे स्वार अशी मन्सब होती. त्याला मुजफ्फरनगर(मळखेड) सरकार(जिल्हा) मध्ये मुकेल(मक्तल?) वगैरे चार परगणे जहागीर म्हणून होते. पूर्वीप्रमाणेच त्या परगण्यांची फौजदारी आपल्याकडे ठेवण्यात यावी अशी त्याने विनंती केली. विनंती मान्य करण्यात आली.

मुजफ्फरनगरचा(मळखेड) किल्लेदार व बेगलरखानाचा मुलगा मुहंमद बेग याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

गाजिउद्दीनखान बहादुर याचा वकील शहादतखान याने कळविले की : बहादुरखानाचा नातू व दिलेर हिंमतचा मुलगा मुहंमद याला स्वतःच्या लग्नासाठी रजा हवी आहे. बादशहांनी सहा महिन्याची रजा दिली.

### २८ नोव्हेंबर १६९४

शहाजादा बेदारबख्त याला देण्यात यावयाचे फर्मान व बक्षिसे ही फखरुद्दीनकुली गुर्जबर्दार(दंडधारी) याने नेऊन पोहोचवावी अशी आज्ञा झाली.

### २९ नोव्हेंबर १६९४

मरहूम दिलेरखान याचा मुलगा दिलदारखान, तोफखान्याचा दारोगा तीरअंदाजखान वगैरे हे शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होते. तीरअंदाजखान व हमीदखानाचा मुलगा जीवन यांना मन्सबीत वाढ देण्यात आली.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान याला बादशहांनी सांगितले, 'तुम्ही पुढील अर्थाचा हुकुम गाजिउद्दीनखान बहादुर यांजकडे पाठवा.'

'गाजिउद्दीनखान यांनी आज्जमगड पुरंदरच्या संरक्षणार्थ स्वतःचे दोनशे स्वार पाठवावे आणि त्यांच्या ऐवजी स्वतःपाशी नवीन दोनशे स्वार भरती करावे. प्रत्येक स्वाराला तीस रुपये नेमून देण्यात यावेत.'

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेतून पुढील बातमी कळली : हलकट गनिमांच्या(मराठ्यांच्या) ताब्यातील परसगड या किल्ल्याचा किल्लेदार याने किल्ला मोगलांच्या हवाली करण्यासंबंधी बोलणे लावले होते. या अवधीत परसगडचा किल्लेदार हा चाकरीच्या आशेने संजरखानाला येऊन भेटला.

### १ डिसेंबर १६९४

बिहार सुभ्याच्या वृत्तान्तावरून कळले की : तेथील सुभेदार व शायिस्ताखानाचा मुलगा बुजुर्गउमेदखान हा मरण पावला आहे. त्याचा मुलगा साबिरखान हा गाजीपूरला फौजदार होता. त्याला पत्र पाठविण्यात आले.

आजमनगर बेळगावचा किल्लेदार व फौजदार बसालतखान याची मन्सब वगैरे किती आहे याची माहिती मागविण्यात आली. बसालतखानाकडे संपगावची ठाणेदारी पण होती.

सय्यद यादगार हुसेनखान याचे पन्नास स्वार गढी संका येथील ठाणेदार मुहंमद अली याजपाशी तैनात होते. ते परत बोलावण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : उत्तर हिंदुस्थानातून अनेक लोकांचा एक तांडा (काफिला) बादशहाकडे येत होता. हा काफला भूम व चौसाळा (उस्मानाबाद व बीड या जिल्ह्यात) यांच्या दरम्यान आला. त्यावेळी गनीम (मराठे) चालून आले. त्यांनी काफला संपूर्णपणे लुटला.

## २ डिसेंबर १६९४

रुस्तमखान विजापुरी याचा मुलगा गालिबखान व सय्यद यादगार हुसेनखान यांनी बादशहाची भेट घेतली.

आजमनगर बेळगावचा किल्लेदार, फौजदार व संपगावचा ठाणेदार बसालतखान याला शहाबंदरची पण किल्लेदारी देण्यात आली. शहाबंदरच्या किल्लेदारीवर त्याचाच नायब म्हणून त्याचा भाऊ मुईनुद्दीन याला नेमण्यात आले.

मीर सालेहचा मुलगा मीर अब्दुल्करीम याला गजिउद्दीन बहादुरच्या फौजेत तैनात करण्यात आले.

गोलियारगड(?)चा किल्लेदार मुहंमद फाजल याचा अर्ज बादशहांनी नजरेखालून घातला.

तळबीडचा ठाणेदार व नाहरखानाचा मुलगा अब्दुल्ला याने पुढीलप्रमाणे कळविले :- हलकट गनिमांचा सरदार संता(संताजी घोरपडे) याने बापा लोकीकर (बाबुसाहेब पवार तर नव्हे?) या सरदाराला या जिल्ह्यात ठेवले होते. संताजी स्वतः जिंजीकडे रवाना झाला. बापा हा एक हजार स्वार घेऊन तळबीडच्या भागावर चालून आला होता. मी वेळीच त्याच्यावर हल्ला केला. त्याची दीडशे घोडी(?) व इतर शस्त्रे हाती लागली. गनीम पळून गेला.

बादशहांनी आज्ञा केली की : संताजी(?)चा पाठलाग करण्यात यावा. हिंमतखान बहादूर त्याच्या पाठलागावर आहे.

अब्दुल्ला याने लिहिले होते की : गनिमांचे कबिले या भागातील खेडयातून आहेत. मला त्यातील प्रत्येकाचे नाव माहीत आहे. एक चांगल्यापैकी सैन्य या भागात पाठविले तर गनिमांच्या कबिल्यांना पकडता येईल.

बादशहांनी बहरामंदखानाला सांगितले की : याबातीत गाजिउद्दीनखान बहादुर याला लिहावे.

काल बादशहांना कळविण्यात आले की : रामाजीचा भाऊ केरराव (केशवराव?) हा पाचशेचा मन्सबदार इस्लामगड उर्फ रायरी(रायगड) येथे तैनात होता. तो वारला.

बंकापूरचा दिवाण मुहंमद रजा याला तेथून बदलून शहाजादा बेदारबख्ताच्या फौजेच्या दिवाणीवर नेमण्यात आले.

### ३ डिसेंबर १६९४

लष्करखानाच्या फौजेतील बातम्यावरून पुढील गोष्ट कळली : नजरअलीबेग हा मन्सबदार येथील सैन्यात तैनात होता. त्याने सैन्याचा बक्षी मुहंमद सलाह याला शंभर रुपयांची लाच दिली आणि येथून निसटून तो बादशाही छावणीकडे रवाना झाला. नजर अलीची जहागीर काढून घ्यावी अशी बादशहाने आज्ञा केली. नजर अलीला एक हजार जात व चारशे स्वार अशी मन्सब होती.

खानजहान बहादुर बहादुरखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– तो काफर सरदार संता(संताजी घोरपडे)जिंजीला जाण्याच्या उद्देशाने हैद्राबाद प्रांतात घुसला होता. पण आता तो हैद्राबाद प्रांत सोडून विजापूरच्या भागात येत आहे. हिंमतखान बहादुर (बहादुरखानाचा मुलगा) याजपाशी संताजीचा मोड करण्याइतके सैन्य नाही. आपण गाजिउद्दीनखान याला सैन्य देऊन पाठवा. तो आणि हिंमतखान बहादुर हे एक होऊन संताजीचा पूर्ण मोड करतील.

बादशहांनी हे मान्य केले आणि संताजीचा मोड करण्यासाठी चीनकुलीजखानाला नेमावे अशा अर्थाची आज्ञापत्रे गाजिउद्दीनखानाकडे पाठविण्याचा हुकुम दिला. बुऱ्हाणपूरचा सुभेदार मरहमतखान आणि शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला अब्दुलरसूलखान याची विनंतीपत्रे बादशहांनी नजरेखालून घातली. मरहूम किलेदारखान याचा मुलगा बहरवर याच्या मन्सबीत(दीडशे जात व वीस स्वार)पन्नासांनी वाढ करण्यात आली.

### ४ डिसेंबर १६९४

नव्याने मुसलमान झालेला अब्दुलबारी याला दारोगागिरी देण्यात आली.

शाइस्ताखानाचा मुलगा अबुलमाली याला त्याचा भाऊ बुजुर्गउमेद याच्या मृत्यूबद्दल सांत्वन म्हणून बालाबंद हा अलंकार देण्यात आला.

नुस्रताबाद सगर(गुलबर्गा जिल्हा) येथील किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग याला जुम्लतुल्मुल्क असदखान याने बादशहाच्या हुकुमाने आज्ञापत्रे पाठविली.

आजमनगर बेळगावचा किल्लेदार, फौजदार व संपगावचा ठाणेदार बसालतखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :–

मी यापूर्वी संपगावचा देशमुख पिलगौडा देशमुख याच्या बंडखोरीविषयी कळविले होते. संपगांव घेतल्यावेळेपासून तेथील फौजदारांना त्याच्या बंडामुळे संपगावात ठाणे बसविणे शक्य झाले नाही. ठाणे बसत नाही तोपर्यंत देश ताब्यात येत नाही. मी माझा नायब मुहंमद याह्या याला लिहिले व माझ्या भावांना बरोबर सैन्य देऊन संपगावकडे पाठविले.

त्यांनी संपगावात ठाणे बसविले. पण पिलगौडा हा एक हजार स्वार व दोन हजार पायदळ घेऊन त्यांच्याशी लढत आहे. आपण आज्ञा कराल तर मी

आपल्या भावांना, बक्षीला, नायब व दिवाण यांना किल्ल्यात ठेऊन स्वतः किल्ल्याबाहेर पडेन आणि बंडखोरांचा समाचार घेईन.

बहारामंदखानाने वृत्तांत सादर करावा अशी बादशहाने आज्ञा केली.

मुख्तारखान मीर आतिश(दारूगोळयाचा मुख्य)व आख्ताबेगी याने विनंती केली होती की : माझी परिस्थिति खालावली आहे. मला बाहेर पाठवावे. त्याची बिहारच्या सुभेदारीवर नेमणूक करण्यात आली.

बीड परगण्याचा फौजदार व सोलपूरचा राहदार(मार्गरक्षक)मामूरखान याच्या बरोबर पाचशे स्वार देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात असलेला संजरखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मामूरखान याला फर्मान, खिलतीची वस्त्रे व घोडा, दीडशेची अधिक मन्सब ही पाठविण्याची आज्ञा झाली. त्याने आपण गनिमावर विजय मिळविला असे लिहिले होते.

## ५ डिसेंबर १६९४

गुलबर्ग्याच्या किल्लेदारीवरून समंदरखानाला बदलण्यात आले. त्याच्या जागी गंजीकोटचा किल्लेदार मुहंमद याह्या याची नेमणूक करण्यात आली. गंजीकोटवर याह्याचा भाऊ मुहंमद तकी याला नेमण्यात आले.

## ६ डिसेंबर १६९४

मुख्तारखान मीर आतिश(दारूगोळयाचा अधिकारी) याने अर्ज केला की : मगरमछ नावाची तोफ बेदारबख्ताच्या फौजेत होती. तिचे तोंड फाकले आहे. बादशहांनी ती मागवून घेऊन नजरेखालून घातली.

बहरामंदखानाला सांगण्यात आले की, 'तुम्ही सय्यद लष्करखानाला हुकुम द्यावा की बंजारी लोक हैदराबादेहून धान्य आणीत आहेत. त्यांना सुरक्षितपणे भीमा नदीपर्यंत पोहोचवावे.'

व्यंकटराव हा शहाबंदरचा ठाणेदार होता. आजमनगर बेळगावचा किल्लेदार व फौजदार बसालतखान याने बादशहांना कळविले होते की : हलकट गनिमांचे(मराठ्यांचे) सैन्य शहाबंदरवर चालून आले. त्यांनी वेंकटरावला कैद केले. यामुळे बादशहांनी वेंकटरावला शहाबंदरच्या ठाणेदारीवरून काढले व बसालतखानाची नेमणूक केली. पण गेली दोन महिने वेंकटराव हा मराठ्यांशी लढला. त्याने त्यांचा पराजय केला. बादशहांनी आज्ञा केली की : याचा तपशील हाती येईपर्यंत वेंकटरावाची जहागीर काढून घेण्यात येऊ नये. वेंकटरावला एक हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती.

आदिलखानी तळकोकणचा फौजदार इखलासखान व हिंमतखान बहादुर यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेल्या जमशीदखान विजापुरी याने विनंती

केली की : माझी आर्थिक स्थिति चांगली नाही. मला कर्नाटकातच तीन लाखाचा तनखा जहागीर देण्याचा हुकुम जुल्फिकारखानाला देण्यात यावा. माझ्या ईसा आदि मुलांना मन्सबी मिळाव्या. मुलांना हुजुरात पाठविण्याविषयी हुकुम देऊन बादशहांनी आज्ञा केली की : जहागिरीसंबंधी असदखान जुम्लतुल्मुल्क यांनी जुल्फिकारखानाला लिहावे.

### ७ डिसेंबर १६९४

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : तीस नोव्हेंबर(१६९४) रोजी हिंमतखान बहादुर याने संता(संताजी घोरपडे)शी बाणूर गावाजवळ(भूपाळगडजवळ, खानापूर तालुका, सांगली जिल्हा) लढाई केली. संताजीचे रखमाजी व इतर एक सरदार मारले गेले. मकहूर संताजी(ज्याच्यावर प्रकोप झाला आहे असा)चा पराजय झाला. आपली अनेक माणसे ठार व जखमी झाली आहेत.

### ८ डिसेंबर १६९४

गुत्तीचा किल्लेदार मीर मुहंमद तकी याची गंजीकोटचा किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

मुधोळचा फौजदार मीर मुहंमदशफी याची गुत्तीचा फौजदार व किल्लेदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

जगदेवराव हा नसीराबाद धारवाडजवळ सावनूर(?) येथे राहदार(मार्गरक्षक) होता. त्याला हुजुरात बोलावण्यात यावे. एकीकडून विजापूर पर्यंत व दुसरीकडून आपल्या दिलेल्या मार्गाचे रक्षण करण्याचे काम त्याला द्यावे अशी आज्ञा झाली.

संपगावचा ठाणेदार बसालतखान याचा नायब मुहंमद याह्या याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

### ९ डिसेंबर १६९४

आपल्या मुलाने संताजीवर विजय मिळविला म्हणून खानजहान बहादुर याने पन्नास अश्रफ्या नियाज म्हणून बादशहाला नजर दिल्या.

हमीदुद्दीन हा आपली तुकडी रायबाग हुक्केरीकडे ठेवून आला होता. ती परत बोलावून घ्यावी अशी आज्ञा झाली. सुरतेचा मुतसद्दी (कारभारी) एतिमादखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

यादवाडचा फौजदार व बहाउद्दीन याचा मुलगा जमालुद्दीन हा बादशहांना येऊन भेटला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : नेकनियतखानाचा मुलगा मदार हा मामूरखानाच्या फौजेत तैनात होता. इंडिजवळ त्याची गनिमांशी(मराठ्यांशी) चकमक झाली. तो दोन हजारी मन्सबदार होता. लढाईत मदार मारला गेला. गालिबखानाने त्याच्या बापाचे, नेकनियतखानाचे सांत्वन केले. बादशहांनी आज्ञा केली की : इंडीचा ठाणेदार यजदानबक्ष याला बदलण्यात येऊन त्याच्या जागी दुसऱ्याला नेमण्यात यावे.

हैद्राबादच्या बागांचा दारोगा ख्वाजा अंबर याने पपनस व पन्नास कलिंगडे पाठविली. ती बादशहांनी पाहिली.

## १० डिसेंबर १६९४

शहाजादा बेदारबख्त व त्याच्या फौजेत तैनात असलेले शमशेरखान, तीरअंदाजखान व (मुकर्‍रबखानाची मुले) मुनव्वरखान व इख्तिसासखान यांच्याकडे देण्यात आलेली बक्षिसे पोहोचवून गुर्जबर्दार(दंडधारी) परत आले.

तजीराम व इतर बंजारा नाईकांनी बादशहाची भेट घेतली. त्याला व कान्होजी रामचंद्र यांना बक्षिसे देण्यात आली.

अनूपसिंग राठोड व सुल्तानसिंग राठोड यांना जुल्फिकारखानाच्या तैनातीत पाठविण्यात आले.

नरगुंद बहादुरगडचा किल्लेदार सय्यद नूरुल्ला याला मुफख्खरखान ही पदवी देण्यात आली.

काल रात्री शहाजादा मुहंमद मुअज्जम यास बोलावून बादशहांनी त्याला क्षमा केली व पूर्वीचा सरंजाम बहाल केला.

रामदुर्गला भागदुर्ग(?) व परसगडला समरगड(शमशेरगड ?) ही नावे देण्यात आली.

## ११ डिसेंबर १६९४

बाणूरचा ठाणेदार जगदेवराव याची पत्रे आली ती बादशहांनी नजरे खालून घातली.

इस्माईलखान मकाचे भाऊबंद, काली, उमर, अबू मुहंमद, हाजी अहमद यांना मन्सबी देऊन त्यांना इस्माईलपाशी तैनात करण्यात आले. शहाजादा मुअज्जम याला चाळीस हजार स्वार अशी मन्सब बहाल करण्यात आली. बहादुरशहा ही पदवीही त्याला बहाल करण्यात आली.

आपल्या(बादशहाच्या) जल्लूतील(निकट, खास) मन्सबदार परत पाठवावे असे जुल्फिकारखानाला हुकुम पाठविण्याची आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : लष्करात हिंदु लोक पालख्यातून किंवा इराकी घोड्यावर बसून फिरतात. बादशहाने आज्ञा केली की : रजपूत, मराठे व दख्खनी हे पालख्यातून अगर इराकी घोड्यावरून फिरू शकतील. त्यांना सोडून इतर हिंदुस्थानी (उत्तर भारतीय) हिंदूनी पालख्यातून अगर इराकी घोड्यावरून फिरू नये.

## १२ डिसेंबर १६९४

मरहूम लोधीखानाचा मुलगा वलीदाद याला लछीराम गौड याच्या ऐवजी पट्टयाच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. वलीदाद हा भागदुर्ग (रामदुर्ग)चा किल्लेदार होता. त्याच्या जागी सय्यद मुस्तफा याला नेमण्यासाठी हैद्राबादेहून बोलावून घ्यावे अशी आज्ञा झाली.

संगमनेरचा फौजदार मुहंमद हादी याने डाळिंबाच्या चाळीस करंड्या पाठविल्या.

शहाजादा मुअज्जम याजबरोबर आग्र्याला जाण्यासाठी पाच हजार स्वार तयार करण्याची आज्ञा झाली. बरोबर जाण्यासाठी सरदार मुख्तारखान(बिहारचा सुभेदार), गालिबखान, लुत्फुल्लाखान, जानोजी, मानसिंग राठोड वगैरेंना नेमण्यात आले.

शहाजादा बेदारबख्त याने आज बादशहांची भेट घेतली. औंढा(नागनाथ) सरकार(जिल्हा) वाशीमचा बदललेला फौजदार व अमानतखानाचा मुलगा मुहंमद बाकर हा बादशहांना भेटला. दिवंगत नारोराघो याचा मुलगा मताजी हा हिंमतखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला दीड हजार जात, बाराशे स्वार अशी मन्सब होती. तीत दोनशे स्वारांची वाढ करण्यात आली.

सोनागड(खानदेश)च्या ठाणेदारीवर अबुल्फतहच्या ऐवजी सिकंदरचा मुलगा करमुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

गदगचा फौजदार शेरखान याला खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली.

मुख्तारखानाची नेमणूक बिहारच्या सुभेदारीवर झाली होती. ती बदलून त्याला आग्र्याच्या सुभ्यावर नेमण्यात आले. बिहारवर आग्र्याचा सुभेदार फिदाईखान याची नेमणूक करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : हिंमतखान बहादुर हा संताजीच्या पाठलागावर होता. संताजी हा नलदुर्ग(उस्मानाबाद जिल्हा)जवळ पोहचला. तेथे दोघांचे युद्ध झाले. शत्रूची अनेक माणसे मृत अगर जखमी झाली. आपलीही बरीच माणसे मारली गेली. संताजी पराजित होऊन महादेवाच्या डोंगरात निघून गेला.

### १३ डिसेंबर १६९४

आज्ञा झाली की : रजपूत व मराठे यांना सोडून कोणाहि हिंदूने पालखीतून इराकी व गजनी घोड्यावरून व हत्तीवरून फिरू नये व हत्यारे बरोबर बाळगू नयेत.

### १५ डिसेंबर १६९४

इंडीचा ठाणेदार हादीबेग याने कळविले की : बंडखोरांनी ठाण्याला वेढले आहे. मी लढा देत आहे. पण मला कुमक हवी आहे. बादशहांनी हा मजकूर बहरामंदखानाला कळवावा अशी आज्ञा केली.

### १६ डिसेंबर १६९४

हमीदुद्दीनखाच्या फौजेत तैनात असलेले हयातखान बेलसर(पिंपळनेर?)चा ठाणेदार व इतर इसम बादशहांना भेटले.

हिंमतखान बहादुर याने गनिमांवर(मराठ्यांवर) जय मिळविला. याबद्दल त्याला खिलतीची वस्त्रे व एक तल्वार पाठविण्याचे ठरले.

मनोहरदास गौड याचा नातू सूरतसिंग गौड याला चौडची किल्लेदारी देण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली. त्याला चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. ती शंभर स्वारांनी वाढविण्यात आली.

इंडीचा ठाणेदार यादगारबेग याने कळविले की : गनिमांचे सैन्य इकडे येऊन

आक्रमण करीत आहे. माझ्याबरोबर फार थोडे सैन्य आहे. मला लवकर कुमक पाठवावी बादशहांनी आज्ञा केली की : जानोजी हा हमीदुद्दीनच्या फौजेत तैनात आहे. त्याने इकडे येऊन ईडीच्या ठाण्याकडे रवाना व्हावे.

सुरतेचा किल्लेदार कदीमुल्खिदमतखान याचे पत्र बादशहाने नजरेखालून घातले.

## १७ डिसेंबर १६९४

मरहूम इहतिशामखान याचा काका शेखलाल याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– पन्हाळ्याच्या युद्धात मी इहतिशामखानाबरोबरच जखमी होऊन पडलो. माझी जहागीर जप्त करण्यात आली. कारभाऱ्यांनी मी फरारी झालो अशी नोंद केली. मी संधी साधून हुजुरात आलो आहे. माझ्याकडून सेवा घ्यावी. त्याला सातशे जात व तीनशे स्वार अशी मन्सब होती. ती बहाल करण्यात आली.

कळविण्यात आले की : शहाजादा मुइजुद्दीन याच्या अधिकाऱ्यांनी फजले अली (अब्दुलअजीम तनबक्षी) याच्याशी तक्रार केली आणि ते मारामारी करू लागले. कोतवालीच्या लोकांना आवरत नाहीत. बादशहांनी मुख्तारखान मीर आतिश व मतलबखान यांना आज्ञा केली की : तुम्ही तोफखान्याची माणसे घेऊन जा. त्यांना आवरा. त्यांनी ऐकले नाही तर त्यांचा मोड करा.

बादशहाची कचेरी संपल्यानंतर कळले की : शहाजादा मुइजुद्दीनच्या माणसाबरोबर चकमक झाली. सिद्दीमरजान हा साडेचारशेचा मन्सबदार मारला गेला व शहाजाद्याचा जमादार सय्यदलाल हा जखमी झाला.

## १९ डिसेंबर १६९४

विजापूर कर्नाटकचा फौजदार कासिमखान याच्या नावे बादशहाचे आज्ञापत्र रवाना झाले.

दुनीचंद हिंदू मुसलमान झाला. त्याला खिलत देण्यात आली.

## २१ डिसेंबर १६९४

आजमनगर बेळगावच्या टंकसाळचा दारोगा ख्वाजा मिर्जा अमीन हा मरण पावला.

खानजमान फतेहजंग बहादुर (मुकर्रबखान) याचा मुलगा अन्वरखान (मुनव्वरखान) हा कोल्हापूरजवळ होता. त्याने कळविले की : मी नंदीगाव (?) च्या गढीला वेढा घातला आहे. मला लवकर कुमक आली तर गढी ताब्यात आणीन. बादशहांनी आज्ञा केली की : मिरजेचा फौजदार इस्माईल मका याला मुनव्वरखानाच्या मदतीसाठी पाठवावे आणि त्यासाठी मुद्दाम एक अंमलबजावणीचा अधिकारी (यसावल) मिरजेला पाठवावा.

## २१ डिसेंबर १६९४

आदिलशाही तळकोकणचा बदललेला फौजदार सरवाजखान हा आपल्या भाऊबंदांबरोबर बादशहांना भेटला.

यक्काताजखान मीर तुजक (दरबारची शिस्त पाहणारा) अधिकारी याच्याबरोबर

तीन हजार चौतीस स्वार देऊन हलकट गनिमांशी (मराठ्यांशी) लढण्यासाठी अलमेल (विजापूर जिल्हा) कडे पाठविण्यात आले. पाचशे पायदळ शिपाई, दहा मण शिसे, पाच मण दारू, दहा शुतरनाळ व शंभर बाण वगैरे बरोबर देण्यात आले. बरोबरच्या मन्सबदारांच्या सैनिकांचा थकलेला पगार देण्यात आला.

**२३ डिसेंबर १६९४**

पूर्वी दिलेले गंजीकोट, गुत्ती, गुलबर्गा इत्यादींच्या किल्लेदारीसंबंधीचे हुकुम रद्द करण्यात आले.

**२४ डिसेंबर १६९४**

हिंमतखान बहादुरच्या फौजेत तैनात असलेला हादी कुली अद्याप तेथे पोहोचला नाही असे कळले. आज्ञा झाली की : तो एक महिन्यात रुजू झाला नाही तर त्याला फरारी समजण्यात यावे.

मिरजेचा फौजदार इस्माइलखान मका याने विनंती केली की : जिंजीच्या मोहिमेत मी नियमाहून अधिक पथक बाळगले होते. खर्च फार झाला. आता मला अन्वरखान (मुनव्वरखान) याच्या कुमकेला जाण्यासाठी सांगण्यात येत आहे.

**२५ डिसेंबर १६९४**

गजेंद्रगडचा किल्लेदार सय्यद फन्रुक हा काही विनंत्या घेऊन आला होता. त्याला छावणीत येण्याची परवानगी देण्यात येऊन मुखलिसखान याजकडे रुजू होण्यास सांगण्यात आले.

* * *

# पुरवणी

आठ मे १६९४ चा आग्रा सुभ्याच्या काजीचा अहवाल उद्‌बोधक वाटेल म्हणून येथे दिला आहे:– शरीयत पन्हा काजी वली मुहंमद निदर्शनास आणतो की, परमेश्वर कृपेने व बादशहाच्या भाग्याने जिझिया वसुलीचे काम उत्तम रीतीने पार पडले. सरकारी कर्मचारी, पेशकार, दिवाण वाकेनवीस, मुतसद्दी व मरहूम अमीरुलउमरा शायिस्ताखान याचे कारभारी, दीनानाथ, बक्षीचे हुजुर शिरस्तेदार पेशदस्त, खानचंद (अमीन कचेरी) व एतिकादखान दिवाण दयाराम इत्यादी मंडळी चबुतऱ्यावर (काजीच्या कचेरीच्या पुढचा ओटा) आली आणि त्यांनी स्वतः जिझिया भरला. मरहूम अमीरुलउमरा याचा दिवाण मुरलीधर याने सांगून पाठविले की : जिझिया देणे हे माझे पुण्यकर्म समजतो. आपण म्हणाल

तर मी अनवाणी चबुतऱ्यापर्यंत येऊन जिझिया देईन. पण मरहूम अमीरुलउमरा यांच्या मालमत्तेचे रक्षण करणे आवश्यक आहे. यासाठी मी वाडा सोडून येऊ शकत नाही. माझे येणे होणार नाही. आपले अधिकारी आले म्हणजे मी त्यांना नियमाप्रमाणे जिझिया देईन. मी त्याला पुन्हा सांगून पाठविले की, हे काम इतर कामापेक्षा महत्त्वाचे आहे. त्याचे महत्त्व ओळखून इकडे येऊन नियमाप्रमाणे जिझिया द्यावा. मशारनिल्हे यांनी जिझिया देणे कबूल केले पण येथे येऊन जिझिया देण्यास असमर्थता दाखविली. जिझिया वसुलीचे नियम हुजुरातून आले आहेत. त्यांत म्हटले आहे की, झिम्मी याने चबुतऱ्यावर यावे. अमीनासमोर उभे रहावे व आपल्या हाताने जिझिया द्यावा. इतर मार्गाने जिझिया घेणे अयोग्य आहे. आता यावर काय ते ठरवा. सुभेदार म्हणाले की : शरा (धर्म-शास्त्र) चे नियम तुम्हाला जास्त चांगले माहीत आहेत. धर्मशास्त्रात जसे आहे तसा अंमल झाला पाहिजे. यानंतर रायमजकूर हे सडे चबुतऱ्यावर आले आणि नियमाप्रमाणे अंमलबजावणी झाली.

* * *

# आठ

## २ जानेवारी १६९५ ते १९ डिसेंबर १६९५

### २ जानेवारी १६९५

नीमा देवडा सलाबतपूर, चांदा येथील ठाणेदारीवर पहपार(?) याची मुहंमद रहीमच्या जागी नेमणूक करण्यात आली. पहपार हा गाजिउद्दीनच्या फौजेत तैनात होता.

### ३ जानेवारी १६९५

वऱ्हाडचा दिवाण अबुल्हसन याला दिवाणगिरीवरून बदलण्यात आले.

कळविण्यात आले की : वंजाऱ्यांचा तांडा महमदापूरच्या बागेत उतरला असून त्याने तेथील रक्षकांशी मारामारी केली. आज्ञा झाली की : एक गुर्जदार, दहा बंदुकची व दोन बाणदार यांनी जाऊन त्यांना बागेतून काढून लावावे.

परंड्याचा किल्लेदार व फौजदार इज्जतखान याचा नायब मुहंमद दाराब याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

हादी कुली हा हिंमतखान बहादुरच्या फौजेत तैनात होता. त्याची महिपतगड(?) च्या किल्लेदारीवर पूर्वीचा किल्लेदार सय्यद शुजाअत याच्या जागी नेमणूक करण्यात आली.

सुपे व पाटस येथील ठाणेदार देवीसिंग याची नेमणूक गजेंद्रगडच्या किल्लेदारीवर करण्यात आली.

मुहंमद अब्बास याची नेमणूक बहादुरगड उर्फ पेडगावच्या किल्लेदारीवर करण्यात आली.

## ५ जानेवारी १६९५

बेदारबख्ताच्या सैन्यातील दिवाण मीर कलां याला वऱ्हाडचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

बादशहांनी मुखलिसखानाला सांगितले, 'तुम्ही यक्कताजखानाला लिहा. गनीम हे इंडी ठाण्यात पसरले आहेत. (धान्य आणणाऱ्या) वंजाऱ्यांचे तांडे भीमेच्या पलीकडे थबकले आहेत. तुम्ही गनिमांचा मोड करून वंजाऱ्यांना सुरक्षितपणे हुजुरात आणा.'

अब्दुल्ला हा ठाणे परगव्हाणच्या (?) युद्धात मारला गेला होता. त्याच्या वारसांना रक्कम देण्यात आली.

रायचूरच्या बातम्यावरून कळले की : हिंमतखान बहादुर हा ऐनी (?) जवळ होता तेथे संताजी वगैरे गनिमांशी लढाई झाली. गनीम पळून गेले. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.'

## ६ जानेवारी १६९५

कैलासवासी राजा भीम (उदयपूरचा राजपुत्र) याचा काका दलसिंग हा सय्यद लष्करखानाच्या फौजेत तैनात होता. तो येऊन बादशहाला भेटला.

हैद्राबाद कर्नाटकच्या बातम्यावरून कळले की : सुरमा (?) नावाच्या मन्सबदाराला एक हजार जात व चारशे स्वार अशी मन्सब होती. तो जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. तो छावणी सोडून निघून गेला. फरारी म्हणून त्याची नोंद व्हावी अशी बादशहाने आज्ञा केली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : रायचूरजवळ हिंमतखान बहादुर आणि संताजीचे युद्ध झाले. बादशहाच्या कृपेने हिंमतखानाने संताजीच्या अनेक सहकाऱ्यांना ठार केले. अनेकजण जखमी झाले. हिंमतखानाला जय मिळाला. संताजीचे तीन सरदार पण मारले गेले. हिंमतखानाचे अनेक सैनिक मृत अगर जखमी झाले. वरील विजयाबद्दल हिंमतखानाचा बाप खानजहान याने बादशहांना एक कटयार नजर म्हणून दिली.

मराठा सरदार महादजी नारायण याला परंडयाचा किल्लेदार व फौजदार अजीजखान याने बादशहाकडे पाठविले. महादजीला बादशहाने दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब दिली. त्याचा मुलगा सायब (?) याला पाचशे जात व शंभर स्वार यांची मन्सब देण्यात आली.

## ७ जानेवारी १६९५

मरहूम मुहकमसिंगची पृथ्वीसिंग (?) व इतर मुले यांना नुस्रताबाद उर्फ सगर (गुलबर्गा जिल्हा) येथील किल्लेदाराच्या लिहिण्यावरून मन्सबी देण्यात आल्या.

बहिर्जी पांढरे हा हिंमतखान बहादूर याच्या सैन्यात तैनात होता. तो कासेगावला (इस्लामपूर तालुका) ठाणेदार होता. त्याला पाच हजार जात व तीन हजार

स्वार अशी मन्सब होती. त्याच्या मन्सबीत सूट देण्यात आली.

पाईन विलायतचा ठाणेदार बिहारखान याने लिहिल्यावरून हरबाजींचा मुलगा हरबाजी याला सातारगडापासून सात कोसावर असलेल्या बानगाव(?) येथील ठाणेदारी देण्यात आली. त्याला चारशे जात व तीनशे स्वार अशी मन्सब आहे. बहादूरगडचा बदललेला किल्लेदार मुहंमद मुरादखान याची मन्सब कमी करण्यात आली.

महादजी नारायण याचे भाऊ नरसोजी वगैरेंना पुढीलप्रमाणे मन्सबी देण्यात आल्या :– नरसोजी चारशे जात व शंभर स्वार, दरबाजीचा मुलगा नरहरजी दोनशे जात, तीस स्वार, भगवंतराव, दोनशे जात व वीस स्वार, बाळाजीचा मुलगा यशवंत-राव(?) दोनशे जात व वीस स्वार.

बादशहादाच्या शुतरखाना(उंटांचा) व गावखाना(बैलांचा) यांचा दारोगा खिदमत गुजारखान याने अर्ज पाठविला की : मी औरंगाबादेत आहे. शुतरखाना व गावखाना उंट व बैल छावणीत आणावे अशी आज्ञा झाली आहे. पण वाटेत गनिमांचा उपद्रव भारी आहे. तर उंट व बैल आणण्याचे काम तूर्त स्थगित केल्यास बरे. बादशहांनी आज्ञा केली की : ठीक आहे. गावखाना व शुतरखाना यांच्या बरोबर लागणारा लवाजमा परत बोलावून घ्या.

## ८ जानेवारी १६९५

खानदेशात जाऊन तेथून आंबे पाठविण्यासाठी म्हणून मुहंमद इब्राहीम याची नेम-णूक करण्यात आली. यक्काताजखान हा गनिमांचा मोड करण्यासाठी गेला होता. तो व त्याचा भाऊ नूरुद्दीन यांनी अनुक्रमे एक मोहर व नऊ रुपये नजर दिली.

बदारबख्ताच्या फौजेत तैनात असलेला मुहंमदबदी बल्खी याने विनंती केली की : वऱ्हाड मधील परगणे पातूरा (पातूर) मला तनखा जहागीर होता. आता तो चीन-कुलीजखान यास देण्यात आला आहे. मला परत मिळावा. आज्ञा झाली की : इनायतुल्ला-खान याने(चौकशी करून) वृत्तांत सादर करावा. तसेच बल्खीला एक हत्ती देण्याचे आश्वासन देण्यात आले होते. त्याप्रमाणे त्याला हत्ती देण्यात यावा अशी आज्ञा करण्यात आली. तसाच एक घोडाही देण्यात आला.

गाजिउद्दीन बहादुर याने चौंद(जावंद)चा किल्ला जिंकून घेतला होता. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या व गाजिउद्दीनचा विनंतीअर्ज ही बादशहाच्या नजरेखालून गेली. वली-बेग गुर्जबर्दार यास बदामीचा जमीनदार व मेलगिरी(?)चा मुलगा रामचंद्र याला आणण्यासाठी पाठविण्यात आले होते. तो त्याला बरोबर घेऊन आला. याशिवाय त्याने जमीनदाराकडून येणारी आठ हजार रुपये पेशकशही आणली.

## ९ जानेवारी १६९५

शेख अली हा गाजिउद्दीनखानाच्या फौजेत तैनात होता. ती सोडून तो पाथरी गावात येऊन बसला. त्याला परत फौजेत नेऊन पोहोचविण्यासाठी फतेहुल्ला गुर्जबर्दार याला पाठविण्यात आले. तो ते काम करून परत आला.

जुल्फिकारखानाच्या लिहिण्यावरून सरबलंदखान याला सरीवीत(?) जगदेवगडची किल्लेदारी देण्यात आली. तो पाच हजारी होता. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

यानंतर तीन महिन्याच्या नोंदी आढळत नाहीत.

### ३१ एप्रिल १६९५

मरहूम दिलेरखान याचा मुलगा दिलदारखान हा जुल्फिकारखानाच्या छावणीतून येऊन भेटला. त्याला शहाजादा बेदारबख्ताच्या सैन्यात तैनात करण्यात आले.

बागांचा व्यवस्थापक ख्वाजा याकूत याने कळविले की : खानजहान बहादुर याने औरंगाबादेहून द्राक्षांची चारशे कलमे मागविली. ती आपल्याकडे पाठविली आहेत. आज्ञा झाली की : शहाबाग, रहमतवाडीबाग व जुम्मामशिदीची बाग येथे ती कलमे लावण्यात यावीत.

यानंतरच्या नोंदी ३ जून १६९५ पासून आढळू लागतात. मे १६९५ मध्ये बादशहा हा विजापुराहून(गलगली) निघून सोलापूर जवळ भीमेच्या काठी ब्रह्मपुरी येथे राहू लागला होता.

### ३ जून १६९५

इंडीचा ठाणेदार जानोजी याला खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

महाराज देव याला भूपतगड(?)चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले. किशनसिंग (चौहान) याचा मुलगा जसवंतसिंग (हनवंतसिंग?) याला समरगड (शमशेर गड?) उर्फ परसगड (सरसगड?) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

भूपतगडचा(?) बदललेला किल्लेदार अबुल्वासे याची मन्सब कमी करण्यात येऊन त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

रायबाग हुकेरीचा फौजदार शेख फरीद याला जमखिंडीचा अमीन व फौजदार म्हणून अली अकबर याच्या जागी नेमण्यात आले.

कळविण्यात आले की : आनंदापूर(आळंद)च्या भागात बेडरांनी उच्छाद मांडला आहे. त्यांचा मोड करण्यासाठी सय्यद अब्दुल्लाखानाला तिकडे पोहचविण्यात यावे म्हणून गुर्जबर्दाराची खास नेमणूक करण्याची आज्ञा झाली.

आज्ञा झाली की : एक मन्सबदार परंड्याला पाठविण्यात यावा. त्याने तेथील किल्लेदार इज्जतखान याच्या हाताखालील अधिकारी व अनुयायी यांचा तपशील आणावा.

दख्खनच्या तोफखान्याचा दरोगा आतिशखान हा सरंजाम पोहोचविण्यासाठी गेला होता. त्याने लिहून कळविले की : मी भीमेच्या पलीकडे बसलो आहे. अद्याप सरंजाम आला नाही. तो लवकर पाठविण्यात यावा अशी आज्ञा झाली.

### ४ जून १६९५

ऐना(?)चा देशमुख व हनवंत(?) देशमुखचा मुलगा सिद्धराज याला मन्सब देण्यात आली. हनवंतचा भाऊ येसराव यालाहि मन्सब देण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : कृष्णा नदीच्या वीस नावा आल्या आहेत.

आज्ञा झाली की : त्या भीमा नदीत सोडण्यात याव्या.

बादशहांनी दलबादल हत्ती नजरेखालून घातला. तळकोकणहून बदललेला फौजदार इखलासखान मियाना हा येऊन बादशहाला भेटला. (इखलासखान मियाना हा अठरा जून १६९४ पासून फेब्रुवारी १६९५ च्या सुरवातीपर्यंत आदिलशाही तळकोकणचा फौजदार होता.) त्याच्या जागी मुहंमद रफी दिवाण याला तळकोकणच्या फौजदारीवर नेमण्यात आले.

**५ जून १६९५**

विजापुरी कर्नाटकातील बसवापट्टणच्या बातम्यावरून कळले की : मौजे लोरणी (?) परगणे बदामी येथे बंडखोरांनी रहमतुल्ला वगैरे सौदागर यांना लुटून खंक केले. तेथील फौजदाराच्याने बंडखोरांचा मोड होत नाही. बादशहांनी आज्ञा केली की : हिंमतखान बहादुर याने तिकडे जाऊन बंदोबस्त करून मग अकलूजकडे जावे. अशी आज्ञा इस्माईल बेग गुर्जबर्दार याजबरोबर पाठविण्यात आली.

गुजरमल व रामसिंग हे मुसलमान झाले. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मुल्हेरचा फौजदार बहरोजखान याचे विनंतीपत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

जुन्नर शिवनेरीचा फौजदार मन्सूरखान याने विनंती केली की : माझा मुलगा मुहंमद काजिम याला माझा नायब म्हणून ओतूर(?) येथील किल्ल्यावर नेमावे. आणि गजनफर याची हरीशगडला किल्लेदार म्हणून नेमणूक करावी. शहाबेग मन्सबदार याला माझ्यापाशी तैनात करावे. विनंत्या मान्य करण्यात आल्या. मन्सबवाढीची विनंती मान्य करण्यात आली नाही.

**७ जून १६९५**

फतेहुल्लाखान याला घासदाणा आणण्यासाठी पाठविण्यात आले होते. त्याने गनिमाकडून दहा घोडे, चवदा उंट व काही बैल धरून आणले.

**९ जून १६९५**

खानाजादखान (मरहूम रुहुल्लाखान याचा मुलगा) हा कही (घासदाण, लाकूड-फाटा) आणण्यास गेला होता. तो येऊन भेटला. बादशहा म्हणाले, 'शाबास खूप कही आणली. तुमच्या कामगिरीचा मजुरा झाला.'
खानजादखानाने विनंती केली की : फतेहुल्लाखान हा गस्त घालण्यासाठी (टेहेळणी) गेला होता. त्याने चांगली कामगिरी बजावली. शिपाई गडी आहे. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.'

नलगोंड्याचा (?) बदललेला किल्लेदार सत्रसाल बुंदेला (राठोड) येऊन बादशहाला भेटला. (हा छत्रसाल नव्हे)

बादशाही छावणीपासून इंडीपर्यंतच्या रस्त्याचे रक्षण व इंडीची ठाणेदारी ही हमीदुद्दीनखानाच्या कक्षेत देण्यात आली. इंडीचे ठाणेदार यादगारबेग आणि जानोजी यांना बदलण्यात आले. कड्याचा (?) किल्लेदार व फौजदार याला खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

किशोरागड(?)चा किल्लेदार घासीराम याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'तयार रहा. कही आणण्यासाठी मी तुम्हाला भूपालगडकडे पाठवीत आहे.'

फतेहाबाद उर्फ धारूर(बीड जिल्हा, मराठवाडा)चा किल्लेदार व फौजदार उजबेग-खान याने आपला भाऊ अब्दुलगफूर याला आपला नायब म्हणून किल्ल्यात ठेऊन हुजुरात येण्याची परवानगी मागितली. परवानगी देण्यात आली.

## १० जून १६९५

जाधवराव उर्फ जगदेवराव याचा अर्ज बादशहांनी नजरेखालून घातला.

चिटगोप्याचा(?) किल्लेदार व फौजदार काकडखान याची मन्सब वाढविण्यात आली.

नलगोंडचाचा बदललेला किल्लेदार व फौजदार सत्रसाल बुंदेला(राठोड) याची मन्सब काय अशी बादशहाने चौकशी केली.

बक्षीउल्मुल्क अलीकुलीखान याला बादशहा म्हणाले, 'हमीदुद्दीनखानासाठी पाच हजार स्वारांची व्यवस्था करा.'

सुभानगडचा किल्लेदार व फौजदार सय्यद लुत्फ याच्याकडे बिदनूरच्या राणीकडून खंडणी वसूल करण्याचेहि काम देण्यात आले. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

जुल्फिकारखानाच्या सैन्याचा दिवाण मुहमद शफी याने तिकडील जमीनदारांकडून येणाऱ्या खंडणीचा भाग म्हणून चार हजार रुपयांचा एक हिरा पाठविला. पण हुजुरात तो हिरा तपासता त्याची किंमत दिड हजार रुपयेच निघाली. म्हणून तो हिरा परत करण्यात आला. यानंतर महमद आदिल गुर्जबर्दार हा मुहंमद शफीकडून एक हजार रुपये व दोन हिरे घेऊन आला व या कामगिरी बद्दल बादशहाने त्याची मन्सब वाढविली.

## ११ जून १६९५

बादशहाच्या निवासस्थानासाठी योग्य स्थळ शोधावे म्हणून मतलबखान व सरकार-खान हे अकलूजला गेले होते. त्यांनी येऊन सांगितले की आम्ही अकलूज व इंदापूरच्या दोन्ही जागा पाहिल्या. तेथे आपल्यायोग्य जागा नाही. पण टेंभुरणीच्या जवळ जागा आहे. ती मात्र योग्य आहे. बादशहांनी त्या दोघांबरोबर असलेल्या सैनिकांची यादी (तूमार)नजरेखालून घातली.

शेख मजीद विजापुरीचा मुलगा मुहंमद वजीर याला सरमलहाल(?)च्या ठाणे-दारीवर नेमण्यात आले.

## १२ जून १६९५

हमीदुद्दीनखान याजबरोबर पाच हजार स्वार देऊन कही(घासदाणा, लाकुडफाटा, रसद इत्यादी)आणण्यासाठी मुदहाळ(मुद्देबिहाळ?)कडे रवाना करण्यात आले. त्याच्या तुकडीत सत्रसाल बुंदेला(राठोड), साहेबखान, जानोजी वगैरेंना देण्यात आले.

बसवापट्टण वगैरे चार किल्ल्यांचा किल्लेदार ऐवजबेग(?)याने लिहिले की :

माझ्या किल्ल्यात एक हजार बंदुकची तैनात असायला हवेत. त्यापैकी सातशेच जागेवर आहेत. बादशहांनी त्याच्या मन्सबीत वाढ केली.

म्हसवडचा ठाणेदार रणदुल्लाखान याने हुजुरात येण्याची परवानगी मागितली. ठाण्याविषयी सावधगिरी बाळगून हुजुरात येण्याची परवानगी देण्यात आली.

नारायणदास मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

**१३ जून १६९५**

बादशहांनी शहाजादा मुअज्जम याजकडे अननसाच्या तीन करंड्या रवाना केल्या.

**१४ जून १६९४**

अलमेलाचा बदललेला फौजदार अबुल्हसन हा येऊन बादशहाला भेटला.

आबाजी वगैरे दोन मराठे खटाव(?) परगण्यातून येऊन बादशहाला भेटले.

सत्रसाल बुंदेला(राठोड) हा हमीदुद्दीनखान याजपाशी तैनात होता. त्याला तीनशे जात व पाचशे स्वार अशी मन्सब होती. तीत शंभर जात व पाचशे स्वार अशी वाढ करण्यात आली.

मामूरखान याने कळविले की : हजरत बद्रुन्निसा या इस्लामपुरीत(ब्रह्मपुरीत) आल्या आहेत. आज्ञा असेल तर हुजुरात पाठवितो. बादशहांनी परवानगी दिली.

रायरी (रायगडचा) फौजदार अब्दुरज्जाकखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

ख्वाजा जलाह अल्वली याला लष्करखानाच्या फौजेतून काढून हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**१५ जून १६९५**

गाजिउद्दीनखानाच्या फौजेत तैनात असलेल रुस्तमखान विजापुरी, महिमानगड (महिपालगड) चा किल्लेदार फौजदारखान व ताळीकोटचा फौजदार पीर मुहंमद(?) यांचे अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेले.

जाधवराव उर्फ जगदेवराव ठाणेदार सांगोला(?) याला हुजुरात बोलावण्यात आले. त्याला तीन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यावरून समजले की : मसूदखानाचा मुलगा हुसेनखान याला सहा हजार जात व पाच हजार स्वार अशी मन्सब होती. पण प्रत्यक्षात त्याचे स्वतःचे स्वार नाहीत. त्याचा पाच हजार स्वारांचा सरंजाम काढून घेऊन त्याचा जात सरंजाम तेवढा ठेवावा अशी आज्ञा झाली.

बरखुर्दार पीर मुहंमदखान याला बहादुरगड उर्फ पेडगावच्या किल्ल्यावरील तोफखाना व इतर सामग्री याचा व्यवस्थापक(दारोगा) म्हणून नेमण्यात आले. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

**१६ जून १६९५**

इज्जतबेग(?)तोफखान्याचा दारोगा, याला उदगीर व कंधार येथे किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त याला आंब्याच्या सहा करंड्या पाठविल्या. तसेच शहाजादा मुअज्जम, गाजिउद्दीनखान बहादुर, जुल्फिकारखान बहादुर व विजापूर कर्नाटकचा फौजदार कासिमखान यांना आंबे पाठविण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांच्या फौजेने मानवत, अंबड व वाशिम या भागात धुमाकुळ घातला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : अलीमर्दानखान (वऱ्हाडचा सुभेदार) याजकडे अलीकुली बेग गुर्जबर्दार याला पाठवावे आणि अलीमर्दानखानाने जागेवर जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे अशा अर्थाचे हुकुम पाठवावे.

बिलरसखान यास मातबरखानाच्या फौजेतून हुजुरात बोलावून घेण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : बेडरांनी गुलबर्गा भागात उच्छाद मांडला आहे आणि आसपासची खेडी लुटली आहेत.

आग्ऱ्याला अठरा मे १६९५ रोजी पोहोचून आपण सुभेदारीचे काम सांभाळू लागलो अशा अर्थाची मुख्तारखानाची अर्जी आली.

## ५ जुलै १६९५

देवगडचा जमीनदार बख्तबलंद याची कैदेतून सुटका झाली. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याच्या मध्यस्थीने तो बादशहास भेटला. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब व मदत म्हणून पाचशे रुपये देण्यात आले. बख्तबलंदला ख्वाजा याकूतच्या हवाली करण्यात आले. सावधगिरी बाळगावी असे ख्वाजा याकूतला सांगण्यात आले.

परंड्याचा किल्लेदार व फौजदार इज्जतखान याच्यापाशी असलेल्या सामग्री सरंजामाची तपासणी करण्यासाठी मरहूम अब्दुर्रहीमखान याचा मुलगा मीर नोमान (?) याला परंड्याला पाठविण्यात आले.

लाहोर सुभ्यातील शम्साबादचा कानूनगो पंजाबराय हा मुसलमान झाला. तसेच रामराय व मधो हे मुसलमान झाले. सर्वांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

शहाजादा अजीम याने कळविले की : अथणी वगैरे भागाचा जमीनदार सटवाजी डफळे याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला आहे :– मला जीवदान मिळावे, माझे गुन्हे माफ व्हावे आणि माझ्या योग्यतेप्रमाणे मन्सब मिळावी म्हणजे मी आपल्या सेवेत हजर होईन आणि या भागात बादशहा मला जी कामगिरी सांगतील ती पार पाडीन. बादशहा शहाजाद्याला म्हणाले, 'तुमच्या शिफारशीप्रमाणे सटवाजीला अभय दिले असून त्याचे गुन्हे माफ केले आहेत. मुहंमद हुसेन मीरबक्षी यांनी त्याला हुजुरात आणावे.'

शहाजादा मुहंमद आज्जम याने विनंती केली की : मला स्वारीसाठी काही घोडे देण्यात यावेत. बादशहा म्हणाले, 'शहाजाद्यांना दोन इराकी, दोन अरबी व तीन तुर्की घोडे देण्यात यावेत.' आज्ञेप्रमाणे आख्ताबेगी सफशिकनखान याने दोन घोडे बादशहासमोर आणले. एका इराकी घोड्याचे नाव लालनार(तांबडी आग) असे असून त्याची किंमत सहा हजार रुपये ही होती. दुसरा घोडा अरबी होता.

### ६ जुलै १६९५

सियादतखानाचा आप्त ख्वाजा हामिद हा इंडीच्या ठाण्यावरून येऊन बादशहाला भेटला.

बादशहांनी शहाजादा कामबक्ष याला चार हजार रुपये किमतीचा कोहशुकोह (पर्वतप्राय) नावाचा घोडा बक्षीस दिला.

नुस्रताबाद उर्फ सगर(गुलबर्गा जिल्हा)च्या बातम्यावरून कळले की : नंदानायक जमीनदार वाकिणखेडा(?) याने ठिकठिकाणी पत्रे पाठवून प्रमुख लोकांनी आपापली पथके घेऊन यावी असे त्यांना कळविले आहे. भीमा ओलांडण्याचा त्याचा बेत आहे. बादशहांनी आज्ञा केली की : तेथील किल्लेदार व फौजदार राजा अनुपसिंग याला कडक सावधगिरी बाळगण्याविषयी लिहा.

अधोनी(आता आंध्र प्रदेशात रायचूर व गुंटकलच्या मध्ये)च्या बातम्यावरून कळले की : लक्ष्मीकांत याजपाशी दोन हत्ती होते. अधोनीचा किल्लेदार रादअंदाजखान याने स्नेहभावाने एक हत्ती घेतला आणि दुसरा जबरदस्तीने. तो हत्तीची किंमत देत नाही. लक्ष्मीकांतला हुजुरात बोलावून आणण्यासाठी गुर्जबर्दार पाठवावा अशी आज्ञा झाली.

बदामीचा किल्लेदार व फौजदार याची मन्सब कमी करून त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

### ७ जुलै १६९५

सय्यद यादगार हुसेनखान(नळदुर्ग व बेळगाव येथील माजी किल्लेदार) याचा नातू सय्यद दौलत मुहंमद याला स्वतःच्या लग्नासाठी स्वदेशी जाण्यास रजा देण्यात आली.

विजापूर कर्नाटकचा फौजदार कासिमखान याने विनंतीपत्र पाठविले की : आपल्याला दुआब(बादशाही हत्ती वगैरेचा खुराक)ची माफी मिळावी. मी प्रत्यक्ष मोहिमेत कामगिरी बजावीत आहे. विनंती मान्य करण्यात आली.

मंगळवेढयाच्या किल्ल्यातील बाग पाहून या म्हणून ख्वाजा याकूतला आज्ञा करण्यात आली.

हत्तीखान्याचा दारोगा हमीदुद्दीनखान याने विनंती केली की : कुतबाबाद गलगली येथे माझ्यापाशी पन्नास अहदी व बर्कंदाज तैनात होते. ते आताही तसेच ठेवावे. विनंती मान्य करण्यात आली.

औरंगाबादचा संरक्षक मरहमतखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

### ८ जुलै १६९५

जुन्नरचा किल्लेदार व फौजदार मन्सूरखान याला जवळपासच्या किल्ल्यांच्या सामग्री सरंजामाचा देखरेख अधिकारी(दारोगा) म्हणूनही नेमण्यात आले.

तेगलकोट(?)चा किल्लेदार व फौजदार अबुल्हसन याने अर्ज पाठविला की :

शंकर नारायण वगैरे बंडखोर हे सैन्यासहित येथे आले असून किल्ल्याला वेढा घालण्याचा बेत करीत आहेत. माझ्या बरोबर फार थोडे सैन्य आहे. बादशहाने आज्ञा केली की : बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने विजापुरी कर्नाटकचा फौजदार कासिमखान याला लिहून अबुल्हसनची मदत करण्यास सांगावे.

## ९ जुलै १६९५

अनव्याचा (माळवा) फौजदार कमाल्लुद्दीन याला आज्ञापत्र पाठविण्यात आले.

सय्यद अब्दुल्लाखान याला फर्मान पाठविण्यात आले की : तुम्ही सुभे हैदराबादच्या सरहद्दीवर राहावे. गनीम तिकडे आले की त्यांचे पारिपत्य करावे.

बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला सांगितले की : कही आणण्यासाठी खानाजादखानाबरोबर सैन्य पाठवायचे आहे. सैनिकांची यादी (तूमार) तयार करा.

बादशहांनी खानाजादखानाला आज्ञा केली की : ठिकठिकाणच्या किल्ल्यावर तोफखाना व त्याचा लवाजमा किती आहे याचा तपशील मला कळवा.

जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेल्या सय्यद ऐवज याची मन्सब वाढविण्यात आली.

राहिरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याने अर्ज पाठविला की : येथे युद्धप्रसंगी मुहंमद सालेह वगैरे तीन इसम यांनी चांगली कामगिरी बजावली. त्यांना मन्सब मिळावी. आज्ञा झाली की : याबाबतीत मुखलिसखान याने वृत्तांत सादर करावा.

विजापूर सुभ्याचा दिवाण मीर अब्दुल्वहाब याने अर्ज केला की : माझ्या मुलाने माझ्या घरात चोरी केली व मालमत्ता दाबली आहे. मुलाला लष्करात आणावे अशी आज्ञा झाली.

## १२ जुलै १६९५

आज बकरीदचा सण. शहाजादे, आज्जम, कामबक्ष, मुइजुद्दीन, मुहंमद अजीम वालाजाह व अमीर उमराव असदखान, खानजहान बहादुर, मुखलिसखान, खानाजादखान इत्यादींनी हजर होऊन बादशहांना तसलीमात (नम्र अभिवादन) केल्या.

## १३ जुलै १६९५

बादशहांनी आज हत्ती व घोडे यांची पाहणी केली.

औरंगाबादेच्या बातम्यावरून कळले की : सिद्दीफसल (मन्सबदार) याच्या सरंजामात प्रत्यक्षात एकही स्वार अस्तित्वात नाही. त्याची जहागीर बदलावी अशी आज्ञा झाली.

बादशहांना अहमदाबादेचा सुभेदार शुजाअतखान याने एक घोडा पाठविला. त्याची किंमत चारशे मोहरा ठरविण्यात आली. बादशहाने घोड्याचे नाव सरबलंद ठेवले. असाच आणखी एक घोडा घेण्यात आला. त्याचे नाव बादशहापसंद ठेवण्यात आले.

वीस हिंदू मुसलमान झाले. त्यापैकी प्रत्येकाला अठ्ठावीस रुपये देण्यात आले.

## १४ जुलै १६९५

लष्करखानाच्या तैनातीत असलेला कादरदादखान हा येऊन बादशहाला भेटला.

कल्याण याचा मुलगा ऐमन न्हावी मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

परसगड उर्फ समरगड(?)चा किल्लेदार बहवंत(भूपत?) सिंग व त्याची मुले मोहन-सिंग, केशरीसिंग व सुजालसिंग यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मानसिंग राठोड याच्या चौकीचा दिवस गुरुवारच्या ऐवजी शनिवार करण्यात आला.

पवनारचा फौजदार सदरुद्दीन मुहंमदखान याने तिकडील जमीनदारांची एक लाख रुपये खंडणी (पेशकश) पाठविली.

जवाहरमल मेमार(बांधकाम तज्ञ) याने विनंती केली की : मला हैद्राबादेस जाण्याची आज्ञा झाली आहे पण सरकारकडून पगार येणे आहे. ती बाकी मिळावी. बादशहांनी ( हिशेब होईपर्यंत) एक हजार रुपये द्यावे अशी आज्ञा केली.

बुधपाचगावचा (सातारा जिल्हा)चा ठाणेदार पदाजो(?) याने अर्ज केला की : या भागात गनिमांची नेहमी वर्दळ असते. माझ्या काही मागण्या आहेत. आज्ञा झाली की : हमीदुद्दीनखान त्या भागात येत आहेत. त्यांना कळवावे. त्या मंजूर करण्यात येतील.

हमीदुद्दीनखान याला आज्ञा झाली की : त्याने आज संध्याकाळी लातूर(?)कडे रवाना व्हावे.

सफशिकनखान यास बादशहा म्हणाले, 'तयार व्हा. तुम्हाला कही आणण्या-साठी खानाजादखान याजबरोबर पाठवीत आहे.'

बादशहांनी कोहीरचा फौजदार सय्यद मुजफ्फरखान याला पाचशे स्वार व दीड हजार पायदळ शिबंदी म्हणून दिली.

शहाजहानाबाद(दिल्ली)च्या बातम्यावरून समजले की : फतेहुल्ला याने स्वतःच्या घरात दारुची भट्टी घातली असून तो रात्रंदिवस धिगाणा घालीत असतो. त्याची मन्सब कमी करण्याची आज्ञा देण्यात आली.

### १५ जुलै १६९५

जाधवराव उर्फ जगदेवराव याला शिवूर(शिवपूर?)च्या ठाण्यावरून बदलून हमीदुद्दीनखान याजपाशी तैनात करण्यात आले. त्याच्यासाठी एक घोडा देण्यात यावा अशी आज्ञा झाली. जगदेवरावच्या भाऊबंदांपैकी बहादुरजी यास बक्षीस देण्यात आले.

रामराय हिंदू मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

किशोरसिंग हा जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला गुर्जबर्दाराच्या हस्ते खिलतीची वस्त्रे पाठवावी अशी आज्ञा झाली.

बादशहांना अर्ज करण्यात आला की : सुरत बंदर वगैरेहून नऊ लाख चाळीस रुपयांचा खजिना आला आहे. बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली :– पाच लाख रुपये गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याच्या सैन्यात पाठविण्यात यावेत. दीड लाख रुपये

खासचौकी व तोफखान्याच्या लोकांना पगार म्हणून द्यावेत. दोन लाख रुपये खाजगीत पाठवावेत व बाकीचे सरकारी खजिन्यात दाखल करावे.

जुन्नरचा किल्लेदार व फौजदार मन्सूरखान याने अर्ज केला होता की : मी या भागाची व्यवस्था उत्तम प्रकारे करीत आहे. मला जौदगड(जोंद, चौंद?)ची पण किल्लेदारी देण्यात यावी. बादशहांनी ते मान्य केले नाही. गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याला लिहून दुसऱ्या कुणाची तरी नेमणूक करावी अशी आज्ञा झाली.

माहूरचा किल्लेदार उदाजीराम याचा नायब केशवराव याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## १६ जुलै १६९५

वेदवान फिरंगी यास तोफखान्यातील फिरंग्यांचा मुख्य म्हणून नेमण्यात येऊन त्याच्या दीडशेच्या मन्सबीत पन्नासची वाढ करण्यात आली. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

सिरहिंदचा फौजदार कारतलबखान याच्याकडे शहाजहानाबादेच्या (दिल्ली) कालव्याच्या देखरेखीचे पण काम सोपविण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

फतेह मुहंमद मेमार(बांधकाम तज्ञ) याने हुलीहाळच्या किल्ल्याचा नकाशा बादशहासमोर आणला. तो त्यांनी नजरेखालून घातला.

सफशिकनखान आख्ताबेगी याने अर्ज केला की : मिर्जाबेग मन्सबदार हा काबुलहून एकशेवीस घोडे विकत घेऊन येत होता. त्यापैकी पंचावन्न घोडे उज्जैन सुभ्यात चोरीस गेले. बादशहांनी आज्ञा केली की : उज्जैनचा नायब सुभा सय्यद मुहंमद याला लिहा की : ते घोडे हुडकून काढा आणि त्यांच्या किंमतीबद्दल जाब द्या. मिर्जाबेगची मन्सब कमी करण्यात आली.

कळविण्यात आले की : औरंगाबादेत जोराची वृष्टि झाली. तलावाचे बांध फुटले व सरकारी बागांच्या भिंतींचे खूप नुकसान झाले. दुरुस्तीसाठी माणसे पाठविण्यात आली.

गुप्त बातम्यावरून समजले की : उदयपूरचा जमीनदार(कोणत्याही राजाला मोगल हे जमीनदार म्हणत. त्यातून उदयपूरचा महाराणाही सुटला नाही.) राणा जयसिंग हा मरण पावला. प्रधानांनी त्याचा मुलगा अमरसिंग याची राणा म्हणून गादीवर स्थापना केली.

बादशहांनी खानाजादखानाच्या फौजेबरोबर खालीलप्रमाणे माणसे नेमली :–

आघाडीला — सफशिकनखान,
उजव्या फळीवर — सय्यद असालतखान,
डाव्या फळीवर — मुहंमद मुरादखान,
पिछाडीला — यक्काताजखान.

अबुतालिब याला खानाजादखानाच्या सैन्याचा बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

१७ जुलै १६९५

बादशहांनी खानाजादखान, सफशिकनखान व सय्यद असालतखान यांना निरोप देऊन कही आणण्यासाठी व गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी भूपाळगडाकडे रवाना केले. निरोपाच्यावेळी बादशहा कुशल होवो व जय मिळो अशा अर्थाचा फातेहा (प्रार्थना) पढले. खानाजादखान याजबरोबर मुहंमद मुरादखान, सय्यद मूर्तजा हैदराबादी, मरहूम मिर्जाखान याचा मुलगा हुसेन आणि गंगाराम आदि दोन रजपूत राजे यांना देण्यात आले.

हनुमान हिंदू हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार समंदरखान याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– माझ्याकडे चिंचोळीची फौजदारी पण होती. मळखेडचा फौजदार मुहंमदबेग याच्या वकीलाने खोटे सागून चिंचोळी माझ्याकडून काढवून मुहंमदबेगच्या नावे करविली आहे. अद्यापपर्यंत माझेच ठाणेदार चिंचोळीला आहेत आणि चिंचोळीच्या फौजदारीची सनद अद्याप यारअलीबेग (बादशहाच्या सचिवालयातील अधिकारी) याने मुहंमदबेगच्या नावे पाठविली नाही. चिंचोळीची फौजदारी पूर्वीप्रमाणेच माझ्याकडे असू द्यावी. बादशहांनी ते मान्य केले नाही. यारअलीबेगकडून सनद काढून (मुहंमद बेगला) देण्यासाठी फतेहदौलत याला सजावली (अंमलबजावणीचा अधिकारी) म्हणून नेमावे अशी आज्ञा झाली.

छावणीतील दुसऱ्या गंजाचा (बाजाराचा) दारोगा याने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– पहिल्या गंजाचा करोडी शरीफखान हा दर वर्षी पाच लाख रुपयांची अफरातफर करतो. मला आज्ञा झाली तर याचा पुरावा देईन व ही रक्कम खजिन्यात भरायला लावीन. बादशहा रुष्ट होऊन म्हणाले, 'हा (दुसऱ्या गंजाचा दारोगा गजनफर) नेहमी उचापती व लबाड्या करीत असतो.' बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'दुसऱ्या गंजाची आवश्यकता नाही. त्याला काढून टाका.'

१९ जुलै १६९५

जुन्नरचा बदललेला किल्लेदार मीर फखरुद्दीन हा येऊन बादशहाला भेटला.

गाजिउद्दीनखान बहादुर याने कळविले की : मिफ्ताहल्फुतूह उर्फ कोथळागडचा किल्लेदार व फौजदार गुलाम अलीखान याच्याने त्या भागाची नीट व्यवस्था होत नाही. दुसऱ्या कुणाचीतरी नेमणूक व्हावी. बादशहांनी ते मान्य केले नाही. उलट गुलाम अली-खानाच्या मन्सबीत वाढ केली.

हमीदुद्दीनखान याच्या फौजेची दिवाणगिरी पत्करण्यास जुल्फिकारबेग याने नकार दिला. दुसऱ्याची नेमणूक करावी अशी आज्ञा झाली.

सगर (गुलबर्गा जिल्हा) चा किल्लेदार राजा अनूपसिंग याने कळविले की : बंड-खोर बेडर या प्रांतात येऊन दंगा करीत आहेत. कुणातरी सरदाराला इकडे पाठवावे. आज्ञा झाली की : फतेहबेग गुर्जबर्दार याने जावे व राजा (अनूपसिंगाचे) सैन्य घेऊन बंडखोरांचे पारिपत्य करावे व ठाणी कायम करून परत यावे. यक्काताजखान हा खाना-जादखानाच्या बरोबर होता. असदखान (मुख्य प्रधान) याच्या हाताखालील तीनशे स्वार

यक्काताजखानाकडे पाठवावे असे ठरले.

कळविण्यात आले की : अगरबेग उर्फ तुर्कताजखान हा मरण पावला.

## २० जुलै १६९५

हमीदुद्दीनखान व त्याच्या सैन्यातील पुढील सहकारी यांना बक्षिसे द्यावीत असे ठरले. हमीदुद्दीनखान, जानोजीराव, खिलतीची वस्त्रे, घोडा व हत्ती. फतेहुल्लाखान, घोडा. बहिर्जी पांढरे, खिलतीची वस्त्रे. सरबाजखान, घोडा. सत्रसाल बुंदेला, खिलतीची वस्त्रे. हयातखान, घोडा.

बादशहांनी मुखलिसखानाला विचारले, 'सरफराजखानाबरोबर किती माणसे जुल्फिकारखानाची छावणी सोडून आली आहेत.' चौकशी करून कळवितो असे मुखलिसखानाने सांगितले.

औंढयाचा फौजदार कमालुद्दीन याने आपला नायब याला छावणीत पाठवावे असे त्याला कळवावे म्हणून आज्ञा झाली.

सोंध्याची पेशकश (खंडणी) सात हजार पाचशे रुपये व खालसातील चार महालाचे सात हजार रुपये हे खजिन्यात दाखल करण्यात आले.

सियादतखानाने कळविले की : अजदहाबेग गुर्जबर्दार याने आज्ञेप्रमाणे सरफराजखान यास शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेत रवाना केले. सरफराजखानाने ते मान्य केले नाही. त्याने मन्सबीचा राजीनामा दिला. बादशहा म्हणाले, 'मी असे कुणालाच म्हटले नाही की सरफराजखानाच्या तंबूचे दोर कापावे व त्याच्यावर जुलूम करावा.' त्याला समाधानाची पत्रे लिहिण्यात यावीत. दोन महिन्यांनी त्याला हुजुरात बोलावून घेण्यात येईल. त्यावेळी त्याच्या काय मागण्या आहेत त्या त्याने मांडाव्या.

बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांनी (मराठयांनी) खटावला वेढा घातला असून तेथील ठाणेदार रामचंद्र हा त्यांच्याशी युद्ध करीत आहे. आज्ञा झाली की : ही बातमी हमीदुद्दीनखानाला कळविण्यात यावी. त्याने तातडीने रवाना व्हावे.

## २२ जुलै १६९५

मुद्गल (रायचूर जिल्हा) च्या किल्लेदारीवर नसरखान हा होता. त्याच्या ऐवजी मीर फाजिल याला नेमण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली.

सय्यद अब्दुल्लाखान (नांदेडचा सुभेदार) याला गनिमांच्या पारिपत्यासाठी हैद्राबाद सुभ्याच्या सरहद्दीवर पोहोचवून गुर्जबर्दार परत आला. शिरूर (म्हसवडचा ?) ठाणेदार रणदुल्लखान हा बादशहांना भेटण्यासाठी आला. त्याला छावणीत येण्याची परवानगी देण्यात आली.

सगर (गुलबर्गा जिल्हा) चा किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग याने किल्ल्यात आपला नायब ठेवावा व बंडखोरांच्या पारिपत्यासाठी स्वतः किल्ल्याबाहेर पडावे अशी आज्ञा गुर्जबर्दाराच्या द्वारे पाठवावी असा हुकुम झाला.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याने मोगऱ्याची सहा रोपे आणली.

तीन प्रार्थनागृहात (तसबीह्खाना) व तीन महालात लावावी अशी आज्ञा झाली.

कळविण्यात आले की : मौजे बार्शी (?) येथे काफरांचे मुख्य हे मूर्तिपूजा करतात. बादशहांनी जुम्लतुलमुल्क असदखान यास सांगितले की, 'इज्जतखानाला आज्ञापत्र पाठवून कळवा की तेथील देऊळ पाडून टाकण्यात यावे.'

बुऱ्हाणपूरचा संरक्षक इनायतखान याने कळविले की : धनाजी जाधव हा मलकापूरजवळ आला आहे. यापूर्वी युद्धप्रसंगात माझे साहाय्य करावे अशा आपण इकडील फौजदारांना आज्ञा पाठविल्या आहेत. अशीरगडचा किल्लेदार व फौजदार जाबताखान व होशंगाबादचा फौजदार मोतिकदखान यांना पण अशा अर्थाचे हुकुम दिले जावे. विनंती मान्य करण्यात आली.

परंड्याचा बक्षी व वाकनीस अब्दुलकयूम याने भेटण्यास येण्याची परवानगी मागितली. परवानगी देण्यात आली.

**२३ ऑगस्ट १६९५**

हमीदुद्दीनखानाकडे धान्य वगैरेच्या रसदीची सरबराई करावी अशा अर्थाच्या आज्ञा ठाणेदारांना देण्यात आल्या.

सत्रसाल बुंदेला (राठोड) याला हमीदुद्दीनखानाच्या फौजेतून हुजुरात बोलावून घेण्यात आले.

नारायणदास हिंदु हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

**२५ ऑगस्ट १६९५**

बुऱ्हाणपूर व औरंगाबाद येथील पथकांची पाहणी करण्यासाठी इनायतुल्लाला पाठविण्यात आले.

अकलूजचा फौजदार बुऱ्हानुल्लाखान याला मुजऱ्यासाठी दिवाणेखासमध्ये येण्याची परवानगी देण्यात आली. देवगडचा जमीनदार बख्तबलंद हा बादशहांना भेटला. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'हा उपद्रवी व बंडखोर आहे. याच्यावर नजर असू द्या.'

**२६ ऑगस्ट १६९५**

विजापूर कर्नाटकचा फौजदार कासिमखान याला रादअंदाजखानाच्या जागी अधोनीचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. कासिमखान हा चार हजारी मन्सबदार होता. त्याच्या मन्सबीतील स्वारात वाढ करण्यात आली. रादअंदाजखान याला हुजुरात बोलाविण्यात आले.

सिरागड (कर्नाटकात) च्या किल्लेदारीवर व फौजदारीवर दुसऱ्या कुणाची तरी नेमणूक व्हावी असे बादशहांनी मुखलिसखानाला सांगितले.

पावसामुळे बादशहांनी शिकारीला जाण्याचा बेत टाकून दिला.

**२७ ऑगस्ट १६९५**

पहाडसिंगाचा मुलगा व मछींद्रगडचा किल्लेदार देवीसिंग याने अर्ज पाठविला की : बंडखोर गोळा झाले आणि त्यांनी किल्ल्याच्या पायथ्याशी असलेले दहूर (?) हे गाव

लुटले. गदगच्या फौजदाराला हुकुम जावा की : बंडखोरांना पकडून माझ्या हवाली करावे. फौजदाराला असे लिहिण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बदामीचा किल्लेदार अब्दुर्रज्जाक याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

जुन्नरचा किल्लेदार फखरुद्दीन याला सिरागडच्या किल्लेदारीवर नेमण्यात येऊन त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. सिरागडवर यापूर्वी दरगाहकुलीखान हा किल्लेदार होता.

औंढयाचा किल्लेदार मुहंमदमाह् याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## २८ ऑगस्ट १६९५

सय्यद अफजल याला मुहंमद अश्रफ याच्या जागी रामगीरचा किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

मालोजी हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. आजारामुळे तो छावणी सोडून गेला होता. फरारी म्हणून त्याची नोंद झाली होती. तो परत आला. त्याची चारशे जात व शंभर स्वार अशी मन्सब बहाल करण्यात आली.

उदगीरचा फौजदार मुहंमद याह्या याला उदगीरवरून बदलण्यात येऊन त्याला हुजुरात बोलावण्यात आले. तो अद्याप आला नाही असे कळले. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली. त्याला चारशे जात व सत्तर स्वार अशी मन्सब होती.

## २९ ऑगस्ट १६९५

यादगार हुसेन (नळदुर्ग व बेळगाव येथील माजी किल्लेदार) ला मुल्तानचा बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला. त्याला चारशेची मन्सब होती. तीत वीस स्वारांची वाढ करण्यात आली.

पाईन विलायतचा (वाई प्रांत) ठाणेदार नाहरखान याने पुढीलप्रमाणे कळविले :- गनीम (मराठे) या भागात आले होते. मी त्यांच्याशी युध्द केले. शत्रूपैकी अनेक मारले गेले. शत्रूचा पराजय झाला. दोन हत्ती, काही उंट, तलवारी व भाले अशी लूट सापडली. ती सर्व हुजुरात पाठवावी अशी आज्ञा झाली.

देवगडचा जमीनदार बख्तबलंद याच्यावरचा चौकी पहारा काढून घ्यावा अशी आज्ञा झाली.

## ३ सप्टेंबर १६९५

करावलीचा (टेहेळणी, स्काउट) सरकारखान याने कळविले की : वंजारी लोक शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत रसद पोहचवितात. आपल्याकडेही मधून मधून येतात. लष्करच्या कुरणात आपले बैल चरायला सोडतात. त्यांना मना करण्यासाठी माझी माणसे गेली होती. तर मारामारी करू लागले. बादशहांनी आज्ञा केली की : अब्दुल्लाबेगला तोफखान्याची दीडशे माणसे बरोबर देऊन पाठवा आणि वंजाऱ्यांना तेथून काढून लावा.

हमीदुद्दीनखान याने लिहून कळविले की : गनिमांची (मराठ्यांची) फौज मोठी आहे आणि माझी लहान आहे. गनिमांनी सैन्य तयार ठेवले आहे. चीनकुलीजखानबहादुर

अद्याप पोहोचले नाहीत. माझी इच्छा अशी आहे की बुणगे वगैरे जादा सामान खटाव-मध्ये सोडावे व सडया सैन्यासहित जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे.

बादशहा हे बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'खानाजादखानाबरोबर देण्यासाठी साडे तीन हजार स्वार तयार असू द्या. खानाजादखानाला मी सोमवारी हमीदुद्दीनखानाच्या कुमकेसाठी रवाना करीन. हमीदुद्दीनखानाला कळवा की, खानाजाद-खान येऊन पोहोचेपर्यंत तुम्ही गनिमांवर चालून जाण्याचे थांबवावे.

**७ सप्टेंबर १६९५**

नांदेडचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान याला फर्मान पाठविण्यात आले.

साबाजी हा गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याच्या सैन्यात तैनात होता. त्याला एक हजार जात व सातशे स्वार अशी मन्सब होती. तो छावणी सोडून निघून गेला. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

**८ सप्टेंबर १६९५**

हमीदुद्दीनखानाची कुमक करण्यासाठी खानाजादखान मीर आतिश (दारू गोळया-चा अधिकारी) याला बादशहांनी खटावाच्या दिशेने जाण्यास निरोप दिला. निरोपाच्या वेळी बादशहा फातेहा खैर पढले. मरहूम फतेहजंगखान याचा नातू कादरदादखान याला निरोप देण्यात आला.

**९ सप्टेंबर १६९५**

दंडराजपुरीचा फौजदार याकूतखान याजकडे खिलतीची खास वस्त्रे पाठविण्याची आज्ञा झाली.

खानाजादखानाच्या सैनिकांना दोन महिन्याचा पगार आगाऊ देण्याची आज्ञा झाली.

हमीदुद्दीनखानाच्या सैन्यातील बातम्यावरून कळले ते असे : हमीदुद्दीनखानाने चंदन-वंदन किल्लयाखालच्या वाडया जाळण्यासाठी फतेहुल्लाखान याला पाठविले होते. संता जीला ही बातमी समजली. तो फतेहुल्लाखानावर चालून आला. हमीदुद्दीनखानहि तेथे पोहोचला. युध्द आले. धनाजी जाधवचा मुलगा व एक मराठा सरदार व अनेक काफर सैनिक यांचा पराजय झाला. गनीम पळून किल्लयात जाऊन बसले. खानाने किल्लया-खालील पेठा जाळून टाकल्या व गुरेढोरे पकडली.

**१० सप्टेंबर १६९५**

बादशहा आतिशखानाला म्हणाले, 'तयार रहा. बेडरांच्या पारिपत्यासाठी मी तुम्हाला गुलबर्ग्याकडे पाठवीत आहे.' आतिशखानाबरोबर देण्यासाठी हवे असलेले सैन्य तयार करण्यासाठी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला सागण्यात आले.

सोलापुरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याला बदलण्यात आले.

**११ सप्टेंबर १६९५**

खानाजादखान हा हमीदुद्दीनखानाच्या मदतीला गेला होता. त्याला बादशहांनी सात घोडे दिले.

रामचंद्र व रावदलपत बुंदेला याला हुजुरात बोलाविण्यात आले. यादगार हुसेनखान यास खानाजादखान याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**१३ सप्टेंबर १६९५**

हमीदुद्दीनखानाच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : संताजी व धनाजी हे आपले सैन्य घेऊन डोंगराच्या अलीकडे दोन कोसावर चालून आले होते. हे कळल्यावर हमीदुद्दीनखान याने फतेहुल्लाखान व नाहरखान यांना तिकडे पाठविले. फतेहुल्लाखान तिकडे पोहोचला. युद्ध झाले. बादशहाच्या भाग्याने शत्रूपैकी अनेक लोक मारले गेले. शत्रूचा पराजय झाला. दोनशे घोड्या, तलवारी वगैरे लूट सापडली. यानंतर किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली वाडी जाळून टाकण्यात आली. बादशहा म्हणाले, 'सेवेचा मजुरा झाला.' हमीदुद्दीनखानाला बक्षीस म्हणून एक तलवार पाठवावी अशी आज्ञा झाली.

भारकडी(?)च्या बातम्यावरून कळले की : हमीदुद्दीनखानाच्या सैन्यातील जखमी सैनिक तेथे पोहचले होते. तेथील ठाणेदार पुरदिलखान याने त्यांच्या उपचारासाठी त्यांना पुढे पाठविले.

**२४ सप्टेंबर १६९५**

इंडीच्या ठाण्यावरून कळले की : ख्वाजा यादगारबरोबर जे अहदी (बादशहाच्या निकटचे स्वारशिलेदार) येथे तैनात आहेत ते सरकारच्या कामात सहकार्य देत नाहीत. निरर्थक बडबड करतात. अहद्यांचा बक्षी मुरीदखान याने त्यांना हुजुरात बोलावून घ्यावे अशी आज्ञा झाली.

परगणे बीडचा फौजदार मामूरखान याच्या वकीलाने विनंती केली की : मामूरखान हा खजिना घेऊन छावणीजवळ आला आहे. भेटण्याची परवानगी मिळावी. परवानगी देण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी(घोरपडे)च्या सहकाऱ्यांपैकी अमरुजी (अमृतराव तर नसेल ?) हा पाचशे स्वारांसहित बादशहाची चाकरी बजावण्याच्या आशेने हमीदुद्दीनखान यास भेटला. खानाने त्याला घोडा व खिलतीची वस्त्रे दिली.

**२५ सप्टेंबर १६९५**

खानाजादखान हा काफरांचे पारिपत्य करण्यासाठी असदनगर अकलूजकडे गेला होता. गनीम भूपाळगड कडे निघून गेले होते. खानाजादखान हा आज्ञेप्रमाणे बादशहाच्या छावणी जवळ आला. त्याने बादशहास भेटण्याची परवानगी मागितली. ती देण्यात आली.

काफरांच्या बरोबर लढताना हमीदुद्दीनखानाच्या बरोबर राहून पाईन विलायतचा ठाणेदार नाहरखान याने उत्कृष्ट कामगिरी बजावली. याबद्दल त्याच्याकडे फर्मान पाठविण्यात आले.

**३ नोव्हेंबर १६९५**

जानसिपारखान (सुभेदार हैद्राबाद) याने छिटाचे कापड व एक हत्ती या वस्तू

पाठविल्या. हत्तीची किंमत बारा हजार रुपये ठरविण्यात आली.

बलरसखान याला हिंमतखान बहादुर याच्या फौजेत तैनात करण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनीम कासेगावजवळ आले व त्यांनी गुरेढोरे लुटून नेली. सियादतखान याचा आप्त(जावई ?) ख्वाजाखान याने तीनशे स्वार बरोबर घेऊन जाऊन बंडखोरांचे पारिपत्य करावे असे ठरले.

सोलापुरात बागा तयार करण्यासाठी ख्वाजा याकूत याला रवाना करण्यात आले.

### ४ नोव्हेंबर १६९५

शहाजादा कामबक्ष याच्या सैन्यातील मीरबक्षी मुहंमद मुरादखान याने कळविले की : सैनिकांची पगाराची थकबाकी फारच झाली आहे. ते आरडाओरड करीत आहेत. कामबक्षच्या सरकारी खजिन्यात पैसे नाहीत. बादशहांनी आज्ञा केली की : आपल्या सरकारी खजिन्यातून पस्तीस हजार रुपये काढावे व सैनिकांना पगार द्यावा.

असदनगर अकलूजचा फौजदार व किल्लेदार बुऱ्हाणुल्लाखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

गाजिउद्दीनखानाच्या लिहिण्यावरून अब्दुर्रज्जाक, रायरीरायगडचा फौजदार याची अब्दुस्सलाम वगैरे मुले यांना मन्सबी देण्यात आल्या.

मळखेड(गुलबर्गा जिल्हा)च्या बातम्यावरून कळले की : अलीखान हा चितापूरच्या जहागिरीत बसला आहे. त्याने तो परगणा पिडनाईकच्या गुमास्त्याला इजाऱ्याने दिला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : अलीखानाला ताबडतोब आतिशखानाच्या फौजेत तैनात करा आणि फौजदार व वाकनीस यांना गुमास्त्याबद्दल बारकाईने चौकशी करून कळविण्यास लिहा.

यलंगतोशखान(औरंगजेबाचा दासीपुत्र) याचा मुलगा सुभानवर्दी याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

### ५ नोव्हेंबर १६९५

गाळण्या (आतां नाशिक जिल्हा, मालेगाव तालुका)चा किल्लेदार व फौजदार लष्करी याने बादशहाकडे नजर म्हणून काही गालिचे पाठविले.

खानाजादखान याला एक कलगी शिरपेच (बाराशे रुपये किंमतीचा) देण्यात आला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी (घोरपडे) याने भागदुर्ग (रामदुर्ग) च्या किल्ल्याला वेढा घातला आहे. तेथे फौजदार व किल्लेदार म्हणून लछीराम (गौड) काम करीत आहे. विजापूरचा सुभेदार सय्यद लष्करखान याचा मुलगा नसुल्लाखान याने तातडीने लछीरामच्या कुमकेला जावे असे लष्करखान याला लिहीण्याची आज्ञा झाली. हिंमतखान बहादुर हा पण बंडखोरांचे(संताजी)पारिपत्य करण्यासाठी तेथे पोहोचेल. मुहंमदाबाद(बीदर)चा किल्लेदार व फौजदार सजावारखान याचा आप्त(जावई?) मीर अहमद हा विजापुरात तैनात होता. त्याला सजावारखानाकडे तैनात करण्यात आले.

## ६ नोव्हेंबर १६९५

खानाजादखान याचा मुलगा मुहंमद खलील याला दीड हजार रुपये किंमतीचा शिरपेच बक्षीस म्हणून देण्यात आला.

मीर आतिश अन्वरखान(?) याला बादशहा म्हणाले, 'तयार रहा. गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी मी तुमच्या बरोबर पाच हजार स्वार देऊन अकलूजकडे रवाना करणार आहे.'

आज्ञा झाली की : एक हजार अश्रफ्या व दहा हजार रुपये खानाजादखानाच्या सैनिकांना देण्यात यावेत.

गंजाचा (बाजाराचा) करोडी (व्यवस्थापक) शरीफखान हा मरण पावला.

## ७ नोव्हेंबर १६९५

खानाजादखान याच्या बरोबर चार हजार आठशे स्वार देऊन त्याला धनाजी जाधवाचे परिपत्य करण्यासाठी असदनगर अकलूजकडे पाठविण्यात आले. हरावलीला (आघाडीला) सफशिकनखान, उजव्या फळीला असालतखान, डाव्या फळीला मुहंमद मुरादखान, अशी खानाजादखानाच्या सैन्याची बादशहांनी रचना केली. यक्काताजखान हा असदनगर अकलूजकडे या पूर्वीच गेला होता. त्यांने चंदावल(पिछाडी) सांभाळावी असे ठरले.

जुन्नरच्या बातम्यावरून कळले की : गनिमांचे लोक या भागात आले. त्यांनी अरणगाव(?) लुटून गुरेढोरे नेली. येथील किल्लेदार व फौजदार मन्सूरखान याचा नायब मुहंमद काजिम हा कुंवारी किल्ल्याकडे गेला आहे. गनिमांचा बेत हा कसबा लुटण्याचा दिसतो. आज्ञा झाली की : याबद्दल मन्सूरखानाला ताकीदपत्र पाठविण्यात यावे.

हैदराबादचा सुभेदार जानसिपारखान याने विनंती लिहून पाठविली की : या सुभ्यात ठिकठिकाणी मिळून पाच हजार बंदूकची तैनात आहेत. त्यापैकी दीड हजार मृत अगर फरारी आहेत. आज्ञा झाली की : पाचशे माणसे नेमण्यात यावीत.

वारुगडचा किल्लेदार शामसिंग याचा विनंती अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

विजापुराहून आंब्याच्या दोन करंड्या ख्वाजा जरीफ याने पाठविल्या होत्या. बादशहांनी त्या नजरेखालून घातल्या.

गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याने लिहिले की : हलकट गनिमांनी (मराठ्यांनी) बेत केला आहे की, नांदेड, वऱ्हाड, खानदेश व औरंगाबाद या प्रांतात जाऊन लुटालूट करावी. त्या त्या प्रांतातील सुभेदार, फौजदार, ठाणेदार इत्यादींना आज्ञा व्हावी की : त्यांनी आपल्या सरहद्दीवर ससैन्य येऊन ठाण मांडावे म्हणजे गनीम तिकडे आले की त्यांचे पारिपात्य करता येईल. आज्ञा झाली की : बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने सुभेदार वगैरेंना पत्रे लिहावी आणि ती मुद्दाम गुर्जबर्दाराच्याद्वारे पोहोचविण्यात यावी.

### ८ नोव्हेंबर १६९५

सोलापूरच्या बागा पाहण्यासाठी ख्वाजा याकूत गेला होता. तो परत येऊन बादशहाला भेटला. सोलापूरचा किल्लेदार मिह्दीखान याने भाजीच्या दोन करंड्या पाठविल्या. बादशहांनी सांगितले की : सोलापूरच्या बागेत तीन बंगले आहेत. त्या पैकी एकाची पक्की इमारत बांधावी.

मिह्दीखानाने कळविले होते की : किल्ल्यात काही कैदी बरेच दिवसापासून आहेत. त्यांची काही हकीकत कळत नाही. चौकशी करावी म्हणून आज्ञा झाली.

### ९ नोव्हेंबर १६९५

यक्कताजखान यास खानाजादखानाच्या फौजेत नेऊन पोहोचविण्यासाठी मुबारक यसावल याला नेमण्यात आले.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिह्दीखान याने आपल्या स्वतःच्या हाताखालील माणसांची यादी हुजुरात द्यावी अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखान बहादुर याच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : रुद्रसिंग याचा मुलगा सुल्तानसिंग याला सातशे जात व सातशे स्वार अशी मन्सब होती. तो जुल्फिकारखानाची छावणी सोडून आपल्या जहागिरीत जाऊन बसला. आज्ञा झाली की : त्याची जहागीर काढून घ्यावी.

### १० नोव्हेंबर १६९५

राजा भीम (उदयपूरचा राजपुत्र) याची पृथ्वीसिंग वगैरे दोन मुले ही आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर बादशहाला भेटण्यासाठी पन्हाळगडाहून (तिकडील आघाडीवरून) आली. त्याना सांत्वनाची वस्त्रे देण्यात आली.

बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने विनंती केली की : इखलासखान मियाना म्हणतो की, 'आपली परिस्थिति समाधानकारक नाही. सहा महिन्यासाठी मला आपल्या नरसी या जहागिरीत जाऊन राहाण्याची परवानगी द्यावी.' विनंती मान्य करण्यात आली.

आतिशखानाचा भाऊ मुहंमद यूसफ याजकडे औरंगाबाद व त्या सुभ्यातील किल्ल्यातील सरंजाम तपासण्याचे काम होते. त्याला अमानतखानाच्या ऐवजी औरंगाबादेची किल्लेदारी देण्यात आली. अमानतखानाला हुजुरात बोलावण्यात आले.

फाजिलखान याने औरंगाबाद व तेथील तलाव यांचे नकाशे बादशहाच्या समोर ठेवले. बादशहांनी वाकियानिगार भोलानाथ याला सांगितले, 'येथून औरंगाबादेपर्यंत मजला कोणत्या व किती आहेत याची माहिती लिहून ख्वाजा याकूत याला द्या. मी त्याला औरंगाबादेतील तलाव दुरुस्त करण्यासाठी पाठविणार आहे.'

### ११ नोव्हेंबर १६९५

सौदागराने चवदा हत्ती विकण्यास आणले. नऊ हत्ती विकत घ्यावे अशी आज्ञा झाली.

शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात खानजमान फतेहजंग (मुकरबखान) याची

मुले इख्तिसासखान वगैरे ही होती. त्यांची मन्सब वाढविण्यात आली.

रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याला खास फर्मान पाठविण्यात यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

रावदलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद्र याला बादशाही हत्तीघोडे इत्यादींच्या खुराकाची बाब माफ करण्यात आली. त्याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती.

गाजिउद्दीनखान बहादुर याला आज्ञा देण्यात आली की : बादशहाकडून पाठविण्यात आलेला रहमतुल्ला हा मन्सबदार तुमच्या सैन्यातील काही पथके बरोबर घेऊन अहमदनगरला जाईल. तेथील पीलखान्या (हत्तीखाना) ची काळजी घेईल. तिकडचे फौजदार व ठाणेदार सावधपणे काम करीत आहेत असे दिसल्यास तुमची पथके तुमच्याकडे पाठविण्यात येतील व रहमतुल्ला हुजुरात परत येईल.

## १२ नोव्हेंबर १६९५

विजापूरचा सुभेदार सय्यदलष्करखान याची मुले अजीजुल्ला व अबूसईद ही येऊन बादशहाला भेटली.

मामूरखानाच्या फौजेत तैनात असलेला हरचंदराय हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहांना भेटला.

जुन्नरचा किल्लेदार व फौजदार मन्सूरखान याने कुंवारीचा किल्ला घेतला. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या त्याने बादशहाकडे पाठविल्या. बादशहांनी त्या नजरेखालून घातल्या.

## १३ नोव्हेंबर १६९५

आज बादशहा सोलापूरला रवाना झाले. नावांच्या द्वारे त्यांनी (ब्रह्मपुरीजवळ) भीमा ओलांडली. असदखानाला त्यांनी (ब्रह्मपुरी) तळाच्या रक्षणार्थ मागे ठेवले. नंतर ते तख्ते रवां (उघड्या पालखी सारखे वाहन) वर बसून सहा कोसावर असलेल्या कामानी या गावी थांबले. वाटेत त्यांच्या आज्ञेवरून शहाजादा आज्जम याने बादशहाच्या घोड्यावर स्वार होऊन त्याची चाल पाहिली.

रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याची अर्जी आली. ती बादशहाने नजरेखालून घातली.

## १४ नोव्हेंबर १६९५

आज बादशहा कामानीहून निघाले. ते अर्धा कोस घोड्यावरून स्वार होऊन गले. नतर तख्ते रवांवर बसून त्यांनी चार कोसांचा प्रवास केला. नंतर ते सोलापूरला मुक्कामाला आले.

विजापूरच्या किल्ले अर्कचा किल्लेदार ताजमहमुद याने राजीनामा दिला. त्याच्या ऐवजी फतेहबेगची नेमणूक करण्यात आली.

खटाव व रहमतपूरचा ठाणेदार रामचंद याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. त्याला दोन हजार जात व बाराशे स्वार (त्यापैकी एक हजार दोअस्पा म्हणजे दोन घोडी)

अशी मन्सब होती. त्यात शंभर दोअस्पाची वाढ करण्यात आली.

मसूरचा ठाणेदार मंबाजी याला दोन हजार जात व एक हजार स्वार (चारशे दोअस्पा) अशी मन्सब होती. तीत तीनशे स्वारांची वाढ करण्यात आली.

ठाणे मोडनिंब (?) येथील किल्लेदार व फौजदार ख्वाजाखुर्द याला कूचकखान ही पदवी देण्यात आली.

### १५ नोव्हेंबर १६९५

बादशहा शुक्रवारच्या नमाजासाठी घोड्यावर स्वार होऊन शहाजादे आज्जम, कामबक्ष, वालाजाह व अमीर उमराव यांजबरोबर शहरातील जुम्मामशिदीत गेले. नमाज पढून झाल्यावर तसेच घोड्यावर स्वार होऊन ते आपल्या निवासस्थानी परत आले.

### १६ नोव्हेंबर १६९५

आज बादशहा सोलापुराहून परत फिरले.

एकोजीचा मुलगा सुल्तानजी हा मुहंमद मुनीम याच्या मध्यस्थीने बादशहांना भेटला. त्याला बाराशेची मन्सब देण्यात आली. तसेच आपल्या भाऊबंदांना चाकरीत घेण्याची त्याला परवानगी देण्यात आली.

हाजी मुहंमद मुकीम हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तोफखान्याचा दारोगा (व्यवस्थापक) होता. त्याला तीरअंदाजखान याच्या जागी शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात तोफखान्याचा दारोगा म्हणून नेमण्यात आले. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव हा सातारगडाहून निघून भटकत होता. नंतर तो कृष्णा ओलांडून भागदुर्ग (रामदुर्ग) ला पोहोचला. त्याला जाऊन मिळावे असा संताजीचा बेत आहे. नदीच्या पलीकडे हिंमतखान बहादुर हा संताजीचा पाठलाग करीत आहे.

### १८ नोव्हेंबर १६९५

शिरडशहापूर (परभणी जिल्हा?) येथील फौजदार अब्दुल्हादी याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

कळविण्यात आले की : गुर्जबर्दार तमरबेग हा केज (बीड जिल्हा?) येथे येऊन बसला असून शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत रसद, घासदाणा पाठविण्यासाठी फार तगादा करीत आहे. त्याचा हेतू वेगळाच दिसतो. आज्ञा झाली की : त्याची दोनशेची मन्सब काढून घेण्यात येऊन दुसऱ्या कुणाची तरी नेमणूक करावी.

### १९ डिसेंबर १६९५

बहादुरगडचा किल्लेदार व फौजदार अब्बासखान याने काही वस्तू नजर म्हणून पाठविल्या.

पारोद्याचा किल्लेदार मुहंमद यूनुस याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

कळविण्यात आले की : देवीसिंगचा मुलगा हा स्वदेशी जाऊन बसला आहे. आज्ञा झाली की : त्याची नेमणूक मानेगड (?) च्या किल्लेदारीवर करण्यात यावी. गुर्जबर्दार पाठवून त्याला हुजुरात घेऊन यावे.

* * *

# नऊ

## १५ जानेवारी १६९६ ते ३ सप्टेंबर १६९६

### १५ जानेवारी १६९६

मरहूम कासिमखान (हा दोड्डेरीच्या वेढ्यात वारला). त्याची मालमत्ता ताब्यात घेण्यासाठी मुहंमद जाफर याला नेमण्यात आले.

विजापूरचा दिवाण मुहम्मद हादी याला आज्ञा झाली की: तयार रहा. तुम्ही इकडे आल्यावर तुम्हाला आतिशखानाच्या फौजेबरोबर जावे लागेल.

मरहूम कासिमखान याच्या सैनिकांना हिंमतखान बहादुर याच्या फौजेत तैनात करण्यात यावे अशी आज्ञा झाली.

मतलबखान याच्या तैनातीत असलेले यसावल व हरावल सैनिक यांना पगार म्हणून दोन हजार रुपये देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

बादशहा हे बक्षीउलमुल्क मुखलिसखान यास म्हणाले, 'रुस्तमदिलखान हा खानाजादखानाच्या कुमकेला गेला आहे. त्याला गनिमांनी (मराठ्यांनी) घेरले आहे. विजापुरी कर्नाटकचा फौजदार हिंमतखान बहादुर याला लिहा की, 'तुम्ही, खानाजादखान, रुस्तम कुलीखान इत्यादि सरदारांची सुटका करवून आपल्याकडे घेऊन जा. हमीदुद्दीनखान हा खानाजादखानाला बसवापट्टणच्या मार्गे हुजुरात घेऊन येईल.

### १६ जानेवारी १६९६

बंडखोर शहाजादा अकबर याच्या मुलींना अकबराबाद आग्र्याकडे जाण्यास निरोप

देण्यात आला.

दंडराजपुरीचा किल्लेदार सिद्दी याकूत याला फर्मान पाठविण्याची व्यवस्था करण्यात आली.

मरहूम शम्सुद्दीन मुहंमदखान याचा भाऊ मुहंमद बाकर याला विजापुरी कर्नाटकचा दिवाण म्हणून नेमण्यात आले.

कळविण्यात आले की : गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी आतिशखान हा गुलबर्ग्याकडे गेला आहे. बादशहा म्हणाले 'बरे केले.' बादशहाच्या छावणीतून एक फौज आतिशखानाकडे तैनात करावी अशी आज्ञा झाली.

## १८ जानेवारी १६९६

जुल्फिकारखानाच्या फौजेतून कळले की : धनाजी जाधव हा सैन्य घेऊन आला. जुल्फिकारखानानेहि आपले सैन्य तयार केले. उभयतांचे युद्ध झाले. शत्रूपैकी अनेकजण ठार झाले. शत्रूचा पराजय झाला. तो (धनाजी जाधव) जिंजीकडे पळाला.

मरहूम इस्लामखान याचा मुलगा निजामुद्दीन अहमद याला लुत्फुल्लाच्या सैन्यात बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

आतिशखानाने गुलबर्ग्याहून निघून गनिमांची वाट बंद करून त्यांचे पारिपत्य करण्यासाठी फीरोजगडकडे जावे अशी आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हिंमतखान बहादुर हा बसवापट्टणपाशी पोहोचला. खानजहान बहादुर (हिंमतखानाचा बाप बहादुरखान) याने पाठविलेले पथक त्याच्याबरोबर आहे. पण बादशाही अधिकारी व पथके पोहोचली नाहीत. सैन्य थोडे असल्यामुळे हिंमतखान बहादुर पुढे सरकू शकत नाही.

राजा उदयसिंग हा शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात तैनात होता. तेथून त्याला हमीदुद्दीनखानाच्या सैन्यात तैनात करण्यात आले.

## १९ जानेवारी १६९६

हिंमतखान बहादुर याने खानाजादखानाची मदत करावी अशा अर्थाचे फर्मान बादशहांनी गुर्जबर्दारच्या हाती धाडले होते. गुर्जबर्दाराने फर्मान पोहोचविले. परत येऊन त्याने पुढील हकीकत सांगितली :–

हिंमतखान बहादूर हा बसवापट्टण येथ आहे. खानाजादखान (दोड्डेरीच्या वेढ्यातील फजीत सरदार) वगैरेंना मदत करण्यात आली. खानाजादखान याला वस्त्रे, पोशाख, चार हत्ती, चार घोडे व दोन हजार होन देण्यात आले. सफशिकनखान याला वस्त्रे, घोडा व एक हजार रुपये देण्यात आले. इतरांनाहि कमी अधिक प्रमाणात मदत देण्यात आली. ही सर्व मदत हिंमतखान बहादुरने स्वतःकडून केली. त्याने खानाजादखान वगैरेंना अधोनीपर्यंत पोहोचविण्यासाठी पाचशे स्वार बरोबर दिले आहेत. अधोनीहून ती सरदार मंडळी हुजुरात येतील. हिंमतखान बहादुर व हमीदुद्दीनखान यांच्याशी लढण्यासाठी बंडखोराने (संताजी घोरपडे)

दोन सन्ये तयार केली आहेत. हिंमतखान बहादुराने गढीत ठाणे केले आहे. बादशहांनी विचारले की, 'तो तेथे केव्हा पोहोचला.' कळविण्यात आले की : चार पाच दिवसा-आधी. बंडखोरांनी (मराठयांनी) कासिमखानाचे एकूण सैन्य व सरंजाम लुटून नेले.

## २० जानेवारी १६९६

लुत्फुल्ला हा गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी गेला होता. त्याला परत येण्याची आज्ञा करण्यात आली.

अधोनीचा किल्लेदार व फौजदार याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## २२ जानेवारी १६९६

आज शुक्रवारची नमाज पढण्यासाठी बादशहा हे इस्लामपूर ब्रह्मपुरीहून सोलापूरकडे रवाना झाले. खानजहान बहादुर, बहरामंदखान, मुखलिसखान, सियादतखान, वगैरेंनी बरोबर रहावे अशी आज्ञा झाली.

राजा अवधूतसिंग याला गुर्जबर्दाराच्या द्वारे हमीदुद्दीनखानाच्या फौजेत तैनात करून तेथे पोहोचविण्यात आले.

मरहूम कासिमखान याची मालमत्ता जप्त करण्यासाठी महमद जाफर याला पाठविण्याचे ठरले होते. आता त्याने जाण्याची जरूरी नाही. फक्त मुरलीधर याला पाठविले की पुरे अशी आज्ञा झाली.

काल हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : लुत्फुल्लाखानाचा मुक्काम पंढरपूरला होता रात्री त्याच्या तंबूत एक चोर शिरला. पलंगावरील खंजीर उचलून त्याने खानावर हल्ला करण्याचा बेत केला. खानाने त्याच्या हातातून खंजीर काढून घेऊन त्याला ठार मारले. बादशहांनी आज याबद्दल लुत्फुल्लाखानापाशी चौकशी केली.

## २३ जानेवारी १६९६

आज कामानी या गावापाशी सीना नदी ओलांडून बादशहा सोलापूरला पोहोचले.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान वगैरेंनी बादशहाची भेट घेतली.

अलमला येथील फौजदार मीर हादीखान याने विनंती लिहून पाठविली की : मला एक हजार रुपये देण्यात यावेत. येथील देशमुखाचा गनिमांशी राबता (जाणे येणे) आहे. याशिवाय सैन्यसामग्री द्यावी. आज्ञा झाली की : तोफ व त्याबरोबरचा लवाजमा मीर हादीकडे देण्यात यावा.

## २४ जानेवारी १६९६

बादशहा आज घोडयावर स्वार होऊन जुम्मामशिदीत गेले. तेथे ते शुक्रवारची नमाज पढले.

जुल्फिकारखान बहादुर याच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : कोट्याचा राजा किशोरसिंग हाडा हा तेथील छावणीत होता. तो मरण पावला. त्याला अडीच हजार जात व तीन हजार स्वार अशी मन्सब होती.

बादशहांना कळविण्यात आले की : दोड्डेरीच्या अलीकडे अठरा कोसांवर कनकगिरी

येथे खानाजादखान व हमीदुद्दीनखान यांची गाठ पडली.

### २५ जानेवारी १६९६

आज बादशहा सोलापुराहून रवाना झाले. त्यांनी कामानीला मुक्काम केला.

यारअलीबेगने कळविले की : हिंमतखान बहादुर याने पुढीलप्रमाणे पत्र पाठविले आहे :– संताजी हा मोठे सैन्य घेऊन बसवापट्टणवर चालून आला आहे. माझ्यापाशी सैन्य फार थोडे आहे. अद्याप बादशाही सरदारांची कुमक आली नाही. जी परिस्थिती आहे ती कळवीत आहे. मी प्रयत्नाची पराकाष्टा करीन. बादशहांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनखान व रुस्तमकुलीखान यांना लिहा की, तुम्ही अद्याप हिंमतखान बहादुरच्या सहाय्यार्थ गेला नाहीत. तुम्ही तातडीने जावे.

### २६ जानेवारी १६९६

आज बादशहा छावणीला (ब्रह्मपुरी) परतले.

बादशहा मुल्तफतखानाला म्हणाले, 'तुम्ही खानजहान बहादूर (बहादुरखान, हिंमतखान बहादुरचा बाप) च्या डेऱ्यावर जा. त्यांना पुढीलप्रमाणे सांगा :– शहाजादा मुहंमद बेदारबख्त याला पन्हाळगडच्या आघाडीवरून काढून संताजीचे पारिपत्य करण्यासाठी बसवापट्टणकडे पाठवितो. पन्हाळ्याच्या वेढ्याचे काम गाजिउद्दीनखान बहादुर याजकडे देतो व तुम्हाला गाजिउद्दीनखान बहादुरच्या जागेवर नेमतो. मुल्तफातखान हा खानजहान याला विचारून आला. त्याने बादशहांना कळविले की : खानजहान म्हणतात' माझी काही हरकत नाही. पण माझ्याबरोबर सैन्य नेमून देण्यात यावे. बादशहांनी आज्ञा केली की: शहाजाद बेदारबख्त याच्याकडे पाठविण्यासाठी फर्मान तयार करा.

### २७ जानेवारी १६९६

हनमंतगडचा ( ? ) बदललेला किल्लेदार सय्यद शुजाअत हा येऊन बादशहाला भेटला.

वैजापूर (?) चा फौजदार मुहंमदजमान हा होता. त्याच्या जागी जैनुलाबिदीनखान याची नेमणूक करण्यात आली.

म्हस्की मुद्गलचा फौजदार मुहंमद फाजिल याची मन्सब वाढविण्यात आली.

इंडी (?) चा ठाणेदार जाधवराव याला चारशेची मन्सब होती. ती वाढविण्यात आली.

### २८ जानेवारी १६९६

कान्हो बाबर ( ? ) ला गंजूनहर (गंजन ?) च्या देशमुखीवर नेमण्यात येऊन त्याला एक शाल देण्यात आली.

बीडचा फौजदार मामूरखान याने लिहिले की : परसळा (शिरसाळा) चा बदललेला फौजदार मुहंमद वजीर याने व्यवस्था चांगली ठेवली आहे. त्याला त्या जागेवर पूर्वीप्रमाणे बहाल करण्यात यावे. बादशहांनी ती मान्य करून वजीरखानाला मामूरखानापाशी तैनात करण्याची आज्ञा केली.

बादशहांनी वाकियानिगार भोलानाथ याला म्हटले, 'पन्हाळगडाहून बसवापट्टण-पर्यंत किती कोस अंतर आहे व किती मजला होतात याचा तपास काढून कळवा.'

गुलशनाबाद (नाशिक) चा ठाणेदार मातबरखान याच्यापाशी रावतमल झाला हा तैनात होता. त्याची नामीगड (?) च्या किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजकडे पाठविण्याचे फर्मान गुर्जबर्दारांच्याकडे देण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : वीस जानेवारी १६९६ (चोवीस जमादिसानी) रोजी संताजी तीन चार हजार घोडेस्वारांनिशी हिंमतखान बहादुरावर चालून आला. हिंमतखान आपल्या मोर्च्यातून बाहेर पडला. शत्रूपैकी अनेकजण ठार अगर जखमी झाले. हिंमतखान आपल्या मोर्च्यात परत आला. तो त्याला बंदुकीची गोळी लागली. त्याच्याबरोबर बलरसखान हा होता. तोहि जखमी झाला.

## २९ जानेवारी १६९६

किशोरसिंग हाडा याची कोटा येथील जहागीर त्याचा मुलगा रामसिंग याला देण्यात आली.

काल रात्री बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान याजबरोबर खलबते केली. बादशहा म्हणाले, 'शहाजादा बेदारबख्त, गाजिउद्दीनखान बहादुर, हिंमतखान बहादुर, हमीदुद्दीनखानबहादुर, व रुस्तमदिलखान यांजपाशी एकंदर सैन्य किती आहे व या सैन्याची सामग्री काय आहे कळवा.' त्याप्रमाणे कळविण्यात आले.

## ३० जानेवारी १६९६

बादशहांनी (दोड्डेरीच्या वेढ्यात फजीत पावलेल्या) पुढील इसमांच्या पुढीलप्रमाणे बदल्या केल्या. खानाजादखान, अजमीरच्या सुभेदारीवर, सफशिकनखान, धामोनी (मध्यप्रदेश, सागरजवळ) च्या फौजदारीवर, मुहंमद मुरादखान, सुभे अजमीरची दिवाणी, सय्यद असालतखान, रणथंबोर (राजस्थान) ची किल्लेदारी.

किशोरसिंगाचा नातू भीमसिंग याला गणखेरी (?) ची व बदामीची फौजदारी देण्यात आली. तेथे पूर्वी रामसिंग फौजदार होता.

## १ फेब्रुवारी १६९६

विजापूरचा दिवाण व अलमेलाचा ठाणेदार मीरहादी याला आपल्या स्थळी जाण्यास निरोप देण्यात आला.

कळविण्यात आले की : परलोकवासी किशोरसिंग याची पथके देशीहून आली असून जिंजीकडे रवाना होऊ इच्छितात. बादशहा म्हणाले, 'त्यांना उद्या हजर राहाण्यास सांगा. मी त्यांची पाहणी करीन.'

जुन्नरचा फौजदार मन्सूरखान याच्या नावाने आज्ञापत्र (हस्बुलहुकुम) पाठविण्यात आले.

## २ फेब्रुवारी १६९६

कळविण्यात आले की : गदग येथून खजिना आणावयाचा आहे. लुत्फुल्लाखानाला

तो आणण्यास जाण्यासाठी तयार रहावयास सांगण्यात आले. त्याच्या बरोबर अडीच हजार स्वार हवेत. तितके पथक तयार करण्यात यावे अशी आज्ञा झाली.

खानाजादखानाच्या तोफखान्यातील माणसांना हुजुरात बोलावण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

नरसापूर(?)च्या बातम्यावरून कळले की : लुटालूट करण्याच्या उद्देशाने गनिमांचे एक हजार स्वार या भागात चालून आले आणि इकडील खेडी त्यांनी लुटली. तेथील बदललेला फौजदार मुहंमद अमान याने गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी मुहंमदअली यास पाठविले. शत्रूपैकी अनेकजण ठार झाले. स्वतः मुहंमदअली हाहि मारला गेला. त्याला दोनशे जात व पन्नास स्वार अशी मन्सब होती.

### ३ फेब्रुवारी १६९६

मरहूम हिंमतखान याचा मुलगा सय्यद मुहंमद हुसेन याला मुहंमद मुरादखान याच्या ऐवजी मीर तुजुक(शिष्टाचारपालनाचा दरबारातील अधिकारी)म्हणून नेमण्यात आले.

बादशहा म्हणाले, 'हमीदुद्दीनखानाला लिहा, तुम्ही निम्मे सैन्य घेऊन हुजुरात या. निम्मे सैन्य शहाजादा बेदारबख्त याजकडे तैनात करण्यात येईल.'

हिंमतखान बहादुरच्या फौजेतून काल बातमी कळली ती अशी : संताजी (घोरपडे) हा दहा हजार स्वार व बारा हजार पायदळ सैनिक घेऊन हिंमतखान बहादुरावर चालून आला. संताजीचे कर्नाटकी प्यादे एका डोंगरावर जमलेले आढळले. हिंमतखान बहादुर हा स्वतःचे सैन्य घेऊन त्यांच्यावर चालून गेला. जवळ जवळ पाचशे प्यादे ठार झाले. यानंतर संताजीचा समाचार घेण्यासाठी तो हत्तीवर बसून निघाला. तो संताजी व त्याचे सैन्य याजवर तुटून पडला. या सुमारास हिंमतखान बहादुराच्या कपाळाला बंदुकीची गोळी लागली. जखमी अवस्थेत तो आपल्या मोर्च्यात दाखल झाला. बादशाही सैन्यातील अलीबाकी वगैरे जमादारांनी शत्रूशी युद्ध चालू ठेवले. यातच अलीबाकीला बाण व तलवार यांच्या जखमा होऊन तो जमिनीवर कोसळला. गनिमांचे सैनिक त्याला घेऊन गेले. त्याच्या मुलाने लढा चालू ठेवला. संताजीला बाणाच्या दोन जखमा झाल्या. मोगलांचे सैन्य मोर्च्यात परतले. वीस जानेवारी १६९६च्या मध्यरात्री हिंमतखान बहादुर मरण पावला. हिंमतखान बहादुराचे जवळ जवळ तीनशे सैनिक परागंदा झाले व वाट फूटेल तिकडे पळाले.

आज उम्दतुल्मुल्क खानजहान बहादूर हा बादशहाकडे आला आणि म्हणाला की, 'हिंमतखान बहादूर हा आपल्या सेवेत मरण पावला. माझी हीच इच्छा आहे की आपल्या सेवेत मीहि कामी यावे.'

बादशहा फातेहा (मृतांसाठी प्रार्थना) पढून म्हणाले की, 'खान बहादुर हा शहीद (धर्मकार्यार्थ हुतात्मा) झाला.' असे म्हणून त्यांनी खानजहानला आपल्या डेऱ्याकडे जाण्यास निरोप दिला.

बादशहा शहाजादा कामबक्ष याला म्हणाले, 'खानजहान बहादुराच्या समाचारासाठी त्याच्या डेऱ्यावर जा. 'त्याप्रमाणे शहाजादा त्याच्या डेऱ्यावर जाऊन आला.'

बादशहांनी आपल्या मुदपाकखान्याचा मुख्य अधिकारी नेमतखान याला म्हटले, 'तुम्ही व मुल्तफतखान असे दोघे भोजनाचे खानजहानच्या डेऱ्यावर घेऊन जा व त्यांना जेऊ घालून परत या.'

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'जेवरगी, फीरोजगड, (गुलबर्गा जिल्हा) वगैरे किल्ल्यांच्या किल्लेदारांना लिहून कळवा की, त्यांनी आपापल्या किल्ल्याबाबत अत्यंत सावधगिरी बाळगावी.

गाजिउद्दीनखान बहादुराकडून कळले की : गनीम हे लुटालूट करण्याच्या उद्देशाने वऱ्हाड व खानदेश या सुभ्याकडे गेले आहेत. चीनकुलीजखानबहादुर (भावी निजामुल्मुल्क) यांना सैन्य देऊन त्यांच्या पाठलागावर पाठविण्यात आले आहे.

## ४ फेब्रुवारी १६९६

किशोरसिंग (हाडा) ची हरीसिंग वगैरे माणसे आज बादशहांना भेटली. त्यांना बक्षिसे देण्यात आली.

कळविण्यात आले की : किशोरसिंगाच्या पथकातील माणसे बाहेर उभी आहेत. बादशहांनी ऐंशी स्वारांची पाहणी केली व त्यांना लुत्फुल्लाखानापाशी तैनात करावे अशी आज्ञा केली.

कळविण्यात आले की : लक्ष्मीकांत हा आतिशखानाच्या फौजेत तैनात होता. तो छावणी सोडून निघून गेला. त्याला दीड हजार जात व शंभर स्वार अशी मन्सब होती.

कोटरीपियाराच्या फौजदारीवरून इरादतखानाला बदलून त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

सुल्तानपूर नंदुरबारचा फौजदार बहरोजखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## ५ फेब्रुवारी १६९६

महादजी माने याला अडीच हजार स्वार अशी मन्सब होती. त्याच्याकडे नाहरगाव (?) तालुक्याची व्यवस्था होती. सजावली (अंमलबजावणीचे अधिकारी) पाठवून त्याला हुजुरात बोलावण्यात आले व तेथून त्याला स्वतःच्या तालूक्यात पाठवावे असे ठरले. मतलबखानाने विनंती केली की : महादजीचे म्हणणे आहे की, 'मला जहागीर नसल्यामुळे माझी आर्थिक परिस्थिती खालावली आहे. माझी माणसे ठाण्याची व्यवस्था नीट ठेवीत आहेत. मला जहागीरीचा परवाना मिळताच मी कामावर जाईन.' बादशहा म्हणाले, 'सध्या तुम्ही जा. जहागिरीचा परवाना दियानतखानाकडून घ्या.' महादजीने ते कबूल केले नाही. त्याने कमरेची तल्वार काढून सांगितले की : मला नोकरीची जरूरी नाही.' यावर बादशहा म्हणाले की, याला कैदेत टाका. मातबर जामीन मिळाला तरच सोडा.'

सरुपगडचा बदललेला फौजदार खिदमतअलीखान याला पूर्वीप्रमाणेच अंकोल्याच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले.

सोलापूरचा कालवा नीट करण्यासाठी दोनशे बेलदार व शंभर कहार पाठविण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

बादशहा हे बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास म्हणाले की, 'अहमदाबाद, अजमीर अकबराबाद, शहाजहानाबाद, लाहोर व अलाहाबाद या सुभ्यात किती सैन्य आहे ते मला कळविण्यात यावे.'

बादशहांनी आज्ञा केली की : हुजुरात आलेले एकशे पासष्ट बंदूकची यांना शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात पोहोचविण्यात यावे.

बादशहा बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'चांद्याचा राजा किसनसिंग व पवनारचा फौजदार सद्रुद्दीन मुहंमदखान यांना लिहा की, चीनकुलीजखानबहादुर हे गनिमांच्या पारिपत्यासाठी तुमच्या प्रांतात येतील त्यावेळी तुम्ही त्यांच्याशी मिळून गनीम मोडून काढावा.

## ८ फेब्रुवारी १६९६

तख्ते रवां(वाहन)चा दारोगा फतेह दौलत याला बादशहांनी आज्ञा केली की : ज्या दिवशी मला रोजा(उपवास) असेल त्यादिवशी माझ्या येण्याजाण्यासाठी न्यायालयात पालखी मेणा ठेवीत जा. त्याप्रमाणे करण्यात आले.

होशंगाबादचा बदललेला फौजदार मोतिकदखान याला बीड वगैरेच्या फौजदारीवर नेमण्यात आले. बीडवर यापूर्वी मामूरखान हा फौजदार होता.

## १० फेब्रुवारी १६९६

बादशहा आज सकाळ संध्याकाळचे नमाज(फजर, जोहर) आपल्या शय्यामंदिरातच पढले. असरच्या नमाजाच्या वेळी(उतरत्या उन्हाच्या वेळी) ते प्रार्थनागृहात (तस्बीहखाना, जपाची जागा) आले. तेथे त्यांनी शहाजादा आज्जम, शहाजादा कामबक्ष, असदखान, सियादतखान, मुल्तफतखान व पेश इमाम यांना बोलावून घेतले व समूहासहित ते असरची नमाज पढले.

कळविण्यात आले की : नसुल्लाखान व खुस्रोखान यांनी गदगचा खजिना विजापूरला आणला आहे. खुस्रोखान हा तो खजिना विजापुराहून आणीत आहे. आता लुत्फल्लाखानाने जाण्याची जरुर नाही अशी आज्ञा झाली.

## ११ फेब्रुवारी १६९६

फराशखान्याचा मुश्रफ(अधिकारी) अब्दुल्है याला बादशहा म्हणाले, 'माझ्या प्रार्थनागृहाच्या(तसबीहखाना) या बाजूला एक खिडकी(झरोका) करून द्या. म्हणजे न्यायदान मागणाऱ्यांना बोलावून न्यायदानाचे काम करता येईल. तसे करण्यात आले.

## १२ फेब्रुवारी १६९६

बादशहांनी दीवाणे आम व खासचे काम बंद ठेवले. तेरा व चवदा रजब (सात ते आठ फेब्रुवारी)ला बादशहांनी रोजा(उपवास) केला. पंधरा तारखेलाहि रोजा(उपवास) होता. उन्हाळ्यामुळे बादशहा अशक्त झाले. शहजादा आज्जम हा आल्यावर बादशहांनी

इफ्तार(पारणे) केला. नंतर हकीम(वैद्य) मुहंमद सादिक याला बोलावून बादशहा सरबत प्याले.

मथुरेचा फौजदार बिशनसिंग ( मिर्जा राजा जयसिंग याचा पणतू ) याला हुजुरात बोलावण्यासाठी मुद्दाम गुर्जबर्दार पाठविण्यात आला.

खानजहान बहादुर याने तीस खर्बुजे, पन्नास सफरचंद व दोनशे डाळिंबे बादशहाकडे पाठविली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हमीदुद्दीनखान व रुस्तमखान वगैरेंनी जड सामन अधोनीच्या किल्ल्यात ठेवले व पाच हजार स्वार व सात हजार पायदळ सैनिक बरोबर घेऊन एक फेब्रुवारी रोजी ते संताजीच्या पारिपत्यासाठी बसवापट्टणकडे रवाना झाले.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार याने अर्जी पाठविली होती ती बादशहांनी नजरेखालून घातली.

आज्ञेप्रमाणे वाकियानिगार भोलानाथ याने अधोनीच्या किल्ल्याचा नकाशा बादशहाला दाखविला.

बादशहांना कळविण्यात आले की : हिंमतखान बहादुर याजकडे अठरा लाख रुपये सरकारी देणे निघत आहे. बादशहांनी ती सगळी रक्कम माफ केली व हिंमतखान बहादुर याच्या कारभाऱ्यांना हुजुरात येण्याची आज्ञा केली.

बादशहा सियादतखानाला म्हणाले, 'अब्दुल्खलिक गुर्जबर्दार हा वऱ्हाडात आहे. गनिमांच्या पारिपत्यासाठी चीनकुलीजखानबहादुर अद्याप त्या भागात पोहोचला की नाही हे गुर्जबर्दाराला लिहून विचारा. म्हणजे वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याला चिनकुलीजखानाला जाऊन मिळण्याविषयी ताकीद पाठविण्यात येईल.'

## तेरा फेब्रुवारी १६९६

आज बादशहा मेण्यात बसून आपल्या निवासस्थानातून न्यायकचेरीत आले. न्यायालयात ते तीन घटका होते.

खानजहान याने दोन हजार रुपये पेशकश बादशहांना नजर केली. बादशहांनी ती माफ केली. तसेच न्यायालयाचे काम संपण्यापूर्वीच खानजहान याला आपल्या तंबूत परत जाण्याची परवानगी देण्यात आली.

सकाळच्या वेळी बादशहांनी ख्वाजा याकूतला सांगितले, 'महालातून एक हजार रुपये घेऊन जा व सोलापूरची विहीर स्वच्छ करा.' ख्वाजा याकूतने कहारांचा दारोगा दूलानाला, बेलदारांचा दारोगा हीराचंद, कचेरीचा दारोगा हाजी सुहराब इत्यादींना आज्ञेप्रमाणे बरोबर घेतले. बादशहा म्हणाले, 'विहीर लवकर तयार(साफ) करा. तोपर्यन्त ख्वाजा याकूतने तेथेच थांबावे.

जीनतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिने खानजहान याजकडे खिलतीची मातमी ( शोकनिदर्शक ) वस्त्रे पाठविली.

मुहंमद मुरादखान याची सुभे अजमीरच्या दिवाणगिरीवर नेमणूक झाली होती.

ती बदलून त्याला गोध्र्याच्या(गुजरात) फौजदारीवर नेमण्यात आले. (सुप्रसिद्ध इतिहासकार खाफीखान याला मुहंमद मुरादखानाचा आश्रय होता.)

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की: खानाजादखान, सफशिकनखान इत्यादि मंडळी विजापूरच्या पलीकडे पंधरा कोसावर आली आहेत.

दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा आतिशखान याने आपला नायब हुजुरात पाठवावा अशी आज्ञा झाली. रादअंदाजखान याला अधोनी इम्तियाजगडच्या किल्ल्यावरून बदलण्यात आले होते. त्याने विनंती लिहून पाठविली की : नवीन किल्लेदार इकडे येण्यास उशीर झल्यामुळे मला कर्ज झाले आहे. बादशहा म्हणाले, 'त्यालहवे असल्यास नुस्रताबादेच्या किल्ल्यावर त्याला नेमतो.' मुल्तफतखानाने सांगितलें की : तें रादअंदाजखानाला मान्य नाही. बादशहा म्हणाले, 'त्याने हुजुरात यावे.' नुस्रताबादवर नेमण्यासाठी म्हणून बादशहांनी पुरदिलखान याची मन्सब किती आहे याची चौकशी केली.

**१४ फेब्रुवारी १६९६**

आज शुक्रवार, कचेऱ्या बंद होत्या.

**१५ फेब्रुवारी १६९६**

चांभारगोंद्याचा फौजदार ख्वाजा खुदायारखान याने कलिंगडाच्या दोन करंड्या पाठविल्या.

इंडीचा ठाणेदार व दलपतचा मुलगा गजपत याने खजिना आणला होता. त्याने दोन मोहरा नजर दिली.

मुहंमद जाफर याला विजापुरी कर्नाटकचा दिवाण म्हणून नेमण्यात आले. रामराज याला अंबाजोगाई(?)चा ठाणेदार म्हणून नेमण्यात येऊन त्याला एक घोडा देण्यात आला. त्याला निरोप देण्यात आला.

मथुरेचा फौजदार राजा बिशनसिंग याने आपले अर्धे सैन्य आपला मुलगा कुंवर जयसिंग(भावी सवाई जयसिंग) याज बरोबर मथुरेत ठेवून निम्म्या सैन्यानिशी हुजुरात यावे अशी आज्ञापत्रे लिहिण्याचा हुकुम झाला.

आलमेल्याच्या आसपासच्या फौजदारांना व ठाणेदारांना मोहीमेच्या प्रसंगी आलमेल्याचा फौजदार मुहंमद हादी याजकडे पोहोचविण्यासाठी गालिबबेग व इतर इसम असे दोन गुर्जबर्दार नेमण्यात आले.

मरहूम कासिमखान याच्या जहागिरी त्याच्या घराण्याकडे बहाल ठेवाव्या अशी आज्ञा झाली.

आतिशखान याने आपले सैन्य फीरोजगड(यादगीर)येथील किल्लेदार मुहंमद शरीफ याजकडे ठेऊन स्वतः हैद्राबादेतील शिबंदीची चौकशी करण्यास जावे अशी आज्ञा करण्यात आली.

**१७ फेब्रुवारी १६९६**

बादशहा मुखलिसखान याला म्हणाले, 'सात हजार सातशे स्वारांच्या पैकी तेराशे

पंचेचाळीस स्वार ब्रह्मपुरीच्या तळाच्या रक्षणासाठी असदखान व शहाजादा वालाजाह याजपाशी ठेवावे. बाकीचे स्वार आमच्या बरोबर राहतील. आमच्या बरोबरच्या पथकांची रचना अशी राहील :–

शहजादा आज्जम — हरावल (आघाडी)
मुहंमद कामबक्ष — उजव्या फळीला
खानजहान बहादुर — डाव्या फळीला
लुत्फुल्लाखान — चंदावल (पिछाडी).

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला खानजमान फतेहजंग, वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान, रामदुर्गचा किल्लेदार लक्षीराम गौड यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

खानाजादखान हा इंडीला पोहोचला असे कळले. विजापुरी कर्नाटकचा दिवाण मीर बाकर याला दिवाणगिरीवरून काढण्यात आले होते. त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

हमीदुद्दीनखानाने लिहून कळविले की : संताजीच्या पारिपत्यासाठी मी अधोनीहून बसवापट्टणकडे रवाना झालो आहे.

## १३ मार्च १६९६

बादशहांनी आज्ञा केली की : गाजिउद्दीनखान बहादूर पेडगावहून हुजुरात येत आहे. त्याने बक्षीउलमुल्क बहरामंदखान याच्या डेऱ्यात उतरावे व चीनकुलीजखानबहादुर याने मरहूम वजीरखान याचा मुलगा मीर जैनुलआबिदीन याच्या हवेलीत उतरावे.

आज्ञा झाली की : पीलखाना (हत्तीखाना) याजबरोबर संरक्षक पथक (बदरका) देऊन गाजिउद्दीनखान बहादुर याने तो औरंगाबादेस पोहोचवावा. मार्गावरील फौजदारांनी पण आपापल्या हद्दीतून संरक्षणाची व्यवस्था करून हत्ती आपल्या हद्दीबाहेर पोहोचवावे.

सय्यद अब्दुल्लाखानाचा मुलगा हसन अलीखान याजबरोबर मन्सबदार, फौजदार व तेराशे बावन्न स्वार तैनात करण्यात आले. आज्ञा झाली की : हलकट गनीम हे हैद्राबाद प्रांतात पसरले आहेत. एका गुर्जबर्दाराने जाऊन हसन अलीखानाला गनिमांच्या पारिपत्याठी तातडीने तिकडे पोहोचवावे.

## १४ मार्च १६९६

महिमानगडचा किल्लेदार व किल्लेदारखानाचा मुलगा मुहंमदकुली हा हुजुरात आला होता. तो लग्नासाठी औरंगाबादेस रवाना झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला.

किरणसेनचा मुलगा मनसाराम हा मुसलमान झाला. त्याला वीस होन देऊन शेख हिदायतुल्ला हे नाव देण्यात आले.

बीड वगैरेच्या परगण्यावर मामूरखान हा फौजदार होता. त्याच्याऐवजी सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याची नेमणूक करण्यात आली. मिहदीखानाचा मुलगा मिर्जा मुहंमद याला सोलापूरचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याला दोनशे

जात व वीस स्वार अशी मन्सब होती. ती वाढवून तीनशे जात व दोनशे स्वार अशी करण्यात आली. मोतिकदखानाला होशंगाबादेवरून बीडवर नेमण्यात आले होते. तो हुकुम मागे घेण्यात येऊन त्याला होशंगाबादेवरच कायम करण्यात आले.

मामूरखान याजकडून कळविण्यात आले की : महदाजी नारायण हा दोन हजार जात व एक हजार स्वार यांचा मन्सबदार होता. तो मरण पावला.

राजा रघुनाथ याचा नातू महिपतसिंग याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन त्याला सरकारी बाकीच्या वसुलीचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले.

### १५ मार्च १६९६

बादशहांनी आज हत्ती व घोडे यांची पाहणी केली.

### १७ मार्च १६९६

खिदमत गुजारखान (उंटखान्याचा) याने विनंती केली की : धारच्या ऐवजी दक्षिणेतच जहागीर द्यावी. आज्ञा झाली की : औरंगाबाद प्रांतातील हरसूल परगणा हा तनखा जहागीर म्हणून देण्यात यावा.

बादशहा आज सोलापुराकडे रवाना झाले. शुतरखाना (उंट) वगैरेची पाहणी करून बादशहा म्हणाले, 'यांना चरण्यासाठी औरंगाबादेकडे पाठवा.'

### १८ मार्च १६९६

आलमेल्याचा फौजदार मीर हादी याने अर्ज पाठविला की : वाकणखेड्याचा जमीनदार पिड नाइक याने माझ्याकडे संदेश (वाटाघाटीचा) धाडला आहे. विजापूरचा रुद्राजी कानूनगो (देशपांडे) याला पाठविले तर तह करीन असे तो म्हणतो. मध्यस्थाला वस्त्रे देऊन त्याच्याकडे रवाना करावे अशी आज्ञा झाली.

### १९ मार्च १६९६

बादशहाच्या (सोलापूरकडे कूच करतानाच्या सैन्यातील) चंदावल (पिछाडी) चा सरदार व मीर आतिश (दारुगोळ्याचा अधिकारी) तरबियतखान याने विनंती केली की : ब्रम्हपुरीचा तळ व सोलापूर या दरम्यान दोनशे स्वारांचे ठाणे बसविल्यास बरे होईल. बादशहांनी विनंती मंजूर केली.

मळखेडचा फौजदार सरमत याला गनिमांच्या पारिपत्यासाठी विजापूरचा दिवाण मुहंमद हादी याजपाशी तैनात करण्यात आले. त्याला हादीकडे नेऊन पोहोचविण्यासाठी एक गुर्जदार नेमावा अशी आज्ञा झाली.

विजापूरचा कानूनगो (देशपांडे) रुद्र पंडित याला खिलतीची वस्त्रे देऊन मुहंमद हादीपाशी रवाना करण्यात आले.

जुल्फिकारखान बहादुर याने पुढीलप्रमाणे कळविले :– येथील नगदी नेमणूक असलेल्या मन्सबदारांची स्थिती शोचनीय झाली आहे. सरकारकडून त्यांना पुष्कळ येणे बाकी आहे. माझ्यावरसुद्धा माझ्या नोकरवर्गाचे व स्वतःच्या सैनिकांचे देणे फार झाले आहे. माझ्यावर कृपा होईल अशी आशा आहे. बादशहा म्हणाले, त्यांना पुढीलप्रमाणे लिहा :–

तुमच्या येथे तैनात असलेल्या सैन्याच्या पगारासाठी पंधरा लाख रुपये खास तुमची अडचण दूर करण्यासाठी देण्यात येत आहेत.'

बादशहा आज सोलापूरला पोहोचले. सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान आणि त्याची मुले मिर्जा मुहंमद व हसन मुहंमद हे बादशहांना भेटले.

परगणे अंबा बाबूर(?)च्या रयतेनें तक्रार केली की : येथील फौजदार अजीजुल्ला हा जुलूम जबरदस्ती करतो. बादशहांनी त्याची मन्सब काय आहे याची चौकशी करण्यास सांगितले.

मामूरखान याने यारअलीबेगच्या मध्यस्थीने विनंती अर्ज पाठविला की : बादशहांनी माझी नेमणूक विजापूरी कर्नाटकच्या फौजदारीवर केली आहे. मन्सबीत वाढ व बक्षिसी दिली आहे. पण माझी मन्सब लहान आहे. पूर्वीच्या फौजदारांना मोठ्या मन्सबी होत्या. येथे रयत बंडखोरी करीत असते. माझी मन्सब पाचशे जात, हजार स्वार अशी वाढवावी. बादशहांनी याची चौकशी करून आपल्याला कळवावे असे मुखलिसखान वगैरेंना सांगितले.

## २० मार्च १६९६

आज बादशहा सोलापुरातील जुम्मामशिदीत नमाज पढण्यासाठी तख्ते रवां या वाहनातून गेले. नमाज पढून झाल्यावर ते जुम्मामशिदीहून पाऊण कोसावर असलेल्या आपल्या निवासस्थानी आले.

## २१ मार्च १६९६

गोविंदराव हरकारा याला मजकूर लिहून घेण्यासाठी हुजुरात बोलावण्यात आले.

मरहूम कासिमखान याच्या वकिलाने पुढीलप्रमाणे अर्ज केला :– मरहूम कासिमखान याचे कुटुंबीय आणि इतर माणसे ही इम्तियाजगड अधोनीच्या किल्ल्यात आहेत. कासिमखानाची मालमत्ता जप्तीत घेण्यासाठी बादशहाकडून मुरलीधर हा अधोनीला गेला आहे. कासिमखानाचे कुटुंबीय आणि कारभारी कारकून यांना योग्य तो लवाजमा बरोबर देऊन संरक्षक पथकांसहित हुजुरात बोलावून घेण्याची आज्ञा व्हावी.

बादशहांनी आज्ञा केली की : वरील विनंतीप्रमाणे करण्यास इम्तियाजगड अधोनीचा किल्लेदार राजा अनूपसिंग याला लिहिण्यात यावे.

विजापूरचा सुभेदार सय्यद लष्करखान व त्याचा मुलगा सय्यद नस्रुल्लाखान आजारी असल्याचे कळले. हकीम मुहंमद शफी यांनी त्यांचा उपचार करावा अशी आज्ञा झाली.

फौजदार नाहरखान याचा मुलगा मलिक मुहंमद याला बापाचा नायब म्हणून नेमण्यात आले. तसेच नाहरखानाच्या तैनातीत असलेला आणि इस्माईलचा मुलगा अब्दुल्ला याला(नाहरखानाचा) नायब म्हणून करहत(कऱ्हाड?) येथे नेमण्यात आले.

## २२ मार्च १६९६

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'तुम्ही नांदेडचा सुभेदार खानाजादखान (अज-

मीरच्या ऐवजी त्याची नेमणूक नांदेडच्या सुभेदारीवर करण्यात आली होती.) याला लिहा, त्याला विजापूर कर्नाटकची फौजदारी हवी असेल तर तेथे मी त्याला नेमण्यास तयार आहे.'

म्हस्की मुद्गलचा फौजदार मुहंमद फाजिल व चांभारगोंद्याचा फौजदार बरखुर्दारखान(खुदायारखान?) यांचे अर्ज बादशहांच्या नजरेखालून गेले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त हा बंकापूर (धारवाड जिल्हा)ला पोहोचला. तेथे जड सामान ठेवून संताजीच्या पारिपत्यासाठी तो सडा रवाना झाला.

चांदवडचा बक्षी व वाकनीस याला कामावरून बदलून हुजुरात बोलावण्यात आले होते. या अवधीत तो कन्नड(?)चा बदललेला फौजदार मुबारजखान(?) याजपाशी नोकर झाला असे कळले. मुबारजखानाला लिहून त्याला बडतर्फ करावे अशी आज्ञा करण्यात आली.

सोलापूरच्या ईदग्याची भिंत व खंदक ही दुरुस्त करण्यात यावी अशी बादशहांनी सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याला आज्ञा केली.

**२३ मार्च १६९६**

बख्तबलंदचा मुलगा मुहंमदअली हा देवगड(नागपूरजवळ)हून येऊन बादशहाला भेटला.

मीर आतिश(दारुगोळ्याचा अधिकारी) तरबियतखान याने पुढीलप्रमाणे विनंति केली :– गनीम हैद्राबाद प्रांताकडे आले आहेत. हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान याचा मुलगा रुस्तमअलीखान गनिमांच्या पारिपत्यासाठी गेला आहे. आता हैद्राबादच्या सुभेदारापाशी फार थोडे सैन्य राहिले आहे. काही पथके तैनात होतील अशी तो अपेक्षा बाळगून आहे. बादशहांनी त्याची मन्सब वाढवून अधिक स्वार सैनिक बाळगण्याची आज्ञा दिली. यापूर्वी त्याला तीन हजार पाचशे जात व दोन हजार पाचशे स्वार(त्यापैकी एक हजार दोअस्पा म्हणजे दोन घोडी) अशी मन्सब होती.

सोलापूरचा(?) फौजदार अमानुल्ला याची मन्सब वाढविण्यात आली.

मामूरखान यास पूर्वीप्रमाणेच बीड वगैरेच्या फौजदारीवर कायम ठेवण्यात आले. त्याला दोन हजार जात, सतराशे स्वार व शिबंदीसाठी दीडलाख रुपये अशी मन्सब होती.

बादशहा हे सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याला म्हणाले, 'शुतरखाना(उंट) व इतर सामान तुम्ही मामूरखान फौजदार याजपर्यंत नेऊन पोहोचवा. तेथून ते औरंगाबादेपर्यंत पोहोचवतील.'

मरहूम शुजाखानाचा मुलगा मुहंमद विकार याला बादशहांनी विचारले; 'तुझा भाऊ व चांभारगोंद्याचा बदललेला किल्लेदार मुहंमद अश्रफ याला हुजरात बोलावण्यात आले होते. तो अद्याप आला नाही.' विकार म्हणाला, 'त्याची आर्थिक परिस्थिति

शोचनीय आहे. तो रोशनाबादेत आहे.' त्याची जहागीर काढून घेण्यात यावी अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखान बहादुराच्या फौजेत तैनात असलेला राव गोपाळसिंग व रायचूरचा किल्लेदार व फौजदार सरुपसिंग यांची पत्रे बादशहाच्या नजरेखालून गेली.

**२४ मार्च १६९६**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा बासवापट्टणच्या वेढ्यात गुंतला होता. हमीदुद्दीनखान तेथून आठ कोसावर आला. आपले बरेच सैन्य वेढ्याच्या कामात ठेवून संताजी हा हमीदुद्दीनखान याजवर या महिन्यात (शाबान) दोन तारखेस (फेब्रुवारी अखेर) चालून आला. बादशहाच्या कृपेने शत्रूपैकी अनेक जण ठार वा जखमी झाले. शत्रूचा पराजय झाला. चार कोसपर्यंत त्याचा पाठलाग करण्यात आला. चार सजलेले घोडे व शस्त्रे आमच्या हाती सापडली. त्यानंतर शत्रूच्या स्थळावर (तळावर) हल्ला करून ते लुटले. संताजी तेथून पळून गेला. हमीदुद्दीनखान आणि इतर अधिकारी यांनी शत्रूच्या तळावर मुक्काम केला. यानंतर हमीदुद्दीनखानाने संताजीची बातमी आणण्यासाठी हेर नेमले. हेरांनी बातमी आणली की : संताजी हा चित्रदुर्गकडे गेला. यामुळे हमीदुद्दीनखान याने तेथेच मुक्काम केला. मृतांचे दफन व जखमी लोकांची शुश्रुशा इत्यादी कामे करून दोन तीन दिवसांनी तो गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना होणार आहे.

आरण बहादुरगड पेडगावात दाखल झाली अशा अर्थाचे पत्र शहाजादा आज्जम याजकडून आले. ते बादशहांनी नजरेखालून घातले.

बहरामंदखान बक्षिउलमुल्क याने विनंती केली की : बसवापट्टणचा फौजदार दाऊद याने गनिमांच्या युद्धात कामगिरी बजावली. त्या भागाची तो चांगली व्यवस्था करीत आहे. आपल्या कृपेची आशा बाळगून आहे. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

किशोरसिंगाचा मुलगा रामसिंग याजकडे गुर्जबर्दाराच्याद्वारे खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली.

बसवापट्टणच्या किल्लेदाराला काय मन्सब आहे, चौकशी करून कळविण्याची आज्ञा झाली.

**२५ मार्च १६९६**

बसवापट्टणचा फौजदार दाऊद दिलनाक याला खिदमत दौलतखान ही पदवी-देण्यात आली.

आज रमजानची पहिली तारीख. बादशहाच्या राज्यकारभाराचे चाळिसावे वर्ष सुरू झाले म्हणून काल रात्री शहाजादा कामबक्ष, सियादतखान, मुल्तफतखान वगैरेंनी बादशहाला नम्र अभिवादन केले.

बसवापट्टणचा किल्लेदार मुहंमद ऐवज याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन त्याला ऐवजखान ही पदवी देण्यात आली.

वाकियानवीस भोलानाथ याने आज्ञेप्रमाणे बसवापट्टणचा नकाशा बादशहांना दाखविला. बादशहांनी नकाशा पाहून विचारले, 'शहाजादा मुहंमद बेदारबख्त हा कोठे आहे.' कळविण्यात आले की : तो बंकापूरहून तीन मार्च रोजी संताजीच्या पारिपत्यासाठी रवाना झाला आहे. बादशहांनी विचारले, 'बंकापुरापासून तुंगभद्रा किती दूर आहे.' कळविण्यात आले की : अठरा कोस आणि तेथून बसवापट्टण दहा कोस आहे.

आज्ञा झाली की : देउळघाटचा फौजदार (वऱ्हाड) नसरखान याच्या भाउबंदांपैकी सहा मन्सबदार तैनात करण्यात यावे.

रामगड (?) च्या किल्लेदारीवर व फौजदारीवर इमाम मुहियुद्दीनखान याच्या जागी दर्गाहकुलीखान याची नेमणूक झाली.

बादशहा सियादतखानाला म्हणाले, 'संताजीशी झालेल्या युद्धाविषयीचे पत्र हमीदुद्दीनखानाने लिहिले आहे. त्याच्या प्रती शहाजादा आज्जम व शहाजादा बेदारबख्त यांजकडे पाठवा. तसेच जुल्फिकारखानबहादुर व खानाजादखान यांना लिहून कळवा की, 'सैनिक अशा दृढनिश्चयाने लढत असतात.'

## २६ मार्च १६९६

संगमनेरचा फोजदार मुहंमद ताहिर याला दुसऱ्या ठिकाणी (?) फौजदारीवर नेमण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली.

अब्दुर्रसूलखान मियाना याला शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यातून बदलून शहाजादा आज्जम याजकडे तैनात करण्यात आले.

बदामीच्या बातम्यावरून समजले की : तेथील किल्लेदार अब्दुलर्रज्जाक याने तेथील जमीनदार अब्दुलरसूल याची मालमत्ता घेतली असून त्याने तिच्यावर जबरदस्तीने ताबा मिळविला आहे.

गुर्जबर्दार पाठवून मालमत्ता परत देवविण्यात यावी अशी आज्ञा झाली.

गाजिउद्दीनखान बहादुर याच्या लिहिण्यावरून कळले की : मिफ्ताहुल्फुतूह (कोथळज, कोथळागड) चा फौजदार गुलाम अलीखान याने राजीनामा दिला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : दुसऱ्या कुणाचेतरी नाव सुचवा. त्याची नेमणूक करण्यात येईल.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी दोन कोस चालून येऊन हमीदुद्दीनखानाशी युद्ध करण्याच्या तयारीत आहे.

मरहूम कासिमखान याच्या मालमत्तेचा तपशील मुरलीधर याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविला :– कासिमखानाच्या औरंगाबादेच्या वाड्यात पंचवीस हत्ती, जिन्सी (सामग्री) खाना वगैरे, कंदर्की येथील जमीनदारीच्या गोरीमदर (?) खेड्यात सोन्याचांदीची भांडी व कागदपत्र, सीरागड येथे पाच हत्ती. याशिवाय कासिमखानाचे कारभारी बनारसीदास व इस्फिदयारबेग यांच्याकडे कासिमखानाने मालमत्ता दिली आहे. ते दोघे आता अहमदाबादेत आहेत. वरील सर्व मालमत्ता ताब्यात घ्यावी अशी आज्ञा झाली.

## २७ मार्च १६९६

कळविण्यात आले की : गाजिउद्दीनखान बहादुर हा आपल्या मुलासहित व सैन्य बरोबर घेऊन पेडगाव(?)हून रवाना झाला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : संताजी हा युद्ध करण्यासाठी हमीदुद्दीनखानावर चालून आला. खानानेही त्याला लढा दिला. बादशहाच्या भाग्याने शत्रूपैकी अनेकजण ठार अगर जखमी झाले. शत्रूचा पराजय झाला. दोनशे घोडे व इतर शस्त्रास्त्रे आम्हा गाजींच्या हाती लागली. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.'

## २८ मार्च १६९६

तोफखान्याचा दारोगा अवदालबेग याने ब्रह्मपुरीच्या तळावरून बादशहाच्या हुजुरात (सोलापूरला) दोन तोफा आणल्या.

बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने विनंती केली की : खानजहान बहादुरचे एक हजार स्वार, असदखानाचे दोनशे स्वार व माझे दोनशे स्वार असे हिंमतखान बहादुर याजपाशी तैनात होते. त्यांच्या संबंधी काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : खानजहान बहादुर याचे स्वार बोलावून घेण्यात यावेत. बाकीच्या स्वारांना शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात करण्यात यावे.

नांदेडचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान याने विनंती लिहून पाठविली की : अजमीरच्या सुभेदारीवर मला बदलल्याचे फर्मान व खिलतीची वस्त्रे मिळाली. पण नवीन नेमलेला नांदेडचा सुभेदार खानाजादखान हा अद्याप आला नाही. खानाजादखान याला लवकर नांदेडला पोहचण्याविषयी लिहिण्याची आज्ञा झाली. सय्यद अब्दुल्लाखान याच्या भाऊबंदांना त्याचा मुलगा व नायब हसन अलीखान याजबरोबर तैनात करण्याचाहि हुकुम झाला.

बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने अर्ज केला की : खानाजादखान याला विजापूर कर्नाटकची फौजदारी नको आहे. त्या जागेसाठी दुसऱ्याकुणाचे तरी नाव सुचविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

अजमतखान, बलरसखान व अजमतुल्लाखान यांनी बसवापट्टण येथे संताजीशी झालेल्या युद्धात चांगली कामगिरी बजावली. त्यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

कळविण्यात आले की : विजापूर कर्नाटकचे जमिनदार हे संताजीच्या बरोबर पळून गेले होते. ते शहाजादा बेदारबख्त याला भेटले.

## २९ मार्च १६९६

हमीदुद्दीनखान याने संताजीशी झालेल्या युद्धाचा वृत्तांत लिहून बादशहाकडे पाठविला. हा वृत्तांत इबादुल्ला वगैरे सात मन्सबदार घेऊन आले. बादशहांनी तो पाहिला. हमीदुद्दीनखान व त्याचे राजा अवधूतसिंग वगैरे सहकारी यांच्या मन्सबी काय आहेत याची चौकशी बादशहांनी केली.

बसवापट्टणचा फौजदार दोस्तखान याला खुदादादखान ही पदवी देण्यात आली.

गदगचा फौजदार शेरखान मुहंमद याला वकनामोपी(?)ची फौजदारी देण्यात आली.

मिफ्ताहुलफुतूह(कोथळज)चा किल्लेदार गुलामअली याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले :–एकोणीस शाबान(चोवीस मार्च)१६९६ रोजी रात्रीच्या वेळी रामा, नारायण, वगैरे हे पाचशे स्वार व नऊशे पायदळ असे सैन्य घेऊन आले व त्यांनी किल्ल्याला वेढा घातला. मीही किल्ल्यातून त्यांच्यावर हुक्के वगैरेंचा मारा केला आणि त्यांना दाखविले की मी सावध आहे. विनंती की, मातबरखान वगैरे इकडील फौजदारांना माझी मदत करण्यासाठी तातडीने येण्याचा हुकुम व्हावा.

बादशहांनी आज्ञा केली की : फौजदारांना कुमकेसाठी जाण्याबद्दल तातडीचे हुकुम पाठवा. बैरमबेग गुर्जबर्दार याने जाऊन वरील फौजदारांना गुलाम अलीकडे नेऊन पोहोचवावे. तसेच गुलाम अलीच्या पत्राची प्रत शहाजादा आज्जम याजकडे पाठविण्यात यावी अशी आज्ञा झाली.

## ३१ मार्च १६९६

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान हा सरकारी बैल व उंट यांचे तांडे (औरंगाबादेकडे)पोहोचविण्यासाठी गेला होता. त्याच्याकडील बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले :– अठ्ठावीस मार्च १६९६(चार रमजान) रोजी मी मुजमद(?)च्या पलीकडे तीन कोसावर शंभर सारबान(उंट हाकणारे)वांयांना बरोबर घेऊन त्यांना चरविण्यासाठी गेलो होतो. गनिमांचे पथक चालून आले. त्यांनी उंटांना घेरले. माझे व खानजहान बहादुरचे, माझ्याजवळ तैनात असलेले सैनिक यांनी गनिमांशी सामना दिला. बादशहाच्या भाग्याने काही गनीम ठार अगर जखमी झाले. गनिमांचा पराजय करून आम्ही उंट सोडवून आणले. खानजहान बहादुराचा मुरादबेग नावाचा सैनिक मारला गेला.

इरादतखान यास पूर्वीप्रमाणेच कोटरापियारी(माळवा)च्या फौजदारीवर कायम ठेवण्यात आले. याशिवाय गागरोनच्या किल्लेदारीवर व फौजदारीवर त्याची नेमणूक करण्यात आली. आपल्या मुलाला नायब म्हणून ठेवून स्वत: दोनशे स्वारांसहीत त्याने हुजुरात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

आपण संताजीचे पारिपत्य करण्यासाठी हमीदुद्दीनखानाच्या साहाय्यार्थ गेलो आहोत अशा अर्थाचे विनंतीपत्र हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान याचा मुलगा रुस्तमदिलखान याजकडून आले. ते बादशहांनी नजरेखालून घातले.

शिकारखान व महंमदबेग यांना बादशहांनी आज्ञा केली की : इंदापूरला जा आणि तेथे माझ्या राहाण्यासाठी, छावणीसाठी जागा व तेथे चारापाणीं याच्या काय सोयी आहेत याची चौकशी करून या.

बादशहांनी आज्ञा केली की : संताजीवर जय मिळविल्याबद्दल हमीदुद्दीनखान याजकडे फर्मान, खिलतीची वस्त्रे, चेगा(शिरपेच)ही पाठवावी. हमीदुद्दीनखान याला हमीदुद्दीनखान बहादुर ही पदवी देण्यात आली.

बादशहांनी(सोलापूर मूक्कामाहून)जवाहरमल व हीरा(बांधकाम खात्याचे) यांना मो. द. बा. १०.

आज्ञा केली की : तुम्ही इस्लामपुरी उर्फ ब्रह्मपुरीच्या तळावर जा आणि तळाभोवती भिंत उभारण्याचे काम करा.

हिंमतखान बहादुर व सय्यद कासिमखान यांच्या सैनिकांना शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी तैनात करण्याची आज्ञा झाली होती. ती अंमलात आणण्यासाठी गुर्जबर्दार नेमावे अशी आज्ञा झाली.

### १ एप्रिल १६९६

हमीदुद्दीनखानबहादुर याच्या संताजीवरील मोहिमेत भाग घेतल्याबद्दल रुस्तमदिल खान, मुगलखान, सत्रसाल बुंदेला, (राठोड), तदबीरखान(?)इत्यादींना खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली.

शहाबादचा बदललेला फौजदार राजा उत्तमराम गौड याची मन्सब वाढविण्यात आली. बीड वगैरेचा फौजदार मामूरखान याने लिहिले की : बादशहा इस्लामपुरीहून आले आहेत. मी परंड्याचा रस्ता(निर्धोकपणे)चालू केला असून चौक्या(गस्त घालण्यासाठी)बसविल्या आहेत. बादशहा शुक्रवारच्या नमाजासाठी सोलापुरला येतात तर सोलापूरकडे जाणारा राजमार्ग चालू करून तेथे(मार्गावर)चौक्या व ठाणी बसवितो. आज्ञा झाली की : ठीक आहे.

बादशहांनी जवाहरमल याला तळाकडे(ब्रह्मपुरीच्या)जाण्यास निरोप दिला. ते म्हणाले, 'जेथे माझे निवासस्थान आहे तेथे एक किल्ला बांधा. तुम्ही जाऊन खर्चाचा आराखडा करून घेऊन या.'

### ३ एप्रिल १६९६

आज(सोलापूर मुक्कामी)बादशहा घोड्यावर स्वार होऊन जुम्मामशिदीत शुक्रवारच्या नमाजासाठी गेले. बरोबर शहाजादा कामबक्ष, खानजहान बहादुर, मुखलिसखान वगैरे मंडळी होती.

### ४ एप्रिल १६९६

बादशहा आपल्या बक्षींना म्हणाले, 'मिहदीखान(सोलापूरचा किल्लेदार) याचा मुलगा मुहंमद याला म्हणावे, किल्ल्यातील तोफखाना पाहण्यासाठी, तोफखान्याचा(बादशाही)दारोगा तरबियतखान हा किल्ल्यात येणार आहे.'

शहाबादचा फौजदार राजा उत्तमराम याने आपला भाऊ उदीतसिंग याला शहाबादेत ठेऊन स्वतः हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'ईदूल्फितरची नमाज पढून झाल्यावर मी तळाकडे(ब्रह्मपुरी)जाईन. तेथून दोनतीन दिवसांनी इंदापूरकडे जाईन.'

बादशहांना कळविण्यात आले की : शेरखान, खुदादादखान व ऐवजखान हे बसवापट्टणच्या रक्षणासाठी तेथेच राहिले आहेत आणि अजमतुल्लाखान व बलरसखान वगैरे हे हमतखान बहादुर शहीद याचे शव घेऊन हुजुरात रवाना झाले आहेत.

### ६ एप्रिल १६९६

हाशमबेग गुर्जबर्दार हा बादशहाचे आज्ञापत्र घेऊन गाजिउद्दीनखान बहादुर याजकडे गेला

होता. तेथून गाजिउद्दीनखानाचे उत्तर घेऊन तो परत आला. त्याने सांगितले की : आपण तेथून निघालो तेव्हा गाजिउद्दीनखान बहादुर हा परंड्याच्या पलीकडे होता.

शहाजादा बेदारबख्त व जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असलेला सरबलंदखान यांची पत्रे बादशहांनी नजरेखालून घातली.

यारअलीबेग याने पुढीलप्रमाणे कळविले :– वेंकटराव हरकारा याने कळविले होते की : भूम(उस्मानाबाद जिल्हा)च्या आसपासचे मल्हारराव वगैरे जमीनदार हे संताजी (घोरपडे)याला मदत करतात. या वृत्तावरून गुर्जबर्दार पाठवून सदरील जमीनदारांना कैद करून आणण्यात आले व चौकशीचे काम बक्षीउलमुल्क मुखलिसखान याजकडे सोपवियणत आले. त्याने मला (यारअलीबेग)हे प्रकरण तपासण्यास सांगितले. माझ्या चौकशीत दिसून आले की : वेंकटरावाचा व सदर जमीनदारांचा तंटा जमीनदारीबाबत बरेच दिवसापासून आहे. वेंकटरावाने यामुळे त्यांच्यावर आळ घेऊन त्यांना कैद करविले आहे. जमीनदार म्हणतात की : जमीनदारीची सनद आम्हाला मिळाली तर आम्ही पेशकश म्हणून वीस हजार रुपये देऊ. बादशहांनी विनंती मान्य केली.

### ७ एप्रिल १६९६

अन्हू(?)च्या ठाणेदारीवर सफशिकनखान हा होता. त्याच्या जागी नळदुर्गचा किल्लेदार कामिलखान याची नेमणूक करण्यात आली.

जुल्फिकारखान याच्या सैन्यातील तोफखान्याचा दारोगा फाजिलखान याने विनंती केली की : विजापुरी कर्नाटकची फौजदारी आपल्याला देण्यात आली तर ते काम व्यवस्थितपणे पार पाडीन. आज्ञा झाली की : जुल्फिकारखान याने याबद्दल लिहिले तर ते मान्य करण्यात येईल.

जुन्नरचा किल्लेदार व फौजदार मन्सूरखान याने कळविले की : शहाजादा मुहंमद आज्जम हे या भागात आले आहेत. आपली आज्ञा झाली तर त्यांना भेटतो.

### ८ एप्रिल १६९६

शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यात खानजमान फतेहजंग याची मुले तैनात होती. त्यांना म्हणजे इखलासखान व मुनव्वरखान यांना मन्सबीची वाढ देण्यात आली.

उदगीर(?)चा किल्लेदार सजावारखान याने विनंती लिहून पाठविली की: पगारबाकी देण्यासाठी सैनिक फार त्रास देत आहेत. काही रक्कम पाठवून मदत करण्यात यावी. आज्ञा झाली की : नांदेडचा सुभेदार खानाजादखान याला लिहून सैनिकांचा गिल्ला थांबवावा.

### ९ एप्रिल १६९६

पवनारचा फौजदार सद्रुद्दीन मुहंमदखान याने विनंती अर्ज पाठविला की : आपल्या आज्ञेप्रमाणे दीनदार(गोंड राजा)चे पारिपत्य व इस्लामगडचा किल्ला जिंकून घेणे यासाठी मी व चांद्याचा जमिनदार(राजा) किशनसिंग हे शत्रूवर चालून गेलो. बंडखोराचे पारिपत्य झाले. तो पळून गेला. त्याच्या पाठलागावर दोन हजार सैनिक

पाठविले असून इस्लामगडचा किल्ला ताब्यात आणला आहे. चांद्याचा जमीनदार राजा किशनसिंग याचेहि याच अर्थाचे विनंतीपत्र आले. सद्रुद्दीनने इस्लामगडच्या सोन्याच्या किल्ल्या पाठविल्या. बादशहांनी किशनसिंग, सद्रुद्दिन व देवगडचा बदललेला जमीनदार यांच्या मन्सबीबद्दल चौकशी केली.

खान फीरोजजंग याच्या सैन्याचा दिवाण मुहंमद जाफर याला शहाजादा आज्जम याच्या सैन्याचा मीर सामान म्हणून नेमण्यात आले. मामूरखानाचा दिवाण मुहंमद नसीर याला फीरोजजंग (गाजिउद्दीनखान) याच्या फौजेची दिवाणगिरी देण्यात आली.

लष्करखानाच्या फौजेतील खालील मन्सबदारांना लुत्फुल्लाखानाकडे देण्यात आले. ते गेले नाहीत. त्यांच्या मन्सबीत घट करण्यात आली. एकोजी, हा तीन हजारी होता. दलसिंग हा हजारी होता. मालोजी, मुहंमद मुकीम.

### १० एप्रिल १६९६

आज तख्ते रवांवर बसून बादशहा (सोलापूर मुक्कामी) नमाजासाठी जुम्मा-मशिदीत गेले.

### ११ एप्रिल १६९६

बादशहांना सांगण्यात आले की : इंदापूरला मुक्काम करण्यासाठी जागा चांगली आहे. चारापाणी मुबलक आहे. बादशहा म्हणाले, 'मीर सामान फाजिलखान याला लिहा, तयारी करा. आम्ही इंदापूरकडे कूच करतो.'

### १२ एप्रिल १६९६

कळविण्यात आले की: गाजिउद्दीनखान बहादुर हे आज्ञेप्रमाणे कामठी (बीदरजवळ) हून निघून बेडर बंडखोरांच्या पारिपत्यासाठी गुलबर्ग्याकडे रवाना झाले आहेत.

गुलबर्गा भागात कोण जमीनदार धामधूम करीत आहेत याची चौकशी करून कळविण्यासाठी मळखेडचा फौजदार मुहंमदबेग याला लिहिण्यात यावे अशी बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला आज्ञा करण्यात आली.

कळंब (यवतमाळ जिल्हा)चा फौजदार नूरुल्ला याची बादशहांनी चौकशी केली.

### १४ एप्रिल १६९६

लष्करखानाच्या सैन्यात खालील अधिकारी तैनात होते. त्यांना लुत्फुल्लाखान याजकडे तैनात करण्यात आले. पण ते गेले नाहीत. म्हणून त्यांच्या मन्सबी कमी करण्यात आल्या.

सय्यद नसरुल्लाखान, वजीदुद्दीनखान (?), रहमदाद, एकोजी, मंबाजी (मनाजी), जलवाजी, मुहंमद जाफर, लुतफेअली, बहिर्जी, संभाजी (?), हाजी अली वगैरे.

### १५ एप्रिल १६९६

मिर्जाबेग याला भूपतगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. बांधकामखात्याचा जवाहरमल याने ईस्लामपुरी (ब्रह्मपुरी)चा नकाशा व बांधकामाच्या खर्चाचा आराखडा ही बादशहा समोर ठेवली. त्याने सांगितले की : किल्ला पक्का बांधावयाचा

असल्यास सत्तर हजार रुपये खर्च येईल. कच्चा बांधायचा असल्यास चाळीस हजार पये खर्च येईल. आराखडा मुल्तफतखान याजकडे देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

मीर आतिश तरबियतखान याने विनंती केली की : सलाबत बारमध्ये मी एक मशीद व हौद ही तयार केली आहेत. आपल्या खास निवासस्थानातून (दौलतखाना) पाण्याचा कालवा जातो. आपण आज्ञा कराल तर त्याचे पाणी मशिदीच्या हौदात देण्यात येईल. ख्वाजा याकूत व काजी अब्दुल्ला यांना विचारून काय ते करा असे सांगण्यात आले.

संताजीवरील युद्धात सय्यद अजमतुल्ला याच्या भाउबंदांनी कामगिरी बजावली होती. त्यांना बक्षिसे देण्यात आली.

पवनारचा फौजदार सद्रुद्दीन मुहंमदखान याने लिहिले की : मी व चांद्याचा राजा किसनसिंग यांनी देवगडचा जमीनदार दीनदार याला काढून लावले. राजा (किशनसिंग) याचा दुसरा मुलगा कालसिंग हा तरुण व होतकरू आहे. इस्लामगडची (देवगड) जमीनदारी आपल्याला मिळाली तर मी चांदा व देवगड या जमीनदाऱ्याबद्दल बारा लाख रुपये पेशकश म्हणून देईन. शिवाय शुकराना (आभाराचे द्योतक) म्हणून पाच लाख रुपये देईन. याशिवाय दीनदारकडे पेशकशची काही बाकी निघत असल्यास तीही देईन. सद्रुद्दीनने हे लिहिले की : राजा किशनसिंगचा हा दुसरा मुलगा आपल्या आईसहित मुसलमान होण्यास तयार आहे. आणि प्रत्येक महिन्यास एक लाख रुपये सरकारी खजिन्यात भरण्यास तयार आहे. बादशहा बक्षीउल्मुल्कला म्हणाले, ‘सद्रुद्दीनखानाला लिहा, कालसिंग आणि त्याची आई यांना चांद्याहून तुमच्याकडे बोलावून घ्या आणि त्यांना मुसलमान करा. नंतर हुजुरात लिहा. त्यानंतर इस्लामगड उर्फ देवगडची जमीनदारी, राजा ही पदवी व फर्मान ही पाठविण्यात येतील.

### १७ एप्रिल १६९६

आज तख्ते रवांवर स्वार होऊन बादशहा जुम्मामशिदीत जाऊन नमाज पढून आले. बरोबर शहाजादा कामबक्ष, खानजहान बहादुर, मुखलिसखान वगैरे अमीर उमराव होते.

आमच्या निवासस्थानापासून (सोलापुरात) ईदगाह किती लांब आहे अशी बादशहांनी चौकशी केली. अर्धाकोस व पाव (पाउण कोस) अंतर आहे असे सांगण्यात आले.

देवगडचा पदच्युत जमीनदार बख्तबलंद हा (ब्रम्हपुरीहून) येऊन बादशहांना भेटला.

वऱ्हाड सुभ्याचा दिवाण बशारतखान याने विनंतीपत्र पाठविले की : मुहंमद सईद गुर्जबर्दार हा येथे धान्यासाठी आला होता. तो रयतेवर जुलूम करीत आहे. त्याने बरीच रक्कम गोळा करून हस्तगत केली आहे. त्याला बदलण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

शहाजादा आज्जम याचे पत्र बादशहाच्या नजरेखालून गेले.

मुल्तफतखानाने अर्ज केला की : जवाहरमलने बांधकामाचा आराखडा दिला आहे.

ईस्लामपुरीत किल्ला व दोन विहिरी यांचा खर्च सत्तर हजार रुपये होईल. मातीच्या भिंती बांधल्या तर चाळीस हजार रुपये लागतील. बादशहा म्हणाले, 'मातीची तटबंदी करा व दोन विहिरी बांधा. काजी, कचेरीचा दारोगा व मीर सामान यांनी आपसात विचारविनिमय करून हे काम तडीस न्यावे.'

मुल्तफतखानानें विनंती केली की : आपण इंद्रापुरला जाणार आहात. मलाहि बरोबर न्यावे. बादशहांनी मान्य केले. ते म्हणाले, 'तूर्त मी ईस्लामपुरीला जातो काजीशी ठरवून किल्ल्याच्या पाया बांधणीचे काम सुरू व्हावे.' तटबंदीच्या भिंतीसाठी पासष्ट हजार रुपये देण्याची आज्ञा झाली.

## १८ एप्रिल १६९६

यारअलीबेगने विनंती केली की : मुलतान येथे एक हिंदू मनुष्य इराकी घोड्यावर बसून जात होता. हिंदूना इराकी व अरबी घोड्यावर बसण्याची मनाई असल्यामुळे मुलतानचा कोतवाल मुहंमद अमीन याने घोडा, जीन, लगाम ही त्या माणसाकडून घेऊन हुजुरात पाठविली. बादशहांनी ती पाहून सरकारात ठेवून देण्याची आज्ञा दिली.

## २० एप्रिल १६९६

आज बादशहा ध्यानधारणेसाठी एतिकाफला (एकांतात) बसले.

अंबरचा राजा बिशनसिंग याचा मुलगा कुंवर जयसिंग हा आपले सैन्य घेऊन मथुरेहून हुजुरात येण्यास निघाला असे कळले.

रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाक याने विनंती केली की : या पूर्वी या जिल्ह्याची हकीकत मी गाजिउद्दीनखान बहादुर फीरोजजंग याजकडे लिहून पाठवीत असे. आता ते गुलबर्ग्याला गेले आहेत व बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा हे पेडगावला (गाजिउद्दीनच्या जागी) आले आहेत. त्यांनाहि जिल्ह्याची हकीकत लिहून पाठविण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : पाठवीत जावी.

## २१ एप्रिल १६९६

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांचे (मराठ्यांचे) जवळजवळ चार हजार स्वार हे परंडा प्रांतात देवरानी येथे आले. तेथे ते लुटालुट करीत आहेत. बीड वगैरेचा फौजदार मामूरखान याने तिकडे जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे अशी आज्ञा गुर्जबर्दाराच्याद्वारे पाठविण्याचा हुकुम झाला.

रमजानच्या इदेसाठी असदखान हा (ब्रह्मपुरीहून निघून) सोलापूरच्या वाटेवर होता. इतक्यात हरकाऱ्यांकडून बातमी कळली की : गनिमांची फौज मंगळवेढ्याजवळ आली आहे. बादशहांनी आज्ञा केली की : असदखानाला लिहा तळावर (ब्रह्मपुरी) जाऊन सावध रहा.

## २४ एप्रिल १६९६

आज बादशहा तख्ते रवांवर बसून ईदग्यात गेले. तेथे ते ईदची नमाज पढले.

(शव्वाल महिन्याची पहिली तारीख ) अमीर उमराव बरोबर होते. सर्वांनी बादशहाचे अभिष्ट चिंतन केले.

कळविण्यात आले की : शेरबाजखान उर्फ अब्दुल्ला हा चार हजारी मन्सबदार होता. त्याने एका अफगाण सावकारापासून कर्ज काढले होते. आपली रक्कम वसूल करण्यासाठी सावकार हा शेरबाजाखानापाशी गेला. त्यांच्यात बाचाबाची झाली. अफगाण सावकाराने शेरबाजखानाला आपल्या कट्यारीने ठार मारले. त्याच्या नोकरांनी त्या अफगाण सावकारालाहि ठार मारले.

मुलतान येथे एक हिंदू मनुष्य इराकी घोड्यावर बसून जात असल्यामुळे तो घोडा जप्त करण्यात आला होता. बादशहाने तो घोडा तरबियतखानाला बक्षीस म्हणून दिला.

**२५ एप्रिल १६९६**

आज बादशहा जुम्मामशिदीत जाऊन नमाज पढले. ते तख्तेरवांवर स्वार होऊन गेले होते.

राजा बिशनसिंग याने मथुरेहून आपल्या मुलाबरोबर एक हजार स्वार देऊन त्याला हुजुरात रवाना केले असे कळले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मल्हारतुका(मल्हार तुकदेव ) वगैरे सरदार दीड हजार स्वारांहित वांगी परगण्यातील भूम(?)( उस्मानाबाद जिल्हा )वर चालून आले असून त्या गावाला त्यांनी वेढले आहे. बादशहांनी आज्ञा केली की : खानजहान बहादुराचा मुलगा नुस्रतखान याने एक हजार स्वार व पायदळ यासहित तिकडे जावे आणि गनिमांचे पारिपत्य करावे.

सोलापूर व ब्रह्मपुरी यांच्या दरम्यान एक ठाणे कायम करण्यात आले होते. तेथील ठाणेदार मुहंमद हा येऊन बादशहांना भेटला.

**२६ एप्रिल १६९६**

बादशहा आज सोलापुराहून निघून ब्रह्मपुरीकडे रवाना झाले. वाटेत त्यांनी सीना नदीच्या काठावर मुक्काम केला.

केज(बीड जिल्हा)चा चौधरी (देशमुख ) व शिवराम(?)चा मुलगा रामराव याने दहा रुपयांची नजर बादशहांना दिली.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याला अफजलपूरची पण ठाणेदारी देण्यात आली. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. हे ठाणे यापूर्वी बीड वगैरेचा फौजदार मामूरखान याजकडे होते. त्या प्रमाणात त्याची मन्सब कमी करण्यात मिहदीखान व त्याचा मुलगा मिर्जा मुहंमद यांना सोलापूरकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

**२७ एप्रिल १६९६**

बादशहांनी आज (ब्रह्मपुरीच्या वाटेवर) वाघोली (?) या गावी मुक्काम केला.

रुस्तमखान विजापुरी हा गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. त्याने विनंतीपत्र पाठविले की : मी आजारी आहे. माझा मुलगा गालिबखान याने मला भेटून जावे. यासाठी रजा द्यावी. बादशहांनी गालिबखानाला एक आठवड्याची रजा दिली. गालिबखानाला तीन हजार जात व तीन हजार स्वार अशी मन्सब आहे.

लोहगडच्या किल्ल्यावर पूर्वी खानचंद बुंदेला हा किल्लेदार व फौजदार होता. त्याची बदली पुरंदर उर्फ आज्जमगडवर करण्यात आली. खानचंदच्या जागी लोहगडच्या किल्लेदारीवर व फौजदारीवर रावदलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद याची नेमणूक करण्यात आली. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

खानजहान बहादुर याचा मुलगा नुस्रतखान यास गनिमांच्या पारिपत्यासाठी परंड्याकडे जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याला सातशे जात व चारशे स्वार अशी मन्सब आहे. त्याच्याबरोबर एक हजार स्वार व एक हजार पायदळ सैनिक देण्यात आले.

खानचंद बुंदेला याच्यापूर्वी पुरंदरला माधोराम हा किल्लेदार व फौजदार होता. माधोरामला शहाजादा आज्जम याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

**२८ एप्रिल १६९६**

आज बादशहा (ब्रम्हपुरीच्या) तळावर पोहोचले.

कळविण्यात आले की : गनीम (मराठे) औरंगाबादच्या भोवती पसरले आहेत. आज्ञा झाली की : औरंगाबादचा संरक्षक मरहमतखान याला जवळपासच्या फौजदारांच्या सहकार्याने गनिमांना हाकलून लावण्यासाठी लिहावे. एक गुर्जबर्दार याला अंमलबजावणीसाठी पाठविण्यात यावे.

मरहूम हिंमतखान बहादुर याजपाशी तैनात असलेला बलरसखान हा येऊन बादशहांना भेटला.

शहाजादा कामबक्ष याच्या फौजेतील चारशे स्वारांना खानजहान बहादुर याचा मुलगा नुस्रतखान याजपाशी परंड्याकडे तैनात करण्यात आले.

**२९ एप्रिल १६९६**

सजावारखान (उद्‌गीरचा किल्लेदार सुहराबखान याचा मुलगा हा स्वतः हि बीदर, कंधार (नांदेड जिल्हा) वगैरेचा किल्लेदार होता. याला शहाजादा आज्जम याच्या सैन्यात तैनात करण्यात आले.

बहादुरगड उर्फ पेडगाव येथील किल्लेदार अब्बासखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**१ मे १६९६**

कळविण्यात आले की : शहाजादा बेदारबख्त हा बसवापट्टण येथे असून त्याने तिकडील जमीनदारांचे पारिपत्य करण्यासाठी खानजमान फतेहजंग याची नेमणूक केली आहे.

परंड्याच्या बातम्यावरून कळले की : मकहुर(मराठे)याचे रामचंद वगैरे सरदार तिकडे आले होते. मामूरखान फौजदार पण तिकडे आला. त्याने गनिमांचे पारिपत्य करून त्यांचा पराजय केला व त्यांचे घोडे वगैरे हस्तगत केले.

मरहूम हिंमतखान बहादुर याचे पुढील सहकारी येऊन बादशहाला भेटले. अज्मतुल्लाखान, अस्मतुल्लाखान, सय्यद सरमस्त, देवीसिंग, मानसिंग(?), हिफजुल्ला.

आलमेल्याचा बदललेला फौजदार सय्यद जैद हा येऊन बादशहांना भेटला. बहादुरगड उर्फ पेडगावचा किल्लेदार व फौजदार अब्बासखान याने लिहिले की : बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याचा तंबू किल्ल्याजवळ आहे. शहाजाद्याला मुजरा करण्यास जाण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : ( रोज मुजरा करण्यास) जाण्याची जरूर नाही.

### ४ मे १६९६

बागांचा दारोगा ख्वाजा याकूत याने विनंती केली की : मला या जागेवर पाच वर्षांपूर्वी नेमण्यात आले. या अवधीत मी बागाइतीचे उत्पन्न म्हणून एक लक्ष चौतीस हजार नऊशे एकोणऐंशी रुपायांचा भरणा आपल्या खासगीच्या खजिन्यात केला आहे. ख्वाजा याकूत ( बागांचा दारोगा ) याला चारशे जात व पन्नास स्वार अशी मन्सब होती. तीत शंभर(जात)ची वाढ करून बादशहा म्हणाले, 'तयार व्हा. सोलापूरच्या विहिरीच्या दुरुस्तीसाठी मी तुम्हाला तिकडे पाठविणार आहे.'

बादशहाजादा मुहंमद आज्जम शहा याने बादशहाच्या स्वारीसाठी लागतील म्हणून पाचशे उंट पाठविले होते. पण माझे जाणे आता थांबविले आहे असे सांगून बादशहांनी उंट परत पाठविण्याची आज्ञा केली.

### ५ मे १६९६

इस्लामगड उर्फ रायरी येथील बातम्यावरून कळले की : रायरीचा किल्लेदार सूरसिंग हा मरण पावला. त्याला दीड हजार जात व चवदाशे स्वार अशी मन्सब होती. बादशहांनी सूरसिंगाच्या जागी त्याचा मुलगा शिवसिंग याची रायरीच्या किल्लेदारीवर नेमणूक केली. शिवसिंगाला चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तीत बादशाहांनी तीनशे जात व आठशे स्वार आशी भर घातली. त्याला एकंदरीत एक हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब झाली. याशिवाय त्याला पन्नास लाख दाम(सुमारे पन्नास हजार रुपये) बक्षीस म्हणून देण्यात आले.

सिऱ्याचा(?) ठाणेदार रणदुल्लाखान याचे गनिमांशी युद्ध झाले. गनिमांपैकी अनेकजण ठार झाले. अठरा घोडे, दोनशे भाले व तीन माणसे हातात सापडली. ती हुजुरात पाठविण्यात आली आहेत असे बक्षींनी सांगितले. आज्ञा झाली की खानसामानच्या हवाली करावे.

### ६ मे १६९६

बंकापूर(बेळगाव?)चा किल्लेदार व फौजदार बसालतखान याला महिपतगडची-

पण किल्लेदारी देण्यात आली. महिपतगडवर यापूर्वी मिर्जाबेग हा किल्लेदार होता. त्याची मन्सब पन्नास स्वारांनी कमी करण्यात आली.

कळविण्यात आले की : गनीम(मराठे) गजेंद्रगडच्या भागात पसरले आहेत. लुत्फुल्लाखानाने तिकडे जाऊन बंडखोरांचे पारिपत्य करावे अशा अर्थाचा हुकुम पाठवावा अशी आज्ञा झाली.

आज्ञा झाली की : राहिरी(रायगड)चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याला लिहा की, शिवसिंग तेथे येऊन पोहोचेपर्यन्त किल्ल्या(रायगड)च्या बाबतीत सावधगिरी बाळगा.

## ८ मे १६९६

सोलापूरचा कालवा तयार करण्यासाठी ख्वाजा याकूत याला पाठविण्यात आले.

बुधपाचगावचा(सातारा जिल्हा) ठाणेदार बदाजी(पदाजी) याने विनंतीपत्र पाठविले की : ठाण्याची गढी मोडकळीस आली आहे. काय आज्ञा ? यावर बादशहांनी आज्ञा केली की : खटावचा ठाणेदार रामचंद्र याला लिहा, पन्नास बेलदार व इतर पाचशे कामगार खटावहून पाठवून गढी दुरुस्त करून घ्या. बादशहांनी मतलबखानाला सांगितले की, 'पदाजीला जहागीर तनखा देऊन त्याच्या ठाण्याकडे रवाना करा.'

सियादतखान याने बादशहांना सांगितले की : गाजिउद्दीनखान बहादुर याने मला पुढीलप्रमाणे पत्र लिहिले आहे : —

हंबळ(? गुलबर्गा जिल्हा)च्या गढीत बेडरांनी ठाण मांडले होते. तेथून ते वाटमारी करीत. हे कळल्यावर मी माझ्या जवळ असलेले खंजरखान वगैरे अधिकारी त्यांच्या पारिपत्यासाठी पाठविले. गनिमांचा पराजय झाला. त्यांच्यापैकी बऱ्याच जणांना ठार मारण्यात आले. घोडे, आणि शस्त्रे हस्तगत झाली. बंडखोर पळून गेले आणि गढी आमच्या ताब्यात आली.

## १० मे १६९६

गाजिउद्दीनखान बहादुर याने लिहिले की: आपल्या आज्ञेप्रमाणे मी सगर उर्फ नुस्रताबाद(गुलबर्गा जिल्हा)च्या सरहद्दीवर आली आहे. पण हद्दी आखलेल्या नाहीत. मी कुठपर्यंत हद्दी सांभाळाव्या. आज्ञा झाली की : सगरच्या काय हद्दी आहेत हे लिहून त्याला कळविण्यात यावे.

## ११ मे १६९६

खानजहान बहादुर याच्या विनंतीवरून मरहूम हिंमतखान बहादुर याच्या अजमतुल्लाखान व बलरसखान या सहकाऱ्यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मिरजेवर इस्माईलखान मका हा फौजदार होता. त्याच्या जागी मकसूद बेग याची मिरजेचा फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली. ईस्माईलखान याला शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

## ३१ मे १६९६

मीर हबीबुल्ला याचा मुलगा मीर मुहंमद ताहिर हा संगमनेर व गंगापूरचा

फौजदार होता. त्याला परगणे थाळनेर वडजी(?) येथे अमीन व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

दरगाहकुलीखान याला सिरागड? (कर्नाटकात)चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

विजापूर कर्नाटकचा फौजदार आतिशखान याला नेमणूकीचे फर्मान व खिलतीची वस्त्रे धाडण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : एक गुर्जबर्दार नेमा. त्याने सरफराजखान व माधोराम यांना पारनेर भागातील ठाण्यात नेऊन सोडावे.

मंगळवेढयाच्या बातम्यावरून कळले की: गनीमांचे चारशे सैनिक त्या भागात पसरले असून त्यांनी आजुबाजुची बरीच खेडी लुटली आहेत. तिकडील फौजदारांना लिहून बंडखोरांचे पारिपत्य करवावे अशी आज्ञा झाली.

१ जून १६९६

चाकणचा किल्लेदार व फौजदार बुऱ्हाणुल्ला याला चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तो मरण पावला. त्याच्या जागी मिफ्ताहुल्फुतूह (कोथळगड)चा किल्लेदार व फौजदार गुलाम अलीखान याची नेमणूक करण्यात आली. त्याच्या मुन्सबीत वाढ करण्यात आली.

रावदलपत बुंदेला याचा मुलगा भारतीचंद याला जुल्फिकारखानाच्या सांगण्या-प्रमाणे पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब देण्यात आली.

बादशहांनी ठाणेदारांच्या बदल्या पुढीलप्रमाणे केल्या :– कडूसच्या ठाण्यावर अमरसिंग व लोहगड(?)च्या ठाणेदारीवर दलसिंग हे होते. त्यांच्या जागी वरील दोन्ही ठाण्यावर माधोराम याची नेमणूक करण्यात आली. माधोराम हा पाटस(?)च्या ठाणेदारीवर होता. त्याच्याजागी खडगराय याचा मुलगा अमरसिंग याला नेमण्यात आले. दलसिंग याला सुप्याची ठाणेदारी देण्यात आली. भानसिंग याला बारा मावळची ठाणेदारी देण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की : अब्दुर्रहीम मियाना याचा मुलगा अब्दुस्सलाम हा दोन हजारी(जात)व एक हजार(स्वार) असा मन्सबदार होता. तो बेदारबख्ताची छावणी सोडून आपल्या स्वतःच्या जहागिरीत जाऊन बसला आहे. त्याची जहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखान बहादुर याच्या फौजेतून कळले की : संताजी हा तंजावरकडे गेला. ही बातमी कळताच जुल्फिकारखान हा सैन्य घेऊन संताजीवर चालून गेला. युद्ध झाले. बादशहाच्या भाग्याने शत्रूचे अनेक लोक प्राणास मुकले. शत्रूचा पराजय झाला. घोडे, उंट, भाले व तलवारी अशी लूट सापडली.

बादशहांनी वरील वृत्तांत असदखान(जुल्फिकारखानाचा बाप) याला पाहाण्यास दिला. गढीसंख(जत तालुका, सांगली जिल्हा) या ठिकाणी पुरदिलखान हा ठाणेदार

होता. त्याला मन्सूरखानाच्या ऐवजी जुन्नर(शिवनेरी)च्या किल्लेदारीवर व फौजदारीवर नेमण्यात आले. दख्खनच्या तोफखान्यावर आतिशखान हा दारोगा म्हणून काम करीत होता. त्याच्या जागी मन्सूरखान याची नेमणूक झाली व त्याला हुजुरात बोलावण्यात आले.

हिम्जुल्ला याला जुल्फिकारखानाच्या फौजेचा बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले होते. तो बादशहाच्या दरबारात आला. तो म्हणाला, 'मला ही नोकरी नको.' बादशहा रुष्ट होऊन म्हणाले, 'याची खिलतीची वस्त्रे परत घ्या आणि त्या जागेवर इतर कुणाची तरी नेमणूक करा.'

रावदलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद हा शहाजादा आज्जम याच्या फौजेत तैनात होता. त्याला खानचंदच्या ऐवजी लोहगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

मरहूम लष्करखान याची मुले सय्यद फजलुल्लाखान व सय्यद नसरुल्लाखान यांना दरबारात बोलावण्यात आले.

हाफिज मुहंमदखान वगैरे मन्सबदार व सुभे औरंगाबादेतील किल्ल्यातील सामग्री सरंजामचा निरीक्षक मुहंमद यूसुफ यांना बिजापूरी कर्नाटकचा फौजदार आतिशखान याजबरोबर तैनात करण्यात आले.

अधोनीचा किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग याजकडे सिरगुप्पीची किल्लेदारी व फौजदारीपण देण्यात आली.

बिजापुरातील किल्ले अरकची किल्लेदारी मरहूम सय्यद लष्करखान याचा मुलगा सय्यद वजीहुद्दीनखान याला देण्यात आली.

## २ जून १६९६

गढी संखच्या(संख, जत तालुका) ठाणेदारीवर फखुद्दीनखान याचा भाऊ मुहंमद बेग याची नेमणूक करण्यात आली. तेथे यापूर्वी पुरदिलखान हा ठाणेदार होता.

काजी मुहंमद हुसेन याला बुऱ्हाणपूरचा काजी म्हणून नेमण्यात आले. खिलतीची वस्त्रे अंगावर घालून तो दरबारात आला. त्याला पाहून बादशहा म्हणाले, 'याची खिलतीची वस्त्रे काढून घेऊन काजीच्या जागेवर दुसऱ्याची नेमणूक करा.'

तरबियतखान हा आपली पथके घेऊन छावणीत पोहोचला असून त्याची माणसे कही(घासदाणा, रसद) आणण्यासाठी तीन कोस लांब गेली आहेत असे कळले.

## ३ जून १६९६

न्यायकचेरीतील दंड वसूल करणारा दारोगा(व्यवस्थापक)अब्दुल्कादर हा दरबारात इकडून तिकडे फिरत होता बादशहांनी आज्ञा केली की: असे फिरणे बंद करा. यापुढे न्यायकचेरीत (अदालत)व दीवाण यातून कोणी असे आमच्यासमोर इकडे तिकडे फिरता कामा नये. प्रत्येकाने आपल्या जागी उभे राहिले पाहिजे.

निजामुद्दीन याला तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. पण तो गेला नाही. त्याच्या मन्सबीत घट करण्यात आली.

थाळनेरचा फौजदार हुसेन बेगखान याची नेमणूक अंबानापूर(?)च्या फौजदारीवर करण्यात आली. अंबानापूरचा फौजदार व मरहूम कादरदादखान याचा मुलगा अजीजुल्ला याला हुजुरात बोलावून घेण्यात आले.

मरहूम किल्लेदारखान( मराठवाड्यातील धारुरचा किल्लेदार ) याचा मुलगा दाराब याला जुल्फिकारखानाच्या फौजेत बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

**४ जून १६९६**

तरबियतखानाची पथके(घासदाणा, लाकूडफाटा इत्यादि) आणण्यासाठी गेली होती. गनिमांची पथके त्यांच्यावर चालून आली. तरबियतखानाने त्यांच्या पारिपत्यासाठी आपला भाऊ कामयाब याला पाठविले. युद्ध प्रसंग झाला. बादशहाच्या भाग्याने गनिमांपैकी अनेकजण ठार झाले. गनिमांचा पराजय झाला. घोडे, शस्त्रे इत्यादि हाती लागली. हे वृत्त ऐकून बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला.'

हमीदुद्दीनखान बहादूर याने गनिमांच्या पारिपत्यासाठी बालाघाटकडे ( कडपा करनूल वगैरे) जावे असे बादशहांनी ठरविले होते. पण हमीदुद्दीनखानाने आपला रस्ता बदलण्याचे कारण नाही असे नंतर ठरले.

शहाजादा आज्जम याने विनंती लिहून पाठविली की : माझे शंभर सैनिक हे आदिलखानी तळकोकणचा फौजदार मुहंमद रफी याजपाशी तैनात आहेत. त्यांना हुजुरात बोलावून घ्यावे. बादशहांनी मान्य करून त्यांना शहाजादा आज्जम याजकडे रवाना करावे असा हुकुम दिला.

**६ जून १६९६**

चांभारगोंद्यांचा फौजदार खुदायारखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**७ जून १६९६**

शहाजादा आज्जम याच्या छावणीतून कळले की : अब्दुलरसूलखान याला दोन हजार जात व दीड हजार स्वार अशी मन्सब आहे व मियानाखान याला एक हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब आहे. पण प्रत्यक्षात त्यांच्यापाशी फक्त पन्नास पन्नास स्वार आहेत. त्याप्रमाणात त्यांची सरंजाम जहागीर कमी करावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

**८ जून १६९६**

सुलतान मुहंमद अमीन याने लिहून कळविले की. गनिमांच्या सैनिकांनी युद्धप्रसंगी मोर्चे उभे केले होते. ते पाडायचे आहेत. हुजुरातून बेलदार आले तर ते हे काम करू शकतील. शंभर बेलदार पाठविण्यात यावेत अशी बादशहांनी फाजिलखान मीरसामान यास आज्ञा केली.

गाजिउद्दीनखान बहादुर यानेहि गनिमांची गढी पाडण्यासाठी(गुलबर्गा जिल्ह्यात) बेलदार मागविले होते. दोनशे बेलदार पाठवावे अशी आज्ञा झाली.

मरहूम इहतिमामखान याचा मुलगा व औंढयाचा(मराठवाडा) किल्लेदार सय्यद अहमदयार याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

सिरागडचा बदललेला किल्लेदार व फौजदार फखुद्दीनखान हा येऊन बादशहांना भेटला.

सय्यद जाफर याला वाकणची किल्लेदारी व फौजदारी देण्यात येऊन त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बंडखोर अकबर(औरंगजेबाचा मुलगा) याच्या मुलींना घेऊन येण्यासाठी नगारखान्याचा अधिकारी शहाबेग याला नेमण्यात येऊन त्याला अहमदाबादेचा सुभेदार शुजाअतखान याजकडे पाठविण्यात आले.

अजमतुल्ला दरवेशची मुले सय्यद अली व अब्दुल अली यांना नीम( ? ) व नोहरा(?) येथे ठाणेदाऱ्या देण्यात आल्या.

## १० जून १६९६

केज धारुर(मराठवाडा) येथील अधिकारी मुहंमद शरीफ याला चंदेरी कापड खरेदी करण्यासाठी पाठविण्यात आले.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार इनायतखान याला लिहून हटकरांशी झालेल्या चकमकीचा तपशील मागावा अशी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला आज्ञा झाली.

बनारसचे विणकर कापडावर कुराणाच्या ओळी काढीत. हा प्रकार बंद करण्यात यावा आणि असे कापड हुजुरात पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

## ११ जून १६९६

गाजिउद्दीनखान बहादुर याच्या छावणीतून समजले की : साबाजी(दीड हजार जात व पाचशे स्वार), मानसिंग(पाचशे जात व दोनशे स्वार) व रामसिंग(पांचशे जात व शंभर स्वार) हे मन्सबदार हजर नाहीत. त्यांना फरारी म्हणून नोंदण्यात यावे अशी आज्ञा झाली.

सरबाजखान(आदिलशाही कोकणचा माजी फौजदार) याच्या मृत्यूमुळे त्याच्या सरंजामात असलेला रंदार(?)चा परगणा दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूत याला तनखा जहागीर म्हणून देण्यात आला.

## १४ जून १६९६

आपण ईदुज्जुहा(बकरीद)ची नमाज मंगळवेढयात पढू तर ती जागा पाहून या अशी फरासखान्याचा अधिकारी अब्दुल्हे व मतलबखान करावल यांना आज्ञा झाली.

तरबियतखान याने लिहून पाठविले की : गनिमांच्या पारिपत्यासाठी मी इकडे आलो आहे. गनिमांच्या गढया पाडण्यासाठी एक तोफ पाठवावी. विनंती मान्य झाली. एक तोफ पाठविण्याची तोफखान्याचा मुश्रफ(अधिकारी)मुनिमखान याला आज्ञा झाली.

बकरीद्च्या नमाजाच्या प्रसंगी जरूर पडेल म्हणून मंगळवेढा येथील ईदग्याचा ओटा मोठा करावा अशी आज्ञा झाली.

बादशहांनी साल्हेर(?)चा फौजदार मुहंमद अमीन याच्या मन्सबीची चौकशी केली.

सरफराजखानाच्या जहागीर परगण्यावरील एक आमिल (अधिकारी) बापू हा नांदेडचा सुभेदार खानाजादखान याच्या कैदेत आहे असे समजले. त्याला सोडवून हैद्राबादच्या दिवाणाकडे पाठवावे म्हणून मुहंमद आदिल गुर्जबर्दार याला पाठवावा अशी आज्ञा झाली.

बादशहा हे बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'बापू पंडितला बोलवा. दक्षिणचे सुभे हैद्राबाद, वऱ्हाड, औरंगाबाद व विजापूर अगदी समुद्रापर्यंत या सर्व प्रदेशाचा नकाशा नीट करून मला दाखविण्यात यावा.'

## १४ ऑगस्ट १६९६

सोंध्याचा (कर्नाटक) जमीनदार सदाशिवनायक याच्या नावे फर्मान गुर्जबर्दारांच्या द्वारे पाठविण्यात आले.

असदनगर उर्फ अकलूज येथे बलरसखान याची ठाणेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याने विनंती केली की : वेळप्रसंगी या भागातील फौजदारांनी आपल्याला येऊन मिळावे. अशा अर्थाचे हुकुम पाठविण्याची आज्ञा करण्यात आली.

## २२ ऑगस्ट १६९६

बेळगावचा किल्लेदार बसालतखान याने लिहिले की : रहीमदाद अफगाण विजापुरात तैनात आहे. त्याला या भागाची फार चांगली माहिती आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. बादशहा म्हणाले, 'यापूर्वी सय्यद लष्करखान (विजापूरचा सुभेदार) हा रहिमदादला जामीन होता. त्याचप्रमाणे बसालतखान हा रहीमदादला जामीन राहात असल्यास त्याला बसालतखानापाशी तैनात करण्यात येईल.'

चांद्याचा राजा किशनसिंग हा मरण पावला होता. असदखान याने कळविले की : किशनसिंगाचा मोठा मुलगा वीरसिंग हा वीस वर्षाचा असून जमीनदारी करण्यास योग्य आहे. त्याला त्याच्या बापाच्या मृत्यूमुळे रिकामी असलेली जमीनदारी व मन्सब मिळावी. बादशहांनी मान्य केले. ते म्हणाले, 'पूर्वीप्रमाणे त्याच्याकडून खास पेशकश घेऊन चांद्याच्या जमीनदारीचे फर्मान त्याला देण्यात यावे.'

असदखानाने विनंती केली की : देवगडचा राजा नेकनाम याचा वकील नेकनामची विनंती मांडतो आहे. ती विनंती अशी :– मला बादशहाच्या कृपेने देवगडची जमीनदारी मिळाली आहे. राजा किशनसिंग याच्या नावे तशा अर्थाचे फर्मानहि सादर झाले आहे. आता राजा किशनसिंग हे वारले आहेत. ते फर्मान आता आपल्या नावे सादर व्हावे. बादशहांनी विनंती मान्य केली. राजा नेकनाम याच्या नावे वेगळे फर्मान व खिलतीची वस्त्रे सादर करण्याचा हुकुम झाला. राजा किशनसिंग याच्याकडे जे फर्मान गुर्जबर्दाराच्या हस्ते रवाना झाले होते ते गुर्जबर्दाराने आपल्या जवळच ठेवावे अशी आज्ञा झाली. कारण राजा नेकनामचा मोठा भाऊ वीरसिंग हा राजा नेकनाम याचा द्वेष करीत असतो. (किशनसिंगाचा दुसरा मुलगा मुसलमान झाला. त्याचे नाव नेकनाम ठेवण्यात येऊन त्याला देवगड, नागपूर जवळची जमीनदारी देण्यात आली. किशनसिंगाचा मोठा मुलगा वीरसिंग हा चंद्रपूर चांद्याचा राजा झाला).

### २३ ऑगस्ट १६९६

राजा उत्तमराम गौंड हा हुजुरात आला. त्याच्या मन्सबीबद्दल बादशहांनी चौकशी केली.

अधोनीचा किल्लेदार व फौजदार राजा अनूपसिंग याने पुढील अर्थाचे विनंती-पत्र पाठविले :– माझी पथके वर्षातून दोनदा देशी जातात. त्यांच्या ऐवजी दुसरी पथके येतात. माझा मुलगा सरूपसिंग याला सातशे जात व चारशे स्वार अशी मन्सब आहे. घोडयांना डाग दिले की नाही, नोंदी बरोबर आहेत कीं नाहीत हे पहावयाचे म्हणून सरकारी अधिकारी त्रास देतात. साहेबसिंगाच्या काळात जी वहिवाट होती तीच चालवून या त्रासातून माफी देण्यात यावी. बादशहांनी मान्य केले.

### २५ ऑगस्ट १६९६

बादशहांनी आज शहाजादा कामबक्ष याच्याकडे पंधरा केळी व काही करवंदे पाठविली. असदखान व खानजहान बहादुर यांना प्रत्येकी सात सात केळी देण्यात आली. शहाजादा आज्जम याजकडेही केळी पाठविण्याची आज्ञा झाली.

### २६ ऑगस्ट १६९६

बिदनूरच्या राणीने भेटी पाठविल्या (सुगंधी द्रव्ये व मसाले). त्या बादशहाच्या नजरे-खालून गेल्या.

चांद्याचा राजा किशनसिंग याचा मुलगा बीरसिंग यास दीड हजारी मन्सब, राजा ही पदवी, एक हत्ती, खिलतीची वस्त्रे व एक खंजीर ही देण्याची आज्ञा झाली.

ख्वाजा याकूत याने विनंती केली की : सोलापुरांतील आपल्या निवासस्थानातून पाण्याचा पाट तयार करण्यात आला आहे. त्याचा खर्चाचा आराखडा पाच हजार रुपये होता. त्या पैकी सरकारी रक्कम चार हजार रुपये खर्च झाली. मी माझे स्वतःचे तीनशे रुपये खर्च केले. हे तीनशे माझ्या तर्फे हुजुरात पेशकश म्हणून समजावे. पाटाचे पाणी बागेत आणण्यात आले आहे. बादशहांनी आज्ञा केली की एक माणूस सोलापूरला पाठविण्यात यावा. त्याने जाऊन प्रत्यक्षात किती खर्च झाला आहे याची चौकशी करावी.

### २७ ऑगस्ट १६९६

आज बादशहांनी रोजा (उपवास) ठेवला. म्हणून कचेऱ्या बंद होत्या.

### ३० ऑगस्ट १६९६

आज राजा बिशनसिंग याचा मुलगा विजयसिंग (हाच पुढे सवाई जयसिंग म्हणून प्रसिद्ध झाला.) हा बादशहास भेटला. मुलाखतीच्या वेळी विजयसिंगास नरकवासी संभाजीचा मुलगा राजा शाहू याच्या मागे उभे राहाण्याची आज्ञा झाली. कुंवर विजयसिंहाने बादशहास तसलीमात (मुजरे वगैरे) शिष्टाचाराप्रमाणे केले.

बादशहांनी पूर्वी आज्ञा केली होती की : इस्माईलखान मका हा शहाजादा आज्जम याच्या फौजेत तैनात आहे. आज्जमनगर पुरंदरच्या रक्षणासाठी त्याने त्या किल्ल्याकडे जावे. त्याला तिकडे पोहोचविण्यासाठी गुर्जबर्दार नेमा. त्यानंतर बादशहांनी दुसरा हुकुम सोडला की : इस्माईलखान मका याने शहाजादा आज्जम याच्या छावणीत राहावे. पुरंदरच्या

रक्षणासाठी शहाजादा आज्जम याने त्याच्या मनाला येईल त्याला पाठवावे.

गोकाकचा अमीन व फौजदार सय्यद मुजफ्फरखान याला यादवाडची फौजदारी पण देण्यात आली होती. ती रद्द करण्यात आली.

### ३१ ऑगस्ट १६९६

शहाजादा कामबक्ष याच्या देवडीवरचा नाजर ख्वाजा इज्जत (अधिकारी, निरीक्षक) याने एक पाणीपिण्याचे पात्र, त्याच्याबरचे झांकण, एक तबक व एक किश्ती अशी पांच पात्रे बिलोरी नक्षी केलेली घेऊन ती कामबक्षाच्या महालात पाठविली. शहाजाद्याला ती आवडली. त्यांनी ती पात्रे घेऊन आबदारखान्यात (जलपात्रे ठेवण्याची जागा) पाठविली. आबदारखानाचा दारोगा (व्यवस्थापक) मुहंमद कबीर याने ती पात्रे बादशहास दाखवली आणि म्हटले की : ही पात्रे पाच हजार रुपयांना विकत घेतली आहेत. बादशहा नाजरवर रागावले. त्यांनी त्याची मन्सब पन्नासनी कमी केली. बादशहांनी आज्ञा केली की : सौदागर व कारागीर यांना कैद करा. यापुढे अशी पात्रे आणता कामा नये.

### १ सप्टेंबर १६९६

मंगळवेढ्याचा किल्लेदार व फौजदार फजलुल्लाखान हा मरण पावला. त्याच्या जागेवर आसफखान (?) याची नेमणूक करण्यात आली.

कळविण्यात आले की : शहाजादा आज्जम याच्याबरोबर सैन्य थोडे आहे. आज्ञा झाली की : अजमतुल्लान, बलरसखान वगैरेंना अडीच हजार स्वार बरोबर देऊन शहाजादा आज्जम याजपाशी तैनात करण्यात यावे.

### २ सप्टेंबर १६९६

बादशहा काल मीरतुजुक (दरबारची व्यवस्था पाहाणारा) तरबीयतखान याला म्हणाले, 'न्यायकचेरीत आरडाओरडा (आवाज) फार होतो. भास्करराव हरकारा वगैरेंना कचेरीत येऊ देऊ नका.'

### ३ सप्टेंबर १६९६

अधोनीचा बदललेला किल्लेदार व फौजदार रादअंदाजखान हा येऊन बादशहाला भेटला.

रायरी (रायगड) चा फौजदार अब्दुर्रज्जाकखान याचे विनंतीपत्र बादशहांच्या नजरेखालून गेले. त्याने काही मागण्या केल्या होत्या.

बादशाही हत्ती घोड्यांना खुराक म्हणून द्यावी लागणारी रक्कम माफ व्हावी. बादशहांनी ती माफ केली.

फर्मान, खिलतीची वस्त्रे व घोडा या माझ्या वडिलांच्या मृत्यूच्या सात्वनार्थ मिळणाऱ्या वस्तू मिळाव्या. बादशहांनी मान्य केले.

वऱ्हाडातील चिचोळी (?) हा परगणा शिबंदीचा दोनशे माणसांच्या पगारासाठी तनखा म्हणून मला देण्यात आला आहे. तेथील फौजदारी पण मला देण्यात यावी.

हत्तीचे नुकसान झाले. त्याची जबाबदारी सूरसिंगावर घालण्यात आली. तो मरण पावला. नुकसानीची माफी देण्यात यावी. बादशहांनी मान्य केले.

* * *

## १

# पाच एप्रिल १६९९ ते पाच नोव्हेंबर १६९९

### पाच एप्रिल १६९९

बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने विनंती केली की : आपल्या आज्ञेप्रमाणे फतेहुल्लाखान यास तरबियतखानाच्या फौजेत तैनात म्हणून रवाना करण्यात आले. पण फतेहुल्लाखान जात नाही. तो म्हणतो की, 'मला धनाजी जाधव किंवा इतर गनीम यांच्या पाठलागावर पाठविण्यात यावे. मी कामगिरीची पराकाष्टा करीन. पण अशीच आज्ञा होत असल्यास मी काही कुरकुर न करता आपले डोके कापून हुजुरात पाठवीन. पण त्यापूर्वी एकदा येऊन बादशहाचे चरण पाहीन.' बादशहांनी आज्ञा केली की, 'त्याला हुजुरात येण्यासाठी दस्तक (परवाना) देण्यात यावे.'

### सोळा एप्रिल १६९९

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : कृष्णा सावंत हा मोठे सैन्य घेऊन वऱ्हाड प्रांतात हालचाल करीत आहे. बंडखोर निगूनबख्त (गोंड जमीनदार) हा आपल्या लहान सैन्यासहित त्याला मिळाला आणि संधी साधून त्याने मकहूर (कृष्णा सावंत) याला कैद केले.

हेरांच्या तोंडून बातमी कळली ती अशी : गनिमांचे सरदार चार हजार स्वारांसहित इकडे आले असून त्यांनी बादशाही मुलुख लुटला. ही बातमी कळताच तरबियतखान हा शहागडहून (जालन्याजवळ, औरंगाबाद जिल्हा) त्यांच्यावर तातडीने चालून गेला. या महिन्याच्या (शव्वाल) बारा तारखेस (तीन एप्रिल १६९९) युद्ध झाले. गनीमांचा

पराजय झाला. बारा कोस पर्यंत त्यांचा पाठलाग करण्यात आला. गनिमांची कित्येक माणसे ठार अगर जखमी झाली. अडीच हजार गुरेढोरे, गोण्या लादलेले दहा हजार बैल आणि शंभर घोड्या इतकी लूट तरबियतखानाच्या हाती पडली. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला (सेवेचे सार्थक झाले).'

तेगबहादुरचा पुत्र गोविंद(गुरू गोविंदसिंग) यांच्या बाबतीत सरहिंदचा फौजदार वजीरखान व जम्मूचा बदललेला फौजदार दिलावरखान यांना आज्ञापत्रे पाठविण्यात आली होती. त्यांची उत्तरे आली. ती बादशहांच्या समोर ठेवण्यात आली.

**सतरा एप्रिल १६९९**

औरंगाबाद ते बुऱ्हाणपूर या मार्गाचे रक्षण(राहदारी) करण्याचे काम फतेहुल्लाखान याजकडे देण्यात आले. त्याला दोनशे मोहरा किंमतीचा घोडा व खिलतीची वस्त्रे देऊन त्याला निरोप देण्यात आला.

**अठरा एप्रिल १६९९**

फराशखान्याचा अधिकारी शरफुद्दीन याला बादशहांनी आज्ञा केली की, 'आम्ही शुक्रवारचो नमाज मंगळवेढयात पढू. उद्या पुढील टप्प्याचे तंबू(पेशखाना) तिकडे पाठवा.'

नुत्रतजंग(जुल्फिकारखान) याच्याकडे चार लाख रुपये पाठवायचे होते. त्याच्या बदर्क्यासंबंधी (संरक्षक पथकासंबंधी) आज्ञा झाली की : अख्तयारबेग गुर्जबर्दार यांनी जुम्लतुल्मुल्क असदखान याच्या जवळचे शंभर स्वार खजिन्याबरोबर न्यावे आणि खजिना पोहोचवून परत यावे.

कळविण्यात आले की : शिकाकोल येथील खजिन्यात तेवीस लाख रुपये आहेत. आज्ञा झाली की मीरबाकी वगैरे तीन गुर्जबर्दार पाठवून खजिना हुजुरात बोलावून घ्यावा.

**एकोणीस एप्रिल १६९९**

अब्दुर्रहमान मुफ्ती हा मक्केच्या यात्रेवरून परत आला होता. त्याला पूर्ववत बादशाही छावणीत मुफ्तीगिरीवर नेमण्यात आले.

दौलताबादेचा किल्लेदार व फौजदार सय्यद मुर्तजाखान याने पुढीलप्रमाणे कळविले : फतेहुल्ला हे या भागात आले. ते रात्री हल्ल्यासाठी हालचाली करतात. या कामासाठी आमची पथके मागवितात. पण किल्ला रिकामा सोडून मदतीसाठी आमच्या पथकांनी जाणे हे कायद्याच्या विरुद्ध आहे. याबद्दल फतेहुल्लाचा जाब विचारण्यात यावा अशी आज्ञा झाली.

**वीस एप्रिल १६९९**

आज बादशहा सव्वासहा मैल अंतर प्रवास करून मंगळवेढ्याला पोहोचले. स्वारीत त्यांच्या बरोबर मन्सूरखान व खिदमत तलबखान, आणि स्वारीच्या मागे शहाजादे कामबक्ष हे होते.

**एकवीस एप्रिल १६९९**

आज बादशाहा मंगळवेढ्याच्या जुम्मामशिदीत शुक्रवारची नमाज पढले.

राणोद(माळव्यात, सिरोजच्या उत्तरेस सत्तर मैलावर)चा फौजदार शेर अफगन-

खान याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले : आपल्या आज्ञेप्रमाणे मी छत्रसाल बुंदेल्याच्या पारिपत्यासाठी निघालो. छत्रसाल त्यावेळी सूरजमऊ येथे होता. मी त्याच्यावर चालून गेलो. युद्ध झाले. शत्रूची अनेक माणसे ठार झाली. आमच्याकडचीही बरीच माणसे मारली गेली अगर जखमी झाली. छत्रसाल हा पळून किल्ल्यात घुसला. मी किल्ल्याला वेढा घातला. संधी साधून छत्रसाल किल्ल्यातून पळाला. मी गाव उध्वस्त केले. नंतर त्याचा पाठलाग केला. आज्ञा झाली तर छत्रसालला जिवे मारीन अगर त्याला आपल्या सेवेत आणीन. तो जेथे जेथे जाईल तेथे बादशहाच्या कृपेने त्याच्या मागे जाऊन त्याला नरकात पाठवीन. बादशाहा म्हणाले, 'आफरीन, शाबास, सेवेचा मजुरा झाला.' बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला आज्ञा केली, 'तुम्ही शेर अफगनखानाला लिहा की – छत्रसाल भेटीला आला तर उत्तम, नाहीतर त्याचे डोके कापून ते हुजुरात पाठवा. यानंतर तुमच्यावर सर्व प्रकारे कृपा होईल.'

### बावीस एप्रिल १६९९

शुक्रवारची नमाज आटोपून आज बादशहा मंगळवेढयाहून आपल्या तळावर (ब्रह्मपुरी) परत आले.

### तेवीस एप्रिल १६९९

सरबलंदखान उर्फ ख्वाजा मुसा याचा चुलतभाऊ ख्वाजा अब्दुल्लतीफ याला चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. सरबलंदखान याची मन्सब काढून घेण्यात आली. त्याला दोन हजार रुपयांचे वर्षासन देऊन शहाजहानाबादेत (दिल्ली) तैनात करण्यात यावे अशी आज्ञा झाली.

काल बादशहांनी असदखान, रूहुल्लाखान, ख्वाजा अंबर, ख्वाजा मसूद इत्यादींना डाळिंबे पाठविली. (बादशहाजादा मुअज्जम याने काबुलहून अठरा डाळिंबे व अठरा नासपाती पाठविली होती.)

### चोवीस एप्रिल १६९९

औरंगाबादचा अधिकारी (हारिस, संरक्षक) सय्यद हसनखान याचा अर्ज बादशहाच्या नजरेखालून गेला.

बुऱ्हाणपूरच्या बातमीपत्रावरून कळले की : मरहूम इस्लामखान याचा नातू अब्दुल करीमखान हा मदिरापान करून लोकांच्यावर जुलुम करतो. तो होळीचा खेळ खेळतो. निषिद्ध अशा पुष्कळच गोष्टी तो करतो. त्याला नउशे जात व चारशे स्वार अशी मन्सब होती. ती चारशे जात व दोनशे स्वार अशी कमी करण्याची आज्ञा झाली.

चीनकुलीजखान बहादुर याने पुढीलप्रमाणे अर्ज पाठविला : शिक्रापूरचा बदललेला ठाणेदार व राघोजीचा मुलगा मानाजी हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेत सापडला होता. आता तो सुटून माझ्या छावणीत आला आहे. त्याची मन्सब पूर्वीप्रमाणे बहाल करण्यात यावी अशी त्याची विनंती आहे. विनंती मान्य करण्यात आली. मानाजीला दीड हजार जात व पाचशे स्वार, त्या पैकी चारशे स्वार दुघोडी, अशी मन्सब होती.

**पंचवीस एप्रिल १६९९**

काटी (तुळजापूरजवळ) चा अमीन शेख पीर मुहंमद याने लिहिले की : येथे पन्नास हजार रुपयांचा सरकारी खजिना आहे. बदर्का (संरक्षक पथक) असल्याशिवाय मी तो पाठवू शकत नाही. आज्ञा झाली की : मुखलिसखान याने बदर्का पाठवून खजिना आणवून घ्यावा.

**सव्वीस एप्रिल १६९९**

बादशहांनी आज रोजा (उपवास) ठेवला. न्यायदानाचे काम बंद होते.

**सत्तावीस एप्रिल १६९९**

आज शुक्रवार. सरकारी काम बंद होते.

**अठ्ठावीस एप्रिल १६९९**

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे तूराणचा वकील ख्वाजा कुतबुद्दीन याला शहागडपर्यंत पोहोचवून तरबियतखान आणि त्याचे पुढील सहकारी, मुहंमद कामयाब (भाऊ), सय्यदखान, नागोजी माने, हैदरखान, आवजी, यशवंतराव, मरहूम इरादतखानाचा मुलगा शुकुल्ला, सय्यदखानाचा मुलगा सय्यद याकूब, बक्षी व वाकनीस मुहंमदमीर आणि मिर्जा मुहंमद हे येऊन बादशहांना भेटले.

सफशिकनखानाने विनंती केली की : कुलीजखानाच्या बरोबरचे बर्कंदाज सरकारात आहेत त्यांचे पगार थकलेले आहेत. त्यांना दोन महिन्याचा पगार देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

**एकोणतीस एप्रिल १६९९**

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याने लिहिले की : माझा चुलतभाऊ मुहंमद हुसेन याने कर्नाळा गड घेण्याच्या कामात खूप कामगिरी बजावली. कृपेची आशा बाळगून आहे. त्याला दोनशेची मन्सब होती. ती शंभर स्वारांनी वाढविण्यात आली.

मन्सूरखान याने विनंति केली की : माझा मुलगा मुहंमद जफर हा नरगुंद (?) च्या किल्ल्यावर आहे. तेथील हशमाच्या माणसांनी त्याला त्याच्या घरात कोंडले. 'आतिशखानाने जे दिलेले आहे ते तू आम्हाला दे.' तेथील किल्लेदार व फौजदार केशवदास याने हशमाच्या लोकांचे दाणापाणी बंद करून टाकून त्यांच्याकडून त्यांनी घेतलेले सगळे वसूल केले. यावर काय आज्ञा? बादशहांनी यावर केशवदासाच्या मन्सबीत वाढ केली.

काल बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांची पथके गुलबर्ग्याच्या जवळ आली. त्यांनी कित्येक खेडी लुटून जाळपोळ केली. बादशहांनी आज्ञा केली की, 'तरबियतखानाने सैन्य घेऊन जावे व गनिमांचे पारिपत्य करावे.' तरबियतखानाने विनंती केली की : हुकुमाच्या तामीलीत काही कुरकुर नाही. आज्ञा झाली तर माझा भाऊ कामयाब याला गनिमांच्या पारिपत्यासाठी पाठवीन. बादशहांनी आज्ञा केली, 'तुम्ही किंवा कामयाब यांचे जाणे स्थगित.' मतलबखान याला आज्ञा झाली की, 'तयार राहा. गनिमांच्या पारिपत्यासाठी मी तुम्हाला पाठवीत आहे.'

### तीस एप्रिल १६९९

ख्वाजा मुहरमखान (ख्वाजा याकूब) याने औरंगाबादेहून दहा खरबूजे पाठविली. ती बादशहासमोर ठेवण्यात आली. सटवाजी डफळे (जतेचा) याचा मुलगा बाबाजी (बाजी) हा रामा (राजाराम) पाशी होता. त्याला आणण्यासाठी मुनीमखानाचा कारभारी रामजी पंडित हा गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला. येताना त्याने आपल्याबरोबर बाजी डफळे याच्या मागण्यांची अर्जी आणली. ती बादशहांसमोर ठेवली. बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने चौकशी करून कळवावे, अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांचे सहा हजार स्वार गुलबर्गा भागात पसरले आहेत. या सुमारास त्यांनी हीरापेठ लुटले आहे. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी बादशहांनी तरबियतखानाचा भाऊ कामयाब यास रवाना केले. याशिवाय आज्ञा झाली की : 'नळदुर्गचा किल्लेदार व फोजदार मिहदीखान याने स्वतः गुलबर्गा भागाकडे रवाना व्हावे' असा त्याला हुकुम देण्यात यावा.

कळविण्यात आले की : बाबाराव हा इस्लामगड उर्फ रायरी (रायगड) येथे तैनात होता तो वारला. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती.

### एक मे १६९९

बादशहांनी आज्ञा केली की : सुभे दक्षिणच्या दिवाणाचा मुख्य हुजूर कारकून (पेशदस्त) मिहरचंद याला आणि त्याच्या मुलाला कैद करण्यात यावे. अंमलबजावणी करण्यात आली.

कामयाब याने गनिमांच्या पारिपत्यासाठी जाण्यास म्हणून निरोप घेतला. त्याने विनंती केली की : गुलबर्ग्याहून मला एक तोफ देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहाची चाकरी पत्करण्यासाठी बाजी डफळे याने चार अटी घातल्या होत्या:–

**एक :** मला पाच हजार जात व पाच हजार स्वार अशी मन्सब देण्यात यावी. यावर बादशहाची आज्ञा, चार हजार जात व चार हजार स्वार अशी.

**दोन :** शेख नसीर याला मन्सब देऊन आमच्याबरोबर तैनात करण्यात यावे. बादशहाची आज्ञा, मान्य केले.

**तीन :** जुन्या बादशाही इलाख्यातील परगणे काटी वगैरे चार महाल तनखा जहागिर म्हणून मिळावे. बादशहाची आज्ञा, मान्य नाही.

**चार :** पन्नास हजार रुपये खर्चासाठी देण्यात यावे. बादशाहाची आज्ञा, पंधरा हजार रुपये देण्यात येतील.

### दोन मे १६९९

नुसरताबाद उर्फ धारवाड येथील हरकाऱ्याने लिहून पाठविले की : रायहळ्ळी किल्ल्याजवळील प्रदेशाचा देसाई धीर हा मराठ्यांचा सरदार बहिर्जी याजकडे गेला. त्याच्याकडून त्याने काही पथके घेतली. त्याने किल्ल्याजवळील पेठ आपल्या ताब्यात घेतली असून त्याचे मोर्चे किल्ल्यापासून पंचवीस साखळ्यांच्या अंतरावर आले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की, 'शहाजादा मुहंमद बेदारबख्त याने बंडखोराचे पारिपत्य करावे.'

बागलाण्याचा फौजदार नजाबतखान याने बादशहाकडे एक जायनमाज(प्रार्थनेचे आसन) पाठविले. ते बादशहांनी पाहिले.

**तीन मे १६९९**

बादशहांना कळविण्यात आले की दक्षिण सुभ्याच्या दिवाणाचा हुजूर कारकून मिहरचंद हा कोतवाली चबुतऱ्यात कैदेत आहे. त्याने विनंती केली आहे की : मी मुसलमान होतो. येथे आणि ओरंगाबाद येथे असे दोन्ही ठिकाणी मिळून माझी पन्नास हजाराची मालमत्ता आहे. ती पेशकश म्हणून सेवेत देऊन टाकतो. वरील विनंतीवर मिहरचंदला बादशहाच्या आज्ञेने हुजुरात आणण्यात येऊन त्याला मुसलमान करण्यात आले. त्याची मन्सब एकशेवीस जात अशी होती. तीत दोनशेची बढती करण्यात आली. बादशहांनी त्याचे नाव शेख मिहरुल्ला असे ठेवले.

**चार मे १६९९**

शहाजादा मुअज्जम याने सव्वीस डाळिंबे व सतरा नासपाती पाठविली. ख्वाजा मुहरमखान याने ओरंगाबादेहून संत्री पाठविली.

**पाच मे १६९९**

आज शहाजादा मुअज्जमकडून अठरा डाळिंबे व नासपातीच्या दोन करंड्या आल्या.

मिहरचंद उर्फ मिहरुल्ला याची मालमत्ता त्याला परत करण्यात यावी. पेशकश माफ करण्यात आली आहे. मिहरुल्लाचा मुलगा बागमल याला कैदेतून काढून बापाकडे देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**सहा मे १६९९**

काल (जिल्काद पंधरा) बादशहाचा वाढदिवस होता. अमीर उमरावांनी आज बादशहाचे त्यानिमित्त अभिनंदन केले.

हैद्राबाद सुभ्याचा कोतवाल व बागांचा अधिकारी यान आंब्याच्या चार करंड्या पाठविल्या.

**सात मे १६९९**

मुहंमदाबाद उर्फ बीदर येथे तैनात असलेल्या हरकाऱ्यांच्या लिहिण्यावरून पुढीलप्रमाणे कळले : धनाजी जाधव वगैरे सरदार पंचवीस हजार स्वारांचे सैन्य घेऊन या जिल्ह्यात आले आहेत. किल्ल्यातील हशमांना कित्येक महिन्याचे पगार न मिळाल्यामुळे ते चौकी पहाऱ्याच्या बाबतीत गाफील आहेत. किल्लेदारापाशी स्वतःचे पथक नाही. त्यामुळे त्याचे भाऊ व मुले ही गनिमांच्या विरुद्ध किल्ल्याच्या बाहेर पडू शकत नाहीत. किल्ल्यात सरंजाम सामग्री अल्प आहे. तोफा नादुरुस्त अवस्थेत पडल्या आहेत. तोफा दुरुस्त करण्यासाठी अधिकाऱ्यांना हुकुम गेले पण अंमलबजावणी झाली नाही. गनिमांचे उच्छाद अमर्याद होत आहेत. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की, 'तेथील किल्लेदार व फौजदार सजावारखान याला ताकीदपत्र पाठवावे.'

जोधपूरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : आज्ञेप्रमाणे दुर्गादास राठोड याने बंडखोर राजपुत्र अकबर यास परत आणण्यासाठी म्हणून अहमदाबादेचा सुभेदार शुजाअतखान याजकडून पन्नास हजार रुपये, पोशाखाची वस्त्रे व तंबू आदि सरंजाम हे घेतले आणि तो मेरठ्याहून कंधारच्या दिशेने रवाना झाला आहे. अकबर परत येत असल्यास वाटेत त्याला कोणी अडवू नये या अर्थाचे फर्मान बादशहाने शुजाअतखानाकडे पाठविले होते. ते फर्मानही शुजाअतखानाने दुर्गादासापाशी देऊन ठेवले आहे.

**आठ मे १६९९**

बादशहांनी अधिकाऱ्यांच्या पुढीलप्रमाणे नेमणुका केल्या. औरंगाबादच्या सुभेदारीवर सय्यद हसनअलीखान याच्या ऐवजी बागलाणचा फौजदार नजाबतखान. बागलाणच्या फौजदारीवर नजाबतखानाचा मुलगा बहरोजखान. अधोनी इम्तियाजगडच्या किल्लेदारीवर राव स्वरूपसिंग याच्या ऐवजी सय्यद हसनअलीखान. सुल्तानपूर नंदुरबार व थाळनेर येथील फौजदारीवर इरादतखान.

**दहा मे १६९९**

मुखलिसखान बक्षीउलमुल्क याने आज्ञेप्रमाणे कोल्हापूरचा नकाशा बादशहासमोर ठेवला. बादशहांनी आज्ञा केली की : शहाजादा बेदारबख्त यांनी कोल्हापुरात छावणी करावी. आणि त्या प्रदेशातील गनिमांचे पारिपत्य करावे.

माहुलीचा किल्लेदार जैनुलआबिदीन याने पुढील प्रमाणे लिहून पाठविले : गनिमांनी (मराठ्यांनी) सिद्धगड काबीज केला. त्यांनी एक हजार पायदळ सैनिक व किल्ला चढून जाण्याची सामग्री (दोराच्या शिड्या वगैरे) माहुलीकडे पाठविली. मला बातमी कळताच मी खबरदारी बाळगिली. माहुली किल्ल्यात हशमाचे फक्त एक हजार पायदळ सैनिक आहेत. हे सैन्य फार कमी आहे. येथील शिबंदीसाठी आणखी सातशे माणसे पाठविण्याची कृपा व्हावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'वेळप्रसंगी मातबरखान (कल्याण भिवंडीचा ठाणेदार) याने मदत करावी.'

अहमदनगरच्या बातम्यावरून कळले की : (मराठा) सरदार हणमंतराव याने शेवगाव परगण्याची खेडी लुटली आहेत. तेथील फौजदार इल्तिफातखान याचा नायब सय्यद मुजफ्फर याजपाशी पथके नाहीत. खेड्याचे संरक्षण त्याच्याने होत नाही. शहादुर्गचा किल्लेदार व फौजदार अबुलफतह याने किल्ला जिंकल्याबद्दल किल्ल्या पाठविल्या. त्या बादशहाच्या नजरेखालून गेल्या.

छावणीचा नायबकोतवाल मुहंमद अमीन याने पुढील प्रकरण बादशहाच्या नजरेसमोर आणले.

एक मुसलमान जवाहिऱ्या हा जवाहिरे विकण्यासाठी हरदेव तिवारी याच्या घरी गेला. तिवारीने त्या जवाहिऱ्याला ठार मारून आपल्या घरात त्याला पुरले आणि त्याची चीजवस्त हस्तगत केली. एका आठवड्याने तिवारी याने मोत्यांची दोनपदरी माळ विकण्यासाठी म्हणून बाजारात पाठविली. जवाहिऱ्याच्या वारसांनी ती माळ मयताची

म्हणून ओळखली. तिवारीला कोतवाली चबुतऱ्यावर(ठाण्यावर) आणण्यात आले. त्याला मारहाण करण्यात आली. शेवटी त्याने आपला गुन्हा कबूल केला. मयत जवाहिऱ्या याचे प्रेत आणि मयताची चीजवस्त ही तिवारीच्या घरातून काढण्यात आली. आता जिवाच्या भीतीने तिवारी मुसलमान होऊ पाहात आहे. काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'त्याला काजीपाशी घेऊन जा. ते काय म्हणतात त्यावर विचार करता येईल.' तिवारीला काजीकडे नेण्यात आले. काजी म्हणाला, 'मयताचे वारस काय म्हणतात? त्यांच्या म्हणण्याप्रमाणे होईल.' मयताचे वारस म्हणाले, 'याला सोडता कामा नये. याला मारले पाहिजे.' या नंतर तिवारीला कोतवाली चबुतऱ्याच्या समोर ठार मारण्यात आले.

**अकरा मे १६९९**

आज शुक्रवार. न्यायकचेरी(दीवाण) बंद होती.

**बारा मे १६९९**

जुल्फिकारखानाच्या सैन्यातील बातम्यावरून समजले की : जुल्फिकारखानाने बादशहाच्या आज्ञेप्रमाणे जमशीदखान यास जिंजी प्रांतात ठेवले असून तो स्वतः रामाच्या (राजारामाच्या) पारिपत्यासाठी पंचवीस एप्रिल रोजी हुजुरात येण्यासाठी रवाना झाला आहे.

अधोनी इम्तियाजगडचा बदललेला किल्लेदार व फौजदार राव स्वरूपसिंग याची मन्सब कमी करण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यावरून समजले की : बेदारबख्त हा गनिमांची गाठ घेण्यासाठी कोल्हापूराहून मिरजेकडे रवाना झाला.

**तेरा मे १६९९**

नरकवासी संभा(जी)चा मुलगा राजा शाहू याच्या दिवाणगिरीवर रुद्रदास हा होता. त्याला बदलून त्याच्या जागेवर फराशखान्याचा मुश्रफ शरफुद्दीन याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक बालाबंद(अलंकार) बक्षीस देण्यात आला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : धना(जी) जाधव याने पिठूर(?)च्या गढीला वेढा घातला. तेथील देशमुख याने सात दिवस गढी लढविली. शेवटी धनाजीने देशमुखाला कैद केले. आणि त्याच्याकडून चाळीस हजार रुपये चौथ म्हणून घेतले. त्यानंतर त्याने कारीमुंगी परगण्याला घेरले आहे. धनाजीचा हेतु हा दिसतो की पावसाळा तोंडावर आला आहे. भीमेला पूर येत आहे. त्यामुळे त्या प्रदेशातून निघून परंडयाच्या वाटेने आपल्या देशी परत जावे. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की, 'त्या भागातील फौजदारांना ताकीदपत्रे लिहिण्यात यावीत.'

**चवदा मे १६९९**

गाजिउद्दीन फीरोजजंग याचा भाऊ अब्दुर्रहीमखान याची मन्सब तीनशे जात व दीडशे स्वार अशी कमी करण्यात आली. त्याला एक हजार जात व अडीचशे स्वार अशी मन्सब होती.

एका माणसाने एक अर्ज लिहिला. तो लिहून त्याने बाणाला बांधला आणि तो बाण बादशहाच्या निवासस्थानात टाकला. तो बाण नेमका बादशहाच्या समोर येऊन पडला. अर्जात पुढील मजकूर होता. : एका माणसाने कट केला आहे की बादशहा बाहेर निघाले असता बाणाने किंवा तलवारीने त्यांच्यावर आघात करावा. मी त्या माणसाला ओळखतो. मी तबेल्यात आहे. चौकशीसाठी ज्या कुणाची नेमणूक होईल त्याच्यापाशी हजर होण्यास मी तयार आहे. बादशहांनी बाण आणि अर्ज ही हमीदुद्दीनखानबहादुर याजपाशी देऊन त्या इसमास हुडकून काढण्याची आज्ञा केली.

### सतरा मे १६९९

इरादतखान यास सुल्तानपूर नंदुरबारच्या फौजदारीवर नेमण्यात आले होते. ती नेमणूक बदलून त्याला सय्यद हसनअलीखान याच्या जागी अधोनी इम्तियाजगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

खान फीरोजजंग याने कळविले की : मी वऱ्हाड प्रांतात दाखल झालो असून निगून-बख्ताचे पारिपत्य केले आहे. त्याला मी हाकलून लावीन अगर त्याला पकडून कैद करीन.

### अठरा मे १६९९

इख्तिसासखान हा कोल्हापूरचा फौजदार होता. त्याला चार हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती (मुकर्‍रबखानाचा मुलगा). त्याने शहाजादा आज्जमच्या मार्फतीने विनंती केली की : आपण चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात आहोत. आपल्याला शहाजादा बेदारबख्तापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

सय्यद हसनअलीखान यास सरदारखान याच्या जागेवर सुल्तानपूर नंदुरबारचा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

### एकवीस मे १६९९

बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखान हे धनाजी जाधवाच्या पारिपत्यासाठी जातील तेव्हा त्या त्या भागातील फौजदार व ठाणेदार यांनी आपापल्या हद्दीत त्यांच्याशी सहकार्य करावे.

हमीदुद्दीनखानबहादुर याने कळविले की : ज्या इसमाने बाणाला अर्ज बांधून तो आपल्याकडे फेकला होता त्याची मी चौकशी केली आहे. त्या इसमाचे नाव अब्दुर्‍रहीम असे आहे. त्याला विचारले तर म्हणतो की, 'मी फक्त बादशहांना सांगेन, इतरांना नाही.' याशिवाय वेड्यासारखे काही तरी बरळतो. बादशहांनी आज्ञा केली की, 'त्याला नर्मदेच्या पलीकडे घालवून देण्यात यावे.'

### बावीस मे १६९९

आज बादशहांनी रोझा (उपवास) ठेवला. दोन्ही दीवाण, दिवाणे आम व न्याय-कचेरी ही बंद होती.

### तेवीस मे १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर बसून सोलापुराकडे रवाना झाले. सव्वासहा मैलाचा प्रवास करून त्यांनी बाघवाडीपाशी मुक्काम केला.

राणा अमरसिंग याचे अधिकारी पृथ्वीसिंग, रामराय, बाघमल व जगरूप यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

**चोवीस मे १६९९**

आज बावडीहून निघून सहा मैलाच्या वर अंतर कापून बादशहांनी सीना नदीच्या काठावर मुक्काम केला.

रणथंबोरचा किल्लेदार अब्दुलकादर याने आंब्याच्या चार करंड्या पाठविल्या होत्या. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, रूहुल्लाखान, मुहंमद अमीनखान, सियादतखान व हमीदुद्दीनखान यांच्याकडे आंबे बक्षीस म्हणून देण्यात आले.

**पंचवीस मे १६९९**

आज सोलापूरच्या जुम्मामशिदीत बादशहा शुक्रवारची नमाज पढले.

पदमसिंगाचा (टिटवाळ्याच्या लढाईत १६८३ मध्ये मारला गेलेला व बीकानेरच्या रावकर्ण राठोड याचा मुलगा) नातू साहेबसिंग याने विनंती केली की : मी शहाजादा मुअज्जम यांजपाशी तैनात होतो. दुष्काळामुळे सात वर्षे मला जहागिरीतून काही मिळाले नाही म्हणून मी हुजुरात आलो. परवानगीवाचून शहाजाद्याची छावणी सोडून आलो म्हणून माझी मन्सब काढून घेण्यात आली आहे. मी विपन्नावस्थेत आहे. एकदा आपले चरण दृष्टीस पडावे अशी इच्छा आहे. कृपा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

**सत्तावीस मे १६९९**

साहेबसिंग बादशहांना भेटला. त्याची पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब बहाल करण्यात आली.

लुत्फुल्लाखान हा फीरोजजंगापाशी तैनात होता. त्याची मन्सब कमी करून त्याला व त्याचा भाऊ इनायतखान यांना हुजुरात बोलावण्यात आले.

**अठ्ठावीस मे १६९९**

कैलासवासी राजा भीम(उदयपूरचा राजपुत्र) याचा मुलगा गुमानसिंग हा येऊन बादशहांना भेटला. त्याला आज्जमच्या फौजेत तैनात करण्यात आले.

बादशहांनी आज्ञा केली की : बक्षींनी शामियान्यात बसून लोकांची प्रकरणे निकालात काढीत जावी. त्याप्रमाणे दोन्हेहि बक्षी, मुखलिसखान व बहरामंदखान हे, शामियान्यात येऊन बसू लागले.

हैद्राबाद सुभ्यात सैन्य कमी आहे असे बक्षी मुखलिसखान याने कळविले. यावर पाचशे स्वार व एक हजार पायदळ शिपाई नव्याने नेमण्याची हैदराबादेचा सुभेदार जानसिपारखान याला परवानगी देण्यात आली.

अहसनाबाद गुलबर्ग्याचा किल्लेदार मुहंमदबेग हा होता. त्याला बदलून त्याच्या जागी तरबियतखान याचा भाऊ कामयाब याची नेमणूक करण्यात आली. कामयाब याला खान ही पदवी देण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली.

### एकोणतीस मे १६९९

हैद्राबाद सुभ्यात सैन्य कमी आहे. चार हजार तीनशे स्वार तैनात करण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

### तीस मे १६९९

आज इदेचा (ईदुज्जुहा, बकरीद) दिवस. सोलापूरला बादशहा यासाठी राहिले होते. आज ईदग्यात जाऊन ते नमाज पढले. बरोबर शहाजादा कामबक्ष व अमीर उमराव मंडळी होती.

### एकतीस मे १६९९

आज बादशहा सोलापुराहून तळाकडे (ब्रम्हपुरी) परत येण्यास निघाले. वाटेत कामानी येथे त्यांनी मुक्काम केला.

'तरबियतखानाबरोबर देण्यासाठी दोन हजार स्वार तयार करा. त्याला मी पाठविणार आहे', अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहांनी सोलापूरचा किल्लेदार व फौजदार बख्शीखान यास सोलापूरकडे परत जाण्यासाठी निरोप दिला.

### एक जून १६९९

आज बादशहा तळावर (ब्रम्हपुरी) परतले. सटवाजी डफळे याच्या मुलाला परगणे मंगळवेढे तनखा जहागीर म्हणून देण्याची आज्ञा झाली.

### दोन जून १६९९

अर्शदखानाने कळविले की : बाबाजी (बाजी) डफळे याला मंगळवेढ्याचा परगणा तनखा जहागीर दिला आहे. पण तो तर हशमाच्या इसमांना पगारासाठी आहे. आज्ञा झाली की, 'त्यांना बीड व मुर्तजाबाद (मिरज) या परगण्यातून पगार देण्यात यावा.'

इनायतखान याने वकिलामार्फत विनंती केली की : मी खजिना व हत्ती घेऊन गुलबर्ग्यात बसलो आहे. आणि मला तर हुजुरात येण्याची आज्ञा झाली आहे. हत्ती व खजिना यांचे काय करावयाचे ? आज्ञा झाली की, 'हत्ती व खजिना ही बरोबर घेऊन हुजुरात या.'

कळविण्यात आले की : चीनकुलीजखान बहादुर हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे धनाजी जाधवच्या पारिपत्यासाठी परंडा भागात पोहोचला आहे. तरबियतखानाची रवानगी स्थगित करण्यात आली.

### चार जून १६९९

नरकवासी संभा (जी) चा मुलगा राजा शाहू हा आजारी होता. मोकळीक झाल्यावर तो बादशहांना भेटला आणि नऊ मोहरा नजर म्हणून त्याने पेश केल्या.

इहतिमामखान आख्ताबेगी याला इखलासखान ही पदवी देण्यात आली. (हा पुढे साताऱ्याच्या वेढ्यात मारला गेला.)

राजा भीम याचा मुलगा गुमानसिंग याला शहाजादा आज्जमच्या ऐवजी शहाजादा मुअज्जम याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

चीनकुलीज बहादुर याने लिहिले की : परंड्याहून धनाजी जाधवच्या पारिपत्यासाठी जावे अशी माझी इच्छा आहे. पण गनिमांपाशी (मराठे) बरेच सैन्य आहे. हुजुराकडून आणखी काही पथके धाडण्यात आली तर मी गनिमांचे व्यवस्थितपणे पारिपत्य करीन. बादशहांनी आज्ञा केली की, 'मिहदीखान (नळदुर्गचा फौजदार व किल्लेदार), उजबेकखान (धारुरचा किल्लेदार व फौजदार) व इतर फौजदार यांना त्यांच्या पथकासहित चीनकुलीजखानाला जाऊन मिळण्यासाठी मुद्दाम गुर्जबर्दाराबरोबर हुकुम पाठवावेत. तरबियतखानाने उद्या चीनकुलीजखानाच्या कुमकेसाठी रवाना व्हावे.'

इरादतखानाला (याचे आत्मचरित्र प्रसिद्ध आहे) इम्तियाजगड अधोनीचा किल्लेदार व फौजदार म्हणून जाण्यास बादशहांनी फातेहा पढून निरोप दिला.

**पाच जून १६९९**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव हा हैद्राबाद सुभ्याच्या हद्दीवरून परतून बादशहाच्या छावणीपासून (ब्रम्हपुरीपासून) अकरा कोसावर जिवणी(?) या गावी आला आहे. ही बातमी कळताच चीनकुलीजखान बहादुर हा परंड्याहून तातडीने रवाना झाला. आज तो इंदापूरला पोहोचेल. मजल दरमजल करीत तो गढीसंख (जत तालुका, सांगली जिल्हा) कडे चालला आहे.

बादशहांनी तरबियतखानाबरोबर चार हजार दोनशे स्वार दिले. आणि कुशल इच्छिणारा फातिहा पढून त्याला गनिमांचे पारिपत्य करण्यास जाण्यासाठी निरोप दिला.

मयत राजा भीम (उदयपुरचा राजपुत्र) याचे भाऊ इंद्रसिंग व बहादुरसिंग हे चाकरीच्या आशेने बादशहापाशी आले.

**सहा जून १६९९**

काल रात्री बादशहा हे मुखलिसखान बक्षिउलमुल्क याला म्हणाले, 'हमीदुद्दीनखानाबरोबर देण्यासाठी दोन हजार पाचशे स्वार तयार करा.' स्वार तयार करण्यात आले. ते पथक बादशहांनी पाहिले. बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर यास बादशाही छावणी भोवती गस्त आणि टेहेळणी करण्यासाठी जाण्यास निरोप दिला.

गुर्जबर्दारांचा दारोगा (मुख्य) सियादतखान यास बादशहांनी निरोप देऊन आज्ञा केली की : चीनकुलीजखानबहादुर हे आपल्या तळाच्या (ब्रम्हपुरी) जवळूनच कूच करीत धनाजी जाधवच्या पारिपत्यासाठी जात आहेत. तुम्ही त्यांना भेटून परत यावे.

सय्यदखान उर्फ सय्यदलाल आणि मुरीदखानाचा मुलगा वहीदखान यांना तरबियतखानाच्या फौजेत तैनात करून तिकडे रवाना करण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की : पावसामुळे शहाजादा कामबक्ष याच्या निवासस्थानात चिखलच चिखल झाला आहे. फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन (याच्याकडे शाहूच्या दिवाणगिरीचे पण काम होते) त्याने शहाजाद्याचे पूर्वीचे (व आताचे) निवासस्थान पाहून कळवावे अशी आज्ञा झाली.

### सात जून १६९९

मयत राजा भीम याचे भाऊ इंद्रसिंग व बहादुरसिंग हे बादशहांना भेटले. सटवाजी डफळे याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले : एकतीस मे (१६९९) रोजी मला बातमी कळली की धनाजी जाधव, दादो मल्हार वगैरे या भागात येत आहेत. आपण मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याला पाच हजार स्वार देऊन इकडे पाठवाल अशी आशा आहे. म्हणजे गनिमांचे पारिपत्य होईल व या भागात त्यांना छावणी घालू दिली जाणार नाही. बादशहांनी विनंती मान्य केली.

छत्रसिंग शिसोदिया याला तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. त्याला चारशे जात व अडीचशे स्वार अशी मन्सब आहे.

### आठ जून १६९९

सियादतखान हा आज्ञेप्रमाणे चीनकुलीजखानबहादुर याला भेटून तळावर परत आला.

### नऊ जून १६९९

आज शुक्रवार. दोन्ही दीवाण (दिवाणे आम व न्यायालय) बंद होते.

### दहा जून १६९९

बागलाण वगैरेचा किल्लेदार (व फौजदार) बहरोजखान याला मन्सबीत वाढ व रोख बक्षिसीही देण्यात आली.

नस्रुल्लाखान याने बादशहापसंद या आंब्याच्या करंड्या पाठविल्या होत्या. बादशहांनी शहाजादा व अमीर उमराव यांजकडे आंबे पाठविले.

### अकरा जून १६९९

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : चीनकुलीजखानबहादुर व जबरदस्तखान हे आपल्या सैन्यासहित धनाजी जाधवाच्या पारिपत्यासाठी माण नदीवरून सत्तावीस कोस पुढे गेले. भानावळी (?) मुक्कामी युद्ध झाले. उभय पक्षाचे अनेक लोक ठार झाले. सुमारे दोनशे घोड्या, नगारे, निशान वगरे लूट गाजींना (मोगलांना) मिळाली. गनीम पळून आपल्या स्वतःच्या प्रांताकडे (सातारा प्रांत) जात आहेत. चीनकुलीजखानबहादुर त्यांचा पाठलाग करीत आहे. बादशहा म्हणाले, 'छान केले. सेवेचा मजुरा झाला.'

### बारा जून १६९९

धनाजी जाधवाचे पारिपत्य करून तरबियतखान हा बादशाही तळाजवळ येऊन पोहोचला.

धनाजी जाधवावर विजय मिळविल्याचा वृतांत चीनकुलीजखान याने लिहून पाठविला.

### तेरा जून १६९९

तरबियतखान मीर आतिश (दारू गोळ्याचा अधिकारी) हा आज धनाजी जाधवावरील मोहिमेवरून परत येऊन बादशहांना भेटला. बादशहा तरबियतखानाला म्हणाले,

'तुमच्या सेवेचा मजुरा झाला.' त्याला खिलतीची वस्त्रे व मन्सबीत वाढ ही देण्यात आली.

नागोजी माने हा तरबियतखानाबरोबर आला होता. त्याने बादशहांना दोन मोहरा नजर केल्या. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. तरबियतखानाने विनंती केली की: धनाजीवरील मोहिमेत नागोजी माने याने उत्कृष्ट कामगिरी बजाविली. त्याच्या भाऊबंदांपैकी दोन माणसे या मोहिमेत मारली गेली आहेत. बादशहा म्हणाले, 'याची (नागोजीची) मन्सब, हुद्दा वगैरे काय आहे मला कळविण्यात यावे.'

चीनकुलीजखान याने धनाजी जाधवावर विजय मिळविला म्हणून त्याच्या मन्सबीत दोनशे स्वारांनी वाढ करण्यात आली. चीनकुलीजखान याचे इस्माईलखान मका आदि सरदारांचे मन्सब मरातब काय आहेत याची चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली.

मुहियुद्दीनकुली गुर्जबर्दार याने लिहून पाठविले की: आपल्या आज्ञेप्रमाणे नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान हा लष्करापाशी आला. आणखी एक गुर्जबर्दार उजबेकखानाला (मराठवाड्यातील धारूरचा किल्लेदार, बीड जिल्हा) आणण्यासाठी पाठविला आहे. आणि आता तरबियतखान हेच आपल्या हुजुरात आले आहेत. तर काय आज्ञा? आज्ञा झाली की : मिहदीखान याने आपल्या इलाख्यात (नळदुर्ग, उस्मानाबाद जिल्हा) जाऊन सावधगिरी बाळगावी.

अहमदाबादेचा सुभेदार शुजाअतखान याने लिहून पाठविले की : उदयपूरचा परलोकवासी राणा जयसिंग याचा प्रधान करणसिंग शिसोदिया हा आपल्या मुलांना बरोबर पथके देऊन बादशाही चाकरीत पाठवू इच्छितो. आज्ञा झाली की : त्यांना हुजुरात पाठवावे.

## चवदा जून १६९९

काल बादशहा हे बहरामंदखान बक्षी याला म्हणाले, 'भीमेचा पूर आहे तोपर्यंत तुम्ही आपल्या वाड्यातील कचेरीतच काम करीत चला.' (बहरामंदखानाचे निवासस्थान भीमेच्या उत्तर काठावर, जेथे आता बेगमपुरी आहे, होते असे दिसते. खानजहान बहादुरखानाचा वाडाही तिकडेच होता. बादशहांचा तळ दक्षिण काठावर ब्रह्मपुरीला होता.)

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांचे सुमारे पाच हजाराचे सैन्य इंडीच्या जवळ आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'चीनकुलीजखानबहादुर यांना लिहून गनिमांचे पारिपत्य करण्याचा हुकुम पाठवावा.' मुखलिसखानाने विनंती केली की : चीनकुलीजखानाने लिहिले आहे की हुजुरांच्या चरणांचे दर्शन घेऊन बरेच दिवस झाले आहेत. यावर बादशहा म्हणाले, 'गनिमांचे पारिपत्य करून त्यांनी हुजुरात यावे आणि एक गुर्जबर्दार नेमून मिहदीखान व उजबेकखान यांना चीनकुलीजखानाकडे पाठविण्याची व्यवस्था करा व धनाजी जाधवावर विजय मिळविल्याबद्दल चीनकुलीजखानाकडे फर्मान व खिलतीची वस्त्रे धाडा.'

## पंधरा जून १६९९

औरंगाबादच्या बातम्यावरून समजले की : गनिमांचे पन्नास स्वार जालन्याच्या भोवती फिरत असून ते लोकांना लुटत आहेत. तेथील सुभेदार व फौजदार यांना ताकीदपत्रे पाठवावीत अशी आज्ञा झाली.

मंगळवेढ्याचा किल्लेदार रुस्तमबेग याला तेथील फौजदारी पण देण्यात आली.

### सोळा जून १६९९

शुक्रवार. दोन्ही दीवाण (कचेऱ्या) बंद होत्या.

### सतरा जून १६९९

बीडचा फौजदार इल्तिफातखान हा खजिना घेऊन तळापाशी आला. त्याला आत येण्याची परवानगी देण्यात आली. उजबेकखान (धारुरचा किल्लेदार) याने वकिलाच्या द्वारा विनंती केली की : आज्ञेप्रमाणे मी भीमेच्या पलिकडे पोहोचलो असून चीनकुलीजखानाच्या लष्करात जात आहे. माझ्या पथकांपैकी इतरांना भीमा पार करण्याचा परवाना (दस्तक) देण्यात यावा. विनंती मान्य करण्यात आली.

चीनकुलीजखानाने लिहिले की : सटवाजी डफळे याला माझ्याकडे तैनात करण्यात यावे. तसेच तरबियतखानाच्या तैनातीतील शिद्दी खुदावंदखान आदि अधिकाऱ्यांना काही दिवसांसाठी माझ्याकडे देण्यात यावे. बादशहांनी सटवाजी डफळे याला त्याप्रमाणे लिहिले. 'जावे', अशी आज्ञा केली. खालील अधिकाऱ्यांना चीनकुलीजखानाकडे तैनात करण्यात आले. शिद्दी खुदावंदखान, बहादुर ठाणेदार महरापूर (फखरापूर?) दीड हजारीजात व सातशे-स्वारांचा मन्सबदार, सय्यदखान सातशे जात व दोनशे स्वारांचा मन्सबदार, सुल्तान व मरहूम खानजहान बहादुर यांचे स्वार सहाशे, छत्रसिंग शिसोदिया चारशे जात व दोनशे स्वारांचा मन्सबदार.

### अठरा जून १६९९

धोडप (नाशिक जिल्हा) चा किल्लेदार अबुल्हसन हा बादशहांना येऊन भेटला.

मुहंमदाबाद उर्फ बीदरचा किल्लेदार सरअफराजखान (सजावारखान?) याने लिहिले की : आज्ञा होत असेल तर गनिमांच्या पारिपत्यासाठी मी किल्ल्याच्या बाहेर पडत जाईन. विनंती अमान्य करण्यात आली.

सोंध्याचा जमीनदार शिवप्पा नाईक याच्या नावाने फर्मान पाठविण्यात आले.

### (दोन मुहरम) एकवीस जून १६९९

आतिशखान मरहूम याचा मानलेला मुलगा मुहंमद जफर हा येऊन बादशहाला भेटला.

काल संध्याकाळी मुहंमद अमीनखान सदर (न्यायाधीश) याने पुढीलप्रमाणे बादशहांना कळविले : खान फीरोजजंग यांनी मला पुढीलप्रमाणे पत्र पाठविले आहे—देवगडचा किल्ला (नागपूरजवळ) जिंकून घेण्यासाठी मी हामिदखानबहादुर (फीरोजजंगाचा भाऊ) याला पाठविले. युद्ध झाले. बादशहाच्या भाग्याने शत्रूचे अनेक लोक ठार झाले. हामिदखान याने देवगडचा किल्ला ताब्यात घेतला आहे. फीरोजजंगच्या सैन्यातूनहि याच सुमारास वरीलप्रमाणे बातमी आली. बादशहा म्हणाले, 'शाबास आफरीन, सेवेचा मजुरा झाला.'

रायरीचा (रायगड) किल्लेदार व फौजदार शिवसिंग याने आपल्याला पुत्र झाला म्हणून एक हजार रुपये नजर म्हणून पाठविले. बादशहाने मुलाचे नाव प्रीतसिंग (पर्वत-सिंग ?) ठेवले.

## अठ्ठावीस जून १६९९

चीनकुलीजखान याच्या तैनातीतील पुढील इसमांना मन्सबीत वाढ व पदव्या देण्यात आल्या. मुहंमद शाकिरयार, शाकिरखान, मिर्जाबेग मरहूमचा मुलगा नौरोजबेग यास मिर्जा-बेगखान ही पदवी, मरहूम लष्करखान याचा मुलगा सय्यद अजीजुल्ला यास अब्दुल अजीज-खान ही पदवी.

बागांचा व्यवस्थापक ख्वाजा मुहरमखान याने औरंगाबादेहून पन्नास आंबे पाठविले. बादशहांना ते आवडले. बादशहांनी आंब्याचे नाव 'मुहरमपसंद' असे ठेवले.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिकदखान याने लिहिले की : आज्ञेप्रमाणे मी बंडखोर निगून-बख्त यांच्या सहकाऱ्यांपैकी सादत अफगाण यांच्या कुटुंबियांना व नातेवाइकांना पकडले. आता सादत अफगाण हा हुजुरांची चाकरी करण्याच्या उद्देशाने आला आहे. त्याला हुजुरात पाठवावे अशी आज्ञा झाली.

धामोनी (बुंदेलखंडात, सागर जवळ) चा फौजदार शेरअफगनखान याने विनंती केली की : चित्रमुकुट बुंदेला हा छत्रसाल याला सोडून नोकरीच्या आशेने आला आहे. त्याला मन्सब मिळावी. धामोनीच्या किल्लेदारीवर गयासुद्दीनच्या जागी माझा मुलगा सफरकुली याची नेमणूक करण्यात यावी. तिसरी विनंती ही की छत्रसालच्या पारिपत्यासाठी इकडील फौजदा-रांना व दतियाचे रावदलपत, ओरछाचे अवधूतसिंग व चंदेरीचे दुर्जनसिंग यांच्या कारभाऱ्यांना आपापली पथके घेऊन मला येऊन मिळावे अशी आज्ञा व्हावी. विनंत्या मान्य करण्यात आल्या.

## एकोणतीस जून १६९९

बादशहांनी आज चीनकुलीजखान व त्यांचे सहकारी बिलबारसखान व मोगलखान आदींना कुशलता निदर्शक फातेहा (प्रार्थना) पढून अहमदनगरकडे जाण्यास निरोप दिला. चीनकुलीजखानाला एक शिरपेच खड्याचा व दीड हजार रुपयाचा हार बक्षीस म्हणून देण्यात आले. बीडचा फौजदार इल्तिफातखान यालाही फातिहा पढून निरोप देण्यात आला. त्याची मन्सब वाढविण्यात आली. सयाजी मराठा याला इल्तिफातखान याजकडे तैनात करण्यात आले.

## एक जुलै १६९९

परंड्याचा किल्लेदार गैरतखान (इज्जतखान?) हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहास भेटला. इंडीचा ठाणेदार अमानुल्लाखान हा येऊन बादशहांना भेटला. सय्यद वजीहुद्दीन यास चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात म्हणून जाण्यास निरोप देण्यात आला.

ख्वाजा मंजूर याने विनंती केली की : बंडखोर अकबर याची मुलगी सिबगतुन्निसा बेगम ही तापाच्या आजाराने मरण पावली. बादशहा हे जनाज्याची नमाज पढले. हमी-दुद्दीनखानबहादुर याला त्यांनी आज्ञा केली की, 'तिचा (सिबगतुन्निसा बेगम) दफनविधि मंगळवेढ्यात केला जावा.'

## दोन जुलै १६९९

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : रामा (राजाराम) हा आपल्या किल्ल्यांची पाहणी

करण्यासाठी तळकोकणात गेला होता. तेथून तो साताऱ्याला परत आला. साताऱ्याला तो चार दिवस राहिला. तेथून तो मावळ(?)ला गेला. तेथील जमीनदारांचा पाहुणचार घऊन तो आता वसंतगडला गेला आहे.

धामोणीचा बदललेला किल्लेदार गयासुद्दीन याने कळविले की : निगूनबख्त हा देवगड (नागपूरजवळ)हून या भागात आला. त्याने मंडल्याचा जमीनदार अब्दुल्हादी याच्याशी युद्ध केले. अब्दुल्हादीचा अधिकारी आज्जम व पाचशे अफगाण ठार झाले. निगूनबख्ताने अब्दुल्हादीचा मुलुख बळकावला आहे. आता धामोणीच्या किल्ल्यावर चाल करून येण्याचा त्याचा बेत आहे. धामोणीच्या किल्ल्यात सामग्री काय आणि हशम शिबंदी काय, काही नाही. याची व्यवस्था व्हावी. यावर मुखलिसखान बक्षी याने चौकशी करून वृतांत सादर करावा अशी बादशहाने आज्ञा केली.

बादशहाने आज्ञा केली की : मुहंमद आज्जम याजकडे चौपन्न लाख रुपये नुगलखान याने पोहोचवावे. शहाजादा बेदारबख्त याजकडे एक लाख रुपये नुस्रतजंगाबरोबर (जुल्फिकार-खान) पाठवावे. आणि फीरोजजंगाच्या लष्करात पाच लाख रुपये पाठविण्यात यावेत. हिंदुस्थान(उत्तर भारत)चा खजिना उज्जैनला येत आहे. त्यातून पगारवाटप करण्यात येईल.

### चार जुलै १६९९

निगूनबख्त जिकडे जाईल तिकडे तुम्ही त्याचा पाठलाग करावा अशा अर्थाचे हुकुम फीरोजजंग याला पाठवावे अशी आज्ञा झाली.

शिकाकोलचा फौजदार फकीरुल्लाखान याने एक लाख रुपयांची हुंडी पाठविली होती. रक्कम खजिन्यात दाखल करावी अशी आज्ञा झाली.

### पाच जुलै १६९९

निगूनबख्ताच्या पारिपत्यासाठी पुढील इसमांना हुकुम धाडण्यात आले. माळव्याचा सुभेदार मुख्तारखान, धामोणीचा फौजदार शेरअफगनखान, इटाव्याचा फौजदार खैदर अंदेशखान, चांद्याचा जमीनदार (राजा) बीरसिंग याला लिहिण्यात आले की : तुमचा भाऊ राजानेकनाम याला देवगड उर्फ इस्लागड येथे स्थापन करून तुम्ही चांद्याला परत या.

उमर अफगाण हा सोलापूरच्या किल्ल्यात कैदेत होता. तेथून तो पळाला. 'माळव्यात आला असल्यास त्याला पकडून हुजुरात पाठवावे', अशी माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याला आज्ञा करण्यात आली.

अधोनी इम्तियाजगडच्या बातम्यांवरुन कळले की : डोंगर(गड)चा किल्लेदार शेख अली याने कोलारा(कोलार?) गनिमांपासून घेतला होता. शेख अलीच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

### सहा जुलै १६९९

मयत राजा भीम(उदयपूरचा राजपुत्र) याचे भाऊ इंद्रसिंग व बहादुरसिंग यांना मन्सबी देण्यात आल्या.

निगूनबख्त हा माळव्यात घुसला असून येथील नरसिंहभान नावाच्या जमीनदाराशी त्याने हातमिळवणी केली आहे. इकडील फौजदार व जमीनदार यांना यासंबंधीचे तातडीचे हुकुम देण्यात यावेत अशी विनंती माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याने केली. त्याप्रमाणे हुकुम रवाना झाले.

**सात जुलै १६९९**

पुरंदरचा किल्लेदार व फौजदार खानचंद(बुंदेला) याला डोळ्याचे दुखणे होते. या बाबत चोकशी करण्यासाठी बादशहाने शहाजादा आज्जम याला सांगितले. आज्जमने कळविले की : खानचंद आता आजारातून पुरता बरा झाला असून तो किल्लेदारीची व फौजदारीची व्यवस्था नीट ठेवीत आहे. त्याच्या जवळचे पथकहि चांगले आहे. पुरंदरची (व पुण्याची) फौजदारी व किल्लेदारी त्याच्याकडे बहाल ठेवण्यात आली. त्याला सातशे जात व तीनशे स्वार अशी मन्सब आहे.

बंडखोर अकबर याची मुलगी सिबगतुन्निसाबेगम हिचा मकबरा (थडगे, घुमट इत्यादि) मंगळवेढ्यात बांधण्यात यावा अशी आज्ञा होती. तंत्रज्ञ जवाहरमल याने चारशे वीस रुपयाचा खर्चाचा आराखडा तयार केला. रक्कम मंजूर करण्यात आली.

**नऊ जुलै १६९९**

उमर अफगाण हा सोलापूरच्या किल्ल्यातून पळाला होता. तो कोटरपिरीच्या जवळ (माळवा) पोहोचला असून मोठी धामधूम करण्याच्या विचारात आहे, असा अर्ज मुल्तफतखानाने केला. आज्ञा झाली की : तेथील फौजदार हिदायतुल्लाला, उमर अफगाणला पकडून किल्ला ताब्यात घ्यावा व तो पाडून टाकावा, असा हुकुम पाठवावा. माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याने हिदायतुल्लाला मदत करावी अशीहि आज्ञा करण्यात आली.

**दहा जुलै १६९९**

वऱ्हाडचा सुभेदार अस्करखान यास खेडला व पवनार येथे पूर्वीप्रमाणे ठाणी बसविण्यात यावी असा हुकुम पाठवावा अशी आज्ञा झाली.

शुक्रवारच्या नमाजासाठी आम्ही मंगळवेढ्यास जाऊ त्यावेळी राजा शाहू याची पथके आम्ही नजरेखालून घालू अशी बादशहाने आज्ञा केली.

गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार कामयाबखान याने पुढील प्रमाणे लिहिले : परसोजी भोसले वगैरे गनीम सहा हजार स्वारांचे सैन्य घेऊन या प्रदेशात पसरले. मी तातडीने जाऊन त्यांच्याशी सामना केला. युद्धात त्यांची अनेक माणसे ठार झाली. तीन कोसपर्यंत मी त्यांचा पाठलाग केला. घोडे, भाले इत्यादीची मोठी लूट आमच्या हातात सापडली. मिहदीखान (नळदुर्गचा फौजदार व किल्लेदार) व उजबेकखान (धारुरचा फौजदार व किल्लेदार) यांना, मला येऊन मिळण्याची आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

**बारा जुलै १६९९**

माळव्याच्या सुभेदाराने लिहिले की : निगूनबख्त याने गढमंडल्यावर नरेंद्रशहाची स्थापना केली व तो स्वतः वऱ्हाड सुभ्याकडे निघून गेला.

### तेरा जुलै १६९९

उदयपूरचा (नाजी प्रधान) करुणसिंग हा आपली मुले सुल्तानसिंग व श्यामसिंग यांच्यासहित बादशहांना भेटला. त्यांना मन्सबी देण्यात आल्या. नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान व धारूरचा किल्लेदार व फौजदार उजबेकखान यांना जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

बादशहांनी आज्ञा केली की : राजा शाहूचे शंभर स्वार यांना मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम याजपाशी तैनात करण्यात यावे.

### पंधरा जुलै १६९९

आज्जमनगर बेळगावच्या बातम्यावरून कळले की : राजहंसगडचा किल्लेदार अलाहदाद हा किल्ल्याच्या बाहेर आला होता. गनिमांच्या (मराठ्यांच्या) सैनिकांनी त्याला ठार मारले. त्याला अडीचशे जात व सत्तर स्वार अशी मन्सब होती. बादशहांनी किल्ला कलंदरसिंग (?) याच्या अधिकारात द्यावा अशी आज्ञा केली. त्याला तीनशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : श्रीरंगपट्टणचा जमीनदार (राजा) याचा हरकारा रामराय हा हुजुरात आहे. त्याने जगदेवराव (श्रीरंगपट्टणचा राजा) याच्याकडून रोख रक्कम आदि जिनसा घेतल्या असून त्याने आपल्या ताब्यात ठेवल्या आहेत. काय आज्ञा? हरकाऱ्याला दीडशे जातची मन्सब होती. बादशहांनी त्याची मन्सब पन्नासने कमी केली. आणि त्याने काय रक्कम आणि जिनसा बळकावल्या याचा तपशील मागितला.

### सोळा जुलै १६९९

खदक (गदग?) चा बदलेला किल्लेदार जुझारसिंग हा बादशहांना भेटला.

मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार अलीमर्दानखान याने विनंती लिहून पाठविली की : गनिमांचे पारिपत्य करण्यासबंधीचे हुकुम मिळाले, त्याप्रमाणे करीत आहे. पण गनिमांचे सैन्य मोठे आहे. माझा मुलगा अलीरजा हा खान फीरोजजंग याजपाशी आहे. त्याला माझ्याकडे पाठविण्याची व्यवस्था व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की, 'नुस्रतजंग (जुल्फिकारखान) हा कृष्णा ओलांडील. त्यासाठी दहा नावा कृष्णेत पाठविण्यात याव्या.'

### सतरा जुलै १६९९

कलंदसिंग याला राजहंसगडच्या किल्लेदारीवर जाण्यास निरोप देण्यात आला.

अहमदाबाच्या बातम्यावरून कळले ते हे : येथे तैनात असलेले जाफरअली यमनुल्मुल्की वगैरे हे मुहरममध्ये डोले, ताबूत, अलम वगैरे बसवून बाजे वाजंत्री वाजवितात. कितीहि मना केले तरी ऐकत नाहीत. काय आज्ञा? बादशहांनी पुढील अधिकाऱ्यांच्या मन्सबी कमी केल्या. जाफरअली, हैदरकुली, सय्यदहुसेन, मुहंमदकासम, मुहंमद मुअज्जम.

औरंगाबादच्या बातम्यावरून कळले की : मरहूम दिलेरखान याचा मुलगा चांद

हा लोकांवर जुलुम करीत असून, आपसात भांडणे लावीत आहे. त्याला हुजुरात बोलावण्यात यावे अशी आज्ञा झाली.

**एकोणीस जुलै १६९९**

बादशहाने श्रीरंगपट्टणचा जमीनदार (राजा) याच्याकडे खिलतीची वस्त्रे, स्मरणी व घोडा या वस्तू लुत्फुल्ला गुर्जबर्दार याच्याबरोबर पाठविल्या होत्या. त्या देऊन तो परत आला. श्रीरंगपट्टणच्या राजाने गुर्जबर्दाराला याबद्दल वस्त्रे व एक हजार रुपये बक्षीस म्हणून दिले. ते गुर्जबर्दाराकडेच राहू द्यावे अशी बादशहाने आज्ञा केली.

रहीमखान याची तैनाती शहाजहानाबाद येथे केली. तो औरंगाबादेपर्यंत गेला. तेथून तो पुढे जाईना. बादशहांनी आज्ञा केली की : गुर्जबर्दाराला पाठवून त्याला दिल्लीकडे पाठवावे. रहीमखानाने मन्सबीचा राजीनामा दिला होता. मन्सब नको असल्यास त्याला वर्षासन द्यावे अशी आज्ञा झाली.

लुत्फुल्लाखान (निजामुल्मुल्काचा मामा) याची मन्सब कमी केली होती. ती पुन्हा बहाल करण्यात आली.

**तेवीस जुलै १६९९**

मरहूम अब्दुल अजीजखान याचा मुलगा व धोडपचा किल्लेदार अबुल्हसन याला बक्षिसे देऊन धोडपकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

मुहंमद अमीनखान सदर (न्यायाधीश, निजामुल्मुल्काच्या बापाचा चुलत भाऊ, पुढे मुहंमदशहाच्या कारकिर्दीत मुख्य प्रधान) याचा भाऊ ख्वाजा अब्दुर्रहीम याला रिआयतखान ही पदवी देण्यात आली.

मंगळवेढ्याचा किल्लेदार व फौजदार रुस्तमबेगखान याने पुढीलप्रमाणे कळविले : रामा (राजाराम) याचा एक अधिकारी पूजेसाठी म्हणून पंढरपूरला आला होता. त्यांना पकडले. सरबराहखान हा बादशाही लष्करच्या भोवती टेहळणी करण्याच्या कामावर फौजदार आहे. या सरबराहखानाचा गुमास्ता अलीशेर हा राजारामाच्या माणसांची सुटका करण्यासाठी आला. आमच्या माणसांशी तो लढला. त्यामुळे संधी साधून गनिमांचे बरेच सरदार पळून गेले. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली, 'सरबराहखानाला हजर करा.'

**सव्वीस जुलै १६९९**

विजापुरी कर्नाटकचा फौजदार मामूरखान याने लिहिले की : येथे कामे पुष्कळ व्हावयाची आहेत. अधोनीचा बदललेला किल्लेदार राव सरूपसिंग याला इकडे येऊन बादशाही मोहिमातून भाग घेण्याची आज्ञा व्हावी. एका गुर्जबर्दाराला पाठवून सरूपसिंगाला तिकडे पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली. खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) हा तिकडे आल्यावर सरूपसिंगाने शहाजादा बेदारबख्ताच्या सैन्यात तैनात म्हणून जावे असे ठरले.

महादेवाच्या डोंगराचा ठाणेदार यासीनखान याने कळविले की : रामा (राजाराम) हा सातार्‍याहून निघून वसंतगडला पोहोचला आहे. मराठ्यांचे यमाजी वगैरे सरदार

दहा–बारा हजार स्वारांसहित देवराई या गावात ठाण मांडून बसले आहेत. बालाघाटात आपले घोडे ठेवून पेठेत छावणी करण्याचा त्यांचा विचार आहे. कुणाला तरी पाठवून त्यांचे पारिपत्य करावे आणि त्यांना छावणी घालू देऊ नये अशी विनंती आहे. या बाबतीत चीनकुलीजखान बहादुर याला ताकीदपत्र पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

खटाव येथील हरकाऱ्यांच्या लिहिण्यावरून कळले की : गनिमांचे एक हजार स्वार वारूगड जवळ जमले आहेत. किल्ल्यात सामग्रीसरंजाम व हशम नाही. काय आज्ञा? आज्ञा झाली की, 'मन्सूरखानाने सामग्रीसरंजामाची व्यवस्था करून द्यावी.'

धामोणीचा फौजदार (बुंदेलखंड) शेर अफगनखान याने लिहिले की : गगरोनीचा परगणा वीस वर्षांपासून छत्रसालाचा मुलगा गरीबदास याच्या ताब्यात होता. आता तो त्याच्या हातातून काढून घेण्यात आला आहे. तो मला तनखा जहागीर म्हणून देण्यात यावा. विनंती मान्य करण्यात आली.

हेरांच्या लिहिण्यावरून कळले की : इस्माईलखान मका, जाधवराव, एकोजी व परसोजी वगैरे यांना चीनकुलीचखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले होते. पण ते अद्याप त्या फौजेत दाखल झाले नाहीत. आणि चीनकुलीजखान तर अहमदनगरला पोहोचला. काय आज्ञा ? आज्ञा झाली की, 'सफशिकनखान मीर तुजक याने यसावल (अंमलबजावणीची माणसे) यांना पाठवून वरील अधिकाऱ्यांना चीनकुलीजखानाच्या सैन्यात रवाना करावे.'

### एकोणतीस जुलै १६९९

सरकारी मालमत्तेचा (बयूतातचा) अधिकारी खुदाबंदाखान याने कमरनगर (कर्नूल)-च्या खाणीतून मिळालेले तीन हिरे बादशहाच्या समोर ठेवले.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याने पुढीलप्रमाणे लिहिले : कानगौडा देशमुख याने एक किल्ला बांधला होता. आज्ञेप्रमाणे त्याचा प्रदेश उध्वस्त करून किल्ला ताब्यात आणला आहे. लक्ष्मेश्वरची फौजदारी व सदर किल्ल्याची किल्लेदारी यावर कुणाची तरी नेमणूक व्हावी. 'तुम्हीच कुणाचे तरी नाव सुचवा', असे त्याला कळविण्याची आज्ञा झाली.

मीर आतिश (दारूगोळ्याचा अधिकारी) तरबियतखान याला आज्ञा झाली की : दोनशे बंदूकची विजापुरी कर्नाटकचा फौजदार मामूरखान याजकडे पाठविण्यात यावे.

### तीस जुलै १६९९

बादशहांना कळविण्यात आले की : मुहंमदाबाद उर्फ बीदरचा सुभेदार अलीमर्दान-खानयाने रयतेकडून एक लक्ष तेरा हजार चारशे रुपये वसूल केले आहेत. 'गुर्जबर्दाराला पाठवून ती रक्कम अलीमर्दानखान याजकडून घेऊन हुजुरात आणावी', अशी आज्ञा झाली.

पुरंदर किल्ल्यातील तोफखान्याचा दारोगा कासिम याने लिहिले की : गनिमांचे मोठे सैन्य या भागात पसरले आहे. या किल्ल्यावर त्यांचा रोख दिसतो. आज्ञा झाली की, 'चीन-कुलीजखानबहादुर याने तातडीने तिकडे पोहोचावे असे त्याला लिहिण्यात यावे.'

हरकऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले : सटवाजी डफळ याचा मुलगा बाजी डफळे

याने (राजा)रामाची सोबत सोडून मुनीमखानाच्या मार्फतीने हुजुरात यावे असे ठरले होते. पण तो मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याजपाशी पोहोचला. मात्र सटवाजी हा आपला मुलगा बाबाजी (बाजी) व कबिल्याची माणसे यांना घेऊन पळून गेला. मुहंमद काजिम हा गढीसंख (संख, जत तालुका, सांगली जिल्हा) येथे येऊन पोहोचला. बादशहांनी आज्ञा केली की, 'सटवाजी व त्याचे भाऊबंद याच्या मन्सबी काढून घ्याव्या. मामूरखानाचा नायब दियानतखान हा विजापुरात आहे. त्याला लिहिण्यात यावे की– सटवाजीचे परगणे तातडीने जप्त करावे.'

**एक ऑगस्ट १६९९**

काल रात्री बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास बोलविले. त्याला पुढील प्रमाणे आज्ञा करण्यात आली : तरबियतखान मीर आतिश (दारू गोळयाचा अधिकारी) याजबरोबर पाठविण्यासाठी स्वार तयार करा. त्याचवेळी पाच हजार दोनशे स्वारांचे सैन्य तयार करण्यात येऊन बादशहांना केलेली व्यवस्था दाखविण्यात आली. बादशहांनी तरबियतखानाला मध्यरात्री बोलाविले आणि फातिहा पढून त्याला सटवाजी डफळे याच्या पारिपत्यासाठी रवाना केले. बादशहांनी सफशिकनखान मीर तुजक अवल (दरबारच्या एकंदर व्यवस्थेचा श्रेष्ठ संचालक) याला आज्ञा केली की : तरबियतखानाबरोबर नेमलेल्या सहकाऱ्यांना माणसे पाठवून तरबियतखानापाशी रवाना करा. सफशिकनखानाने विनंती केली की : या सहकाऱ्यांच्या काही मागण्या आहेत.

सय्यद अजमतुल्लाखान याने विनंती केली की : दोन हत्ती व दोन घोडे देण्यात यावेत. विनंती मान्य करण्यात आली.

सय्यदखानाने विनंती केली की : काही घोडे व रोख रक्कम देण्यात यावी. त्याला पाच घोडे व एक हजार रुपये देण्याची आज्ञा झाली. नागोजी माने याची नेमणूक सटवाजी डफळे याच्या जागी आटपाडी (सांगली जिल्हा)च्या ठाणेदारीवर करण्यात आली. त्याला एक खंजीर बक्षीस म्हणून देण्याची सूचना देण्यात आली. तरबियतखानाच्या फौजेच्या दिवाणगिरीवर अबुल्मुकादमचा मुलगा अब्दुलजम व बक्षीगिरी व वाकनिसी यावर मुहंमद तकी यांच्या नेमणुका करण्यात आल्या.

तरबियतखानाने विनंती केली की : शाही तोफखान्यातील दीडशे बर्कंदाज व दोनशेऐंशी पायदळ शिपाई मी बरोबर घेत आहे. त्यांची तीन महिन्याची पगारबाकी चाळीस हजार रुपये भरते. रक्कम महालातील खजिन्यातून देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

मरहूम लोधीखान याचा मुलगा व मिफताहुलफुतूह (कोथलागड)चा किल्लेदार अहमद याने पुढील प्रमाणे विनंतीपत्र धाडले : राजमाचीच्या किल्लेदाराचा भाऊ सावरबा(?) हा मोठे सैन्य घेऊन या भागात चालून आला. मी आपली पथके त्याच्या विरुद्ध पाठविली. युद्ध झाले. बादशहाच्या भाग्याने शत्रूची अनेक माणसे ठार झाली. त्यांच्या सरदाराला जिवंत पकडण्यात आले आहे. बादशहा म्हणाले, 'सेवेचा मजुरा झाला.'

### दोन ऑगस्ट १६९९

शहजादा बेदारबख्त याने मुर्तजाबाद मिरजकडे यावे अशा अर्थाची आज्ञा त्याला धाडण्यात आली.

राजा शाहू याच्या वकीलाने मुखलिसखानाच्या मध्यस्थीने विनंती केली की : राजे शाहू यांना आपली पथके दाखविण्याची आज्ञा झाली आहे. पण त्यापैकी पाचशेसत्तर माणसे मोगल सैन्यातच तैनात आहेत. ती परत येईपर्यंत पाहणी स्थगित करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

गढीसंख (संख, जत तालुका, सांगली जिल्हा) येथील ठाणेदार अली याने कळविले की : सटवाजी डफळे हा गढीला वेढा घालण्यासाठी येत आहे. चारशे बंदूकची आणि कोणीतरी अधिकारी पाठविण्यात येऊन माझे सहाय्य करावे. विनंती मान्य करण्यात आली आणि खानजहानची माणसे व शेख गुलाम मुहंमद, मुशरफ कौलार हैदराबादी यांना तिकडे (संखकडे) पाठविण्याची आज्ञा झाली.

### तीन ऑगस्ट १६९९

आटपाडीचा ठाणेदार नागोजी माने यास तरबियतखानाच्या फौजेत जाण्यास निरो देण्यात आला. त्याला एक घोडा, व एक कटचार ही देण्यात आली.

राजा भीम याचे भाऊ इंद्रसिंग व बहादुरसिंग यांना तरबियतखानाच्या फौजेत जाण्यास निरोप देण्यात आला. त्यांच्या काही विनंत्या मान्य करण्यात आल्या.

### पाच ऑगस्ट १६९९

मयत राजा अनूपसिंग याचा मुलगा इंद्रसिंग याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. त्याला एक घोडा बक्षीस देण्यात येऊन तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

गाजिउद्दीनखान फीरोजजंग याने लिहिले की : आज्ञेप्रमाणे चांदखान याला निगूनबख्ताच्या पाठलागावर पाठवीत आहे. पण तो नर्मदेच्या पलीकडे आहे. माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याला आज्ञा व्हावी की – निगूनबख्ताने नरेंद्रशहाला गढ (मंडल) येथे स्थापन केले आहे. तेथे जाऊन त्याचे पारिपत्य करावे. विनंती मान्य करून मुख्तारखानाकडे एक गुर्जबर्दार पाठविण्याची आज्ञा करण्यात आली.

मोतिकदखान सुभेदार बुऱ्हाणपूर याने पुढीलप्रमाणे लिहिले की : मऊ गंसाबाद (फर्रूखाबाद, जिल्हा उत्तर प्रदेश) येथील वाहिद अफगाण हा कालीबेटचा जमीनदार मकरंद याच्यापाशी पाचशे अफगाण घेऊन दहा हजार रुपये माहवार (मसिक) वर नोकरी करीत आहे. ती नोकरी सोडून दे म्हणून त्याला सांगितले पण ऐकत नाही. शहाजादा मुहंमद आज्जम याच्या जहागिरीतील अनेक गावे त्याने लुटली व तेथील मालमत्ता त्याने आपल्या स्वतःच्या गावी पाठविली. अकबराबाद आग्रा येथील सुभेदार याला लिहून वाहिद अफगाण याचे कबिले धरावे व त्याच्या सहकाऱ्यांची मालमत्ता जप्त करावी असा हुकुम व्हावा. विनंती मान्य करण्यात आली.

### सहा ऑगस्ट १६९९

मरहूम खानजहान याचा मुलगा अबुल्फतह हा स्वतःचे लग्न उरकून छावणीत (ब्रह्मपुरीच्या) आला.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यावरून पुढील प्रमाणे कळले : राव गोपाळसिंग हा आमच्या फौजेत तैनात होता. तो आपला मुलगा हिंमतसिंग याला सैन्यात (बेदारबख्ताच्या) ठेवून स्वतः निघून गेला. या संदर्भात यारअलीबेग याने विनंती केली की राव गोपाळसिंग हा येथे (ब्रह्मपुरी) तळापाशी आला आहे. त्याने चिठ्ठी लिहिली की काही विनंती करण्यासाठी मी आलो आहे. बादशहा म्हणाले, 'तो (गोपाळसिंग) येथे कशासाठी आला हे बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने चौकशी करून कळवावे.' त्याची मन्सब दोन हजार जात व एक हजार स्वार अशी आहे.

### सात ऑगस्ट १६९९

तुर्कताजखानाचा भाऊ व दहीवडीचा ठाणेदार ख्वाजाखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन त्याला व छत्रसिंग सिसोदिया यांना तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले. एखाद्या अधिकाऱ्याची नेमणूक करून माझ्या सैन्यात धान्य व रसद पोहोचेल अशी व्यवस्था व्हावी अशी तरबियतखानाने विनंती केली. विनंती मान्य करण्यात आली.

भीमेच्या पलीकडील काठावर (उतरे कडील) मरहूम खानजहान याचा वाडा होता. जवाहरमल तंत्रज्ञ याने आज्ञेप्रमाणे वाड्याचा नकाशा बादशहासमोर ठेवला. तो पाहून बादशहा म्हणाले, 'नुस्रतखान (खानजहानचा मुलगा) याने दुसऱ्या जागेत राहावे. वरील वाड्यात शहाजहानाबाद (दिल्ली) हून आलेली खानजहानची बहीण हाजीखानम ही राहील.'

जुन्नरच्या बातम्यांवरून पुढीलप्रमाणे कळले : तीनशे मुकाहीर (मराठे) हे लोहगडपाशी आले. त्यांनी किल्ल्याच्या तटावर दोराच्या शिड्या लावल्या. पण तोफखान्याची माणसे सावध झाली. त्यांनी दोर कापून टाकले. तेथील (लोहगड) किल्लेदार अटलसिंग याजपाशी पथके नाहीत. पावसाळ्याचा मोसम आहे. किल्ला हातात राहणे कठीण आहे. काय आज्ञा? आज्ञा झाली की, 'बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने चौकशी करून वृत्तांत सादर करावा.' अल्लाहकुली, सांगोल्याचा किल्लेदार व फौजदार, याने गनिमांचे तीन घोडे लुटले होते. ते हुजुरात पाठविले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : रामा (राजाराम) हा वसंतगडाहून बाहेर पडून साताऱ्याला परत आला आहे.

### आठ ऑगस्ट १६९९

उदयपूरचा राणा अमरसिंग आणि बिदनूरचा जमीनदार (राजा) बसप्पा नाईक (?) यांना प्रत्येकी एकेक घोडा पाठविण्याची आज्ञा झाली.

खान फीरोजजंग यांने पुढीलप्रमाणे लिहिले : सय्यद अब्दुल मआली याचा मुलगा खान मुहंमद हा पूर्वी बंडखोर निगूनबख्त याच्या चाकरीत होता. तो सध्या खानबहादुर नुस्रतजंग याच्या फौजेत तैनात आहे. त्याला इकडील प्रदेशाचा उत्तम

परिचय आहे. त्याला माझ्या फौजेत तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

शहाजादा कामबक्ष याच्या पथकातील दोनशे एकोणतीस माणसे फतेहुल्लाखानाच्या फौजेत व दोनशे छत्तीस माणसे कामयाबखानाच्या फौजेत तैनात होती. त्यांना परत बोलावण्यात यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

काल हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : दौलतमंदखान उर्फ शिवजी हा पूर्वी गुलालबारमध्ये कैदेत होता. जानोजीच्या विनंतीवरून त्याची सुटका करण्यात आली. तो आता जानोजीचा नायब म्हणून जखिनजिवणी(?)च्या फौजदारीवर काम करीत आहे. आता गनिमांना(मराठ्यांना) जाऊन मिळावे असा त्याने बेत केला आहे.

बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'तुमच्या तैनातीतील विश्वासू माणसाला त्याला धरून आणण्यासाठी पाठवा. तो लढू लागला तर त्याला ठार मारा. पण ही गोष्ट उघड होऊ देऊ नका.' हमीदुद्दीनखान बहादुर याने आपला बक्षी रामसिंग याला या कामावर नेमले. तो पथक घेऊन पोहोचला. शिवजी गढीच्या बाहेर आला. रामसिंगाने त्याला म्हटले, 'तुला हुजुरात येण्याचा हुकुम झाला आहे.' यावर शिवजीने तल्वार उपसली. चकमकीत तो मारला गेला. त्याचे डोके कापून पाठविण्यात आले आहे.

**नऊ ऑगस्ट १६९९**

चीनकुलीजखान याने विनंती केली की : या भागातील बाकनिसांना आज्ञा व्हावी की हलकट गनिमांची(मराठ्यांची) माहिती त्यांनी मला पुरवीत जावी. विनंती मान्य करण्यात आली.

संरक्षणासाठी म्हणून औरंगाबाद सुभ्याचे भाग पाडण्यात आले. एकेका अधिकाऱ्याला त्या त्या भागाच्या संरक्षणासाठी जबाबदार धरण्यात आले. ते भाग आणि त्यावरील अधिकारी हे पुढील प्रमाणे होते :–

(१) चीनकुलीजखान बहादुर यांजकडे अहमदनगर, पुणे, संगमनेर, शिरवळ.
(२) औरंगाबादचा फौजदार नजाबतखान याजकडे, जालना, अंबड, वैजापूर, कन्नड, फर्दापूर, गोदावरीवरील शहागडपर्यंत.
(३) बीडचा फौजदार इल्तिफातखान याजकडे फतेहाबाद, शेवगाव, शहागड, बादशाही छावणी(ब्रम्हपुरी).
(४) नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान याजकडे गुलबर्गा, सोलापूर, अक्कलकोट, व अफजलपूर.
(५) गुल्शनाबाद नाशिकचा ठाणेदार मातबरखान याजकडे अहमदाबाद उर्फ नानोदे(?) जव्हार, दूपदी दिंडोरी(?).
(६) धारूरचा फौजदार उजबेकखान याजकडे औसा(?) नलेगाव(?), गोदावरीपर्यंत.

**दहा ऑगस्ट १६९९**

आज बादशहा मंगळवेढ्यास जाण्यास निघत होते. पण मतलबखान करावलबेगी

याने विनंती केली की : पावसामुळे वाटेत खूप चिखल झाला आहे. यामुळे बादशहांनी प्रवासाचा बेत रहित केला.

**अकरा ऑगस्ट १६९९**

आज शुक्रवार. कचेरीचे कामकाज झाले नाही.

**बारा ऑगस्ट १६९९**

कळविण्यात आले की : खान फीरोजजंग याच्या फौजेत तैनात असलेले मुहंमद रजी वगैरे बर्कंदाज हे फीरोजजंगाचे सैन्य सोडून हुजूरात येत आहेत. आज्ञा झाली की, 'रुस्तमबेग याने जाऊन त्यांना परत फीरोजजंगाच्या सैन्यात घालावे.'

चीनकुलीजखानबहादुर याने विनंती लिहून पाठविली की : जुन्नरच्या किल्ल्यात अब्दुलकरीम वगैरे मावळे आहेत. त्यांना माझ्यापाशी तैनात करण्यात यावे.

तरबियतखान मीर आतिश याने खालील विनंत्या लिहून पाठविल्या :

(१) डफळापूरची ठाणेदारी अमानुल्ला यास देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

(२) खानापूरची ठाणेदारी आवजी आढळराव यास देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

(३) बहिर्जी पांढरे याचा मानलेला मुलगा परसोजी आणि सटवाजी डफळे याचे भांडण आहे. बहिर्जीचे म्हणणे आहे की– 'आपल्याला डफळापूरची जमीनदारी देण्यात आली तर आपण पेशकश म्हणून एक लाख रुपये देण्यास तयार आहोत. बादशहाने विनंती मान्य करून आज्ञा केली की, 'परसोजी (व बहिर्जी) पांढरे यास चीनकुलीजखानाच्या फौजेतून काढून तरबियतखानापाशी तैनात करण्यात यावे.'

(४) ठाण्यांच्या रक्षणासाठी आठशे स्वार व एक हजार प्यादे, स्वारास चाळीस रुपये व प्याद्याला पाच रुपये या हिशेबाने नेमण्यात यावेत. या कामासाठी एखाद्या अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात येऊन स्वारांसाठी मुहंमद काजिम व प्याद्यांसाठी मन्सूरखान या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली.

(५) कवठे येथील ठाणेदारीवर भूपतचा मुलगा सिद्धराज याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

(६) जवळे येथील ठाणेदारीवर अब्दुलरसूल याचा मुलगा उस्मान याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

(७) अथणीचा जमीनदार भूपत याचा भाऊ देवराव हा सटवाजी डफळे याच्या तक्रारीमुळे विजापूर येथे कैदेत आहे. त्याची सुटका करण्यात यावी. विनंती मान्य झाली व देवरायला तरबियतखानाच्या सैन्यात पाठविण्यात यावे अशी आज्ञा देण्यात आली.

**तेरा ऑगस्ट १६९९**

मरहूम मुखलिसखान याचा मुलगा व अहमदनगर सरकार (जिल्हा) मधील जेऊर (?) चा फौजदार अजीजुल्ला हा आज्ञेप्रमाणे येऊन बादशहांना भेटला.

आवजी आढळराव याला खानापूरच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले. त्याला दीड

हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे जात अशी वाढ करण्यात आली.

### चवदा ऑगस्ट १६९९

मुहंमदाबाद उर्फ बीदर येथील सुभेदार अलीमर्दानखान याने लिहून विनंती केली की : मी रयतेकडून पट्टी म्हणून एक लाख तेरा हजार चारशे रुपये वसूल केले असे येथील हरकारा व सवानेहनिगार (वृत्त सादर करणारा) यांनी वैमनस्याच्या पोटी खोटेच लिहिले आहे. त्यावरून ही रक्कम माझ्याकडून वसूल करावी अशी आज्ञा झाली आहे. हुकुम रद्द व्हावा. विनंती मान्य करण्यात आली.

त्रिचनापली व बिदनूरच्या जमीनदारांकडे खिलतीची वस्त्रे, फर्मान व घोडे या वस्तू नुस्रतजंग (जुल्फिकारअलीखान) याच्या द्वारे पाठविण्याची आज्ञा झाली.

### पंधरा ऑगस्ट १६९९

पावसामुळे आज कचेऱ्यांचे काम बंद होते.

### सोळा ऑगस्ट १६९९

मन्सूरखान याने अर्ज केला की : कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याने पुढीलप्रमाणे लिहिले आहे – गनिमांनी (मराठ्यांनी) सिद्धगडचा किल्ला ताब्यात घेतला होता. हे ऐकून मी तिकडे माझी पथके पाठविली. बादशहाच्या भाग्याने किल्ला परत आपल्या ताब्यात आला आहे. तेथे किल्लेदार व हशम (शिबंदी) यांची व्यवस्था करण्यात यावी.' आज्ञा झाली की : तेथील किल्लेदारी मातबरखानाच्या अधिकारात देण्यात यावी. मातबर-खानाला दोन हजार जात व एक हजार चारशे स्वार, त्यापैकी एक हजार स्वार दुघोडी, अशी मन्सब होती. तीत शंभर स्वारांची वाढ करण्यात आली.

बादशहांनी औरंगाबाद सुभ्याची विभागणी व अधिकाऱ्यांची नेमणूक पुढीलप्रमाणे करून आज्ञा केली की, 'या अधिकाऱ्यांनी गनिमांना (मराठ्यांना) आपल्या हद्दीत छावणी करू देऊ नये व चोरांना (मराठे गनिमांना) आपल्या हद्दीत राहू देऊ नये.'

सुभ्याचे पाडण्यात आलेले विभाग, त्यांच्या हद्दी, अंतरे व अधिकारी हे पुढीलप्रमाणे:

(१) चीनकुलीजखान याच्या ताब्यात चौसष्ट कोस लांब व तीस कोस रुंद, हद्दी अहमदनगर, संगमनेर, जुन्नर, शिरवळ, पुणे.

(२) औरंगाबादचा सुभेदार नजाबतखान, पन्नास कोस लांब व बेचाळीस कोस रुंद, जालना, अंबड, वैजापूर, कन्नड, खाली गोदावरी व उत्तरेस फर्दापूरचा घाट (अजिंठ्या-जवळ).

(३) बीडचा फौजदार इल्तिफातखान, साठ कोस लांब व चाळीस कोस रुंद, उत्तरेस शहागडपर्यंत (गोदावरीवर), दक्षिणेस ब्रह्मपुरीच्या छावणीपर्यंत.

(४) धारूरचा किल्लेदार उजबेकखान चव्वेचाळीस कोस लांब व छत्तीस कोस रुंद.

(५) नळदुर्गचा किल्लेदार व फौजदार मिहदीखान, बत्तीस कोस लांब आणि बत्तीस कोस रुंद, हद्दी गुलबर्गा, सोलापूर, अफजलपूर, धाराशीव (उस्मानाबाद).

**सतरा ऑगस्ट १६९९**

बहादुरगड पेडगावच्या बातम्यात म्हटले होते की : गनिमांचे पाचशे स्वार पाटसच्या ठाण्याजवळ छावणी करून आहेत. त्यांनी आपले घोडे जवळपासच्या रानात चरण्यासाठी सोडले आहेत. हुजुरांकडून कोणी अधिकारी येऊन त्यांचे पारिपत्य करील अशी आशा बाळगून आहे.

**एकोणीस ऑगस्ट १६९९**

कळविण्यात आले की : एक फकीर न्यायालयाच्या बाजूनेगुलाल बारकड उडी मारून कठड्यावरून बादशहाच्या तख्ताजवळ पोहोचाण्याचा बेत करीत होता. अल्लाह-यारबेग गुर्जबर्दार याने त्याला पकडून खाली आणले. चौकशी करता तो मजजूब (फकीरात वेड्यासारखे वागणारे) असल्याचे समजले. त्याला सोडून द्यावे अशी आज्ञा झाली.

ईरज (ग्वाल्हेर जवळ) कडील बातम्यावरून समजले की : बंडखोर निगूनबख्त याने छत्रसालकडे तीस हजार रुपये पाठविले आहेत. या रकमेतून बंदूकचींना नेमून त्यांना माझ्याकडे पाठवा असे निगूनबख्ताने छत्रसालाला कळविले आहे. कळविण्यात आले की : अब्दुर्रहमान याचा मुलगा अब्दुल्मजीद वगैरे माणसे विजापुरी कर्नाटकात तैनात होती. ती तेथून निघून गेली आहेत. फरारी म्हणून त्यांची नोंद व्हावी अशी आज्ञा झाली. अब्दुल्मजीदला दोन हजारी जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. त्याचे इतर सहकारी फतेहमुहंमद पाचशे जात व दोनशे स्वार व इख्तियारमुहंमद तीनशे जात व शंभर स्वार असे मन्सबदार होते.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : सटवाजी डफळे आणि त्याचा मुलगा हे रामा (राजाराम)ला भेटले. त्याने त्यांना खिलतीची वस्त्रे दिली.

**एकवीस ऑगस्ट १६९९**

उदयपूरचा जमीनदार (राणा) अमरसिंग यास देण्यासाठी खिलतीची वस्त्रे व इतर वस्तू काढून ठेवण्यात आल्या होत्या. त्या पाठविण्याचे स्थगित करावे अशी आज्ञा झाली. इतकेच नव्हे तर त्याने पाठविलेले पेशकश परत करावे अशी जुम्लतुल्मुल्क असदखान यास आज्ञा झाली.

**तेवीस ऑगस्ट १६९९**

आज्ञा झाली की : मयत राजा भीम याचे भाऊ राजा इंद्रसिंग व राजा बहादुरसिंग यांना तरबियतखानाच्या फौजेतून हुजुरात बोलावून घ्यावे.

**चोवीस ऑगस्ट १६९९**

आज बादशहा मंगळवेढ्याकडे रवाना झाले. तीन कोसाची मजल आक्रमून ते मंगळ-वेढ्याच्या किल्ल्यानजिकच्या आपल्या निवासस्थानात दाखल झाले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांच्या (मराठ्यांच्या) सहा हजार स्वारांनी वेरवळ व कंधार (नांदेड जिल्हा) भागात छावणी केली आहे. आज्ञा झाली की, 'गनिमांचे

पारिपत्य करून त्यांना तिकडे छावणी घालू न देण्याविषयी नांदेडचा सुभेदार अलीमर्दानखान व धारूरचा किल्लेदार व फौजदार उजबेकखान यांना लिहिण्यात यावे.'

### पंचवीस व सव्वीस ऑगस्ट १६९९

शुक्रवार—आज कचेऱ्या बंद होत्या. सव्वीस ऑगस्टलाहि कचेऱ्या बंद होत्या.

### सत्तावीस ऑगस्ट १६९९

तळकोकणचा फौजदार बसालतखान (याच्याकडे बेळगावची किल्लेदारीहि होती) याने विनंती लिहून पाठविली की: दोन हत्ती व दोन घोडे पाठविण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली. बसालतखान याच्या इतर विनंत्या पुढील प्रमाणे होत्या (१) इकडे दारुगोळा नाही. पाठवावा अशी आज्ञा झाली.

शंभर बेलदार व शंभर तबरदार (परशुधारी) तैनात करण्यात यावेत. विनंती मान्य करण्यात आली.

कासिमबेग गुर्जबर्दार हा सोंध्याचा जमीनदार (राजा) सदाशिव नाईक याजकडे फर्मान घेऊन गेला होता. तो त्याचे उत्तर घेऊन आला.

### अठ्ठावीस ऑगस्ट १६९९

खान फीरोजजंग याच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की : येथील फौजेतील तोफखान्याचा दारोगा मुहंमदरिजा हा येथून चारशे बाण, दारूगोळा, शुतरनाळ वगैरे सामग्री ही खान फीरोजजंगाच्या परवानगीवाचून घेऊन गेला असून तो (वऱ्हाडचा सुभेदार) अस्करखान याजकडे एलिचपूरला गेला आहे. येथे मोहिमा चालू आहेत. काय आज्ञा ? तोफखान्यात याचा अहवाल द्यावा, अशी आज्ञा झाली.

सुभे हैदराबाद येथे तैनात असलेले मन्सबदार यांनी (मुहरममध्ये) वाद्ये वगैरे वाजविली असे तेथील मुहतसिब (नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारा अधिकारी) याने पाठविलेल्या बातम्यावरून कळले. हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान याची मन्सब पाचशेनी कमी करण्यात आली.

### एकोणतीस ऑगस्ट १६९९

खान फीरोजजंग याच्या सैन्याचा दिवाण याने फीरोजजंगास सांगितले की : 'शिपायांचा एक वर्षाचा पगार थकला आहे.' बादशहाची आज्ञा की, 'उत्तर भारतातील खजिना बुऱ्हाणपुरात आला आहे. तो इकडे आल्यावर पगार देऊ.' पण दिवाणाचे म्हणणे असे की, 'खजिना येण्यात उशीर होत आहे.' यावर बादशहांनी आज्ञा केली की, 'तूर्त इकडून एक लाख रूपये फीरोजजंगाकडे पाठवावे. खजिना आल्यावर उरलेला पगार देण्यात येईल.'

### एक सप्टेंबर १६९९

चाकणचा किल्लेदार व फौजदार सय्यदजाफर याने विनंती लिहून पाठविली की : गनिमांनी (मराठ्यांनी) कडूस व खेड येथे छावण्या घातल्या आहेत. तेथील ठाणेदाऱ्या पण माझ्याकडे देण्यात आल्या तर मी गनिमांचे पारिपत्य करीन आणि त्यांना या भागात येऊ देणार नाही. विनंती मान्य करण्यात आली.

**दोन सप्टेंबर १६९९**

मीर लष्करी याची कौलास(नांदेड जिल्ह्याच्या सरहद्दीवर, आंध्रप्रदेश)चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली.

आपल्या तैनातीतील हरकारा भास्करराव याच्याबरोबर वीस गुर्जबर्दार व इतर वीस कौल(सेवक) देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

होशंगाबाद(मध्यप्रदेश)च्या बातम्यावरून कळले की : येथील फौजदार जानबाजखान हा आज्ञेप्रमाणे खान फीरोजजंग यांना जाऊन मिळावे म्हणून निघाला होता. वाटेत गोंडांनी रात्री त्याच्यावर छापा घातला. अनेक लोक मारले गेले अगर जखमी झाले. जानबाजखान याला जबर जखमा झाल्या. हल्लेखोर गोंड हे त्यानंतर निघून गेले.

**चार सप्टेंबर १६९९**

धारूरचा किल्लेदार व फौजदार उजबेकखान याला इल्तिफातखानाच्या जागी बीडचा पण फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याची मन्सब वाढविण्यात येऊन शिबंदीची रक्कमहि दीडलाख रुपयांनी वाढविण्यात आली.

अर्शदखानाच्या अर्जास अनुसरून अस्करखान (वऱ्हाडचा सुभेदार) याच्या जागी बिंद्राबन याची पुढील कामासाठी नेमणूक करण्यात आली : (१) पवनार व खेडला येथील फौजदारी (२) चांदा व देवगड येथील जमीनदाराकडून मिळणाऱ्या पेशकशची तहसीलदारी(वसुली).

करणसिंग शिसोदिया याला बादशहांनी तरबियतखानाच्या तैनातीतून काढून स्वतःच्या तैनातीत घेतले.

**पाच सप्टेंबर १६९९**

काल रात्री बादशहांना कळविण्यात आले की : तरबियतखान मीर आतिश हा आपले सैन्य ख्वाजाखान याच्या हाताखाली ठेवून एकटाच छावणीत आला आहे. तरबियतखान हा येऊन बादशहांना मशिदीत भेटला. त्याने पाच मोहरा नजर म्हणून बादशहांसमोर ठेवल्या. बादशहांनी त्याला विचारले, 'आज किती कोस मजल मारून आला ?' त्याने सांगितले, 'एकोणीस कोस.' यानंतर त्याला स्वतःच्या निवासस्थानाकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

रूहुल्लाखान याने आपल्या वकीलाच्या द्वारे विनंती केली की : परगणे कासेगाव हे पूर्वी शंकरराम चव्हाण याजकडे होते. आता त्याच्या बदलीमुळे परगणा मोकळा (पायबाकी) आहे. तो मला तनखा म्हणून देण्यात यावा. दियानतखान याने चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली.

**सहा सप्टेंबर १६९९**

बिंद्राबन फौजदार याला पवनार(वर्धा जिल्हा)कडे जाण्यास निरोप देण्यात आला.

जाफराबाद उर्फ चांदूर(चांदवड ?)च्या हरकाऱ्याने लिहिले की : किल्लेदार इनायतुल्ला हा आजारी आहे. तल्वारही हातात धरू शकत नाही. काय आज्ञा ? मुखलिसखान याने चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली.

रूहुल्लाखानाने विनंती केली : शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला राव गोपाळसिंग हा विपन्नस्थितीमुळे बेदारबख्ताच्या फौजेतून आला असून छावणीच्या चौकीत पडून आहे. तो पिढीजाद सेवक आहे. आपल्या भेटीची अपेक्षा बाळगून आहे. बादशहा म्हणाले, 'त्याला म्हणावे, तुला देशी जाण्यास परवानगी मिळणार नाही. भेट घेऊन आपल्या तैनातीच्या जागेवर (बेदारबख्ताच्या फौजेत) जात असेल तर त्याने मला भेटावे, नाहीतर नाही. मर्जी त्याची.' राव गोपाळसिंग याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती.

**आठ सप्टेंबर १६९९**

खान फीरोजजंग याच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की : तेथे तैनात असलेले दिलेरखान वगैरे बाजारात उघडउघड दारू विकतात. आणि अशीच इतर धर्मबाह्य कृत्ये करतात. असे होऊ न देण्याविषयी खान फीरोजजंग यास लिहिण्यात यावे अशी आज्ञा झाली. असे करणाऱ्यांची नावे :– दिलेरखान, राजा इंद्रसिंग, राजा उत्तमराम, राजा वीरसिंग, मुनीमखान, शेख अलीखान, तालेयारखान, शहबाज पन्नी.

मुहमरखान याने औरंगाबादेहून लिहिले की : तेथील तलावातून माती काढून दिल्ली दरवाजाकडे टाकण्यात आली आहे. तेथे बाग लावण्यास जागा चांगली आहे. आज्ञा झाल्यास बाग लावण्यात येईल. विनंती मान्य करण्यात आली.

**नऊ सप्टेंबर १६९९**

मुहंमदअमीन खान सदर (न्यायाधीश) याचा भाऊ मुहंमद यूसफ हा मध्य आशियातून नुकताच आला होता. तो येऊन बादशहाला भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याने पुढीलप्रमाणे नेमणुका करण्यात याव्या असे लिहून पाठविले : बंकापूरचा किल्लेदार मीर नूरुद्दीन याला लक्ष्मेश्वरची फौजदारी पण देण्यात यावी. आणि त्याचा मुलगा मीर हाशम याला चांदागोडाचा किल्ला बरहट्टी(?) यावर किल्लेदार म्हणून नेमण्यात यावे. दोन्ही विनंत्या मान्य करण्यात आल्या.

**दहा सप्टेंबर १६९९**

तरबियतखान हा आज्ञेप्रमाणे तळावर आला होता. कुशलतेची प्रार्थना (फातेहा खैर) पढून बादशहांनी त्याला परत आपल्या सैन्याकडे जाण्यास निरोप दिला.

राव गोपाळसिंग याने पुढीलप्रमाणे विनंती यारअलीबेग व मुखलिसखान यांच्या द्वारे केली : माझा मुलगा रतनसिंग याने माझे सगळे वतन बळकाविले आहे. मी तर येथे सैन्यात नोकरी बजावीत आहे. माझ्या मुलाच्या या आततायीपणामुळे माझी फार दुर्दशा झाली आहे. रतनसिंगाला हुजुरात बोलावण्याबाबत गुर्जबर्दार पाठविण्यात आला नाही. रतनसिंग सध्या उज्जैनच्या सुभ्यात तैनात झाला आहे. मला देशी जाण्याची परवानगी असावी. मी तेथील व्यवस्था लावून पुन्हा हुजुरापाशी येईन. बादशहांनी आज्ञा केली की, 'राव गोपाळसिंग याने जाण्याची जरूर नाही. रतनसिंगाला हुजुरात पाठविण्याबद्दल मुख्तारखान (माळव्याचा सुभेदार) याला लिहिण्यात यावे.'

खास चौकीचा दारोगा मतलबखान याने अर्ज केला की : खास चौकीची बरीच माणसे जहागिरी नसल्यामुळे त्रस्त आहेत. मुनीमखानाने खास अधिकारी पाठवून त्यांना जहागिरी मिळतील अशी व्यवस्था करावी. विनंती मान्य करण्यात आली.

हेरांच्या तोंडून कळले की : परसोजी भोसले वगैरे सरदार वऱ्हाडाकडे हालचाली करीत आहेत. रामा(राजाराम) याने त्यांना लिहिले आहे की मी चांदा देवगडच्या भागात येत आहे.

**अकरा सप्टेंबर १६९९**

तरबियतखानाच्या सैन्यात तैनात असलेला सय्यदखान व त्याचा मुलगा यांना तरबियतखानाकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

डफळापूरचा ठाणेदार अमानुल्लाखान यास संख(जत तालुका) व जरेश्वर(?) येथील ठाणेदारीवर नेमण्यात आले.

तळकोकणचा फौजदार बसालतखान याने विनंती लिहून पाठविली की : आपली आज्ञा झाली होती की वजेरा सदर क्रोह(सांड्रिक?) फिरंगी याने अर्ज व पेशकश ही पाठविली की त्याच्या नावाने फर्मान पाठविण्यात येईल. आपले खास फर्मान येईपर्यंत मुख्लिसखान बक्षी याचा हस्बुल्हुकुम(आपल्या आज्ञेवरून निघालेला हुकुम) तरी सादर व्हावा म्हणजे तो फिरंगी मला तोफा वगैरे सामग्री देईल. विनंती मान्य करण्यात आली.

बीडचा बदललेला फौजदार इल्तिफातखान याच्यापाशी आठशे ऐंशी स्वार होते. ते नवीन फौजदार उजबेकखान याजपाशी तैनात करण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

**तेरा सप्टेंबर १६९९**

लक्ष्मेश्वरच्या फौजदारीवर बादशहांनी मुहंमदखान बेग याच्या जागी अब्दुलरसूल मियाना याची नेमणूक केली.

करूमादगाव(विदर्भात?)च्या जमीनदाराला हुजुरात पाठवावे अशी आज्ञा खान फीरोजजंग याजकडे पाठविण्यात आली.

**पंचवीस सप्टेंबर १६९९**

आज बादशहांनी आज्ञा केली की : यार अलीबेग यानी वकील व खबरा देणाऱ्याकडून मुचलके घ्यावे. त्याने या दरबारच्या बातम्या लिहू नये.

**दोन ऑक्टोबर १६९९**

आज बादशहांनी आज्ञा केली की : वकील व दरबारच्या खबरा देणारे यांनी बक्षीच्या कागदपत्रात जे हुकुम सादर झालेले असतील तेवढ्यापुरत्याच बातम्या द्याव्या. यामुळे या अखबारातचे काम सात दिवस थांबले होते.

आजमगड पुरंदरच्या तोफखान्याचा दारोगा(अधिकारी) मुहंमद कासिम याने पुढील प्रमाणे लिहिले : हेरांनी बातमी आणली की—मुकाहीर(मराठे)यांचा सरदार परशुराम हा दोन हजार स्वार व दोन हजार पायदळ घेऊन दुष्ट हेतू मनात धरून या भागात आला आहे. काय आज्ञा? आज्ञा झाली की, 'चीनकुलीजखानाला लिहून त्याचे पारिपत्य करण्याचा हुकुम पाठवावा.

### तीन ऑक्टोबर १६९९

नुकताच मुसलमान झालेला अब्दुर्रहीम कौल (सेवक) याला वीस मोहरांच्या किमतीचा एक घोडा बक्षीस म्हणून देण्यात आला.

### चार ऑक्टोबर १६९९

राव गोपाळसिंग चंद्रावत हा आज बादशहांना भेटला. त्याने सफशिकनखानाच्या द्वारे पुढीलप्रमाणे विनंती केली : माझा मुलगा रतनसिंग हा माझे वतन (रामपुरा, माळव्यात) बळकावून बसला आहे. तीन वर्षे झाली माझ्या जहागिरीतून एक पैशाचे उत्पन्न मला मिळत नाही. त्याची तैनाती काबुलसुभ्यात करण्यात यावी. त्याच्या ऐवजी माझा मुलगा हिंमतसिंग याला देशी जाण्याची परवानगी देण्यात यावी.

बादशहांनी विनंती मान्य केली. त्यांनी गोपाळसिंगाला खिलतीची वस्त्रे देऊन त्याला बेदारबख्ताच्या फौजेत जाण्यासाठी निरोप दिला. गोपाळसिंगाला दोन हजारी जात व चारशे स्वार अशी मन्सब आहे.

### पाच ऑक्टोबर १६९९

तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक याला बक्षीस देण्यात आले. गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार कामयाबखान याच्या बरोबर असलेले दीडशे मन्सबदार यांना हुजुरात बोलावून घेण्यात आले.

शहाजादा मुअज्जम याने (काबुलहून) अठरा डाळिंब व खर्बुजे पाठविली ती बादशहासमोर ठेवण्यात आली.

### सात ऑक्टोबर १६९९

मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याला खानापूरच्या ठाण्याकडे पाठविण्यात आले.

रावतमल हा गुल्शनाबाद (नाशिक) चा ठाणेदार मातबरखान याजपाशी तैनात होता. तो लष्करात आला. त्याला भेटीस आणावे अशी मन्सूरखानाला आज्ञा झाली. त्याला पाचशे जात व अडीचशे स्वार त्यापैकी दीडशे दुघोडी अशी मन्सब होती.

देवगडचा (नागपूरजवळ) यापुढे इस्लामगड म्हणून उल्लेख करीत जावा अशी आज्ञा झाली.

औरंगाबाद व बीड येथे तैनात असलेले शंभर अहदी (पगारीशिलेदाराप्रमाणे) यांना बोलावून घेऊन पुढे रवाना होणाऱ्या बादशाही तंबूबरोबर (पेशखाना) पाठवावे अशी आज्ञा झाली.

### आठ ऑक्टोबर १६९९

राव गोपाळसिंग याचा मुलगा हिंमतसिंग याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मीरक हुसेन याला बुंगा (बुणगे, तळ ब्रम्हपुरीचा) चा बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

### नऊ ऑक्टोबर १६९९

मिर्जागुल खुशमंजिल व उस्मान करावल यांनी ब्रह्मपुरी ते मुर्तजाबाद मिरज याच्या एका वाटेने बारा मजला व दुसऱ्या वाटेने दहा मजला आखल्या होत्या. ती यादी बादशहांना दाखविण्यात आली. बारा मजलांच्या वाटेने चलावे असे बादशहांनी ठरविले. बादशहा म्हणाले, 'पाच जमादिलावल रोजी (एकोणीस ऑक्टोबर १६९९) मी (ब्रह्मपुरीहून) कूच करीन.'

रावतमल झाला आज बादशहांना भेटला. मिफताहुल्फुतूह (कोथळागड) या किल्ल्याची किल्लेदारी व फौजदारी याजवर पूर्वीचा अधिकारी अहमद याला बदलून त्याच्या जागेवर रावतमल झाला याची नेमणूक करण्यात आली.

यापुढे नजर (भेट, नजराणा) याला पेशकश म्हणत जावे अशी आज्ञा झाली.

जानोजी हा पंचहजारी मन्सबदार, गाजिउद्दीनखान बहादुर याच्या फौजेत तैनात होता. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

### दहा ऑक्टोबर १६९९

शहाजादा बेदारबख्त याने कळविले की : आपल्या आज्ञेप्रमाणे मी या महिन्याच्या (रबिउस्सानी) एकोणीस तारखेस (चार आक्टोबर १६९९) लक्ष्मेश्वरहून पन्हाळगडाकडे रवाना झालो आहे.

सिरहिंदचे नक्शबंदी ख्वाजा (औरंगजेब मुजद्दद सिरहिंदीच्या या घराण्याला गुरुप्रमाणे मानी) यांना काल बादशहांनी दोन हजार रुपये देऊन सिरहिंदला जाण्यास निरोप दिला. त्यांच्याबरोबर संरक्षक पथक दिले जावे अशी आज्ञा झाली.

करावलखान यास आज्ञा झाली की, 'तयार रहा. तुम्हाला मी खटावकडे पाठवीत आहे. येथून खटावपर्यंत किति मजला होतील? तेथे राहाण्यासाठी छावणी योग्य जागा निवडून परत या.' त्याने विनंती केली की : बदर्का (संरक्षक पथक) देण्यात यावे. आज्ञा झाली की : बर्कंदाज व हशम (पायदळ) याचे पथक देण्यात यावे. याच संदर्भात तरबियतखान मीर आतिश (दारूगोळ्याचा मुख्य) याने विनंती केली की : बर्कंदाज पथकाची पगार थकबाकी अठरा हजार रुपयापर्यंत गेली आहे. खासगीतून (अंदरून महल) ही रक्कम देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

विजापुरी कर्नाटकचा फौजदार महमूदखान याने विनंती लिहून पाठविली की : मी आजारी आहे. परवानगी असल्यास येथे एक नायब ठेवून विजापुर सुभ्यात येईन. परवानगी देण्यात आली.

### बारा ऑक्टोबर १६९९

दीवाणचे कामकाज सुरू होण्यापूर्वी बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला बोलावू पाठविले. तो येऊन बादशहा मशिदीत होते तेथे त्यांना भेटला.

करावलखान व मरहूम अन्वरखान याचा मुलगा अब्दुस्सलाम खुशमंजिल याला योजमापाची साधने देऊन खटावकडे रवाना केले. बादशहांनी आज्ञा केली : मुनीमखानाचा

मुलगा मुहंमद काजिम हा आपले पथक घेऊन यांच्याबरोबर जाईल. यांनी मजला ठरवून मला माझ्या प्रवासात वाटेत भेटावे.

• शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यांतील जी जी माणसे ब्रह्मपुरीच्या छावणीत आहेत त्यांना बेदारबख्ताकडे तातडीने पोहोचवावे, अशी आज्ञा झाली.

सुरतेच्या बातम्यावरून कळले की तेथील बंदराचा मुतसद्दी (अधिकारी) अमानतखान हा मरण पावला.

### तेरा ऑक्टोबर १६९९

ब्रह्मपुरीच्या तळावर आसारे मुबारक (प्रेषिताशी संबंधित असलेले कांही अवशेष) ठेवलेले असून बादशहा मधूनमधून दर्शनाला जात (पुढे मोहिमेत ते बरोबर बाळगीत) काल ते रात्रभर आसारे मुबारकाशी बसून होते. सकाळी दिवस दोन प्रहर आला असता ते परतले.

### चवदा ऑक्टोबर १६९९

बादशहांनी आज्ञा केली की : मुरीदखान, हजार जात व तीनशे स्वार यांचा मन्सबदार, याने ब्रह्मपुरीच्या तळावर राहावे.

पंधरा ऑक्टोबर १६९९ एक जमादिलावल, दक्षिण सुभ्याचा दिवाण दियानतखान याची मरहूम अमानतखान याच्या जागी सुरतबंदरचा मुतसद्दी (अधिकारी) म्हणून नेमणूक करण्यात आली.

मोतिमदखान याला दक्षिणचा दिवाण म्हणून नेमणे आहे तर त्याचे मन्सब मरातब काय आहेत याची माहिती विचारण्यात आली.

चीनकुलीजखान याने लिहून कळविले की : नारोजीचा भाऊ व बारामावळचा जमीनदार खंडोजी हा आपल्या इलाख्यातील ठाणी सांभाळण्याचे काम उत्कृष्ट रीतीने करीत आहे. कृपा होईल अशी आशा बाळगून आहे. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे जात अशी वाढ करण्यात आली.

बादशहांनी पुढील प्रमाणे आज्ञा केली. बादशाही तळाच्या भोवतालचे ठाणेदार यांची निम्मी पथके बादशाही सैन्यात व निम्मी ठाण्यात. बादशाही सैन्यातील वरील निम्मी पथके तरबियतखान व फतेहुल्लाखान यांजकडे तैनात राहतील.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : आपली आज्ञा झाली आहे की राजा शाहू व सिकंदरखान विजापुरी हे आपल्या बरोबर राहतील. मरहूम दौलतमंदखान याचा मुलगा बख्तावरखान याच्या संबंधी काय आज्ञा ? त्यानेहि आमच्या बरोबर राहावे अशी आज्ञा झाली. बख्तावरखान यास पंधराशे जात व पाचशे स्वार अशी मन्सब होती.

### सोळा ऑक्टोबर १६९९

फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन याने विनंती केली की : मंगळवेढ्याकडे मुक्कामाचे तंबू पाठविण्यासंबंधी काय आज्ञा ? बादशहांनी आज्ञा केली की : नौबती, नगारे वाजवीत झेंडे बरोबर घेऊन तंबू रवाना करा. बरोबर मतलबखान करावलबेगी, खुदा-

बंदाखान (बयूतात, सरकारी मालमत्तेचा अधिकारी), खिदमत तलबखान (नगारखान्याच्या दारोगा) सरबराहखान कोतवाल, व मुहंमद आरिफ इत्यादींनी जावे. त्याप्रमाणे अंमलबजावणी झाली.

बादशहांनी आज्ञा केली की: तीन हजार मोहरा इंदापूर मार्गे शहाजादा आजम याजकडे पाठविण्यात यावेत. मरहूम अमानतखान (सुरतेचा मुतसद्दी) याची मुले सय्यद मुहंमद, मीर मुहंमदतकी व सय्यद अहमद यांना मन्सबी व नेमणुका देण्यात आल्या.

बादशहांनी तरबियतखान मीर आतिश याला आज्ञा केली की: मी ज्या ज्या वेळी नवीन मजलावर मुक्काम करीन त्यावेळी तुम्ही सर्व तोफांना सरबत्ती दिली पाहिजे.

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त याजकडे फर्मान पाठविले होते. त्याचे उत्तर घेऊन गुर्जबर्दार परत आला. तो म्हणाला, 'मी निघालो त्यावेळी शहाजादे हे पन्हाळगडच्या दिशेने एक मजल प्रवास करून होते.'

बादशहा हे कोतवाल सरबराहखान याला म्हणाले, 'मी कूच करणार आहे. जे माझ्याबरोबर राहातील त्यांना परत (ब्रम्हपुरीच्या) तळावर येऊ देऊ नका.'

## सतरा ऑक्टोबर १६९९

कचेरीच्या पूर्वी बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, हमीदुद्दीनबहादुर, मुल्तफतखान, उस्मान करावल यांना दौलतखान्याच्या (निवासस्थानाच्या) मशिदीत बोलावून त्यांच्याशी खलबते केली.

बादशहांनी आज्ञा केली की: दहा हजार रुपये किंमतीचा एक हत्ती व पाचशे मोहरा किंमतीचा एक घोडा, जुम्लतुल्मुल्क असदखान (मुख्यप्रधान) याच्यासाठी काढून ठेवा. आम्ही इकडून रवाना होण्याच्या वेळी त्यांना देण्यात येतील.

शहाजादा मुअज्जम याने डाळिंबाच्या दोन करंड्या पाठविल्या होत्या त्या मिळाल्या.

बारामावळचा जमीनदार खंडोजी हा चीनकुलीजखान याच्या फौजेत तैनात होण्यासाठी निघाला. त्याने बादशहाचा निरोप घेतला. त्याला सोन्याचे कडे देण्यात आले.

पाईने विलायतचा ठाणेदार नाहरखान, खटावचा ठाणेदार रामचंद्र व मसूरचा ठाणेदार मंबाजी यांच्या नावे आज्ञापत्रे रवाना करावयाचा व त्यांची उत्तरे आणण्याचा हुकुम झाला.

## अठरा ऑक्टोबर १६९९

काल रात्री बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, मन्सूरखान व उस्मान करावल यांना बोलावून त्यांच्याशी खलबते केली.

बादशहांनी जुम्लतुल्मुल्क असदखान यास खिलतीची वस्त्रे दिली. बादशहा म्हणाले, 'उद्या येथून निघताना, तुम्हाला हत्ती व घोडा ही देण्यात येतील.'

कूच करताना रूहुल्लाखान याने एक मजल चौडोल व एक पालखी व दोन मजलासाठी रथ ठेवावा अशी आज्ञा झाली.

वऱ्हाड सुभ्याचा बदललेला दिवाण बशारतखान हा येऊन बादशहांना भेटला. त्याला

मरहूम खानजहानबहादुर याचा मुलगा नुस्रतखान याच्या जागी इस्लामपुरी (ब्रम्हपुरी) च्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. सादतखान, ख्वाजाखान, तुर्कताजखान, चीनसबद, व हिदायत केश यानांच तेवढे आपले कुटुंबीय बरोबर ठेवण्याची परवानगी देण्यात आली. बाकीच्या कुटुंबियाना तळाबाहेर जाऊ देऊ नये अशी आज्ञा कोतवाल सरबराहखान याला देण्यात आली.

### एकोणीस ऑक्टोबर १६९९

आज सहा घटिका दिवस आला तसे बादशहा हे मुर्तजाबाद मिरजेच्या दिशेने जाण्यासाठी तख्ते रवांवर स्वार झाले. ते दिवाणेखास पाशी आले. तेथे त्यांनी जुम्लतुल्मुल्क असदखान यास हती व घोडा ही बक्षीस दिली. असदखानाच्या सात हजार जात व सात हजार स्वार यात स्वार दुधोडी करून वाढ केली. ब्रम्हपुरीच्या तळाचे रक्षण करण्याचे काम असदखानाकडे देण्यात आले. बादशहांनी कुशलतेची प्रार्थना (फातेहाखैर) पढून त्याला निरोप दिला.

सव्वातीन कोस असा प्रवास करून बादशहा मंगळवेढ्याला पोहोचले. त्यावेळी तोफांची सरबत्ती करण्यात आली.

ब्रह्मपुरीहून निघताना वाटेत बादशहांनी इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) चा किल्लेदार बशारतखान याला परत जाण्यास निरोप दिला.

खानजहानबहादुर याची मुले अबुल्फतह व नस्रीखान यांना इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) च्या तळावर राहाण्याची आज्ञा देण्यात आली.

दिवाणेखासचा दारोगा हमीदुद्दीनखानबहादुर, अहदियान (एकांडे) शिलेदारचा बक्षी खुदाबंदाखान, मुल्तफतखान, न्यायकचेरीचा दारोगा मुनीमखान यांच्या मन्सबी वाढविण्यात आल्या.

खुदाबंदाखानाने तळावर राहावे अशी आज्ञा झाली होती. आता त्याने (हा शायिस्तेखानाचा मुलगा) स्वारीत बरोबर राहावे अशी आज्ञा झाली.

### वीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मंगळवेढयात शुक्रवारची नमाज पढले.

### एकवीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहांनी बयूतात (सरकारी मालमत्ता) चा प्रमुख अधिकारी खुदाबंदाखान याच्या जागी त्याचा नायब म्हणून मरहूम अमीरुल उमराचा (शयिस्ताखान) मुलगा अबुल्मुआली याची नेमणूक करून त्याला तळावर (ब्रह्मपुरीच्या) जाण्याचा निरोप दिला.

सिकंदरखान (विजापूरचा माजी बादशहा) राजा शाहू, आणि दौलतमंदखानाचा मुलगा बख्तावरखान यांना स्वारीत पालखी, डोली व रथ बरोबर घेण्याची परवानगी देण्यात आली.

मुहंमद अकबर (बंडखोर राजपुत्र) याचा अर्ज घेऊन त्याचे सिद्दीहसन आदि नोकर आले होते. त्यांनी सद्रुद्दीनखानापाशी जावे अशी आज्ञा करण्यात आली.

## बावीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मंगळवेढ्याहून निघाले. अडीच कोस प्रवास करून ते भालवणी या गावी पोहोचले.

रामराय हरकारा याला तळाच्या (ब्रह्मपुरी) हरकाऱ्याच्या हुद्यावर नेमून बादशहांनी त्याला ब्रह्मपुरीकडे जाण्यास निरोप दिला.

## तेवीस ऑक्टोबर १६९९

खटावच्या दिशेने मजला आखण्यासाठी करावलखान यास पाठविण्यात आले होते. तो परत आला. त्याने मजलाचा आराखडा बादशहा समोर ठेवला.

बिदनूरचा जमीनदार बसाप्पा नायक याला फर्मान, खिलतीची वस्त्रे, हत्ती व घोडा पाठविण्याचे ठरवून व त्याच्याकडून पेशकश (खंडणी) घेऊन येण्यासाठी सय्यद मुराद याची गुर्जबर्दार म्हणून नेमणूक करण्यात आली.

खटावचा ठाणेदार रामचंद्र याने लिहून कळविले की: येथील किल्ला मोडकळीस आलेला असून पडून गेला आहे. दोनशे बेलदार व वीस मण सरब (दारुगोळ्यासाठी लागणारी विशिष्ट माती) व बारुद (दारु) ही पाठविण्यात येतील अशी आशा बाळगून आहे. बादशहांनी आज्ञा केली की पन्नास बेलदार व सरब, बारुद ही पाठविण्यात यावी.

कळविण्यात आले की : हलकट गनिमांची (मराठे) माणसे मंगळवेढ्याच्या भोवती आली आणि त्यांनी गुरेढोरे पळविली. बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउल्मुल्क बहरामंदखान यांनी लष्कराभोवती गस्त घालावी. त्याप्रमाणे बहरामंदखान हा लष्कराभोवती चार कोस गस्त घालून आला.

## चोवीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा भालवणीहून तख्ते रवांवर बसून निघाले. अडीच कोस प्रवास करून ते मुक्काम आम्दा? येथे दाखल झाले. बादशहांनी आज्ञा केली की: नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याला देण्यासाठी म्हणून चारशे मोहरा किंमतीचा एक घोडा व सहा हजार रुपये किंमतीचा एक हत्ती हे वेगळे ठेवावे. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यांनी सांगितले की : नुस्रतजंग (जुल्फिकारखान) हे विजापूर जवळ येऊन पोहचले आहेत.

कळविण्यात आले की : शहाजादा मुहंमद आजमशहा हे या महिन्याच्या सात तारखेस (जमादिलावल) निघाले (एकवीस आक्टोबर १६९९). ते याच महिन्याच्या बारा व चौदा या तारखात बादशहांना येऊन भेटतील. बादशहानी आपल्या बकावल (मुदपाक खाना)चा अधिकारी हकीम सादिकखान यांना आज्ञा केली की: शहाजादे आज्जम एक मजलेवर आले की तुम्ही येथील खाशाचे भोजन बरोबर घेऊन जाऊन त्यांना ते देण्याची व्यवस्था करा.

हरकाऱ्याने कळविले की : रामा (राजाराम) हा साताऱ्च्या किल्ल्यात आहे. आपली बायका मुले किल्ल्यात ठेवून सुरत बंदराकडे जावे असा त्याचा बेत आहे. बादशहानी हे वृत्त वाचून ते बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याजकडे पाठवावे म्हणून आज्ञा केली.

### पंचवीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा निंबोणी(?) या गावाजवळ मुक्कामाला आले. बादशहांनी हिदायतकेश याला विचारले, 'बादशहाजादे आज्जम येथून किती अंतरावर आहेत?' त्याने सांगितले, 'पस्तीस कोसावर. पाच पाच कोसाची मजल ते करतील तर एक आठवडयात ते हुजुरात येऊन पोहचतील.'

रामा(राजाराम) याने हुजुरात अर्ज पाठविला होता. यारअलीबेग याने तो बादशहा पुढे ठेवला. तो वाचून बादशहांनी त्याच्याकडे (यारअलीबेग) परत दिला.

यारअलीबेग याच्या हेरांकडून पुढीलप्रमाणे कळले : राम (राजाराम) याने रामचंद्र (रामचंद्रपंत अमात्य) व निळोपंडित यांना साताऱ्यात सोडले. तो स्वतः साताऱ्यावरून चार कोस पुढे आला. तेथे निगूनबख्त (बंडखोर गोंड राजा) याजकडून आलेली दोन माणसे त्याला भेटली. ते रामाला (राजारामाला) म्हणाले, 'तुम्ही त्या प्रांतातून इकडे या म्हणजे देवगड (नागपूर जवळ) ला ठाण मांडता येईल.'

यावर धनाजाधव व दादोमल्हार हे सरदार म्हणाले, 'बादशहा हे स्वारीवर निघाले आहेत. स्वतःचे हित हवे असेल तर तुम्ही (राजाराम) जिंजीकडे जावे.' रामा(राजाराम) ने ते मान्य केले नाही. त्याची इच्छा सूरतबंदर, वऱ्हाड व सुभे हैदराबाद या मार्गाने जिंजीकडे जाण्याची आहे.

बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने फीरोजजंगाला लिहावे की, 'तुम्ही जेथे आहात (वऱ्हाडात) तेथेच ठाण मांडून राहा आणि चीनकुलीजखानाला लिहावे की, 'मकहूर रामा(राजाराम) जर तुमच्या प्रदेशात येऊ लागला तर तुम्ही त्याचा पाठलाग करावा.'

### पंचवीस ऑक्टोबर १६९९

निंबोणी(?)परगण्याच्या काही रयतेने तक्रार केली, की सगळया शेतीभातीची पायमल्ली झाली आहे. त्यांना पाचशे रुपये देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

सर्जेराव(पाच हजार जात व तीन हजार स्वार), संभाजी, उदाजी व नेतोजी हे शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात असून या वेळी हुजुरात होते. त्यांना फीरोजजंगाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

### सव्वीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मौजे निंबोणी(?)हून निघाले. सव्वातीन कोस व प्रवास करून मौजे कसर(कोसारी ? जत तालुका) येथे आले.

हसनकुलीखानाचा मुलगा मुहंमदअली हा मध्य आशियातून नोकरीच्या आशेने आला होता. तो बादशहांना भेटला. त्याला चारशे जात व शंभर स्वार अशी मन्सब देण्यात आली. रावदलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद हा बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिकदखान याजपाशी तैनात होता. तो येऊन बादशहांना भेटला. त्याची पाचशे जात व दोनशे स्वार ही मन्सब बहाल ठेवण्यात आली.

पुणे व बारा मावळ याचा जमीनदार खंडोजी याने विनंती अर्ज पाठविला. तो मजकूर बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने बादशहांना कळविला. खंडोजीने पुढीलप्रमाणे विनंती केली होती : फौजदारांच्या हलगर्जीपणामुळे या प्रदेशातील पंधरा महालात(परगणे) हलकट गनिमांची(मराठ्यांची)माणसे येथे ठाण मांडून आहेत. ती छावणी करीत आहेत. बहुतेक खेडी म्हणजे बंडखोरांची आगरे बनली आहेत. या महालाची फौजदारी पण मला देण्यात आली तर मी चार हजार स्वार व पाच हजार मावळे पायदळ यांची व्यवस्था करीन व गनिमांना छावणी करू देणार नाही. यावर काय आज्ञा म्हणून विचारता बादशहांनी आज्ञा केली की : जे महाल गैर अमली असून तोटयात नाहीत(कमी) ते देण्यात यावेत. खंडोजीला दीड हजार जात व पांचशे स्वार अशी मन्सब होती.

मौजे आम्दा येथील रयतेने तक्रार केली की पिकाची नासाडी झाली आहे. त्यांना पाचशे रुपये द्यावेत अशी आज्ञा झाली.

बादशहाजादा आज्मम यांजकडे बादशहांचे फर्मान घेऊन गुर्जबर्दार गेला होता. त्याने परत येऊन सांगितले की, 'शहाजादे हे नऊ तारखेस(तेवीस ऑक्टोबर) बादशहाकडे येण्यास निघाले आहेत.'

## सत्तावीस ऑक्टोबर १६९९

शुक्रवार, आज बादशहांच्या दोन्ही कचेऱ्या अदालत व दिवाणे आम या बंद होत्या.

## अठ्ठाविस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा साडेतीन कोसाचा प्रवास करून गावाजवळल पोहोचले. बादशहा उस्मान करावल याला म्हणाले, 'उद्या मी वाटेत गढीसंखा(संख)पाहून पुढील मुक्कामाला जाईन. ते अंतर किती राहील याची मोजणी करून या ?' उस्मान करावलने त्याप्रमाणे केले. त्याने विनंती केली की : गढी संखाच्या वाटेने उद्याचा प्रवास पावणेचार कोसाचा होईल.

## एकोणतीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मुक्कामाहून निघाले. साडेतीन कोस प्रवास करून ते मौजे मबारी (?) जवळ आले. गढीसंख हे स्थळ पाहाण्याचे त्यांनी स्थगित केले.

बारा मावळचा जमीनदार खंडोजी याने पन्हाळगडासंबंधी काही सूचना बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यांच्यापाशी आणल्या होत्या. मुखलिसखानाने त्या(सूचना)बादशहांना कळविल्या. आज्ञा झाली की, सूचना तपासून तरबियतखान यांनी मांडाव्या.

## तीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मुक्कामाहून निघाले. सव्वादोन कोसाचा प्रवास करून ते मलाबाद (जत तालुक्यांतील, जतेपासून बारा मैलावरील वज्राबाद जवळ) येथे मुक्कामाला आले.

हेरांनी आणलेला पुढील वृतांत यारअलीबेग याने बादशहा पुढे ठेवला. वृत्तांतात मजकूर असा होताः रामा(राजाराम) हा सातान्याहून निघून चार कोसावर आला.

तेथून त्याने सातारा किल्ल्यातून कलगी, शिरपेच इत्यादि वस्तू आणण्यासाठी आपला मनुष्य पाठविला. तो मनुष्य किल्ल्यातून त्या वस्तू घेऊन येत असताना वाटेत गनिमांनी त्याच्यावर हल्ला करून त्याला मारले व ते त्या वस्तू घेऊन गेले. ही बातमी ऐकून मकहूर (राजाराम) फार अस्वस्थ झाला. तो किल्ल्यात परत आला. त्याच दिवशी किल्ल्यात एकाएकी आग लागली. आणि सारे काही जळून गेले.

या घटनेमुळे तो (राजाराम) फार घाबरला. त्याने दहशत खाल्ली. त्याचे (राजारामाचे) अनुयायी त्याला म्हणू लागले, 'बादशाही सैन्ये या प्रदेशात येऊन पोहोचली आहेत. रोजचे आमचे कसे निभावेल याची आम्हाला काळजी लागली आहे. तुम्ही दुसरीकडे जावे आणि आमच्या व्यवस्थेसाठी कुणाची तरी नेमणूक करावी.' मकहूर (राजाराम) हा पंचवीस ऑक्टोबर पर्यंत किल्ल्याच्या बाहेर पडला.

बादशहांनी तो वृत्तांत वाचला. त्यांनी स्मितहास्य केले. हा वृत्तांत बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याजकडे पाठवा अशी त्यांनी आज्ञा केली.

### एकतीस ऑक्टोबर १६९९

आज बादशहा मलाबाद (जतपासून आग्नेयेला बारामैलावरून) निघाले. ते हस्ती (अथणी) च्या ठाण्यावरून एकंदर साडे पाच कोस व पंधरा साखळया असा प्रवास करून मौजे नगरी (निगडी ?) जवळ पोहोचले.

कचेरीचे काम संपल्यावर बादशहांनी तरबियतखानाला बोलाविले. त्यांनी त्याला काही सुचना केल्या. बहुतेक ते तरबियतखानाला पुढे पन्हाळगडाकडे रवाना करतील.

बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली : तुम्ही चीनकुलीजखानबहादुर यांना लिहा की : तुम्ही अहमदनगरहून निघून साल्प्याच्या घाटावर या. जर रामा (राजाराम) त्या भागात आला तर त्याचे पुरेसे पारिपत्य करा.

### एक नोव्हेंबर १६९९

कान्होजी (शिर्के) हा शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. त्याला हुजुरात बोलावून घ्यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### दोन नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. अडीच कोसाचा प्रवास करून ते मौजे गन्नापूर (ऐनापूर ?) येथे मुक्कामाला आले.

बादशहांनी काल रात्री हमीदुद्दीनखानबहादुर यास आज्ञा केली की : पन्हाळगडचा नकाशा तयार करवा. तो शहाजादा बेदारबख्त याजकडे पाठवा. त्याप्रमाणे वेढा चालवावा (असे कळवा).

मुनीमखान याने बादशहांना पुढीलप्रमाणे विनंती केली. मोठमोठया अमीर उमरावांचे हिंदु वकील येथे आहेत. त्यांचे म्हणणे आहे ते हे, 'मागे आपली (बादशहाची) आज्ञा झाली होती की आम्ही लोकांनी शस्त्रे बाळगून फिरू नये. आम्ही अमीर उमरावांच्या घोडयांना डाग देवविणे व इतर कामे करतो. आम्ही वास्तविक पाहता बादशहांचे खालसाकडील नोकर

आहोत. शरिया (इस्लामी धर्मशास्त्र) प्रमाणे जिझिया भरतो. यावेळी बादशहा हे जिहाद व शत्रूचे पारिपत्य या कामासाठी उद्युक्त झाले आहेत. आम्ही बादशहाच्या सेवेत व सान्निध्यात आहोत. आम्हाला शस्त्रे धारण करून, कामगिरी करून दाखवून प्राण अर्पण करण्याची संधी मिळावी.' बादशहांनी आज्ञा केली की : मोठ्या अमीर उमरावांचे वकील व मन्सबदार यापैकी जे जे म्हणून घोड्यांना डाग देण्याची व बाळगण्याची कामे करीत असतील त्यांना कोणी त्रास देऊ नये. (ते शस्त्रे बाळगून फिरू शकतात).

शहाजादा आज्जम, गाजिउद्दीनखान (फीरोजजंग) व जुल्फिकारखान नुस्रतजंग यांच्या नांवे पत्रे रवाना झाली.

आम्ही सोमवारी मूर्तजाबाद मिरजेत दाखल होऊ अशी बादशहांनी आज्ञा केली.

## तीन नोव्हेंबर १६९९

चार हजार अश्रफ्या शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजकडे पाठविण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

## चार नोव्हेंबर १६९९

आज बादशहा सब्जरंग (हिरवा) नावाच्या घोड्यावर स्वार होऊन प्रवासाला निघाले. वाटेत ते तख्ते रवांमध्ये बसले आणि सव्वादोन कोसाचा प्रवास करून ते उगार (मिरजेच्या पुढे असलेले उगार स्टेशन जवळचे गाव तर नव्हे ?) येथे मुक्कामाला आले.

कोल्हापूरचा ठाणेदार रणबाजखान याला हुजुरात बोलावण्यात आले.

हेरांच्या तोंडून पुढील बातमी कळली : बारा तारखेस (जमादिलावल, सव्वीस ऑक्टोबर, १६९९) रामा (राजाराम) व नरकवासी संताजीचा मुलगा राणोजी हे चार हजार स्वार बरोबर घेऊन सातान्याहून निघाले. त्यांच्याबरोबर घना जाधव, रामचंद्र व दादो मल्हार वगैरे सरदार सात हजार स्वार बरोबर घेऊन होते. ते चंदनवंदनच्या किल्ल्यात गेले. तेथे ते तीन दिवस होते. सतरा जमादिलावल (एकतीस आक्टोबर १६९९, रोजी ते चंदनवंदनहून निघून तेथून बारा कोसावर असलेल्या परगणे उदरगी (?) येथे पोहोचले. तेथे त्यांना बारा हजार स्वारांचे आणखी सैन्य येऊन मिळाले. सुरतबंदराकडे जाण्याचा मकहूर (राजाराम) चा बेत दिसतो.

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त याला आज्ञा केली होती की : पन्हाळगड जिंकून घ्यावा व सातारगडाखालची पिके व खेडी उध्वस्त करावी. आता आज्ञा करण्यात आली की बेदारबख्ताने रामाचा (राजारामाचा) पाठलाग करावा.

मुनीमखानाने विनंती केली की : सटवाजी डफळे हा पुन्हा हुजुरात येत आहे. वाटेत त्याला कोणी त्रास देऊ नये अशी फौजदार व ठाणेदार यांना आज्ञा व्हावी. तसे हुकुम देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

## पाच नोव्हेंबर १६९९

आज बादशहा मुक्कामाहून निघाले. साडेतीन कोसाचा प्रवास करून ते मौजे वसमल (म्हैसाळ, मिरजेपासून सहा मैल) येथे पोहोचले.

सटवाजी डफळे याजपाशी तैनात असलेला बदी हा हात बांधून बादशहापाशी हजर झाला. त्याचे हात मोकळे करावे अशी आज्ञा झाली.

मिरज मूर्तजाबादेचा किल्लेदार व फौजदार मुफ्तखरखान उर्फ मीर नूरुल्ला हा येऊन बादशहांना भेटला. गुर्जबर्दार हे शहाजादा बेदारबख्त याच्या नावे पत्रे घेऊन गेले होते. त्यांनी परत येऊन बादशहांना कळविले की : शहाजादा हा मुर्तजाबाद मिरजेच्या पलीकडे दहा कोसावर असून तो बादशहाच्या आज्ञेप्रमाणे रामा (राजाराम) च्या पाठलागावर कूच करीत चालला आहे.

* * *

२

# सहा नोव्हेंबर १६९९ ते एकतीस डिसेंबर १६९९

**सहा नोव्हेंबर १६९९**

आज बादशहा तख्ते रवांबर बसून निघाले. पावणेतीन कोसाचा प्रवास करून ते मुर्तजाबाद मिरजेला पोहोचले. तेथील किल्लेदार व फौजदार मुफ्तखरखान याने आज्ञेप्रमाणे तोफांची सरबत्ती केली. बादशहाजादा आज्जम याने बादशहाची गाठ घेतली. त्याची मुले वालाजाह व वालातबार हेहि बादशहाला भेटले.

बादशहांनी प्रार्थनेचे शब्द कोरलेला एक ताईत शहाजादा बेदारबख्त याजकडे पाठविला. मुखलिसखान याने बादशहांना कळविले की : शहाजादा बेदारबख्त याने आपल्या सैन्याचा बक्षी नेकनामखान व सैन्याचे बुणगे मिरजेत ठेवले आहे. आज्ञेप्रमाणे नेकनामखान हा बादशहांना भेटला.

काल रात्री बादशहांनी रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांना बोलावून म्हटले 'तयार रहा. सातारगडाच्या पायथ्याशी असलेली खेडी उध्वस्त करणे व माझ्या छावणीसाठी जागा निवडणे यासाठी मी तुम्हाला गुरुवारी पाठविणार आहे.' बक्षी-उल्मुल्क यांनी सैन्याच्या शिपायांचे तूमार (मस्टर रोल, नावे नोंदलेले दप्तर) तयार करावे अशी आज्ञा झाली. आज्ञेप्रमाणे मुखलिसखानाने रूहुल्लाखानाच्या सैनिकांचा तपशील दाखविला. रूहुल्लाखानाच्या सैनिकांचा तपशील सात हजार नउशे स्वार असा भरला.
गंजीकोटचा किल्लेदार मुहंमदशफी हा येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी फजाईल-

खान याला सांगितले, खान बहादुर नुस्रतजंग याला लिहा की : रामा (राजाराम) हा वऱ्हाडच्या बाजूने गेला आहे. तुम्ही त्वरित त्याच्या पाठलागावर जावे. आणि शहाजादा बेदारबख्त याला जाऊन मिळावे.

### सात नोव्हेंबर १६९९

बादशहांना कळविण्यात आले की : मिरज मुर्तजाबाद येथे पाण्याची फार टंचाई आहे. बादशहांनी आज्ञा केली की : कृष्णा नदीच्या काठावर राहाण्यालायक स्थळ पाहून यावे. त्याप्रमाणे मतलबखान व उस्मान करावल हे जागा पाहून आले. त्यानी सांगितले की, 'येथून कृष्णा सव्वातीन कोस अंतरावर आहे.'

शहाजादा आज्जम याच्या तैनातीतील पुढील माणसे येऊन बादशहांना भेटली. जलालुद्दीनखान बक्षी, अफजलखान बक्षी व दिवाण, हिदायतुल्लाखान, मुहंमद मिहदी मीर सामान, हिदायतुल्ला कोका, असदुल्ला दारोगा तोफखाना, मिर्जा कूचकचा मुलगा मिर्जा मुहंमद, हकीम हुसेन, इखलासकेश बक्षी व वाकनीस.

खान फीरोजजंग याच्या नांवे आज फर्मान रवाना झाले. गंजीकोटचा किल्लेदार महंमद शफी (?) याला रूहुल्लाखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

मुहतशिमखान याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. त्याला मन्सबीवरून बडतर्फ करण्यात आले. त्याला वर्षासन नेमून देण्यात आले. त्याला हुजुरातून दोन हजार व बुऱ्हाणपूरच्या खजिन्यातून तीन हजार द्यावे आणि त्याने अजमीरला जाऊन कालक्रमणा करावी अशी आज्ञा करण्यात आली

सरफराजखान हा शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. मुखलिसखानाच्या विनंतीवरून त्याला मदतीदाखल दहा हजार रुपये द्यावे अशी आज्ञा झाली. राव दलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद हा देशीहून येऊन बादशहाला भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेली अनेक माणसे मुर्तजाबाद मिरजेत बसून आहेत. बादशहांनी सफशिकनखान मीर-तुजक याला आज्ञा केली की, 'मुद्दाम अधिकारी नेमून वरील माणसांना बेदारबख्ताच्या सैन्यात पाठविण्यात यावे."

रूहुल्लाखानाच्या ऐवजी सफशिकनखान याने करावली (टेहळणीचे आघाडीचे पथक, स्काउटिंग) चे काम सांभाळावे अशी आज्ञा झाली. मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजिम याला दारोगा म्हणून नेमण्यात येऊन एक हजार स्वार व पाच हजार पायदळ यांज-सहित बारामावळचा जमीनदार खंडोजी याला त्याजपाशी तैनात करण्यात आले.

खंडोजीचा मुलगा महोजी (?) याला एक हजार जात व चारशे स्वार अशी मन्सब देण्यात आली. अमृतराव याला पांचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब मिळाली. मरहूम खानजमान फतेहजंग याचा मुलगा अब्दुल्लतीफ हा पन्हाळगडच्या भोवतालच्या भागाचा फौजदार होता. आपल्या सनदा दुरुस्त करून मिळाव्या अशी त्याने विनंती

केली. हुसेन कील याने त्याची व्यवस्था करावी अशी आज्ञा झाली.

खुदाबंदाखान याला रूहुल्लाखान मीर सामानच व सियादतखान याला दिवाणेखास दारोगा हमीदुद्दीनखानबहादुर याचा नायब म्हणून नेमण्यात आले.

### आठ नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. एक कोस प्रवास करून ते कृष्णेच्या काठावरील आपल्या मुक्कामावर पोहोचले. छावणीचा मुख्य काजी मुहंमद अकरम याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. बेदारबख्ताचा बक्षी नेकनामखान याची मन्सब वाढवून खजिना बेदारबख्ताच्या छावणीत नेऊन पोहोचविण्याचे काम बादशहांनी त्याच्याकडे दिले.

बादशहांनी सूचना केली की : आम्ही शनिवारी सातारगडाकडे कूच करू.

बादशहा हे मतलबखान करावलबेगी याला म्हणाले, 'तयार राहा. तोफांचे सामान आणण्यासाठी व तळावर (ब्रह्मपुरी) गस्त घालण्यासाठी मी तुम्हाला पाठवीत आहे.' मतलबखानाबरोबर पाठविण्याच्या पयकाचे तूमार (नांवनिशीवार नोंद) तयार करावे म्हणून मुखलिसखान यास आज्ञा करण्यात आली. औरंगाबादच्या अधिकाऱ्यांनी सरंजाम व इतर आवश्यक सामान पाठवावे म्हणून ताकीदपत्रे खास गुर्जबर्दाराच्या द्वारे पाठवावी अशी आज्ञा देण्यात आली.

खानबहादुर (हमीदुद्दीनखान) याने सांगितले की : सातारा हे तर गनिमांचे मुख्यस्थळ. ते जिंकले तर पन्हाळयासारखी इतर स्थळे सहज ताब्यात येतील.

बादशहा म्हणाले, 'तुम्ही आणि रूहुल्लाखान यांनी पुढे रवाना व्हावे' आम्हीहि येतो. बादशहांनी तरबियतखान व मन्सूरखान यांचे पन्हाळगडाकडे जाणे तूर्त स्थगित केले.

शहाजादा आज्जम याने बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला विचारले, 'जिल्लेसुभानी (बादशहा) कुणीकडे मोहीम करणार आहेत?' त्याने म्हटले, मला कांही कळले नाही.

### नऊ नोव्हेंबर १६९९

आज बादशहांनी रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखान बहादुर यांना सातारा प्रदेशात जाण्यासाठी निरोप दिला. त्यांच्याबरोबर सात हजार नऊशे स्वार होते. त्यांच्याबरोबर पुढील अधिकारी देण्यात आले. नागोजी माने (पाच हजारी जात व चार हजार स्वार अशी त्याला मन्सब होती), खंडोजी, सय्यदखान, इनायतखान मुहंमद शेखी, अली नकी, रुस्तमबेगखान, सय्यदखानाचा मुलगा सय्यद याकूब.

सैफुद्दीनखान याची सोलापूरच्या किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली. शिरवळचा ठाणेदार संग्रामखान, बहादुरगडचा फौजदार व किल्लेदार फखुद्दीनखान इत्यादींच्या नावाने हुकुम पाठविण्यात आले. खटावचा रामचंद, महावीर प्रसाद व किशनराव यांना रूहुल्लाखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

### दहा नोव्हेंबर १६९९

आज शुक्रवार, बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन मुर्तजाबाद मिरजेच्या जुम्मामशिदीत नमाज पढण्यासाठी गेले. नमाजानंतर त्यांनी बादशहाजादा आज्जम याला स्वतःच्या

तंबूकडे जाण्यास निरोप दिला. बादशहा हे सय्यद शम्सुद्दीन याच्या दर्ग्यावर गेले. तेथे ते फातिहा पढले. दर्ग्याचे सेवक सय्यद उमरुशहा वगैरेंनी प्रसाद दिला. बादशहांनी विचारले, 'सय्यद शम्सुद्दीन याच्या वंशजात कोण आहे ?' सेवकांनी सांगितले की, कोणी नाही, बादशहानी पुढील प्रमाणे बक्षिसे दिली.

सय्यद उमरुशहा वगैरेंनी दिलेला प्रसाद धूप, शेला, कुराणाची प्रत, डाळिंबाची करंडी. बादशहांनी आज्ञा केली की : एक खेडे इनाम म्हणून द्यावे. रोख दोन हजार रुपये द्यावे. मोज्जन (बांग देणाऱ्यांना) वगैरे तिघांना बक्षिसे दिली. एकाला पाच होन, दुसऱ्याला पाच होन, जारूबकश (झाडलोट करणारा) याला पाच होन.

### अकरा नोव्हेंबर १६९९

आज बादशहांनी रोजा (उपवास) पाळला म्हणून त्यांनी मुक्काम केला. मतलबखान करावलबेगी याला तोफांची सामग्री आणण्यासाठी व (ब्रह्मपुरीच्या) तळाची गस्त घालण्यासाठी पाठविण्यात आले. शहाजादा आज्जम याचे चारशे स्वार तरबियतखानाबरोबर पिछाडी (चंदावल)ला राहावेत अशी आज्ञा करण्यात आली.

### बारा नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. आघाडीला सफशिकनखान व पिछाडीला तरबियतखान हे होते. पावणेदोन कोसाचा प्रवास करून बादशहा हे कृष्णेच्या काठावर असलेल्या मौजे औकी (अंकली) येथे पोहोचले.

शहाजादा बेदारबख्त याने लिहिले की : मी ओर्छाचा राजा अवधूतसिंग याला माझ्या सैन्याच्या चंदावली (पिछाडी) वर नेमले. पण अवधूतसिंगाला हे मान्य नाही. बादशहांनी आज्ञा केली. अवधूतसिंग याला लिहावे. 'तुला आपले भले हवे असेल तर यापुढे तू असे करू नकोस.'

बादशहांनी मुर्तजाबाद मिरजेचा किल्लेदार व फौजदार मुफ्खरखान याला खिलतीची वस्त्रे देऊन मिरजेला जाण्यास निरोप दिला.

बेदारबख्ताच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की : लखाजी हा दोन हजारी जात व एक हजार स्वार असा मन्सबदार होता. तो बेदारबख्ताच्या फौजेत तैनात असून सटवाजी डफळे याला जामीन होता. लखाजी फरारी झाला आहे. या बाबतीत मुखलिसखानाने मुनीमखानाला ताकीदपत्र लिहावे अशी आज्ञा झाली.

मतलबखान करावलबेगी याला पुढीलप्रमाणे हुकुम देण्यात आला. 'तुम्ही तळावरून ब्रह्मपुरी (हुजुरात येण्यास निघाल त्यावेळी तुम्ही सांगोल्याच्या वाटेवर ठाणी बसवीत खटावच्या मार्गाने यावे मुर्तजाबाद मिरजेची वाट बंद करावी.'

### तेरा नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन पावणेतीन कोसाचा प्रवास करून डिग्रज येथे पोहोचले.

मरहूम हातमखान याचा मुलगा निसारुल्ला, मुहंमद बाकर व त्याचा भाऊ गजनफरबेग हे बेदारबख्ताच्या सैन्यात तैनात होते. ते येऊन बादशहांना भेटले.

## चवदा नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. साडेचार कोसाचा प्रवास करून ते इम्तियाजपूर (आमणापुर, तासगांव तालुका, सांगली जिल्हा) ला पोहोचले.

रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखान बहादुर यांनी लिहून पाठविले की : आम्हाला बाणाचे शंभर भाते व शंभर धनुष्ये हवी आहेत. ते द्यावे अशी आज्ञा झाली.

प्रवासात बादशहांनी भास्करराव हरकारा याला विचारले, 'येथून पन्हाळगड किती कोसावर आहे.' भास्करराव याने सांगितले की, 'नऊ कोस अंतरावर आहे. डावीकडे डोंगर आहे. तो दिसत नाही.' बादशहांनी विचारले, 'लांबून दिसेल असा दुसरा कोणता उंच डोंगर आहे' भास्करराव म्हणाला, 'पुरंदर गड.'

## पंधरा नोव्हेंबर १६९९

काल रात्री बादशहांना कळविण्यात आले की : विजपूरचा सुभेदार व विजापुरी कर्नाटकचा फौजदार मामूरखान हा आजारामुळे विजापूरला आला. तेथे वारला. त्याला अडीच हजार जात, व दोन हजार स्वार अशी मन्सब होती.

बादशहांनी पुढीलप्रमाणे नेमणुका केल्या. लुत्फुल्लाखान (निजामुल्मुल्काचा मामा) विजापूरचा सुभेदार.

मरहूम मामूरखान याचा भाऊ व सिरागडचा किल्लेदार व फौजदार याला विजापूर कर्नाटकचा फौजदार म्हणून नेमण्यात आले. लुत्फुल्लाखानाचा भाऊ इनायतखान याला किले अरक विजापूरची किल्लेदारी देण्यात आली. मरहूम अब्दुल्नबीखान याचा पुतण्या शेख अन्वर याला सिरागडची किल्लेदारी व फौजदारी देण्यात आली. मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार अली मर्दानखान याला वऱ्हाडचा सुभेदार म्हणून नेमण्यात आले. आणि वऱ्हाडचा सुभेदार अस्करखान याला मुहंमदाबाद बीदरच्या सुभेदारीवर नेमण्यात आले.

सातारगडचा देशपांडे (कानूनगो) यकोजी (?) चा मुलगा गोविंद पंडित हा बापू पंडित याच्या मध्यस्थीने बादशहांना भेटला.

शहजादा बेदारबख्त हा रामा (राजाराम) च्या पाठलागावर निघाला होता. त्याने आपल्या स्त्रिया व बुणगे यांना मुर्तजाबाद मिरजेत ठेवले होते. त्यांना मिरजेच्या किल्ले अरक मध्ये ठेवावे व किल्लेदार मुफ्तखरखान याने त्यांची काळजी घ्यावी. अशी शहाजाद्याने विनंती केली.

बादशहांनी विनंती मान्य करून आज्ञा केली की : या कामासाठी दोन गुर्जबर्दार व पन्नास बंदूकची नेमण्यात यावेत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : सटवाजी डफळे हा आपल्या मुलासहित बादशहाच्या भेटीस येत होता. ही बातमी लागताच रामा (राजाराम) च्या लोकांनी त्यांना कैद करून सातारगडात ठेवले आहे.

## सोळा नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार झाले. सव्वातीन कोसाचा प्रवास करून मछींद्रगडच्या अलीकडे एक कोसावर त्यांनी मुक्काम केला.

रूद्रकिशनचा मुलगा शिवनाथ याला राजा शाहू यांचा मीरसामान (कारभारी) म्हणून नेमण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली.

यारअलीबेग याने हेरांनी पाठविलेला वृत्तांत बादशहा पुढे ठेवला. हेरांच्या बातम्यात पुढील मजकूर होता :

शहाजादा बेदारबख्त हा परंड्याला पोहोचला. राम(राजाराम)हा परंड्याच्या पलीकडे सहा कोसावर होता. त्याने आपले धनाजी जाधव आदि सरदार यांना शहाजादा बेदारबख्त याजविरुद्ध लढण्यासाठी पाठविले. त्याप्रमाणे ते चार कोस पुढे चालून आले. शहाजादाही दोन कोस पुढे चालून गेला. युद्ध झाले. सरदारखान याची वीस माणसे व शंभर बंदूकची हे मारले गेले अगर जखमी झाले. गनिमांचा एक सरदार, जाने आलम (खाने आलम) याच्या हातून मारला गेला. गनिमांचा पराजय होऊन ते अहमदनगरकडे निघून गेले. शहाजादा त्यांचा पाठलाग करीत आहे.

बादशहा म्हणाले, 'शहाजाद्यांनी छान युद्ध केले. हा वृत्तांत बादशहाजादा आज्जम याजकडे पाठवा.'

करावलखान याला आज्ञा झाली की : रहमतपूर(?) व खटाव व पाईन विलायत या भागात आमच्या मुक्कामाच्या व ठाणी कायम करण्यास योग्य अशा जागा पाहून या. करावलखान याजबरोबर शंभर स्वार व दोनशे प्यादे देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

फतेदोस्त कौल याला आज्ञा देण्यात आली की : मछींद्रगडच्या शिबंदीच्या लोकांना त्यांचा थकलेला पगार वाटण्याचे काम तुम्ही आपल्या समोर करवावे.

जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग याने आपले बुणगे विजापुरात ठेवावे आणि स्वत: रामा (राजाराम)च्या पाठलागावर निघावे अशी आज्ञा त्याला पाठविण्याचा हुकुम फजायलखान यास देण्यात आला.

## सतरा नोव्हेंबर १६९९

बादशहाजादा मुहंमद मुअज्जम बहादुरशहा याने डाळिबाच्या दोन करंडया व खर्बुजाच्या दोन करंडया पाठविल्या. त्या बादशहांना दाखविण्यात आल्या.

## अठरा नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. ते मछींद्रगडाजवळ पोहोचले तेव्हा तेथील किल्लेदार नेमत हा येऊन बादशहाला भेटला. बादशहांनी तोफांना सरबत्ती देण्याची आज्ञा केली.

मुनीमखान याचा मुलगा मुहंमद काजम हा मर्दनगड(वर्धनगड ?)च्या खालच्या वाडया जाळून आला. तो बादशहांना येऊन भेटला. जुल्फिकारखान नुस्रतजंग यांच्या-कडील बातम्यावरून कळले की : त्याने कृष्णा ओलांडली. तो विजापूरला या महिन्याच्या (जमादिसानी)पाच तारखेस पोहोचत असून तेथे बुणगे ठेवून तो रामा(राजाराम)च्या पाठलागावर निघत आहे.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : शहाजादा बेदारबख्त हा परंड्याच्या (बार्शीपासून सतरा मैल, कुर्डुवाडीपासून चवदा मैल, उस्मानाबाद जिल्हा, मराठवाडा) पुढे दोन कोस चालून गेला. त्याने रामा (राजाराम)शी युद्ध केले. खाने आलम व सरदारखान यांनी राजारामाचा एक सरदार आणि शत्रूची काही माणसे ठार मारली व शत्रूचा पराजय केला. खाने आलम व सरदारखान यांची बरीच माणसे मृत अगर जखमी झाली. शत्रू पळून अहमदनगरकडे गेले. शहाजादा त्यांचा पाठलाग करीत आहे. बादशहा म्हणाले, 'शहाजादे छान जाऊन पोहोचले. त्यांची कामगिरी मान्य झाली.'

## एकोणीस नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. ते सव्वातीन कोसाचा प्रवास करून मौजे रेवन(ऐवन, बोन, पोन, ओंद, कऱ्हाडच्या दक्षिणेस अकरा मैल) येथे पोहचले. उस्मान करावल व मीर फतेहुल्ला हे नीमगाव (निंबगाव ? लिंब, सातारा तालुका) येथे बादशहाच्या राहाण्यास योग्य जागा व नीमगावपर्यंत मजला किती होतील हे पाहाण्यासाठी गेले होते ते परत आले. ते म्हणाले, 'मोर (मसूर ?) पासून नीमगांव (लिंब, साताऱ्याच्या उत्तरेस नऊ मैलावर ?) अठरा कोसावर आहे. पाच मजला होतील.'

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : आज्ञेप्रमाणे रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखानबहादुर हे वसंतगडच्या पायथ्याशी असलेल्या वाड्यापाशी पोहोचले. त्यांनी वाड्या जाळल्या. तोपर्यंत गनिमांची पथके तेथे पोहोचली. युद्ध झाले. गनिमांची अनेक माणसे मारली गेली. त्यांचा पराजय झाला. त्यानंतर ते (रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखानबहादुर) सातारगडच्या पायथ्याशी असलेल्या वाड्या उध्वस्त करण्यासाठी गेले आहेत.' रूहुल्लाखानाने पाठविलेला वृत्तांत बादशहांनी वाचून पाहिला.

## वीस नोव्हेंबर १६९९

बादशहांना कळविण्यात आले की : कऱ्हाड गावात कृष्णेच्या पलीकडे एक मोठी मशीद आहे. बादशहांनी बादशहाजादा मुहंमद आजम शहा याला पुढे रवाना केले. त्यानंतर ते तख्ते रवांवर स्वार झाले. त्यांनी कृष्णा ओलांडली. ते मशिदीत गेले. जमातीबरोबर ते नमाज पढले. बादशहांनी मशीद पाहिली. ते बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'मशिदीत जे काही लिहिले आहे ते उतरून घेण्यास मुहंमद अली यास सांगा.' त्याप्रमाणे करण्यात आले. यानंतर बादशहा तेथून निघाले. येऊनजाऊन पावणेतीन कोस प्रवास करून बादशहा मुक्कामावर दाखल झाले.

बादशहा मीर आतिश तरबियतखान याला म्हणाले, 'तयार रहा. सातारगडचा परिसर उध्वस्त करण्यासाठी मी तुम्हाला पाठवीत आहे.' तरबियतखानाबरोबर पाठविण्यासाठी तीन हजार सहाशे स्वार यांची यादी (तूमार) तयार करण्याची मुखलिसखान याला आज्ञा करण्यात आली.

## एकवीस नोव्हेंबर १६९९

काल बादशहांना कळविण्यात आले की : मसूर येथे वास्तव्याची व्यवस्था करण्यात

आली आहे. बादशहा म्हणाले, 'उद्या मुकाम आहे. आमच्या राहाण्याची जागा कृष्णेच्या काठी करावी. कृष्णा पार करता येण्यासारखी असेल तर नदीच्या पलीकडे बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याचा तंबू उभा करण्यात यावा.' या कामासाठी तरबियतखानाला पुढे पाठविण्यात आले. मसूरचे देशमुख महादजी (जगदाळे) वगैरे दोन माणसे बादशहांना भेटली. त्यांनी नजराणे दिले. बादशहांनी त्यांना खिलतीची वस्त्रे दिली व त्यांना एक घोडा मोहर देण्याची आज्ञा केली. भेटणाऱ्यात महादजी व मंताजी (मंबाजी?) हे होते.

खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याने तातडीने शहाजादा बेदारबख्त याला जाऊन मिळून (राजा)रामाचा पाठलाग करावा म्हणून मुद्दाम गुर्जबर्दार पाठवावा अशी आज्ञा करण्यात आली.

दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूबखान याच्याकडे एक सजावली (अंमल-बजावणीचा अधिकारी) पाठवून त्याला दरबारात बोलवून आणावे अशी आज्ञा झाली. बांधकामाचा तज्ञ जवाहरमल याला बक्षिसी देऊन बादशहांनी आज्ञा केली की : कऱ्हाडची गढी पक्की बांधण्याचा किती खर्च येईल; तसेच कच्ची बांधली तर किती खर्च येईल याचा आराखडा तयार करून आणा. बेलदारांचा दारोगा हीराचंद, त्याचे बेलदार, सक्का (पाणी पुरविणारे) इत्यादींनी जवाहरमलच्या बरोबर जावे अशी आज्ञा झाली. अजमीरच्या बातम्या-वरून कळले की : उदयपूरचा जमीनदार (राणा) अमरसिंग याने मंडल व बधनूरचे बादशाही इलाखे उध्वस्त करण्यासाठी सैन्य पाठविले. हे ऐकून अजमीरचा सुभेदार अब्दुल्लाखान याने कर्णसिंह नावाच्या रजपूत सरदाराला त्या भागावर नेमले.

### बावीस नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. वसंतगड जवळ ते पोहचले तेव्हा त्यांनी भास्करराव हरकारा याला विचारले, 'येथून वसंतगड किती लांब आहे' भास्करराव याने सांगितले, 'येथून अर्धा कोस, व मसूरहून दोन कोस.' बादशहांनी साडेतीन कोसाचा प्रवास केला व ते मसूर जवळील आपल्या मुक्कामावर पोहोचले. बादशहा बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'तुम्ही, खुदाबंदाखान व इख्लासखान या तिघांनी पथके घेऊन वसंतगडकडे जावे आणि मोर्च्यासाठी जागा निवडाव्या. आदिलखान वगैरे करावलीच्या लोकांना कृष्णेच्या पलीकडे ठेवावे. त्यांना लष्करातील लोकांना लाकूडफाटा, गवत इत्यादीसाठी तिकडे येऊ देऊ नये.' त्याप्रमाणे करण्यात आले.

### तेवीस नोव्हेंबर १६९९

काल रात्री बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने बादशहापाशी येऊन विनंती केली की : आपल्या आज्ञेप्रमाणे मी वसंतगड पाहून आलो. मोर्च्याची जागा किल्ल्याच्या पलीकडे आहे. बादशहांनी फातेहा (प्रार्थना) पढून, तरबियतखानाला किल्ल्याला वेढा देण्यासाठी पाठविले. बादशहांनी आज्ञा केली की : गाड्यातून तोफा नेण्यात याव्या आणि किल्ल्यावर तोफांचा मारा करावा. तरबियतखानाबरोबर पुढील अधिकारी नेमण्यात आले. बादशहाजादा मुहंमद आज्जम याचा बक्षी जलालुद्दीन, पाचशे स्वारांसहित, तुर्कताजखान शंभर,

गुर्जबर्दारांसहित नुस्रतजंग याच्या फौजेतून आलेली नजरबे वगैरे अठ्ठावीस माणसे. बक्षीउलमुल्क मुखलिसखान यांने सांगितले की, 'नजरबे वगैरे मोगल यांना पगार न मिळाल्यामुळे ते त्रस्त आहेत.' बादशहांनी आज्ञा केली की : पन्नास हजार रुपये खजिन्यातून काढून फतेहदौलत कौल याने चौकशी करून पगारवाटप करावे.

जुल्फिकारखान याने पुढील विनंतीअर्ज लिहून पाठविला : (१) खर्चासाठी काही मदत व्हावी. यावर बादशहांनी आज्ञा केली की : जुल्फिकारखानाला एक लाख रुपये देण्यात यावेत. हैद्राबाद कर्नाटकचा दिवाण शफीखान याने त्या प्रांतात असलेल्या जुल्फिकारखानाच्या जहागिरीतून ही रक्कम नंतर वसूल करावी अशी आज्ञा झाली.

जुल्फिकारखानाने लिहिले होते की : माझ्या सैन्यातील पथकांची पगारबाकी फार राहिली आहे. बादशहांनी आज्ञा केली की : चार लाख रुपये पाठविण्यात यावेत. याशिवाय जुल्फिकारखानाने चाळीस रुपये माणशी पगारावर पाचशे स्वार नवीन भरती करावे अशी आज्ञा झाली.

रूहुल्लाखान याने अंबोजी नावाच्या गनीम सरदाराची बायको कैद केली होती. तिला मच्छींद्रगडाच्या किल्ल्यात ठेवावी म्हणून बादशहांनी आज्ञा केली की : अब्दुल्कादर व बेलदारांचा दारोगा हीराचंद यांनी पन्नास शिपाई बरोबर घेऊन तिला मच्छींद्रगडमध्ये नेऊन ठेवावी व नंतर परत यावे.

## चोवीस नोव्हेंबर १६९९

बादशहांना कळविण्यात आले की : आज्ञेप्रमाणे बक्षीउलमुल्क मुखलिसखान हे रात्रभर वसंतगड समोरील मोर्च्यांत होते. आज संध्याकाळी ते येऊन बादशहांना भेटले. त्यांनी सांगितले की : मोर्चे किल्ल्याच्या नजीक सरकले आहेत, वसंतगड किल्ल्याच्या अलीकडे आमचा तंबू उभा करावा व नदीच्या पलीकडे बादशहाजादा आजम यांचा तंबू उभा करावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

## पंचवीस नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन मसूरहून निघाले. एक कोस व पंचवीस साखळ्या इतके अंतर कापून ते (वसंतगड नजीक) मुक्कामाला आले. बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : उजव्या फळीच्या, डाव्या फळीच्या व पिछाडीच्या पथकांनी दुपारपर्यंत बादशाही छावणीभोवती गस्त घालीत असावे. फौजेच्या करावलांनी संध्याकाळपर्यंत गस्त घालण्याचे काम करावे.

मुहंमद अमीन गुर्जबर्दार याने दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूबखान याला प्रतापगडाला वेढा घालण्यासाठी घेऊन यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

मसूरचा ठाणेदार मंबाजी हा बादशहाच्या आज्ञेप्रमाणे, रूहुल्लाखानाच्या सैन्यातून येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देऊन बादशहांनी त्याला तावडतोब वेढ्यात जाऊन हजर होण्याची आज्ञा केली.

शहाजादा बेदारबख्त याजकडे खजिना पाठविण्यासाठी बादशहांनी बादशहाजादा

आज्जम याच्या तैनातीतील नेकनामखान याजबरोबर पाचशे स्वार पाठविले होते. जुल्फिकारखानबहादुर हा शहाजादा बेदारबख्ताला येऊन मिळेपर्यंत नेकनामखान याने शहाजाद्याजवळच राहावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### सव्वीस नोव्हेंबर १६९९

काल दुपारी हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : वसंतगडचा किल्लेदार रतनराव याने तरबियतखानाकडे पुढील निरोप पाठविला– आम्हाला जिवाचे अभय मिळावे आणि बाहेर येण्याची वाट द्यावी. तर मी किल्ला हवाली करण्यास तयार आहे. तरबियतखानाने सांगून पाठविले की–तुमचे अपराध माफ केले जातील व तुम्हाला जिवाचे अभय आहे. तुम्ही खात्री बाळगून यावे. बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला सांगितले, 'तुम्ही पण किल्ल्याकडे जा.' त्याप्रमाणे मुखलिसखान हा तिकडे गेला. किल्लेदाराने त्याला सांगून पाठविले की, 'मसूरचा ठाणेदार मंबाजी हा येत असेल तर त्याच्या मध्यस्थीने मी येऊन भेटतो.'

यावर बक्षीउलमुल्क मुखलिसखान व तरबियतखान यांनी मंबाजीला किल्ल्यात पाठविले. त्याप्रमाणे मंबाजी हा किल्ल्यात गेला. त्याने किल्ल्यातून रात्री किल्लेदार, फौजदार, कौतवाल असे चार सरदार(मराठ्यांचे) यांना किल्ल्याच्या दरवाजाच्या किल्ल्यांसहित तरबियतखानाकडे आणले. तरबियतखानाने त्यांना खिलतीची वस्त्रे दिली. यानंतर मुनीमखान वगैरे बादशाही अधिकारी हे किल्ल्यात गेले. त्यांनी किल्ला ताब्यात आणला. तरबियतखानाने किल्ल्याबाबतचा वृतांत व सोन्याच्या किल्ल्या या ख्वाजादोस्त महली याच्याबरोबर बादशहाकडे पाठविल्या. बादशहांनी रात्री मजकूर आणि किल्ल्या पाहिल्या.

बादशहांनी ख्वाजादोस्त महली याला विचारले, 'किल्लयातून किती माणसे बाहेर पडली?' त्याने सांगितले, 'चारशे माणसे. याशिवाय काही माणसे जिवाच्या भीतीने संधी साधून पळून गेली. किल्लयात धान्य, सरब(दारू गोळ्यासाठी लागणारी विशिष्ट माती), दारू वगैरे सामान पडलेले आहे.' बादशहांनी विचारले, 'तू किल्लयात गेला होतास काय?' ख्वाजादोस्त महली म्हणाला, 'मी किल्लयात दोनदा जाऊन आलो.' बादशहांनी किल्ला फत्ते झाल्याबद्दल नौबती–नगारे वाजविण्याची आज्ञा केली.

मुखलिसखान हा आज्ञेप्रमाणे किल्ल्यात गेला होता. त्याने किल्ला पाहिला. नंतर तो बादशहाच्या हुजुरात आला. त्याने बादशहांना तसलीमात(नम्रमुजरा, अभिवादन) केले. बादशहांनी आज्ञा केली की : मुखलिसखानाला खिलतीची खास वस्त्रे देण्यात यावी. त्याच्या सेवेचा मजुरा झाला.

मीर आतिश(दारूगोळ्याचा अधिकारी) तरबियतखान हा बादशहाकडे आला. वसंतगडच्या विजयाबद्दल त्याने बादशहांना अठरा अश्रफ्या नजर केल्या. बादशहा त्याला म्हणाले, 'तुम्ही खूप कामगिरी बजाविली. तुमची सेवा मान्य झाली. मजुरा झाला.'

तरबियतखानाने तसलीमात केली (नम्र मुजरा). बादशहांनी त्याला खास खिलतीची वस्त्रे व घोडा या वस्तू दिल्या.

वसंतगडच्या विजयाबद्दल बादशहाजादा मुहंमद आज्जम, बादशहाजादा मुहंमद कामबक्ष, शहाजादा मुहंमद वालाजाह, शहाजादा मुहंमद आली तबार, बहरामंदखान (बक्षी), तलत्तुफखान, अर्शदखान, मन्सूरखान, काजी मुहंमद अक्रम वगैरे अमीर उमरावांनी बादशहांना तसलीमात (नम्र अभिवादन) केले व नजरा दिल्या. त्या पुढीलप्रमाणे :– आज्जम एक हजार मोहरा, वालाजाह शंभर मोहरा, आली तबार पन्नास मोहरा, बहरामंदखान दोनशे मोहरा, अर्शदखान नऊ मोहरा, मन्सूरखान दोन मोहरा, मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम नऊ मोहरा, जवाहिरखान्याचा अधिकारी गुलाम मुहंमद एक ग्रंथ व नऊ मोहरा, बापूपंडित दोन मोहरा, फजाईलखान मुन्शी एक तल्वार.

वसंतगडचा माजी किल्लेदार रतनराव व इतर मराठे सरदार यांना भेटीस आणण्यासाठी काय आज्ञा म्हणून तरबियतखानाने विचारले. बादशहा म्हणाले, 'मी उद्या वसंतगड पाहाण्यासाठी जात आहे. तेथे तुम्ही त्यांना (रतनराव वगैरेंना) घेऊन या.' 'वसंतगडची जाण्यायेण्याची वाट उस्मान करावल याने बघून यावी', अशी बादशहांनी आज्ञा केली.

रूहुल्लाखान याने विनंती केली की : मसूर व रहमतपूर येथील जमीनदार (देशमुख देशपांडे) यांची विनंती आहे की : आमच्या तालुक्यातील शेतीची नासाडी (पायमल्ली) होणार नसेल तर आम्ही दहा हजार रुपये पेशकश (खंडणी) देऊ.

## सत्तावीस नोव्हेंबर १६९९

बादशहांनी काल रात्री बक्षीउल्मुख मुखलीसखान याला बोलावून सांगितले, 'मी उद्या वसंतगड पहाण्यास जाणार नाही. सरकारी मालमत्तेचा (बयूतात) अधिकारी खुदाबंदाखान याला म्हणावे की– किल्ल्यात जाऊन तेथील सामग्री जप्त करा. तुम्ही पण उद्या किल्ल्यात जा.'

बादशहा हे सरकारखान करावल, व अब्दुस्सलाम खुशमंजिल यांना म्हणाले, 'तुम्ही मौजे नीमगांव (?) ला जाऊन आमच्या राहण्यास योग्य अशी जागा पाहून या. फराशखान्याचा दारोगा शरफुद्दीन याने बुधवारी पुढे तंबू रवाना करावे. आम्ही बुधवारी वसंतगड किल्ला पाहाण्यास जाऊ. गुरुवारी येथून कूच करू.'

रावतमल झाला याला वसंतगडचा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. त्याला कऱ्हाडहून बोलावून घेण्यात आले.

बादहांशनी जवाहरमल (बांधकाम तज्ञ) याला आज्ञा केली की : तुम्ही वसंतगडचा किल्ला पाहायला जा. आतून व बाहेरून किल्ल्याची मोजणी, पाहणी करा. किल्ल्याच्या आत जर योग्य जागा मिळाली तर मशिदीचा आराखडा (बरावर्द, खर्चाचा) तयार करा.

खुस्रौबेग गुर्जबदार याला बादशहांनी एक फर्मान (आज्ञापत्र) देऊन चीनकुलीजखान (मराठी कागदपत्रातील चीनकिलीचखान, भावी निजामुल्मुल्क) याजकडे पाठविले होते.

तो ते फर्मान पोहोचवून परत आला. त्याने बादशहांना पुढील माहिती दिली : आपल्या आज्ञे-प्रमाणे चीनकुलीजखान हा या महिन्याच्या (जमादिसानी) तीन तारखेस (सोळा नोव्हेंबर १६९९) बार्शीमुक्कामी शहाजादा बेदारबख्त यांना जाऊन मिळाला. शहाजाद्यांनी चीन-कुलीजखान याला आपल्या सैन्याच्या हरावलीवर नेमले असून ते दोघे मजलदरमजल करीत रामा (राजाराम) च्या पाठलागावर जात आहेत. मी औसा (उस्मानाबाद जिल्हा, मराठवाडा) मुक्कामी त्यांचा निरोप घेतला.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : शहाजादा बेदारबख्त याने आपल्या फौजेचा बक्षी नेकनामखान याला परंड्याच्या किल्ल्यात ठेवले आहे. नेकनामखानाला त्याने सांगितले आहे की, 'या भागातील किल्लेदारांकडून, बाण, दारू, सरब (दारू तयार करण्याची माती) इत्यादि सामग्री घेऊन तुम्ही माझ्याकडे या.'

बादशहांनी आज्ञा केली की : गुलबर्गा, मुहम्मदाबाद बीदर, सोलापूर, व कल्याणी येथील किल्लेदारांनी शहाजादा बेदारबख्त याला लागेल ती सामग्री पुरवावी अशा अर्थाचे हुकुम त्यांना पाठविण्यात यावे.

खानसामान व बयूतात या खात्याचा वाकनीस शेख गुलाम मुहंमद याने विनंती केली की : खुदाबंदाखान (वरील खात्याचा प्रमुख) हे वसंतगडातील सरंजामसामग्री जप्त करण्यासाठी किल्ल्यात जात आहेत. मला पण त्यांच्याबरोबर जाण्याची परवानी असावी. बादशहांनी त्याची विनंती मान्य केली.

### अठ्ठावीस नोव्हेंबर १६९९

बंडखोर राजपुत्र अकबर याचा मुलगा बलंदअख्तर हा आज्ञेप्रमाणे काल येऊन बादशहांना भेटला. वसंतगडच्या विजयाबद्दल त्याने बादशहांना नऊ अश्रफ्या नजर दिल्या. बादशहांनी म्हटले, 'उद्या तुम्ही वसंतगडचा किल्ला पाहून या.' त्याप्रमाणे सुल्तान बलंद-अख्तर हे कासिमखानाच्या बरोबर वसंतगड पाहाण्यासाठी आज गेले.

सातारगडच्या पायथ्याशी असलेल्या वाड्या जाळण्यासाठी हमीदुद्दीनखान बहादुर हा गेला होता. तो संध्याकाळी येऊन बादशहांना भेटला. त्याने दोन मोहरा नजर दिल्या. बादशहा म्हणाले, 'वाड्या छान उध्वस्त करून आलात.'

वसंतगडांत असलेल्या सामग्रीची यादी मुखलिसखान याने लिहून पाठविली. ती पुढील-प्रमाणे : किल्लयाचा घेर एकशेवीस जरीब (साखळ्या), बुरुज बारा, विहीरी तीन, शस्त्रास्त्रांमध्ये धूप सत्त्याऐंशी, समशेरी तेहतीस, कट्यारी अठरा, बंदुकी एकशेतेवीस, चिलखती चव्वे-चाळीस, जिरेटोप तीन, जमदाड पंधरा, भांडी पात्रे वगैरे आठशेअठ्याऐंशी, तोफा पाच, दारू (बंदुकीची) अठरा मण, हुक्का आतिशी (एक अस्त्र, आगीचे नळकांडे) एकशेपन्नास.

रावतमल झाला हा कऱ्हाडहून येऊन बादशहांना भेटला. त्याला वसंतगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले. फौजदारी दिली नाही.

### एकोणतीस नोव्हेंबर १६९९

आज बादशहा वसंतगड पाहाण्यास गेले. ते तख्ते रवांवर स्वार होते. ते किल्ल्याच्या

दरवाज्यापाशी पोहचले. प्रवेशद्वारापाशी लष्करातील लोकांनी एकच गर्दी केली होती. बादशहांनी गर्दी केलेल्या माणसांना आपल्या हातांनी खूप बदडले (बदस्ते मुबारक मदुमहारा खूब जदन्द). प्रवेशद्वाराच्या आत त्यांनी आपला तख्ते रवां (वाहन) थांबविला. बादशहाजादा मुहंमद आजम व कामबक्ष, शहाजादा वालाजाह, थोर अमीर उमराव यांना दरवाजातून आत घेण्यात आले. बादशहा म्हणाले, 'इतरांना आत सोडू नका.' यावेळी तरबियतखान मीर आतिश याने आज्ञाप्रमाणे तमाम तोफांना सरबत्ती दिली. यानंतर बादशहा किल्लयात गेले. किल्ल्यात एक देऊळ होते (जाये बुतखाना). ते पाडण्यात आले. तेथे कनाती उभ्यारण्यात आल्या. बादशहा तेथे प्रार्थना पढले. त्यानंतर त्यांनी स्वतः हातात माती घेऊन मशिदीचा पाया घातला.

यानंतर बादशहा तख्ते रवांवर स्वार झाले. तटापाशी त्यांनी तरबियतखानाला विचारले, 'मोर्चे कुठपर्यंत आले होते?' तरबियतखानाने म्हटले, 'याच बाजूला जवळ आले होते.' यानंतर बादशहांनी बादशहाजाद्यांना निरोप दिला. मुखलिसखान व बहरामंदखान यांना बादशहांनी मागे ठेवले. ते स्वतः किल्लयाच्या पायथ्याशी आले. तेथे कनाती उभ्या करण्यात आल्या होत्या. बादशहा तेथे प्रार्थना पढून तख्ते रवांवर स्वार होऊन दुपारच्या वेळी आपल्या निवासस्थानावर पोहोचले. जाऊन येऊन एकंदर प्रवास चार कोसाचा झाला.

किल्ला फत्ते होईपर्यंत मुनीमखान हा वसंतगडाजवळच राहिला होता. तो आता येऊन बादशहांना भेटला. त्याने पाच अश्रफ्या नजर दिल्या. त्याच्या धाकट्या मुलाने एक धनुष्य नजर म्हणून दिले. तरबियतखानाने म्हटले, 'मुनीमखान याने उत्कृष्ट कामगिरी बजाविली आहे.' बादशहांनी मुनीमखानाची मन्सब वाढविली.

मुखलिसखान याने विनंती केली की : रावतमल झाला याची वसंतगडचा किल्लेदार म्हणून नेमणूक झाली आहे. जागेचे रक्षण झाले पाहिजे. बादशहांनी रावतमल याची मन्सब वाढविली. किल्लयात पाचशे प्यादे शिबंदी (हशमाचे) म्हणून तैनात करावे अशी आज्ञा झाली.

## तीस नोव्हेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. पावणेतीन कोसाचा प्रवास करून ते कृष्णेच्या काठावर मुक्कामाला पोहचले. बादशहांनी पुढील अधिकाऱ्यांना पथकासहित रूहुल्लाखान याजकडे जाण्यास निरोप दिला. हमीदुद्दीनखान बहादुर याला खेळणा (विशाळगड) व पन्हाळगड या किल्ल्याजवळच्या वाड्या उध्वस्त करण्यासाठी रूहुल्लाखान याजकडे रवाना करण्यात आले.

नजरत्रे इत्यादी दोनशे मोगल यांनाहि याचवेळी रूहुल्लाखान याजकडे रवाना करण्यात आले.

मुनीमखान याचा मुलगा मुहंमदकाजम याला आपले एक हजार एकोणचाळीस माणसांचे पथक घेऊन रूहुल्लाखानाकडे जाण्यास निरोप देण्यात आला. वसंतगडचा उल्लेख यापुढे मिफातीहूल फतूह (यशाच्या किल्लया) असा करण्यात यावा अशी आज्ञा झाली.

### एक डिसेंबर १६९९

आज कचेऱ्या बंद होत्या.

### दोन डिसेंबर १६९९

आज बादशहा सकाळी तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. सव्वातीन कोसाचा प्रवास करून ते बोरगांवला(?) पोहोचले.

बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : शहाजादा बेदारबख्त याने आपल्या कुटुंबातील स्त्रियांना मुर्तजाबाद मिरजेत ठेवले आहे. मिरजेचा किल्लेदार मुफ्तखरखान याने शक्य झाले तर त्यांना (बेदारबख्ताच्या कुटुंबियांना) तळावर (ब्रह्मपुरी) पोहोचवावे. ते शक्य नसल्यास विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याने आपली पथके पाठवून त्यांना ब्रह्मपुरीला पोहोचवावे.

बादशहांना कळविण्यात आले की : रूहुल्लाखान व हमीदुद्दीनखान हे सातारगडाहून दोन कोसावर पोहोचले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : त्यांनी तूर्त पन्हाळगड व खेळणा या भागात जाण्याचे स्थगित करावे. साताऱ्याभोवतालचा प्रदेश त्यांनी उध्वस्त करावा.

मन्सूरखान याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले : संताजीचा मुलगा राणोजी हा कऱ्हाड भागात संचार करीत आहे. माझ्याजवळ किती (अल्प) सैन्य आहे हे आपल्याला माहीतच आहे. तातडीने कुमक पाठविण्यात येईल अशी आशा आहे. बादशहांनी ताबडतोब मुहंमद काजम, सिद्दी बिलालखान इत्यादींच्याबरोबर पाचशे स्वार देऊन मन्सूरखानाच्या कुमकेसाठी रवाना केले. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'रूहुल्लाखानाला लिहा, त्यांनी तातडीने जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे.'

सटवाजी डफळे याचा अधिकारी बदी (?) याला बडतर्फ करण्यात आले होते. मुनीमखानाच्या सांगण्यावरून त्याची मन्सब पुन्हा बहाल करण्यात आली.

### तीन डिसेंबर १६९९

बादशहाच्या आज्ञेप्रमाणे मन्सूरखान हा आपला मुलगा मुहंमद काजम व सिद्दी बलालखान यांना सैन्यासहित कऱ्हाड येथे पोहोचवून आला. तो बादशहांना भेटला.

वसंतगडचा उल्लेख मिफताहलफतूह (यशाची किल्ली) असा करण्यात यावा अशी आज्ञा झाली.

मन्सूरखान याने वसंतगडच्या हणमाची व सामग्री सरंजामाची व्यवस्था तातडीने करावी असा बादशहांनी हुकुम केला.

रहमतपूर येथील मशीद पाहून या म्हणून बादशहांनी ख्वाजा मसूद महली व जवाहरमल यांना पाठविले. येथून रहमतपूरचे अंतर किती आहे हेही पाहून येण्यास त्यांना सांगण्यात आले. ते जाऊन परत आले. त्यांनी सांगितले की, 'रहिमतपूर हे येथून एक कोस पंचवीस साखळ्या (जरीब) अंतरावर आहे. तेथील मशीद व बाग ही चांगली आहेत.'

तरबियतखानाने विनंती केली की : वसंतगडचा किल्लेदार रतनराव, मच्छींद्रगडचा

देशमुख महिदाजी, व बागलाणाचा जमीनदार भायाजी (? ) हे मन्सबीसाठी रुजू झाले आहेत. बादशहा म्हणाले, 'त्यांना भेटण्यासाठी घेऊन या.'

## चार डिसेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन रहमतपूरला पोहोचले. तेथे ते मरहूम रणदूलाखान याच्या क़बरीवर गेले. तेथे ते फातेहा पढले. तेथे एक विधवा बाई (रणदूलाखानाची विधवा?) होती. तिला दहा पावली सोने बक्षीस देण्यात आले. बादशहांनी अर्शदखान याला आज्ञा केली की, 'एक गाव इनाम देण्यात यावे.' यानंतर बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. दोन कोसाचा प्रवास करून ते मौजे धानूर(कोरेगांवच्या दक्षिणेस-सात मैल, धामनेर) येथे पोहोचले.

बादशहांनी फराशखान्याचा मुशरफ(अधिकारी) शरफुद्दीन याला विचारले, 'सातारगडचा किल्ला कोणत्या डोंगरावर आहे?' त्याने म्हटले, 'डावीकडच्या डोंगरावर. समोरचे जे दोन डोंगर दिसतात तो चंदनगडचा किल्ला होय.'

बादशहा तरबियतखानाला म्हणाले, 'तयार रहा. साताऱ्याला वेढा घालण्यासाठी तुम्हाला पाठवीत आहे.'

गाजिउद्दीनखान बहादुर याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली : बंडखोर निगूनबख्त याचे तीन हजार सातशे स्वार हे निगूनबख्ताला सोडून माझ्याकडे आले आहेत. आज्ञा असेल तर त्यांना बाळगोन. पण त्यांच्या पगाराच्या खर्चासाठी इस्लामगड (देवगड, नागपूर जवळ)खालील नागपूर आदि वीस महाल लावून देण्यात यावेत अशी विनंती आहे. बादशहांनी विनंती मान्य करून एक हजार स्वार नेमण्यात यावेत अशी आज्ञा केली.

मरहूम सैफुल्लाखान याचा मुलगा असदुल्ला व मरहूम अन्वरखान याचा मुलगा अब्दुल्ला हे माहुलीला बादशहाच्या निवासस्थानायोग्य जागा पाहून आले. ते म्हणाले, 'येथून माहुली साडेतीन कोस आहे.'

देवळी(राजस्थान)चा जमीनदार(राजा) प्रतापसिंग याने पुढील विनंती लिहून पाठविली : मला माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याजपाशी तैनात केले आहे व माझी नेमणूक खिरचीच्या ठाणेदारीवर करण्यात आली आहे. मी माझ्या तैनातीच्या जागी गेलो तर ठाण्याचे रक्षण होणार नाही. याशिवाय उदेपूरचा जमीनदार(राणा) अमरसिंग याचा हेतु माझ्या इलाख्यावर आक्रमण करण्याचा आहे. यावर काय आज्ञा?' बादशहांनी आज्ञा केली की, 'नेमणूक रद्द. तुम्ही आपला इलाखा सावधगिरीने सांभाळा.'

## पाच डिसेंबर १६९९

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. ते साडेतीन कोसाचा प्रवास करून कृष्णाकाठावरच्या माहुली मुक्कामी पोहोचले. बादशहाजादा मुहंमद आजम याने दूराज पक्षी (तीतर, चित्रपक्षी) नजर केले.

मुखलिसखान याने विनंती केली की : रूहुल्लाखान हे आज्ञेप्रमाणे हुजुरात आले आहेत.

त्यांच्याबरोबर असलेले हमीदुद्दीनखान बहादुर हे आज्ञेप्रमाणे पाईन विलायत (सातान्याहून पुण्याकडे जाणारा मार्ग) कडे गेले आहेत. आज्ञा झाली तर रूहुल्लाखान हे येऊन भेटतील. बादशहांनी परवानगी दिली. रूहुल्लाखान हा बादशहांना भेटला. बादशहांनी त्याला सातारगडबद्दल माहिती विचारली.

इंद्रापूरचा ठाणेदार मुगलखान याने लिहून पाठविले की : हलकट गनिमांच्या कुटुंबियाना व संबंधितांना धरले आहे. येथे ठाण्यात त्यांना ठेवणे शक्य नाही. ब्रम्हपुरीच्या तळावर त्यांना पाठवावे तर वाटेत गनिमांचा फार उच्छाद आहे. फतेहुल्लाखान याला आज्ञा व्हावी की दोन तीन दिवसात त्याने वरील माणसांना ब्रम्हपुरीकडे पाठवावे. बादशहांनी मुखलिसखान याला म्हटले, 'तुम्ही मुख्यप्रधान जुम्लतुल्मुल्क (असदखान) यांना ब्रम्हपुरीला लिहा. त्याने दोनशे स्वार व शंभर प्यादे पाठवून वरील कैद्यांना (ब्रम्हपुरीला) बोलावून घ्यावे.

काल रात्री बादशहांनी मुखलिसखान याला बोलावून खलबत केले. त्यांनी काही सूचना केल्या. नंतर त्यांनी रात्री मुखलिसखान याला बादशहाजादा कामबक्ष याच्या डेन्यावर पाठविले. मुखलिसखान तेथे जाऊन परत येऊन बादशहांना भेटला. यानंतर तो आपल्या डेन्यावर परत गेला.

तरबियतखान याने विनंती केली की : वसंतगडच्या वेढयात माझ्याबरोबर दोन हजार चारशे स्वार तैनात होते. सांप्रत सातारच्या वेढयात माझ्यापाशी पूर्वीप्रमाणेच तितकीच माणसे तैनात राहावी. बादशहांनी विनंती मान्य केली. पुढील माणसे तैनात करण्यात आली :–

मुनीमखान, बादशहाजादा आज्जम याचा बक्षी जलालुद्दीन व पाचशे स्वार, तुर्कताजखान याचे नजरबे 'वगैरे मोगल अनुयायी व शंभर गुर्जबर्दार, खटावचा ठाणेदार रामचंद (मयाजीच्या ऐवजी), राजा शाहू यांचे सैनिक.

दक्षिणच्या तोफखान्याचा दारोगा (अधिकारी) मन्सूरखान याने विनंती केली की : माझ्या खात्यात (दख्खनच्या) तोफखान्यात दोन हजार प्यादे कमी आहेत. आज्ञा झाली की, 'भरती करावे.'

कूच करताना बादशहांनी भास्करराव हरकारा याला विचारले, 'हाच ना सातारगड? आपल्या मोर्च्याच्या जागा कोणत्या बाजूला आहेत.' त्याने सांगितले, 'मोर्चे लहान डोंगराच्या जवळ आहेत.'

बादशहांनी आज्ञा केली की : वसंतगडचा उल्लेख किलीदे फतह (यशाची किल्ली) असा करण्यात यावा.

बादशहांनी सातारगडच्या किल्ल्याचा नकाशा मागवून घेऊन तो नजरेखालून घातला. बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा आज्जमशहा याचा डेरा (तंबू) कृष्णेच्या पलीकडच्या काठावर उभा करण्यात यावा. खुदाबंदाखान याने पण तिकडेच मुक्काम ठेवावा.

### सहा डिसेंबर १६९९

वसंतगडचा माजी किल्लेदार रतनराव याला खिलतीची वस्त्रे व दीड हजार स्वारांची मन्सब देण्यात आली. मसूरचा जमीनदार(देशमुख) महादजी (जगदाळे) याला तीनशेची मन्सब देण्यात आली. देवाल(?)चा जमीनदार शेख कासिम याला खिलतीची वस्त्रे व दोन मोहरा, सातार गडचे पाटील महनोजी(?) व हरीपंडित यांना एक मोहर व शाल, सापगावचा(?) देशपांडे निळोजी एक शाल, बाळाजी देशमुख चंदनगड, खिलतीची वस्त्रे, सातारगडचा देशमुख राणोजी याला खिलतीची वस्त्रे, तुकोजी(?) देशमुख खटाव याला खिलतीची वस्त्रे, निर्ली(?)चा देशमुख अमृतराव यास खिलतीची वस्त्रे, बालगाव(?)चा पाटील लोधजी याला शाल, अशी बक्षिसे देण्यात आली.

कैलासवासी राजा अनूपसिंग याचा मुलगा सरूपसिंग याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले : रामा (राजाराम)चे कुटुंबीय व संबंधित, याशिवाय जमीनदारांकडून घेतलेली जवाहीर, हत्ती इत्यादि खंडणी, ही सर्व विजापूर मुक्कामी माझ्या बरोबर ठेवून खान नुस्रत-जंग(जुल्फिकारखान) हा आज्ञेप्रमाणे (राजा) रामाच्या पाठलागावर तातडीने रवाना झाला आहे. आपली आज्ञा असेल तर मी हुजुरात सर्वांना घेऊन येतो. बादशहांनी आज्ञा केली की, 'वाटेवरील राहदार व ठाणेदार यांनी सरूपसिंग याला बदर्का (संरक्षक पथक) द्यावे असे हुकुम देण्यात यावेत.' बादशहा आज तरबियतखानाला म्हणाला, 'गुरूवारी जाऊन सातारगडला मोर्चे लावा. आज तोफा व रेहकले तेथे पोहोचवा.' तरबियतखानाने विनंती केली की : हशमाचा पगार फार थकला आहे. एक लाख रुपये देण्यात यावेत अशी बादशहांनी आज्ञा केली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : नरकवासी संताजीचा मुलगा राणोजी हा दोन हजार स्वारांचे सैन्य घेऊन सांगोल्यांच्या प्रदेशात संचार करीत आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'मतलबखान व फतेहुल्लाखान यांनी त्याचे पारिपत्य करावे म्हणून त्यांना पत्रे लिहिण्यात यावीत.'

### सात डिसेंबर १६९९

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले. मुखलिसखान व तरबियतखान यांना बादशहांनी आज्ञा केली की : तुम्ही आपली पथके घेऊन मोर्चे व दमदुमा (तोफा चढविण्यासाठी लाकडाचा उंच ओटा) यासाठी योग्य जागा पाहाण्यासाठी किल्ल्याकडे जा. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे बक्षीउलमुल्क मुखलिसखान, तरबियतखान, सियादतखान, मुनीमखान, जलालुद्दीन बक्षी ही मंडळी किल्ल्याकडे गेली.

बेलदारांचा दारोगा हीराचंद, कहारांचा दारोगा दूला, यांनी दमदमा तयार करण्यासाठी तरबियतखानाबरोबर जावे अशी आज्ञा झाली. दमदुम्यास लागणारी सामग्री करावल कोतवाल याने पुरवावी असा बादशहांनी हुकुम केला.

जुहरच्या नमाजाच्या वेळी बदशहाजादा कामबक्ष याने आपल्याकडे मुजऱ्यासाठी येत जावे अशी बादशहांनी आज्ञा केली. शहाजादा मुहंमद मुअज्जम बहादुरशहा यांनी

(काबुलहून)पत्र, बेदाणा व डाळिंबाच्या दोन करंड्या पाठविल्या होत्या. मुल्तफतखानाने त्या काल बादशहाच्या नजरेसमोर आणल्या.

**नऊ डिसेंबर १६९९**

आज बादशहा स्वार होऊन निघाले. कृष्णेच्या पात्राच्या मधोमध ते आले तसे त्यांनी एका कागदावर प्रार्थनेच्या ओळी लिहिल्या तो कागद त्यांनी नदीत टाकला. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान व रूहुल्लाखान हे आज्ञेप्रमाणे मोर्च्यावरून येऊन बादशहांना भेटले. बादशहांनी त्यांच्यापाशी किल्लयासंबंधी चौकशी केली. यानंतर बादशहांनी बादशहाजादा मुहंमद आज्मशहा आणि त्याची मुले यांना किल्लयाच्या पलीकडे त्यांचे मोर्चे होते तिकडे जाण्यास निरोप दिला. यानंतर सव्वाकोसाचा प्रवास करून ते आपल्या मुक्कामावर दाखल झाले.

काल रात्री तरबियतखान व मुनीमखान हे दोघे मोर्च्याच्या जागा व दमदमा हे पाहण्यासाठी गेले होते. ते परत आले. त्यांनी सातारा किल्ल्याचा नकाशा दुरुस्त करून आणला होता. तो त्यांनी बादशहांना दाखविला. ते बादशहांना म्हणाले, 'मोर्च्याला जागा आहे पण फार त्रासानेच मोर्चे कायम होऊ शकतील.' बादशहांनी किल्ल्याचा नकाशा पाहिला. ते म्हणाले, 'किल्ल्याच्या पलीकडे बादशहाजादा मुहंमद अज्मशहा यांनी स्वतःचे मोर्चे कायम केले आहेत. किल्ल्याच्या समोरच्या दरवाज्यासमोर तुमचे मोर्चे आहेत. ते तसेच पुढे न्या.'

बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हटले, 'तुम्ही हफ्त चौकी (बादशहाच्या खास चौकीवरील पथके) वरील पथके घेऊन जा आणि बादशाही मोर्चे कायम करा. त्याप्रमाणे मुखलिसखान, रूहुल्लाखान, खुदाबंदाखान, सियादतखान, व इखलासखान वगैरे वडेवडे अमीर उमराव हफ्त चौकीच्या(हफ्त म्हणजे सात) पथकांबरोबर गेले.

बादशहा हे उस्मान करावल याला म्हणाले, 'तुम्ही जाऊन तरबियतखान व मुनीमखान यांचे मोर्चे कोणकोणत्या बाजूने कायम करण्यात आले आहेत व किती पुढे गेले आहेत हे पाहून या.' त्याने पाहून परत येऊन पुढीलप्रमाणे माहिती दिली : मुनीमखानाचे मोर्चे जवळ पोहोचले आहेत. तरबियतखान याने मोठी तोफ टेकडीवर चढविली. तोफेतून एक गोळा किल्ल्याच्या बुरुजावर फेकण्यात आला. बाणदारांचे काही बाण किल्ल्यात पोहोचले. दिवसभर किल्ल्यातून गोळे येत होते. जवळ जवळ सत्तर गोळे किल्ल्यातून आले. एक वेलदार व एक तबरदार(तबर म्हणजे कुऱ्हाड, परशु) ठार झाले. बाकी परमेश्वराची कृपा(फजले इलाही) आहे.

हमीदुद्दीनखान बहादुर याने सर्जागड(वैराटगड, वाईपासून सहा मैल)घेतला होता. त्याच्या सोन्याच्या किल्ल्या त्याने पाठविल्या. त्याने लिहीले की : किल्ल्यातील लोकांनी दोन दिवस किल्ला लढविला. त्यानंतर बादशहांच्या भाग्याने किल्ला ताब्यात आला. बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.'

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'तुम्ही मतलबखान याला लिहा. त्याची पथके

फतेहुल्लाखानापाशी राहातील. फतेहुल्लाखान याने बादशाही छावणी आणि तळ (ब्रम्हपुरी) या मधील प्रदेशात जेथे योग्य वाटेल तेथे राहून चहुदिशेला गनिमांचे पारिपत्य करावे.'

## दहा डिसेंबर १६९९

बादशहाच्या आज्ञेने बादशहाजादा कामबक्ष हा बादशहाजादा मुहंमद आज्जम याला भेटून आला.

बादशहांनी आज्ञा केली की : गनिमांचे लोक किल्ल्यातून बाहेर येताना व बाहेरून किल्ल्यात जाताना आढळले तर त्यांचा वध करण्यात यावा. हे काम रूहुल्लाखान याने आपल्या मोर्च्याच्या जागेवरून (टेकडीवरून) उतरून करीत जावे. सुभे दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा याने आपल्या हशमाबरोबर रूहुल्लाखानाबरोबर जावे.

## अकरा डिसेंबर १६९९

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा हे मोर्च्यावरून आले व त्यांनी कचेरीत (अदालत) बादशहांना मुजरा केला. दोन घटिकानंतर बादशहांनी त्यांना मोर्च्यावर जाण्यासाठी निरोप देताना म्हटले, 'असेच मुजऱ्यासाठी नेहमी येत चला.'

हमीदुद्दीनखान बहादुर यास फर्मान व खिलतीची व वस्त्रे पाईन विलायतचा ठाणेदार नाहरखान यास एक खंजीर पाठविण्याची आज्ञा झाली. सर्जागड (वैराटगड) मध्ये जी सामग्री सापडेल तो जप्त करण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

भास्करराव हरकारा व जवाहरमल (बांधकाम तज्ञ) हे आज्ञेप्रमाणे किल्ला व बादशाहाच्या मोर्च्याच्या जागांचा नकाशा तयार करून घेऊन आले. तो त्यांनी बादशहांना दाखविला. बादशहांनी काल रात्री बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला बोलावून त्याला तो नकाशा दाखविला. बादशहा त्याला म्हणाले, 'उद्या तुम्ही मोर्च्यावर जाऊन मी सांगितल्याप्रमाणे करा.'

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : काल रात्री गनीम हे सातारा किल्ल्यातून बाहेर पडून मुनीमखानाच्या मोर्च्यावर चालून आले. मुनीमखान सावध होता. त्याने त्यांचे पारिपत्य केले. गनीम पळून किल्ल्यात परत गेले.

## बारा डिसेंबर १६९९

जुम्लतुल्मुल्क असदखान (मुख्यप्रधान) याने (ब्रम्हपुरीहून) वसंतगडच्या विजयाबद्दल चारशे अश्रफ्या नजर म्हणून पाठविल्या. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने त्या अश्रफ्या बादशहासमोर ठेवल्या.

बादशहांनी मुखलिसखान यास सांगितले, '(राजा) रामाचे कुटुंबीय व संबंधित (मुताल्लकान), व जमीनदारांनी दिलेली हत्ती, जवाहीर इत्यादींची खंडणी खानबहादुर नुस्रतजंग ही राव अनूपसिंग (बीकानेर) याचा मुलगा सरुपसिंग याजकडे सोपविली होती. ती बादशाही छावणीत घेऊन येण्यासाठी सरुपसिंगाला आज्ञा करण्यात आली होती. पण ती आज्ञा रद्द करण्यात येत आहे. सरुपसिंगाने त्या सर्वांना (माणसे व खंडणी) (ब्रम्हपुरीच्या) तळावर पोहोचवून स्वतः खान नुस्रतजंग याच्या फौजेत निघून जावे; असा हुकुम त्याच्याकडे पाठवा.'

तरबियतखानाने लिहून कळविले की : दमदमा तयार करण्यासाठी आठ हजार गोल (? पोती) पुरवावे असा हुकुम झाला होता. अद्याप गोल येऊन पोहोचले नाहीत. बादशहांनी आज्ञा केली की, 'बाजार(गंज)चा करोडी(अधिकारी) सय्यद इमामुद्दीन याने लागणारी सामग्री पाठवावी. खिदमतगारखान याने वसंतगडच्या विजयाबद्दल शंभर अश्रफ्या आणि एक विनंतीपत्र पाठविले होते. बादशहांनी त्या वस्तू नजरेखालून घातल्या.

### तेरा डिसेंबर १६९९

पुढील लोकांनी बादशहांना नजरा पेश केल्या : मुरीदखान व त्याचा मुलगा मुहंमद अहसन, कऱ्हाडचा ठाणेदार बिलालखान, घोरीखान आणि त्याचा मुलगा मुहंमद हुसेन, फरहादखान, इस्माईलचा मुलगा समंदर.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : कऱ्हाड परगण्यातील मौजे काळेगाव हे मन्सूरखान याने कौल देऊन आबाद केले होते. सिद्दी फरहादखान याने ते लुटले. गुरे ढोरे धरली. आणि चार बायकांना स्वतःच्या घरात घातले आहे. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम याने त्याला हरप्रकारे मना केले. पण तो मानीत नाही. काय आज्ञा? यावर बादशहांनी आज्ञा केली की, 'फरहादखान याची एक हजार जात व चारशे स्वार ही मन्सब शंभर स्वारांनी कमी करण्यात यावी. मुखलिसखान याने गुरेढोरे सोडवून मालकांना परत द्यावी.'

फतेहुल्लाखान याने लिहून विनंती केली : मी सामग्री सरंजाम घेऊन हुजुरात येत होतो. मुखलिसखानाच्या द्वारे हुकुम मिळाला की मी तळ (ब्रह्मपुरी) व बादशाही छावणी यांच्या दरम्यान रहमतपूर येथे राहावे. त्याप्रमाणे मी रहमतपूरला राहिलो आहे. पण एकदा आपल्या चरणाचे दर्शन घ्यावे आणि मग आज्ञा होईल तिकडे जावे अशी इच्छा आहे. 'भेटीस या', म्हणून बादशहांनी आज्ञा केली.

हमीदुद्दीनखान बहादुर याच्या लिहिण्यावरून बादशहांनी नाहरखान याचा मुलगा मुहंमद इब्राहीम याची वैराट उर्फ सर्जागड या किल्लयावर किल्लेदार म्हणून नेमणूक केली. त्याची मन्सब वाढविण्यात आली व त्याला कोदाळ(गोंदवले) परगणा जहागीर (सरंजाम) म्हणून देण्यात आला. त्याच्याबरोबर दीडशे हशम, दोन ढाणदार, दोन शक्का(पाणी आणणारे) व दोन गोलंदाज देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

बादशहांनी पुढीलप्रमाणे हुकुम दिले : तरबियतखान व दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान यांनी ताबडतोब तीन हजार हशम('यादे) भरती करावे. शंभर स्वार हे तरबियतखानाबरोबर मोर्च्यात तैनात करण्यात यावेत.

रुहुल्लाखानाने परळीच्या दिशेने ठाणे बसविले होते. बेलदारांचा दारोगा हीराचंद याने तेथे एक कच्ची गढी बांधून द्यावी. रुस्तमबेग हा तीनशेचा मन्सबदार त्याच्या बरोबर राहावा.

नायबकोतवाल मुहंमद अमीनखान याने अमीरउमराव यांचे बेलदार, शक्का वगैरेंना बादशाही मोर्च्यात पोहोचवावे. इंदापूरचा ठाणेदार मुगलखान याने लिहून पुढीलप्रमाणे

विनंती केली : भानोली(भालवणी?)चा परगणा बहादुरखानाच्या जहागिरीत आहे. पण परगण्यात जहागिरदाराची पथके अजिबात नाहीत. जाण्यायेण्याचा मार्ग या परगण्यातून आहे. जहागिरदाराच्या कारभाऱ्याला याबद्दल ताकीद देण्यात यावी.

बादशहांनी आज्ञा केली की : बहादुरखानाच्या वकिलाकडून मुचलका घ्या. त्याने जहागिरीत पथक उभे केले पाहिजे. नाहीतर जहागीर काढून घेण्यात येईल.

दुसरी विनंती अशी की : परगणे म्हसवड कोंदळ(गोंदवले?) येथे ठाणे स्थापन करून तेथे कुणाची तरी नेमणूक झाली पाहिजे. बादशहांनी आज्ञा केली की, 'बुध पाचगावचा ठाणेदार बुधाजी(पदाजी?) याच्याकडे ते ठाणे लावून द्यावे. बुदाजी(पदाजी?)ला दोन हजार पाचशे जात व एकहजार एकशे स्वार अशी मन्सब होती.

तरबियतखानाने विनंती केली : मोर्चे किल्ल्याच्या जवळ पोहोचविले आहेत. पण किल्ल्यातून दगडांचा सतत वर्षाव होत असतो यामुळे तिकडे सरकता येत नाही. मोर्च्याच्या सुरक्षिततेसाठी सकफ बंदी(सकफ म्हणजे छत. मोर्च्यातून सरकणाऱ्या लोकांसाठी लाकडी छताची योजना) करावी लागणार. त्यासाठी लाकूड हवे. लवकर लाकूड मिळाले तर मोर्चे किल्ल्यापर्यंत नेईन.

बादशहांनी विनंती मान्य करून आज्ञा केली की : तोफखान्याचा मुशरफ (हिशेब अधिकारी) कुंजमन याने दोनशे लाकूडतोडे बरोबर घेऊन जंगलात जाऊन लाकडे तोडून आणावी. दोन हजार उंट त्याच्या बरोबर देण्यात यावेत अशीही आज्ञा झाली.

मुनीमखान याने मोर्च्यातून विनंती लिहून पाठविली की : माझ्याजवळ पथके नाहीत. माझा मुलगा मुहंमद काजम हा आपल्या पथकासहित हमीदुद्दीनखान बहादुर याजबरोबर आहे. त्याला हुजुरात बोलवावे. विनंती मान्य करण्यात आली.

## चवदा डिसेंबर १६९९

बादशहा सकाळी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'सातारा किल्ल्याच्या भोवती साखळ्यांनी(जरीब) मोजणी करून त्याचा घेर व उंची किती हे मला कळवा.

पुढील माणसे आज येऊन बादशहांना भेटली : (१)मतलबखान हा तोफखान्याची आवश्यक सामग्री घेऊन ब्रम्हपुरीहून आला, (२) ख्वाजा मुहरमखान(बागांचा अधिकारी) हा औरंगाबादेहून येऊन बादशहांना भेटला, (३)उंटांच्या कारखान्याचा मुख्य खिदमतगार खान, (४)मतलबखानाचा मुलगा असदुल्ला, (५)मतलबखानाचा दुसरा मुलगा मीर अबू तालिब, (६) मन्सूरखान याची दोन मुले मुहंमद काजम, (७) मुहंमद जफर (ही कऱ्हाडहून आली), (८) मरहुम किफायतखान याचा मुलगा मुहंमद इब्राहीम, (९) मुहंमद इब्राहीमचा मुलगा मुहंमद हुसेन. मुहंमद हुसेनची नेमणूक मलाबाद वज्रवाल जवळ, (जत तालुका)च्या ठाणेदारीवर करण्यात येऊन त्याला रातोरात त्या ठाण्यावर पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

अब्दुऱ्रहमान हरकारा याचा भाचा भाऊशंकर हा मुसलमान झाला. बादशहांनी त्याला खिलतीची वस्त्रे दिली आणि त्याचे नाव अब्दुल्ला ठेवले.

वली मुहंमद कौल याला दोन हजार स्वारांच्या (पगार) खजिन्याचा अधिकारी म्हणून नेमण्यात आले.

मुरीदखान याला खिलतीची वस्त्रे देऊन तळावर (ब्रह्मपुरी) जाण्यास निरोप द्यावा अशी आज्ञा झाली.

सातारा किल्लयाच्या मोर्च्यावरून बातमी कळली की : मुहंमद जहीरूद्दीन वगैरे दोन सैनिक व अधिकारी रात्री जखमी झाले आहेत. त्यांना एक महिन्याचा पगार बक्षीस म्हणून द्यावा अशी आज्ञा झाली.

हमीदुद्दीनखान बहादुर याजकडे फर्मान व खिलतीची वस्त्रे व नाहरखान याजकडे कटयार या वस्तू घेऊन ख्वाजा दौलत गेला होता. तो त्या वस्तू पोहोचवून परत आला. मुखलिसखान याने विनंती केली की : फतेहुल्लाखान हा छावणीजवळ आला आहे. त्याला आत येण्याची परवानगी देण्यात आली.

यारअलीबेग याने पुढीलप्रमाणे विनंती केली : मकाजीचा मुलगा मयाजी (मबाजी, सयाजी?) याचे म्हणणे आहे की, माझी पाचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब काढून घेण्यात आली आहे. मी मुसलमान होतो. माझी मन्सब बहाल करण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली. मयाजीचे नांव शेख नेकनाम ठेवावे व त्याला खिलतीची वस्त्रे द्यावी अशी बादशहाने आज्ञा केली.

दोलापूर (डफळापूर, जत तालुका)चा ठाणेदार अमानुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती अर्ज पाठविला.

'मला अडीचशे स्वार व चारशे प्यादे, स्वाराला प्रत्येकी तीस रुपये व प्याद्याला प्रत्येकी पाच रुपये या पगारावर, हे भरती करण्याची परवानगी द्यावी. त्यांच्या खर्चाबद्दल जत व अथणी हे परगणे लावून देण्यात यावेत. असे झाल्यास मी या जिल्ह्याचा बंदोबस्त नीट करीन आणि गनिमांचे पारिपत्य करीन.' बादशहांनी विनंती मान्य केली. फतेहुल्ला-खानाच्या ऐवजी तळापासून (ब्रम्हपुरी) बादशाही छावणीपर्यंतच्या रक्षणाचे काम अमानुल्ला-खानाला सांगण्यात आले.

आजमनगर (बेळगांव)ची नायबदिवाणी मुहंमद तकी याला बदलून हाजी समी याचा मुलगा मुहंमद समी याला देण्यात आली.

मुखलिसखान हा सातारा किल्ल्याभोवती गस्त करून आला. त्याने बादशहांना तेथील परिस्थितीची माहिती करून दिली.

अथणीवरून बदललेला ठाणेदार घोरीखान याला कऱ्हाडच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले. त्याची मन्सब वाढविण्यात आली. मुद्दाम गुर्जबर्दार देऊन त्याला कऱ्हाडकडे घेऊन जावे अशी आज्ञा झाली.

### पंधरा डिसेंबर १६९९

बादशहांनी काल रात्री मुखलिसखानाला बोलावून त्याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली :

(१) करावलखान याने फराशखान्याचा मुशरफ (अधिकारी) शरफुद्दीन याजबरोबर जावे.
(२) तरबियतखानाचा तळ आहे तेथे दोन टेकडयांच्या मध्ये मोर्च्याच्या मागेच माझ्या निवासाची जागा लवकर नीट करण्यात यावी. हे करून मुखलिसखानाने रात्री परत यावे. निवासाच्या जागेची लांबी रुंदी किती राहील हे मोजून पाहून यावे.
(३) कही (रसद, घासदाणा, लाकूडफाटा इत्यादी) आणण्यासाठी एक दिवस बक्षी-उलमुल्क बहरामंदखान, एक दिवस बक्षीउल्मुल्क मुखलिसखान व एक दिवस हमीदुद्दीनखान बहादुर यांनी पाळी पाळीने जावे.
(४) हमीदुद्दीनखान बहादुर याला आपली पथके घेऊन हुजुरात येण्यासाठी लिहावे.
(५) बादशहाजादा मुहंमद आजम याची पथके ही कही आणण्यासाठी पाठविण्यात यावी.

## सोळा डिसेंबर १६९९

आज सकाळी बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : काल मध्यरात्री सातारा किल्लयातून गनीम बाहेर पडले. ते मुनीमखानाच्या मोर्च्यावर चालून आले. दोन घटिका युद्ध झाले. मुनीमखान, शबखीखान, सटवाजी डफळे याचा मुलगा बाजी व कटघरांतील (मोर्च्याचे) सैनिक हे ठाण मांडून लढले. गनिमांची बरीच माणसे ठार अगर जखमी झाली. मुनीमखान याला दगडाचा मार बसला आहे. त्याच्या बरोबरची अनेक माणसे जखमी झाली आहेत. ही बातमी ऐकून बादशहा म्हणाले, 'आफरीन बाद (धन्य धन्य), सेवा मान्य झाली. मजुरा झाला.' बादशहांनी आज्ञा केली की : हकीम इसहाक याचा मुलगा हकीम इनायतुल्ला याने जाऊन जखमी लोकांवर उपचार करावा.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : गनिमांचा बेत असा आहे की, त्यांचे दोन हजार पायदळ सैन्य बरोबर देऊन तोफा वगैरे परळीहून आणावे व बादशहाजादा आज्जम याच्या मोर्च्याच्या बाजूने साताराकिल्लयावर पोहोचवावे. बादशहांनी आज्ञा केली की, 'गनिमांची वाट बंद करण्यात यावी. त्यांना किल्लयावर जाऊ देऊ नये. आणि (वाटेतच) त्यांचा संहार करावा.'

## सतरा डिसेंबर १६९९

आज सकाळी फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन याने कळविले की : आज्ञेप्रमाणे मी किल्ल्याच्या पायथ्याशी तरबियतखान याच्या मोर्च्याच्या मागे आपल्यासाठी शामियाना व कनाती उभ्या केल्या आहेत. बादशहा पाच घटिका दिवस वर आला असता तख्ते रवांवर स्वार झाले. ते शामियान्याजवळ न उतरता टेकड्यांच्या मध्ये उतरले. त्यांनी दुर्बिणीने सातान्याचा किल्ला व मोर्चे यांची पाहणी केली. त्यांनी बादशहाजादा मुहंमद आज्जम शहा, खुदा बंदाखान, व करावलखान यांच्याकडे किल्ल्यासंबंधी माहिती विचारली.

यावेळी किल्ल्यातून गनीम हे तोफांचा मारा करीत होते. बादशहाजादा मुहंमद आज्जम याने बादशहांना विनंती केली की : या ठिकाणी किल्ल्यावरून गोळे येत आहेत. थोडे अंतरावर आपण उभे राहावे. बादशहा एक घटिका तेथे होते. त्यानंतर ते तेथून

परतले. त्यांनी शहाजादा आज्जम याला स्वतःच्या मोर्च्याकडे परतण्याची परवानगी दिली. जाऊन येऊन सव्वाकोसाचा प्रवास करून बादशहा आपल्या निवासस्थानावर परतले. वाटेत फतेहुल्लाखान हा बादशहांना भेटला. त्याने दोन विलायती बंदुका व दहा अश्रफया नजर केल्या. बादशहांनी नजर माफ केली. व बंदुका इखलासखान आख्ताबेगी याच्या हवाली केल्या. बादशहा मुल्तफतखानाला म्हणाले, 'फतेहुल्लाखानाला म्हणावे, "सातारा किल्ल्याच्या भोवती गस्त घालीत रहा आणि गनिमांना किल्ल्यात जाऊ देऊ नकोस." '

## अठरा डिसेंबर १६९९

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव याने आपल्या सैन्याच्या तीन तुकडया केल्या. तो तळापाशी (ब्रह्मपुरीच्या) संचार करीत आहे. त्याने अनेक ठिकाणी आक्रमण केले आहे. हे ऐकून जुम्लतुल्मुल्क असदखान (मुख्यप्रधान व ब्रह्मपुरीच्या तळाचा रक्षक) याने आपल्या सैन्यानिशी गनिमांशी युद्ध केले. गनिमांपैकी अनेकजण ठार झाले. पराजय पाऊन गनीम पळून गेले. या युद्धात पुढील लोकांनी उत्कृष्ट कामगिरी बजाविली. (१) नुस्रतखान (२) फतेहुल्लाखान (३) कीरतसिंग कछवाहा याचा नातू जसपतसिंग (४) उदयपूरचा जमीनदार (राणा) अमरसिंह याचा सरदार पृथ्वीसिंह.

बादशहांनी हा वृत्तांत वाचला. तो त्यांनी बक्षीउलमुल्क बहरामंदखान याजकडे पाठविला. बादशहांनी सियादतखान याला हुजुरात बोलाविले. बादशहा त्याला म्हणाले, 'चीनकुलीजखानाकडे फर्मान पाठवा. आदिलबेग गुर्जबर्दार याने ते फर्मान घेऊन जावे आणि चीनकुलीजखान यास तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचवून यावे.'

बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा आज्जम, शहाजादे, व अमीर उमराव यांनी त्यांच्याकडे असलेले एक हजार चारशेवीस उंट, मोर्च्याला लागणारे लाकूड आणण्यासाठी कुंजमन याजकडे पाठवावे. दर हजारी मन्सबदारामागे दहा उंट असा हिशेब करण्यात आला.

बादशहांना कळविण्यात आले की : हलकट गनिमांनी अबुल्खैर याचे ठाणे आगरासोया (?) याला वेढा घातला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : मुद्दाम गुर्जबर्दार नेमून त्या भागातून फौजदार व ठाणेदार यांना अबुल्खैर याच्या मदतीस पाठविण्यात यावे.

चांभारगोंद्याचा ठाणेदार ख्वाजा खुदायारखान याने पुढीलप्रमाणे कळविले : गनिमांचे शंकर व इतर सरदार हे दहा हजाराचे सैन्य घेऊन चालून आले. त्यांनी चांभारगोंद्याला वेढा घातला. हे कळताच मी सैन्य जमवून चालून गेलो. सत्तावीस जमादिसानी रोजी (दहा डिसेंबर १६९९) युद्ध झाले. गनिमांपैकी अनेकजण ठार झाले.

सय्यद मुहंमद हा चाकरीसाठी मध्य आशियातून आला. बादशहांना भेटून त्याने एक धनुष्य नजर केले. मुखलिसखान व सियादतखान वगैरे अमीर कही आणण्यासाठी गेले.

पुढील मंडळींना बक्षिसे देण्यात आली : (१) कऱ्हाडचा फौजदार घोरीखान (२) मरहूम उमरखान याची मुले मुहंमद अहसन (३) मुहंमद उस्मान (४) नुकताच मुसलमान झालेला शेख नेकनाम (मकाजीचा मुलगा मयाजी).

मरहूम किनाअतखान याचा मुलगा मुहंमद इब्राहीम याने इनायतुल्लाखानाबरोबर (इनायतुल्लाने पुढे औरंगजेबाची फर्माने एकत्रित केली) असावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, मतलबखान व खुदाबंदाखान वगैरे अमीर पथके घेऊन कही आणण्यासाठी गेले.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेचा दिवाण रिजातलबखान, त्याची मुले मुहंमद अली व मुहंमद बाकर, रूहूल्लाखानाचे सहकारी सय्यदखान, सय्यद याकूब व सय्यद रूस्तम अली हे तिघे जखमेतून बरे झाले होते. वरील मंडळी येऊन बादशहाला भेटली.

तरबियतखान याने येसाजी (असोजी ?) याला चार हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब मिळावी म्हणून विनंती केली होती. बादशहांनी आज्ञा केली की : तरबियतखानाने सांगितलेली कामगिरी येसाजीने (?) पार पाडल्यास त्याला तनखा जहागीर (वरीलप्रमाणे) देण्यात यावी.

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार सैफुद्दीनखान, सुभे औरंगाबादमध्ये तैनात असलेला सय्यद अलीखान, आवजी ओबळराव यांची पत्रे आली. ती बादशहासमोर ठेवण्यात आली.

## एकोणीस डिसेंबर १६९९

काल संध्याकाळी बादशहांना कळविण्यात आले की : हलकट गनिमांची पथके बादशाही छावणीपासून तीन कोसावर आली. त्यांनी वंजाऱ्यांवर हल्ला करून त्यांची गुरेढोरे पकडली. हे ऐकून बादशहांनी गनिमांच्या पारिपत्यासाठी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, फतेहुल्लाखान, मतलबखान, खुदाबंदाखान वगैरेंना नेमले. ती मंडळी गनिमांच्या पाठलागावर तातडीने निघाली. फतेहुल्लाखान हा रहमतपुरापर्यंत गेला. गनीम पळून गेले.

काल रात्री बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला बोलाविले आणि त्याला पुढीलप्रमाणे सूचना दिल्या :

(१) मुहंमद अमीनखान, सियादतखान व फतेहुल्लाखान यांनी आपल्या पथकांसहित रात्री बादशहाच्या छावणीभोवती गस्त घालीत राहावे.

(२) रशीदखान व मुहंमद अली यांनी हे काम बरोबर होत आहे की नाही हे पाहात जावे.

(३) बादशहाजादा आज्जम यांचा बक्षी जलालुद्दीन याने आज्जमच्या छावणीभोवती अशीच गस्त घालावी.

(४) आदिलखान याने डावीकडे करावलखान याने दाखविलेल्या जागेत तळ द्यावा. मरहूम अब्दुर्रहीमखान याचा मुलगा मीर नेमतखान याला मोर्च्याचा वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

बादशहांनी इखलासखान आख्ताबेगी याला बोलावून सांगितले, 'बक्षीउल्मुल्क

बहरामंदखान हे गनिमांच्या पारिपत्यासाठी गेले आहेत. ते परत येईपर्यंत त्यांच्या गोटाची काळजी घ्या.'

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : नाहरखानाचा मुलगा घोरीखान हा आपल्या नेमणुकीच्या जागेकडे, कऱ्हाडच्या फौजदारीचे, काम सांभाळण्यासाठी निघाला होता. तो रहमतपूर व मसूर यांच्या दरम्यान पोहोचला तसे गनिमांचे तीन हजार सैन्य त्याच्यावर चालून आले. घोरीखानाने त्यांच्याशी युद्ध केले. गनिमांचे अनेक लोक ठार झाले. घोरीखान हा जखमी होऊन जमिनीवर पडला. गनीम त्याला उचलून घेऊन गेले. बादशहांनी आज्ञा केली की, 'हमीदुद्दीनखान बहादुर यांनी गनिमांचे पारिपत्य करावे. घोरीखानाची मन्सब पूर्ववत बहाल आहे असे समजण्यात येईल.'

मुनीमखानाने मुखलिसखानाच्या द्वारे विनंती केली की : माझा मुलगा मुहंमद काजम याला अदालतच्या दारोगागिरीवर नायब म्हणून नेमण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली. दुसरी विनंती की माझ्या तैनातीत असलेले नसरी वगैरे इसम यांनी मोर्च्यात उत्कृष्ट कामगिरी बजाविली आहे. त्यांना त्यांच्या प्रांतात जहागिरी देण्यात याव्यात. यावर इनायतुल्लाखान याने चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली.

फतेहुल्लाखान याने मुल्तफतखानाच्या द्वारे विनंती केली की : माझे अडीचशे मोगल मन्सबदार इतरांच्या पथकात तैनात आहेत. ते माझ्याकडे लावून देण्यात यावेत. विनंती मान्य करण्यात आली.

तरबियतखानाने विनंती पाठविली की : सातारगडच्या बुरुजांच्या मधोमध मी दमदुमा तयार करू इच्छितो. सामानाची ने–आण करण्यासाठी तीनशे बैल हवे आहेत. बाजारचा अधिकारी सय्यद इमामुद्दीन याने वरीलप्रमाणे व्यवस्था करावी अशी आज्ञा झाली.

फतेहुल्लाखान हा आज्ञेप्रमाणे कचेरीत येऊन बादशहांना भेटला. त्याने मुजरा केला. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला. तुमची सेवा मान्य झाली.' फतेहुल्लाचा मुलगा फकीरुल्ला हाहि बादशहाला भेटला. त्याने एक मोहर नजर केली.

मरहूम खानजमान फतेहजंग याचा मुलगा व पन्हाळगड भागाचा फौजदार अब्दुललतीफ याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : या भागात नरकवासी संताजीचा मुलगा परसोजी (राणोजी का पिराजी ?) हा मोठे सैन्य घेऊन आला. त्याने हमदोनी (हातकणंगले?) च्या ठाण्याला वेढा घातला. माझ्याबरोबर तो युद्ध करीत आहे. माझ्याबरोबर सैन्य फार थोडे आहे. आशा आहे की मुफ्तखरखान (मिरजेचा फौजदार व किल्लेदार), निसारखान व हमीदुद्दीनखान यांना माझ्या कुमकेस येण्याची आज्ञा होईल. नाहीतर अन्वरखान जसा मारला गेला तसाच मीहि मारला जाईन. मुखलिसखान याने चौकशी करून कळवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

परापावल(बारामावळ)चा जमीनदार खंडोजी याने विनंती केली की : मला कऱ्हाडची ठाणेदारी देण्यात यावी. मी गनिमांचे पारिपत्य करतो. बादशहांनी यावर काही हुकुम दिले (चीजे हुकुम सादर शुद).

**वीस डिसेंबर १६९९**

बादशहांनी आज्ञा केली की : खुस्रौखान याने दौलतखान्याच्या भोवती (बादशहाचे निवासस्थान) गस्त घालीत राहावे. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने कही आणण्यासाठी जावे. मुखलिसखान याने बादशाही छावणीभोवती आपल्या पथकासहित गस्त घालीत असावे.

पन्हाळगड भागाचा फौजदार अब्दुल्लतीफ याचा बादशाही छावणीतील वकील याने विनंती केली की : अब्दुल्लतीफ हा आपल्या कुटुंबियांना आणण्यासाठी मुर्तजाबाद मिरजेला चालला होता. गनिमांनी वाटेत त्याला घेरले आहे. लवकर मदत पाठविली नाही, तर मरून जाईल. बादशहा म्हणाले, 'माझ्या आज्ञेशिवाय तो (मिरजेकडे) गेलाच कशाला?'

मुहंमद अमीनखान व सियादतखान यांनी विनंती केली की : रात्रीच्यावेळी बादशाही लष्कराभोवती गस्त घालीत जावे अशी आम्हाला आज्ञा झाली आहे. पण बादशाही सैन्य पांगले आहे. कुणाची तरी नेमणूक करून माणसे एकत्र आणावी (मिसल बंदी करावी). बादशहांनी आज्ञा केली की, 'मीर हसन तनबख्शी (तनख्याचा बक्षी) याने शहागंज (बाजार) अहदी (शिलेदार सैनिक) यांना कोतवाली चबुतऱ्याच्या मागे व छावणीतील पांगलेल्या लोकांना जवळ आणावे.'

खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या सैन्याचा अधिकारी मुहंमद तालिब, मरहूम सय्यद यूसफखान याचा जावई सय्यद पिसर हे येऊन बादशहांना भेटले. बहरामंदखानाने विनंती केली की : मी कही आणण्यासाठी जात आहे. खुदाबंदाखान याने कहीच्या पथकाचे रक्षण करावे. विनंती मान्य झाली व खुदाबंदाखानाला पाठविण्यात आले.

बादशहांनी आज्ञा केली की : तीनशे स्वारांना सफशिकनखान करावल याच्या नेतृत्वाखाली डाव्या फळीवर तैनात करण्यात यावे.

**एकवीस डिसेंबर १६९९**

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : हमीदुद्दीनखान बहादुर हा मसूरच्या ठाण्याला पोहोचला. धनाजी जाधव व बहिर्जी (चुकून पांढरे लिहिले आहे) इत्यादी मराठे सरदार हे दहा हजार सैन्य घेऊन कऱ्हाडजवळ कृष्णेच्या पलीकडे पोहोचले. त्यांनी आपले जड सामान व बुणगे पन्हाळगडाकडे पाठविले. हमीदुद्दीनखान बहादुराशी युद्ध करावे असा त्यांचा बेत होता. हे ऐकून हमीदुद्दीनखान याने आपले बुणगे मसूर येथे ठेवले व तो गनिमांशी लढण्यासाठी रवाना झाला. यावेळी मराठे गनीम व हमीदुद्दीन-खान यांच्यामध्ये तीन कोसांचे अंतर आहे. आज युद्ध होईल.

बादशहांनी मुखलिसखानाला म्हटले, 'मतलबखान याने खास चौकीचे सैनिक बरोबर घ्यावे. त्याने व बुदाजी (पदाजी ?; ठाणेदार, बुध पाचगाव) याने रातोरात हमीदुद्दीनखानाला जाऊन मिळावे. खटावचा ठाणेदार रामचंद व मसूरचा मयाजी (मंबाजी) यांनी त्वरेने हमीदुद्दीनखान याच्या फौजेत दाखल व्हावे.

फतेहुल्लाखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले की, 'हा राहदारी (मार्गरक्षण)चे काम चांगले करतो.' फतेहुल्लाखानाने विनंती केली की : माझ्या पथकातील लोकांचा पगार फार थकला आहे. पगाराची रक्कम मिळावी म्हणजे आज्ञा होईल तेथे जाऊन कामगिरी बजावीन. पगाराची बाकी किती आहे चौकशी करून देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : मुहंमद अमीनखान व सियादतखान यांच्याबरोबर नगारे, कर्णे, सरब, दारू(बारूद) बाण व माहताब्या या देण्यात याव्या. बादशहांनी आज्ञा केली की : बंदूकिच्या पथकांनी छावणीभोवती गस्त घालावी म्हणजे कहीसाठी स्वारांना पाठविता येईल. सफशिकनखान परत येईपर्यंत इखलासखान आख्ताबेगी याने लष्कराभोवती गस्त घालीत असावे.

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याच्या विनंतीप्रमाणे अब्दुलरसूल वगैरे दोन इसम यांची मन्सब वाढविण्यात आली. हे घोरीखान मरहूम याचे नातू. अब्दुलरसूल व बहादुर(सय्यदुस्सयदाद याचा मुलगा) यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

(ब्रह्मपुरीच्या)तळाच्या रक्षणासाठी बेदारबख्त याला, (राजा) रामाच्या पाठलागासाठी खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान) याला आणि ब्रह्मपुरीपासून सत्तर कोस पर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्यासाठी चीनकुलीजखान याला पत्रे पाठविण्यात आली.

मरहूम खानजहान याचा जुना नोकर व नंतर मामूरखान याच्या पदरी असलेला मीर वली हा बादशहांना भेटला. त्याला मन्सब देण्यात आली. सफशिकनखानाचा भाचा मीर फैजुल्ला हा सफशिकनखान याचे कुटुंबीय आणण्यासाठी माळव्याला गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

मुनीमखानाने लिहून पाठविले की : ठिकठिकाणच्या किल्लेदारांनी पाठविलेली माणसे, कहार, तबरदार (कुऱ्हाडी धारण करणारे), भिस्ती वगैरे मोर्च्यात उत्कृष्ट कामगिरी बजावीत आहेत. पण त्यांना पगारबाकी न मिळाल्याने ते त्रस्त आहेत. त्यांचा पगार देण्यासाठी कुणालातरी नेमण्यात यावे. पगारबाकी देण्यात यावी अशी आज्ञा देण्यात आली.

अतव्याचा(माळवा, सिरोंजच्या उत्तरेस) फौजदार मीर अकलखान याने पुढीलप्रमाणे विनंतीपत्र पाठविले : या प्रांतात कामे पुष्कळ पडली आहेत. माझ्यापाशी सामग्री फार थोडी आहे. शिबंदीसाठी रकम मान्य व्हावी. अकलखान याला मन्सब दीड हजार जात व दीड हजार स्वार(दुघोडी), एक कोटी दाम(सुमारे एक लाख रुपये,) एक हजार स्वार व एक हजार प्यादे असा सरंजाम होता. एक हजार स्वार व एक हजार पायदळ अशी त्याची शिबंदी वाढविण्यात आली. मात्र बादशहांनी अट घातली की छत्रसाल(सुप्रसिद्ध बुंदेला वीर) याचे पारिपत्य करावे. अकलखानाचा मुलगा फकीर अली याला दोनशेची मन्सब देण्यात आली.

**बावीस डिसेंबर १६९९**

सकाळी हरकाऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले : हमीदुद्दीनखान बहादुर याने आपले बुणगे मसूर येथे ठेवले, व तो स्वतः कऱ्हाडला जाऊन धनाजी जाधव वगैरे सरदारांवर

चालून गेला. युद्ध झाले. उभय पक्षातील अनेक माणसे ठार अगर जखमी झाली. गनिमांचे सैन्य मोठे आहे. ते (आमच्या) सैन्याभोवती चहूकडून घिरट्या घालीत युद्ध करीत आहेत. खटावचा ठाणेदार रामचंद व मसूरचा ठाणेदार मयाजी (मंबाजी) हे हमीदुद्दीनखानाला येऊन मिळाले आहेत. पण आमच्या मदतीला आणखी सैन्य आले तर बरे होईल.

बादशहांनी मतलबखानाला बोलावून पुढीलप्रमाणे आज्ञा केली : फतेहुल्लाखान व बहरामंदखान यांनी हमीदुद्दीनखानाच्या मदतीला जावे. बादशहांना कळविण्यात आले की : ते दोघे बादशाही छावणीभोवती गस्त घालण्यासाठी गेले आहेत. आज्ञा झाली की : मन्सूर कौल व फकीरुल्ला यांनी जाऊन त्यांना तातडीने हमीदुद्दीनखानाकडे रवाना करून यावे. फतेहुल्लाखानाच्या सैनिकांच्या पगारबाकीसाठी म्हणून दहा हजार अश्रफ्या महालातील खजिन्यातून धाव्या अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : दोन गुर्जबर्दार यांनी जाऊन शहाजादा बेदारबख्त यास धनाजी जाधवाच्या पारिपत्यासाठी मसुर व कऱ्हाड या भागात घेऊन यावे. त्याचप्रमाणे खानबहादुर नुस्रतजंग याने धनाजी जाधवाच्या पारिपत्यासाठी रहमतपूर व मसूर या भागात यावे म्हणून आज्ञापत्रे व माणसे रवाना करण्यात आली.

## तेवीस डिसेंबर १६९९

सफशिकनखान मीर तुजक (दरबारचा व्यवस्थापक) अव्वल हा आजारातून बरा होऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले, 'वाहवा, आफरीन बाद. हकीम सादक याने इलाज छान केला.'

मुखलिसखान याने विनंती केली की : आज्जमगड (पुरंदर) व लोहगड येथील हशमाच्या पगाराचे म्हणून एक लाख चार हजार रुपये रवाना होत आहेत. त्यांच्या बदर्क्यासंबंधी (संरक्षक पथक) काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'तूर्त स्थगित करा.'

बादशहांनी ख्वाजा मुहरमखान याला रहमतपूर येथील बागांची व्यवस्था पाहाण्यासाठी रहमतपूरला रवाना केले. त्याच्याबरोबर वीस बंदूकची तैनात करण्यात आले.

बादशहांनी आज्ञा केली की : पाच माणसे शहाजादे आज्जम यांच्या मोर्च्यावर नेमा. कोण कोण काय काय कामगिरी बजावीत आहे हे मला लवकर कळत गेले पाहिजे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : या (रजब) महिन्याच्या दहा तारखेस (बावीस डिसेंबर १६९९) धनाजी जाधव वगैरे सरदारांचे हमीदुद्दीनखानाबरोबर युद्ध झाले. मराठ्यांचा एक सरदार दादो मल्हार हा बंदुकीची गोळी लागून ठार झाला. मराठे गनिमांपैकी अनेकांना नरकात पाठविण्यात आले (मारण्यात आले). नाहरखानाचा मुलगा घोरीखान हा मराठ्यांच्या कैदेत होता. त्याची सुटका करण्यात आली. हमीदुद्दीनखान बहादुर हा मराठ्यांशी युद्ध करीत करीत मसूरच्या ठाण्याला पोहोचला. मोगलांचे अनेक लोक जखमी झाले. बक्षीउल्मुल्क बहरामदंखान व त्याची पथके कुमकेस येणार होती ती अद्याप येऊन पोहोचली नाहीत.

बादशहांनी ख्वाजा दौलत महली याला बहरामंदखानाच्या नावे हुकुम देऊन पाठविले. बहरामंदखानाने ससैन्य ताबडतोब हमीदुद्दीनखान बहादुर याला जाऊन मिळावे व युद्धात भाग घ्यावा अशा अर्थाचा हुकुम देण्यात आला.

### चोवीस डिसेंबर १६९९

बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याला सांगितले, 'बादशाही छावणीचा घेर किती आहे? साखळयांनी मोजून माहिती आणा. छावणीभोवती खारबंदी (कच्ची व काटयाकुटयाची लाकडी कुंपणे) बांधावी.' त्याप्राणे बक्षीउल्मुल्क मुखलिसखान व जवाहरमल (बांधकाम तज्ञ) यांनी साखळयांनी पाहणी करून येऊन सांगितले की, 'छावणीचा घेर अडीच कोस व पंचवीस सांखळी (जरीब) इतका आहे'. बादशहांनी आज्ञा केली की : नकाशा तयार करून आणा व माणसे अंतरा-अंतराने आत छावणीत येतील तर त्यांना छावणीत आणावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व बादशाही सैन्य काल संध्याकाळी मसूरच्या ठाण्याला पोहोचले. धनाजी जाधव वगैरे सरदार तेथून पळून सात कोस पलीकडे गेले आहेत.

बहरामंदखानाच्या फौजेत तैनात असलेला व दोन हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब असलेला सय्यद अजमतुल्लाखान याने राजीनामा दिला. त्याला बडतर्फ करावे अशी आज्ञा झाली.

विजापूरच्या सुभ्यातील बातमीवरून पुढील प्रमाणे कळले : सिरागडपासून साठ कोसावर सैदपूर (सोंडूर अगर रायचूर जिल्ह्यातील सिंधनूर तर नव्हे? ) याला दुर्ग (चित्रदुर्ग) चा जमीनदार याने बहिर्जी (घोरपडे) बरोबर मिळून वेढा घातला आहे. सैदपूरचा किल्लेदार वेढा लढवीत आहे. बहिर्जीची इच्छा ही की किल्ला घेतल्यावर तेथे आपले कबिले ठेवावे. मुखलिसखान याने चौकशी करून कळवावे अशी आज्ञा झाली.

मीर हसन तनबक्षी (तनखा म्हणजे पगार, वेतन वाटणारा अधिकारी) हा अहदी (स्वार शिलेदार) यांचा अधिकारी होता. त्याने विनंती केली की : बाहेर पांगलेले सैनिक यांना (सुरक्षिततेसाठी) छावणीत आणावे अशी आज्ञा झाली. माझ्याजवळ माणसे नाहीत. माझ्याजवळ असलेले दोनशे अहदी हे खुदाबंदाखानाबरोबर गेले आहेत. व्यवस्थेसाठी माझ्यापाशी कोणीच राहिले नाही. यावर खुदाबंदाखानाकडून वीस अहदी मागवून घ्यावे अशी आज्ञा झाली.

माळव्याचा सुभेदार मुख्तारखान, आणि इटाव्याचा फौजदार खैर अंदेशखान यांच्या नावे फर्माने रवाना झाली. गुर्जबर्दाराने मुख्तारखान व खैर अंदेशखान यांना अन्व्याचा फौजदार शेर अफगनखान (हा छत्रसालशी लढत होता) याजपाशी नेऊन पोहोचवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### पंचवीस डिसेंबर १६९९

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा हा मोर्च्यातून येऊन बादशहांना भेटला. तो म्हणाला, 'माझ्या मोर्च्यासाठी देण्यात आलेली तोफ फुटलेली व मोडलेली आहे. मला दुसरी तोफ देण्यात

यावी.' बादशहांनी तरबियतखानाच्या मोर्च्यातून उस्मान करावल याला बोलावून घेऊन आज्ञा केली की : तावडतोब दुसरी तोफ आज्जम यांच्या मोर्च्यात पोहोचवा.

आज्ञेप्रमाणे शहाजादे बेदारबख्त हे जवळ येऊन पोहोचले आहेत असे बादशहांना कळविण्यात आले.

काल मुखलिसखानयाने छावणीच्या घेराचा व भोवतालचा नकाशा आणून दाखविला. लष्कराच्याभोवती भिंती घालण्यात याव्यात अशी बदशहांनी आज्ञा केली. बादशहा इनायतुल्लाखानाला म्हणाले, 'सौदागरांनी काश्मीर सुभ्यातून फळफळावळे आणली की नाही?' त्याने सांगितले, 'अद्याप नाही. पण लवकरच माल येईल.'

बुधवारी रूहुल्लाखानाने शुतरखाना (उंट शाळा) बादशहाच्या नजरेखालून घातला. बादशाही देवडीवर तैनात असलेल्या पन्नास इसमांनी, मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम हा परत येईपर्यंत मोर्च्यात जाऊन काम करावे अशी आज्ञा झाली. किल्ल्याच्या तटाला लावण्यासाठी शिड्या तयार करण्यात आल्या असे बादशहांना सांगण्यात आले. बादशहांनी एक शिडी मागवून पाहिली. ते म्हणाले, 'अशा शिड्या कामाच्या नाहीत. एक हात लांब व एक दिरअ रुंद अशा तयार करण्यात याव्यात.'

## (रजब चवदा) सव्वीस डिसेंबर १६९९

शहाजादा बेदारबख्त आज येऊन बादशहांना भेटला. त्याला पंधरा हजार जात व नऊ हजार स्वार अशी मन्सब होती. तीत एक हजार स्वारांची वाढ करण्यात आली. शहाजाद्याला धनाजी जाधवाच्या पारिपत्यासाठी मसूरच्या ठाण्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला. शहाजादा बेदारबख्त याचे सहकारी सद्रुद्दीनखान, मुहंमदखान, खाने आलम, सरफराजखान वगैरेंनी मोहीम आटोपल्यावर भेटावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

हमीदुद्दीनखान बहादुर याने आपले सैन्य बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याजपाशी सोडून स्वतः हुजुरात यावे आणि शहाजादा बेदारबख्त हा मसूरला पोहोचल्यावर बहरामंदखान यानेहि सैन्यासहित हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

मसूरचा ठाणेदार मंबाजी याची कऱ्हाडच्या ठाणेदारीवर नेमणूक करण्यात आली. मंबाजीला दोन हजार जात, व दीड हजार स्वार, त्यात पाचशे स्वार दो अस्पा (दुघोडी) अशी मन्सब होती. तीत पाचशे स्वारांची भर घालण्यात येऊन मंबाजीला कऱ्हाडला जाऊन पोहोचण्याची ताकीद देण्यात आली.

सुल्तानगड (साल्हेर)चा किल्लेदार बहरोजखान याचा (किल्ल्यातील) नायब म्हणून मलिक मुइजुद्दीन याची नेमणूक करण्यात आली. यापूर्वी साल्हेरला पिसर मुहंमद हा किल्लेदार होता. त्याने किल्ला मलिक मुइजुद्दीन याच्या हवाली करावा असा हुकुम त्याला पाठविण्यात आला. मुइजुद्दीनला साल्हेरकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

रूहूल्लाखान याने आज्ञेप्रमाणे पाचशे स्वार नव्याने भरती केले होते. त्यांच्या खर्चासाठी पाच हजार रुपये देण्यात यावेत अशी बादशहांनी आज्ञा केली.

फर्दागड (फरवागड ?)चा किल्लेदार यूसुफ याने पुढीलप्रमाणे लिहून कळविले :

येथील देशमुख हूजुरात आला आहे. त्याचा अर्ज असा आहे की 'रुद्राजी पंडित याने माझ्या विरुद्ध गाऱ्हाणे केले की आणि मला येथे राहू देऊ नये. या जिल्ह्यात पुष्कळ कामे करावयची आहेत. चौकशी न करता मला बदलण्यात येऊ नये ही विनंती.' बादशहांनी आज्ञा केली की, त्याला बदलू नये. यारअलीबेग याने या प्रकरणाची चौकशी करुन वृत्तांत सादर करावा.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : (राजा) रामा हा बादशाही छावणीपासून पंधरा कोसावर येऊन थांबला आहे. खेळण्याच्या (विशालगड) दिशेने जाण्याचा त्याचा बेत दिसतो.

## सत्तावीस डिसेंबर १६९९

शहाजादा बेदारबख्त हा निरोप घेऊन निघाला. तो आज बादशाही छावणीपासून एक कोस अंतरावर कृष्णेच्या काठी डेऱ्यात दाखल झाला असे सकाळी बादशहांना कळविण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी समजली : इखलासखान आख्ताबेगी हा लष्कराच्या आघाडीच्या पथकाभोवती गस्त घालण्यासाठी आपली पथके घेऊन गेला होता. तो बादशाही लष्कराच्या पुढे चंदनवंदन किल्ल्याच्या दिशेने दोन कोस गेला होता. इतक्यात गनिमांचे (मराठ्यांचे) स्वार चालून आले. इखलासखानाने त्यांचे पारिपत्य करण्यासाठी आपल्या मुलाला पुढे पाठविले व तो स्वतःहि त्याच्या मागोमाग रवाना झाला. या सुमारास हणमंतराव हा मराठा सरदार आपले मोठे सैन्य घेऊन चालून आला. त्याने इखलासखानाला चहूकडून घेरले. युद्ध झाले. इखलासखान याला दीड हजार जात व पाचशे स्वार, त्याचा मुलगा मुहंमद यार याला दोनशे जात व वीस स्वार अशा मन्सबी होत्या. इखलासखान व मुहंमद यार व त्यांचे अनेक अनुयायी हे तलवारी व भाले यांनी झालेल्या जखमांनी मारले गेले. अब्दुल्करीम वगैरे जखमी झाले. गनिमांनी दोन हत्ती, घोडे, शस्त्रे इत्यादि इखलासखानाचा सगळा सरंजाम लुटला. यावेळी सफशिकनखान, मुहंमद अमीनखान व राणा भीम याचे भाऊ इंद्रसिंग व बहादुरसिंग यांची पथके गनिमांशी लढत आहेत.

हे कळल्यावर बादशहांनी पुढीलप्रमाणे हुकुम फर्माविले :

(१) बक्षीउलमुल्क मुखलिसखान व सियादतखान यांनी पथके घेऊन जावे व गनिमांचे पारिपत्य करावे.

(२) ख्वाजा मसूद याने जाऊन शहाजादा बेदारबख्त याच्या सैन्यातील सरदार खाने आलम व सर्फराजखान यांना गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना करावे.

(३) ख्वाजा मसूद याने शहाजादा बेदारबख्त यांना सांगावे की तुम्ही पण तयार रहा.

(४) शहाजादा बेदारबख्त याचा छावणीतील वकील सुल्तान नजर यालाहि छावणीतून पाठविण्यात यावे.

त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली. बादशहांनी म्हटले, 'हमीदुद्दीनखान बहादुर कुठे आहे?' सय्यद लुत्फुल्लाला रवाना करीत बादशहा म्हणाले, 'हमीदुद्दीनखान बहादुर जेथे असेल तेथून त्याला गनिमांच्या पारिपत्याकरिता रवाना करा'. हमीदुद्दीनखान

हा कृष्णेच्या काठावर होता. लुत्फुल्लाने त्याला व त्याच्या सैन्यातील ख्वाजाखान, रामचंद (खटावचा ठाणेदार) यांना बादशहाच्या आज्ञेप्रमाणे रवाना केले. परत येऊन त्याने बादशहाला ही हकीकत सांगितली.

बादशहांनी मुहंमद अमीन कौल नायब कोतवाल, याला शहाजादा बेदारबख्त याजकडे निरोप देऊन पाठविले की, 'शहाजाद्याने आपल्या स्वतःच्या तळावरच राहावे.'

वंजाऱ्यांनी बादशहाच्या समोर गाऱ्हाणे मांडले की : आपले बैल वाचवावे म्हणून आमची माणसे गनिमांच्या बरोबर लढत आहेत. मदत मिळावी. सुखलिसखान याने त्यांना मदत करावी अशी आज्ञा झाली.

करावलांचा मुशरफ (अधिकारी) मस्तअली याने वीस बर्कंदाज आणि शंभर बंदूकची यांना घेऊन बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याच्या गोटाची काळजी घेत जावी अशी आज्ञा झाली. सफशिकनखान मीर तुजक अव्वल याने गनिमांच्या पारिपत्यासाठी जाण्यास परवानगी मागितली. 'तुम्ही आमच्या बरोबर रहावे', अशी आज्ञा झाली.

इखलासखान व त्याचा मुलगा यांची प्रेते त्यांच्या गोटात आणण्यात आली आहेत असे कळविण्यात आले. बादशहांनी आज्ञा केली की : काजीउलकुजात व महंमद आकिल यांनी जाऊन जनाजा (प्रेतयात्रा) ची तयारी करावी. पागेचा मुशरफ (हिशेब अधिकारी) अब्दुस्सलाम याने त्या खात्यातील कागदपत्र व इतर सामान यांना सीले (मोहोरबंद) लावावी. म्हणजे अफरातफर होणार नाही. याशिवाय अब्दुस्सलाम याने पाग्याची निगा राखावी. (इखलासखान हा आख्ताबेगी म्हणजे हुजूरपाग्याचा अधिकारी होता.) बक्षीउल्मुल्क मुखलीसखान व त्याची पथके कोठे पोहोचली आहेत याची बातमी काढून आणावी म्हणून एका सांडणीस्वाराला पाठविण्याची मुल्तफतखान याला आज्ञा करण्यात आली.

## अठ्ठावीस डिसेंबर १६९९

काल रात्री एक प्रहर पाच घटिका झाल्यावर मुहंमद अकरम काजी, मुहंमद आकिल, मुराद, व मुहंमद गौस यांनी इखलासखान, त्याचा मुलगा मुहंमदयार व मरहूम नजाबतखान याचा मुलगा बहादुरबेग यांच्या शवपेटिका कचेरीत आणल्या. बादशहा काजीला म्हणाले, 'तिघा मृतांच्याबद्दल जनाजाची नमाज एकत्र पढावी की वेगवेगळी.' काजी म्हणाले, 'वेगवेगळी नमाज पढणे चांगले.' त्याप्रमाणे बदशहा वेगवेगळी नमाज पढले. यानंतर त्यांनी प्रत्येक जनाज्यावर (शवपेटिका) हात ठेवला आणि आज्ञा केली की, 'यांना शहाजहानाबाद (दिल्ली) ला पाठवा.'

काल रात्री हमीदुद्दीनखान बहादुर हा येऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले, 'शाबास, आफरीन बाद.' त्याला बादशाही तबेल्याची दारोगागिरी देण्यात आली. मुखलिसखान हाहि येऊन बादशहांना भेटून गेला. हमीदुद्दीनखान बहादुर याचे पुढील सहकारीहि बादशहांना भेटले : (१) नाहरखान, (२) नागोजी माने, (३) खटावचा ठाणेदार रामचंद, (४) मसूरचा ठाणेदार मंबाजी, (५) ख्वाजाखान, (६) बहिर्जी पांढरे, (७) रुस्तमबेग, (८) अली नकी, फौजेचा दिवाण, (९) जियाउद्दीन, बक्षी व वाकनीस (१०) नाहरखानाचा मुलगा मलिक

शहा, (११) किशनराव (कृष्णराव?), (१२) अनूपसिंगचा मुलगा इंद्रसिंग. यांना विविध बक्षिसे देण्यात आली. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांनी बंजाऱ्यांचे बैल पकडले असून मुहंमद अमानखान हा गनिमांशी युद्ध करीत आहे. हमीदुद्दीनखान यांना गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना करावे असे तहव्वुरखान याला सांगण्यात आले.

बादशहाजादा आज्जम, शहाजादा बेदारबख्त, जुल्फिकारखान इत्यादींच्या सैन्यासंबंधी माहिती कळवावी अशी मुखलिसखान याला आज्ञा झाली. टेहेळणी व गस्त यासाठी सफशिकनखान व सिद्दी बिलालखान यांच्यापाशी दोन पथके तैनात करण्यात यावी अशी आज्ञा झाली.

मरहूम इखलासखान याच्या जागेवर मुल्तफतखान याची नेमणूक करण्यात आली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान हा आज्ञेप्रमाणे रहमतपुराहून आला. शुतरखान्या (उंट)चे रूहुल्लाखान, खिदमतगुजारखान, मुहंमद अमीन, यांनी बादशहांना नजरा पेश केल्या.

मुखलिसखानाचे दोन घोडे जाया झाले होते. त्याच्या विनंतीवरून त्याला दोन घोडे देण्यात आले. बेदारबख्तापाशी तैनात असलेला खाने आलम याने यारअलीबेग याच्याद्वारे विनंती लिहून पाठविली की : आज्ञा झाली तर मी चार कोस पुढे जाऊन गनिमांचे पारिपत्य करीन. बादशहांनी सांगितले, 'नेहमी तयारी ठेवावी. आज्ञा झाली तरच जावे. आज्ञेशिवाय जाऊ नये.'

### एकोणतीस डिसेंबर १६९९

काल रात्री बादशहांनी हमीदुद्दीनखान बहादुर व खुदादाद यांना आज्ञा केली की : तुम्ही आपल्या पथकांसहित गुलाल बाराच्या (बादशहाचे निवासस्थान व अंतःपुर) आत व बाहेर नेहमी तयार राहावे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते हे : गनिमांनी (मराठ्यांनी) नांदगिरीच्या मोर्चावरून बल्लूखान याचे उंट धरले. बल्लूखान त्याच्यांशी लढू लागला. मराठ्यांनी त्यांना घेरले आहे. मदत पाठवावी. बादशहांनी हमीदुद्दीनखान बहादुर व सफशिकनखान यांना पाठविले. ते जाऊन गनिमांचे पारिपत्य करून उंट सोडवून घेऊन रात्री परत आले. बादशहा हमीदुद्दीनखान बहादुर यास म्हणाले, 'आफरीन बाद, शाब्बास'.

बादशहांना कळविण्यात आले की : शहाजादा बेदारबख्त, खाने आलम वगैरे धनाजी जाधवशी लढण्यासाठी रवाना झाले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की, 'मुखलिसखान, बहरामदंखान व मुल्तफतखान यांनी बेदारबख्ताच्या तळाचे रक्षण करावे.' बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांनी (मराठयांनी) सिद्दी बिलालखान याला घेरले आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'शहाजादा बेदारबख्त याने कुमक पाठवावी.' आज्ञेप्रमाणे खाने आलम वगैरे सरदार चालून गेले आणि त्यांनी सिद्दी बिलालखान याला सोडवून आणले. बादशहांना कळविण्यात आले की : गनीम (मराठे) मुहंमद अमीनखान याजवर आले आहेत. मुखलिसखानाने मदत पाठवावी अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : फतेहुल्लाखान याने आपल्या मोगल सैनिकांसहित

गुलालबाराच्या (बादशहाचे निवासस्थान व अंतःपुर) प्रवेशद्वारावर हत्यारबंद होऊन तयारीने रहात असावे. तहव्वुरखान याने बादशहाजादा कामबक्ष व कासिमखान याने मोर्च्यावरून येऊन सुल्तान बलंद अख्तर यांच्या गोटाबद्दल सावधगिरी बाळगावी अशी आज्ञा झाली.

## तीस डिसेंबर १६९९

बहरामंदखान हा रहमतपुराहून येऊन बादशहांना भेटला. हाजीखानाचा मुलगा मीर मासूम हा औरंगाबादेहून येऊन भेटला. नजरबे वगैरे मोगल, सय्यदलाल, रुस्तमबेग किशनराव, बहिर्जी पांढरे, मीर वली हे येऊन बादशहांना भेटले.

गनिमांचे चहूकडून पारिपत्य करण्यासाठी बादशहांनी आपल्या सरदारांची पुढील-प्रमाणे योजना केली :–

बहरामंदखान व मुल्तफतखान पिछाडीला, मुखलिसखान व मुहंमद अमीन लष्कराच्या पुढे, हमीदुद्दीनखान बहादुर लष्करासहित उजव्या फळीला, फतेहुल्लाखान डाव्या फळीला.

मसूरचा ठाणेदार मंबाजी याला देण्यासाठी एक तल्वार वेगळी काढून ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली. शहाजादा बेदारबख्त याला दहा रेहकले, दोन शुतरनाळ, सरब, बारुद वगैरे तोफखान्याची सामग्री द्यावी अशी आज्ञा झाली.

कुंजमन मुशरफ याने लाकूड सामनाच्या तयारीसाठी जावे. त्यानंतर कही बरोबर जावे अशी आज्ञा झाली. बादशहांना कळविण्यात आले की : रसदेचे चार हजार बैल साप-गावात आले आहेत. पण गनिमांच्या धामधुमीमुळे पुढे सरकू शकत नाहीत. आज्ञा झाली की : फतेहउमीदखान याने जाऊन त्यांना घेऊन यावे.

रूहुल्लाखानाने विनंती केली की : मी मोर्च्यात असतो. माझ्या कुटुंबियांना गुलालबारेत (बादशहाचे खास निवासस्थान) राहाण्याची परवानगी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

गनिमांनी पाईन विलायत (वाईचा व पुढचा प्रदेश) ला घेरले आहे असे कळविण्यात आले. नाहरखानाने जाऊन त्यांचे पारिपत्य करावे अशी आज्ञा झाली. हमीदुद्दीनखानाने म्हटले, 'नाहरखान सध्या हुजुरात आहे. आपल्या पायापाशीच राहू द्यावे अशी त्याची विनंती आहे.' बादशहा म्हणाले, 'राहू द्या.' पाईन विलायतच्या लोकांनी तक्रार केली की : गनिमांच्या हातून माणसे मारली जातात. मदत व्हावी. बादशहांनी हुकुम सादर केले.

बादशहा ख्वाजा दौलत याला म्हणाले, 'किलीदे फतह (वसंतगड) जिंकला तेव्हा तूच ती बातमी आणलीस. आता सातारच्या मोर्च्याची बातमी येत नाही.' ख्वाजा दौलत म्हणाला, 'आपल्या आज्ञेशिवाय मी गेलो नाही. आता आज्ञा झाली तर जातो.' बादशहा म्हणाले, 'जा.'

## एकतीस डिसेंबर १६९९

काल रात्री शहाजादा बेदारबख्त यांनी तयार राहावे व आज्ञा मिळताच गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना व्हावे, अशी आज्ञा देण्यात आली. बादशहांनी हमीदुद्दीनखान बहादुर व फतेहुल्लाखान यांना सैन्यासहित जाण्यास निरोप दिला. त्यांनी शहाजादा बेदारबख्ता-

बरोबर गनिमांच्या पारिपत्यासाठी जावे व बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व मतलबखान यांनी शहाजाद्याच्या गोटाचे रक्षण करावे अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणे ते सगळे शहाजादा बेदारबख्त याजकडे गेले. शहाजाद्याला उलट्या झाल्या होत्या. म्हणून तो स्वार झाला नाही. बादशहांनी बहरामंदखान व हमीदुद्दीनखान बहादुर यांना परत बोलाविले.

जुल्फिकारखान बहादुर नुस्रतजंग हा तळावरून (ब्रम्हपुरी) आला आहे असे कळले. त्याने उद्या भेटावे अशी आज्ञा झाली. मोर्च्यावरून कासिमखान व त्याचा मुलगा मुहंमद-इसहाक हे येऊन बादशहाला भेटले. मरहूम इखलासखान याच्या जागी मीर तुजक म्हणून मुरीदखान याची नेमणूक करण्यात आली. मसूरचा ठाणेदार मंबाजी याला एक तलवार बक्षीस म्हणून देण्यात आली.

* * *

# ३

# एक जानेवारी १७०० ते एकवीस एप्रिल १७००

**एक जानेवारी १७००**

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त याला आज्ञा केली की : तुम्ही बादशाही छावणी आणि ब्रह्मपुरीचा तळ यामध्ये योग्य वाटेल त्या ठिकाणी तळ देऊन गनिमांचे पारिपत्य करावे. तळाचे (ब्रह्मपुरी) व मार्ग याच्या रक्षणाची खबरदारी घ्यावी. शहाजाद्याने आज्ञेप्रमाणे कृष्णेच्या काठावरून कूच केले.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, हमीदुद्दीनखान बहादुर, फतेहुल्लाखान व मतलबखान यांना कही आणण्यासाठी सैन्य देऊन पाईन विलायतकडे (वाई व पुण्यामधील प्रांत) जाण्यास निरोप देण्यात आला. मरहूम खानजमान फतेहजंग याची मुले, खाने आलम (सहा हजार जात व पाच हजार स्वार अशी मन्सब असलेला), मुनव्वरखान, इख्तिसासखान व अब्दुल्कादर ही येऊन बादशहांना भेटली.

मरहूम इखलासखान याच्या मालमत्तेच्या विल्हेवाटीबद्दल रूहुल्लाखान याने विचारले. बादशहांनी आज्ञा केली की : घोडे व हत्ती सरकारात घ्यावे. उरलेली मालमत्ता इखलासखानाच्या मुलांना द्यावी.

हमीदुद्दीन मुहंमदखान हा दोन हजार जात व पाचशे स्वार यांचा मन्सबदार होता. तो शहाजादा बेदारबख्त याच्या तैनातीत होता. तो आज्ञेप्रमाणे येऊन बादशहांना भेटला. सैफुद्दीनखान याच्या जागी दारोगा म्हणून त्याची नेमणूक करण्यात आली. बेदारबख्ताच्या

फौजेत तैनात असलेला सरफराजखान याला बक्षीस म्हणून एक हत्ती देण्याची आज्ञा झाली. पुढील इसमांना मन्सबी व बढत्या देण्यात आल्या. सय्यद रुस्तम अली, बहलोलचा मुलगा पुरदिल, मध्य आशियातून नुकताच आलेला अब्दुल्कादरखान.

दुपारच्या वेळी बातमी आली की : जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग हा धनाजी जाधवाचा पाठलाग करीत होता. धनाजी पळून गेला. जुल्फिकारखान हा वसंतगड-कडून वळून हुजुरात येत आहे.

जुल्फिकारखानाने आपले दाऊदखान वगैरे सरदार यांना कृष्णाकाठावर सोडले. तो स्वत: येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी त्याच्या पाठीवर हात ठेवीत विचारले, 'किती वर्षांनंतर तुम्ही मला भेटण्यास येत आहात!' तो म्हणाला, 'जवळ जवळ पंधरा वर्षे.' बादशहांनी त्याला काही सूचना केल्या. त्याला खास खिलतीची वस्त्रे, रत्नजडित कटयार (पाच हजार रुपयांची), चार हजार रुपयांचा घोडा, आठ हजार रुपयांचा हत्ती व खर्चासाठी दोन लाख रुपये अशी बक्षिसे देण्यात आली. दोन घटकानंतर बादशहांनी फातेहा खैर पढून त्याला गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी जाण्यास निरोप दिला.

### दोन जानेवारी १७००

जुल्फिकारखानाचे सहकारी बादशहांना भेटूनच निघू इच्छितात असे सैफुद्दीनखान याचा भाऊ मुहंमद तकी याने कळविले. बादशहा म्हणाले, 'कामे संपल्यावर त्यांनी भेटावे.' जुल्फिकारखानाच्या पुढील सहकाऱ्यांना खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली :– दाऊदखान, बहादुरखान, सुलेमानखान, महमूदखान, राव दलपत बुंदेला, किशोरसिंगाचा मुलगा रामसिंग, कान्होजो (शिर्के).

खाने आलमच्या विनंतीवरून त्याला मदत म्हणून पाच हजार रुपये द्यावे अशी आज्ञा झाली.

अहमदाबादचा सुभेदार व जोधपूरचा फौजदार शुजाअतखान याने डाळिंबाच्या बारा करंड्या पाठविल्या त्या बादशहाच्या नजरे खालून गेल्या. बादशहाजादे, शहाजादे व अमीर उमराव यांच्याकडे डाळिंबे पाठविण्याची आज्ञा झाली.

### तीन जानेवारी १७००

काल रात्री बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने लिहून पाठविले की : आज्ञेप्रमाणे आम्ही कही गोळा केली. पण रस्ता डोंगराळ आहे. मुहंमद अमीनखान याला आपली पथके घेऊन दोन डोंगरामध्ये तळ देण्यास आज्ञा व्हावी. तसेच लोहार व कारागीर यांनाही पाठवावे. त्याप्रमाणे आज्ञा झाली.

गनिमांच्या लोकांनी चंदनवंदन किल्ल्यातून बाहेर पडून वंजाऱ्यांचे बैल पकडून नेले होते. मुहंमद अमीनखानाने त्यांचा पाठलाग करून जनावरे सोडवून आणली.

### चार जानेवारी १७००

सरफराजखान हा पाच हजारी जात व पाच हजार स्वारांचा मन्सबदार शहा-

जादा बेदारबख्त याजपाशी तैनात होता. त्याला त्याच्या पथकासहित हुजुरात बोलावण्यात आले.

औरंगाबादेचा सुभेदार नजाबतखान याने नऊ हरिणे भेट म्हणून पाठविली. ब्रह्मपुरीच्या बातम्यावरून समजले की : आज्ञेप्रमाणे चीनकुलीजखान हा आपल्या सैन्यासहित ब्रह्मपुरीला पोहोचला आहे.

**पाच जानेवारी १७००**

आज कचेऱ्या बंद होत्या.

**सहा जानेवारी १७००**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांचे सैनिक बादशाही छावणीपासून एक-दोन कोसावर पसरले आहेत. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे फतेहुल्लाखान, ख्वाजाखान व नागोजी माने हे गनिमांवर(मराठ्यांवर) चालून गेले. गनीम पळून गेले.

कीरतसिंग(मिर्जा राजा जयसिंग याचा मुलगा) याचा नातू जीतसिंग आणि त्याचा भाऊ महीसिंग(?) याला ब्रह्मपुरीच्या तळावर तैनात करण्यात आले होते. त्यांना असदखान जुम्लतुल्मुल्क याने खिलतीची वस्त्रे, तरवार इत्यादि बक्षिसे दिली. ती घेण्याची परवानगी देण्यात आली.

ओर्छाचा जमीनदार(राजा) अवधूतसिंग हा शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात होता. त्याला हुजुरात येण्याची आज्ञा करण्यात आली.

**सात जानेवारी १७००**

काल हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनिमांचे(मराठ्यांचे) सहा हजार स्वार बादशाही छावणीपासून दोन–तीन कोसावर आले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : बहरामंदखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांनी सैन्य घेऊन भल्या पहाटे गनिमांच्या परिपत्यासाठी जावे. त्याप्रमाणे बहरामंदखान, हमीदुद्दीनखानबहादुर, नाहरखान वगैरे सैन्ये घेऊन कृष्णेच्या पलीकडे गेले. गनिमांनी(मराठ्यांनी) आपल्या सैन्याचे तीन भाग केले. उभय पक्षात बाणांची व बंदुकीची लढाई झाली. दिवस पाच घटका वर आला असता गनीम(मराठे) छावणीभोवती चालून आले. बादशहांनी आज्ञा केली की : मुखलिसखान याने गंजाच्या(छावणीतील बाजार)पलीकडे चाल करून जावे. मुहंमद अमीन व फतेहुल्लाखान यांनी त्याच्या पाठोपाठ जावे. इतक्यात कळले की : फतेहुल्लाखान व मुहंमद अमीनखान हे मोगलांची पथके घेऊन चालून गेले होते. गनिमांच्या(मराठ्यांच्या) दोन तीन तुकड्या त्यांच्यावर चालून आल्या. चहूकडून गनिमांनी हल्ले चढविले. बाणांची व बंदुकीची लढाई झाली. फतेहुल्लाखान व मुहंमद अमीनखान हे गनिमांवर हल्ले करीत तेव्हा गनीम पांगले जात. पण पळता पळता ते बादशाही सैन्याच्याभोवती घिरट्या घालत. बादशाही सैन्याच्या हल्ल्यासमोर टिकत नसत.

बादशहांनी आपल्या कचेरीत हजर असलेले रूहुल्लाखान, अर्शदखान व मुरीदखान यांनाहि गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना केले. या सुमारास बादशहांना कळविण्यात आले

की : बादशहाजादा आजमशहा हा आपल्या पथकासहित टेकड्यांच्या तोंडापाशी आला आहे. तेथून त्याने शहाजादा मुहंमद बालाजाह यास गनिमांच्या पारिपत्यासाठी रवाना केले आहे. यावर बादशहा म्हणाले, 'छान केले, बादशहाजाद्यांनी तेथे आपल्या सैन्यानिशी तयारीत राहावे.'

यानंतर कळले की : गनीम हे पळून चंदनवंदनकडे गेले आहेत. बादशाही सैन्ये त्यांचा पाठलाग करीत आहेत.

दोन घटकांपर्यंत त्यांचा पाठलाग करून बहरामंदखान हा संध्यकाळच्या सुमारास हुजुरात आला. बादशहांना कळले की : मीर तुजक सफशिकनखान हा पीलखान्याच्या (हत्तीखाना) मागून गनिमांशी लढत आहे. पण त्याच्यापाशी बाण कमी आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : शंभर बाण व बाणदार सफशिकनखानाकडे पाठविण्यात यावे. मुहत-शमखान याची मन्सब काढून घेण्यात आली होती. तो धनुष्य व भाते धारण करून दरबारात आला. त्याने बादशहांना मुजरा केला. बादशहा म्हणाले, 'जा, गनिमांचे पारिपत्य करण्याठी मुखलिसखानापाशी जा.'

बादशहाजादा आज्जमशहा याचा वकील सुल्तान नजर याला बादशहांनी बोलाविले. ते त्याला म्हणाले, 'रूहुल्लाखानाच्या मोर्च्याच्या पलीकडे, सातारा किल्लयाच्या डोंगराच्या मध्यावर पाण्याचा एक झरा आहे. किल्ल्यातील लोक बाहेर पडून झऱ्याचे पाणी नेतात. बादशहाजादा आज्जम यांना म्हणावे "तेथे एक चौकी कायम करा आणि किल्लघातील लोकांना पाणी नेऊ देऊ नका." '

मयत राजा अनूपसिंग याचा मुलगा सरुपसिंग याने (राजा) रामाचा कबिला विजापूरचा सूभेदार लुत्फुल्लाखान याजकडे ठेवावा. जडजवाहीर, हत्ती, वगैरे तळावर (ब्रह्मपुरी) जुम्लतु-ल्मुल्क (असदखान) याजकडे द्यावे आणि स्वतः हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

### आठ जानेवारी १७००

आज बादशहांचा उपवासाचा दिवस (रोज हजारा) होता. कचेऱ्या बंद होत्या. बादशहांनी आज्ञा केली की : पाचशे कर्नाटकी प्यादे वगैरेंना शहाजादा बेदारबख्त याजपाशी तैनात करण्यात यावे. आणि त्याच्या जवळचा तोफखाना हुजुरात बोलावून घ्यावा.

### नऊ जानेवारी १७००

मन्सबीवरून बडतर्फ झालेला मुहतशमखान हा येऊन बादशहाला भेटला. त्याचा पूर्वीचा काय हुद्दा-दर्जा होता याची चौकशी करून कळवावे म्हणून आज्ञा झाली. नुस्रतजंग जुल्फिकारखान याला दुआबचा खुराक (सरदारांच्या खर्चाने बादशाही हत्ती घोड्यांची निगा राखणे) माफ करण्यात येऊन त्याला मदतीदाखल वीस हजार रुपये द्यावे अशी आज्ञा देण्यात आली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांना कही आणण्यासाठी खटाव व सापगांव (?) कडे जाण्यास निरोप देण्यात आला.

## दहा जानेवारी १७००

बादशहाजादा कामबक्ष यांनी उद्या बादशाही सैन्याची पाहणी करावी अशी आज्ञा झाली. फजाइलखान, तहव्वुरखान, करावलखान व मीरहुसेन यांनी कामबक्षबरोबर राहावे असा हुकुम देण्यात आला.

काल रात्री बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा मुहंमद आज्मशहा हा कृष्णेच्या पलीकडे जात आहे. सफशिकनखान, सदरुद्दीन मुहंमदखान व यारअलीबेग यांनी डोंगराच्या खिडीजवळ असलेल्या आज्मच्या मोर्चाकडे जाऊन सावधगिरी बाळगावी.

बादशहांना कळविण्यात आले की : आज्मशहा, शहाजादा मुहंमद वालाजाह, बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, रूहुल्लाखान, मुहंमद अमीनखान व फतेहुल्लाखान हे आपली पथके घेऊन कृष्णेच्या पलीकडे गेले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : आज्मशहाने शहाजादा मुहंमद वालाजाह याला तिकडे सोडून हुजुरात यावे. त्याप्रमाणे आज्मशहा येऊन बादशहांना भेटला. त्याला आपल्या गोटाकडे जाण्याची आज्ञा झाली. शहाजादा वालाजाह, मुखलिसखान वगैरे दुपारच्या वेळी आपापल्या गोटाला परतले. काल रात्री बादशहांनी आज्ञा केली की : माझ्या स्वारीचा घोडा तयार असू द्या.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखान हा आज्ञेप्रमाणे मुर्तजाबाद मिरजेहून निघाला. तो मसूरच्या ठाण्याला पोहोचला. आज तो गनिमांच्या पाठलागावर रहमतपूरला गेला. तेथे त्याने गनिमांचे पारिपत्य केले असून तो हुजुरात येत आहे.

बहरामंदखानाच्या विनंतीवरून बादशहांनी मसुरचा ठाणेदार मंबाजी (दोन हजारी), व खटावचा ठाणेदार रामचंद (दोन हजारी) यांच्या मन्सबीत वाढ केली. गनिमांचे पारिपत्य करून रसद लष्करात पोहोचती कराल तर नगाऱ्याचा मान देण्यात येईल असे त्यांना आश्वासन देण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की : आज्ञेप्रमाणे बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, हमीदुद्दीनखानबहादुर, खुदाबंदाखान व मतलबखान हे पथके घेऊन गनिमांचा पाठलाग व रसद आणणे या कामासाठी खटाव रहमतपूरकडे भल्या पहाटे गेले आहेत. सियादतखान याने आपली पथके घेऊन वरील सैन्याच्या डाव्या बाजूने करावल (आघाडी) म्हणून जावे अशी बादशहांनी आज्ञा केली. बहरामंदखान व सियादतखान यांचे कबिले यांनी गुलालबारात (बादशहाचे खास निवासस्थान) राहावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

## अकरा जानेवारी १७००

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले : धनाजी जाधव, हणमंतराव, राणोजी वगैरे मराठे सरदार हे पंधरा हजार स्वारांचे सैन्य घेऊन रहमतपूरच्या पलीकडे आले. ही बातमी कळताच जुल्फिकारखानबहादुर हा सैन्य घेऊन मसूरच्या ठाण्यावरून निघाला. त्याचे व गनिमांचे युद्ध झाले. बाण व बंदुका यांचा मारा झाला. नंतर खान नुस्रतजंग जुल्फिकारखान, दाऊदखान, राव दल्पत बुंदेला, रामसिंग हाडा वगैरेंनी गनिमांवर (मराठ्यांवर) हल्ला चढविला. शत्रूपैकी अनेक जण ठार झाले. ही बातमी बक्षी-

उल्मुल्क बहरामंदखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांना लागली. तेही त्या स्थळी आले. गनिमांचे अनेक लोक ठार झाले. वरील सर्व मोगल सरदार हे अर्धा कोसपर्यंत गनिमांना मार देत देत पुढे सरकले. शत्रूंपैकी जवळजवळ पाचशे माणसांना नरकात पाठविण्यात आले(मारण्यात आले). घोडे, भाले व इतर शस्त्रेही (मोगलांच्या) हाती पडली.

बादशहांनी बातमी आणणाऱ्या दोन हरकाऱ्यांना चार होन व यारअलीबेग याज-बरोबर असलेला खान मुहंमद याला चार होन अशी बक्षिसे दिली व हरकाऱ्यांनी आण-लेली बातम्यांची यादी(फर्द) बादशहाजादा आज्जम याजकडे पाठवावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहा हे ख्वाजा मुहरमखान उर्फ ख्वाजा याकूत(बादशाही बागांच्या खात्याचा व्यवस्थापक) याला म्हणाले, 'खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान), बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांनी अनेक गनिमांना(मराठ्यांना) ठार मारले आहे. तुम्ही रहमतपूरला गेले पाहिजे. मारल्या गेल्या गनिमांचे(मराठ्यांचे) गळे कापून रहमतपूरला त्यांच्या डोक्यांचा मनोरा रचावा.' (बायद के शुमा ब रहमतपूर रफ्ता व गलाहाये मुफसदान बरीदा दर आजा मीनार साजद.)बादशहांनी त्याला निरोप दिला. मरहूम खानजहान याच्या सैनिकांचा अधिकारी शेख गुलाम मुहंमद याने पाचशे स्वार घेऊन ख्वाजा मुहरमखान याजबरोबर जावे अशी आज्ञा झाली. शंभर प्यादे हशमाचे पण त्याच्याबरोबर देण्यात आले.

बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने तरबियतखानाचे मोर्चे व यारअलीबेग याने बाद-शहाजादा मुहंमद आज्जम याचे मोर्चे पाहाण्यास जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

बंडखोर (राजपुत्र) अकबर याचे दोन नोकर हे अकबरची अर्जी व अत्तरे घेऊन आले होते. त्यांना दोनशे रुपये बक्षीस द्यावे अशी आज्ञा झाली.

### बारा जानेवारी १७००

आज शुक्रवार. कचेऱ्या बंद होत्या.

### तेरा जानेवारी १७००

बादशहाच्या आज्ञेने बादशहाजादा मुहंमद आज्जम याने बादशाही हत्तींची पाहणी केली.

बादशहाच्या सूचनेप्रमाणे सातारगडच्या जवळ असलेला पाण्याचा झरा ताब्यात घेण्यासाठी बादशहाजादा आज्जम याने जलालुद्दीनखान याजपाशी एक करावल व दोन हशम पाठविले. त्याच्या आज्ञेप्रमाणे जलालुद्दीनच्या सैनिकांनी गनिमांना मार देऊन पळविले आणि झऱ्याचा (चश्माये आब) ताबा घेतला.

रात्री बादशहांना कळविण्यात आले की : बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व हमीदुद्दीन-खानबहादुर हे आपली पथके घेऊन हुजुरात आले आहेत. आणि जुल्फिकारखानबहादुर हा गनिमांच्या पाठलागावर रहमतपुराहून निघाला आहे.

### चवदा जानेवारी १७००

आज बादशहांनी हत्ती व घोडे यांची पाहणी केली. बादशहापसंद या हत्तीचे त्यांनी विशेष कौतुक केले. हमीदुद्दीनखानबहादुर याच्या विनंतीवरून बादशहांनी खटावचा

ठाणेदार रामचंद याला नगारा, कर्णकुंडले व पाचशे रुपये बक्षीस, ही दिली. त्याला रसद-धान्य आणण्यासाठी खटाव व फलटणकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

बुधपांचगावचा ठाणेदार बुधाजी (पदाजी ? ) हा हमीदुद्दीनखानबहादुराच्या फौजेत तैनात होता. त्याच्या मन्सबीत बाढ करण्यात आली.

## पंधरा जानेवारी १७००

बादशहांनी आज दलबादल हा हत्ती नजरे खालून घातला. याशिवाय दहा हत्तींची त्यांनी पाहणी केली.

काल रात्री बादशहांनी बंडखोर अकबर याचा मुलगा सुल्तान बलंदअख्तर याजकडे एक तल्वार, एक खंजीर व धनुष्यबाण बक्षीस म्हणून पाठविली.

## सोळा जानेवारी १७००

आज सुल्तान बलंदख्तर हा येऊन बादशहांना भेटला. त्याने मुजरा केल्यावर त्याला आपल्या तंबूकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

मंबाजी हा मसूर व कऱ्हाड या स्थळांचा ठाणेदार होता. त्याला नगाऱ्याचे बक्षीस देण्यात आले. मला कलगीतुरा पण द्यावा अशी त्याच्या तर्फे विनंती करण्यात आली. बादशहांनी पाचशे रुपये किंमतीची कर्णकुंडले त्याला बक्षीस म्हणून दिली. (यक जीज गोशवारा:) मंबाजीला अडीच हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. त्यापैकी पाचशे दो अस्पा (दुघोडी) होते.

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : बुधपाचगावचा ठाणेदार बुधाजी हा धान्य, रसद घेऊन रहमतपूरजवळ आला आहे. फतेहुल्लाखान याने एक हजार स्वारांचे पथक बरोबर घेऊन जाऊन त्याला हुजुरात घेऊन यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

चीनकुलीजखान याला हुजुरात बोलाविले होते. पण तो अद्याप आला नाही असे कळले. बादशहांनी त्याची मन्सब पाचशेनी कमी केली.

बादशहांना कळविण्यात आले की : शहाजादा बेदारबख्त हा तळावर (ब्रह्मपुरी) पोहोचला. त्याचदिवशी औरंगाबादेहून खजिना पण (ब्रह्मपुरीला) आला. मुखलिसखानाने मरहूम खानजमान फतेहजंग याचा मुलगा खाने आलम याला लिहून खजिना हुजुरात आणवावा अशी बादशहाने आज्ञा केली. जुम्लतुल्मुल्क असदखान याने खाने आलम बरोबर काही संरक्षक पथके द्यावीत अशीहि आज्ञा झाली.

## सतरा जानेवारी १७००

काल रात्री बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान, मतलबखान, फतेहुल्लाखान, नाहरखान वगैरे सरदारांनी उद्या कही आणण्यासाठी जावे, हमीदुद्दीनखान-बहादुर यांनी हुजुरात राहावे व सद्रुद्दीन मुहंमदखान कोरबेगी याने बहरामंदखानाच्या गोटाची व्यवस्था पाहाण्यासाठी छावणीत राहावे.

इसहाकखान याने शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्यापाशी राहावे. आणि बेदारबख्ता-पाशी असलेले मुहंमद सादिक व त्याचे मोगल पथक यांनी हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर याला आज्ञा केली की : तुम्ही छावणीभोवती फिरा व मोर्चे, भिंती (संरक्षणाच्या) वगैरे पाहून परत या.

### (आठ शाबान ४३)एकोणीस जानेवारी १७००

बादशहांना कळविण्यात आले की : चीनकुलीजखान हा धान्य, रसद व काफिला हे बहरुर(म्हसवड)हून घेऊन सापगावला(रहमतपूरजवळ) आला आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'हमीदुद्दीनखानबहादुर याने तो सापगावाहून हुजुरात आणावा व चीनकुलीज-खानाने विजापुरात असलेला सरब (दारूगोळ्यासाठी लागणारी विशिष्ट प्रकारची माती) व बारुद(दारू) ही बादशाही छावणीत आणावी.

मन्सूरखान याने विनंती केली की : मावळे सैनिक म्हणत आहेत की आमचा पगार थकलेला आहे. आमचे पगार दिले तर आम्ही सातारगड मिळवून देतो. बादशहांनी आज्ञा केली की : महालातून एकलाख छत्तीस हजार रुपये मन्सूरखान कडे द्यावे आणि मावळे सैनिकांना त्यातून पगार वाटण्यात यावा.

बादशहांना कळविण्यात आले की : गनीम (मराठे) चंदनवंदनच्या किल्ल्यातून बाहेर पडतात व कही आणण्यास गेलेल्या (छावणीतील) सैनिकांवर हल्ले करतात. बादशहांनी आज्ञा केली की : करावलांनी (टेहेळणीचे सैनिक) संध्याकाळपर्यंत दोन कोसावर मुक्काम करावा.

### वीस जानेवारी १७००

बादशहांनी काल रात्री आज्ञा केली की : काफिला, रसद, धान्य वगैरे आणण्यासाठी हमीदुद्दीनखानबहादुर याला पाठवायचे ठरले होते. त्याऐवजी खटावचा ठाणेदार याने तो छावणीत आणावा.

सियादतखान याने कळविले की : चीनकुलीजखान हा काफिला वगैरे घेऊन कृष्णेच्या पलीकडे आला आहे. त्याने सडे येऊन भेटून जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

बहरामंदखान, मरहूम सैफुल्लाखानाचा मुलगा असदुल्ला, मरहूम यक्काताजखान याचा मुलगा नूरुल्ला यांनी हरिणे वगैरेच्या भेटी दिल्या.

मरहूम लोधीखान याचा मुलगा व कोहिजचा किल्लेदार व फौजदार अहमद याला आपला मुलगा मुहंमद जमाल याला आपला नायब म्हणून ठेवून हुजुरात येण्याची परवानगी मिळाली. मरहूम इरादतखान याचा मुलगा शाकिरुल्ला याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. खटावचा ठाणेदार रामचंद याच्या लिहिण्यावरून बजीहुद्दीनचा मुलगा मुहंमद शफी याला मन्सब देण्यात आली.

मुरीदखान याने विनंती केली की : माझ्या पथकातील माणसे परवानगीवाचून तोफखान्यात नोकर झाली आहेत. तोफखान्याचा अधिकारी मुहंमद आकिल(मुशरफ) याने त्यांना कैद करावे अशी आज्ञा झाली.

### एकवीस जानेवारी १७००

चीनकुलीजखान हा येऊन बादशहाला भेटला. छावणीतील हत्ती व उंट तळावर

(ब्रह्मपुरी) पाठविण्याचे बादशहांनी ठरविले. बादशहांनी सर्व हत्ती पाहिले. त्यापैकी पन्नास हत्ती खाशांचे व दीडशे हत्ती छावणीचे हे ठेवून बाकीचे हत्ती चीनकुलीजखानाबरोबर तळावर (ब्रह्मपुरी) पाठवावे अशी आज्ञा झाली.

मरहूम दिलेरखानाचा मुलगा दिलावरखान, राणा जयसिंग (उदयपूर) चा चाकर सुजानसिंग शिवधर, मरहूम मामूरखान याचा वकील मुल्ला मुहंमद कासिम, मीर नूरुल्लाह, चीनकुलीजखानाच्या तैनातीतील युलबारसखान ही मंडळी येऊन बादशहांना भेटली. हत्तीखान्याचा मुशरफ (हिशेब अधिकारी) व नारायणदास याचा मुलगा कुंवरसिंगयाने हमीदुद्दीनखानबहादुर याच्या द्वारे विनंती केली की : आज आपले लग्न आहे. आमंत्रणाचा स्वीकार व्हावा. बादशहांनी त्याला दसऱ्याचे बक्षीस, मन्सबीत वाढ व खिलतीची वस्त्रे देऊन निरोप दिला. मुखलिसखानाने कळविले की : परगणे अस्तनी (अथणी) याच्या फौजदारीवर औरंगखानाच्या ऐवजी मलिकशहा व नाहरखान यांची नेमणूक करण्यात आली आहे. औरंगखानासंबंधी काय आज्ञा ? त्याच्या मन्सबीत कपात करावी अशी आज्ञा झाली.

काल यारअलीबेग याने विनंती केली की : गुलबर्याचा काजी अब्दुल्ला याचा भाऊ सय्यद मझली हा पन्नास चिलखतधारी स्वारी व पन्नास बंदुकची यांना घेऊन आला आहे. मोहिमेत भाग घेऊन गनिमांना मारावे या उद्देशाने तो आला आहे. त्याच्या भेटीसंबंधी काय आज्ञा ? बादशहा म्हणाले, 'त्याला उद्या भेटीस घेऊन या.' बादशहांनी त्याच्याकडे (सय्यद मझली) पाचशे रुपये पाठविले.

आज सय्यद मझलीने यारअलीबेग याच्या मध्यस्थीने बादशहाची भेट घेतली. त्याने एक तल्वार, दोन भाते नजर म्हणून दिले. बादशहा म्हणाले, 'तुमचे चिलखतधारी स्वार व बंदुकची यांनाहि माझ्यासमोर आणा.' त्याप्रमाणे त्यांना आणण्यात आले. बादशहांनी पाचशे मोहरा, होन व रुपये एकत्र करून त्यांना बक्षीस म्हणून दिले. बादशहा म्हणाले, 'परमेश्वराची इच्छा असल्यास मी काफरांचा तल्वारीने निकाल लावीन.' (इन्शाल्लाहोताला कुफ्फाररा तहे तेग मी नुमायम.) (तहे तेग म्हणजे तल्वारीच्या खाली पाडीन, तल्वारीचे पाणी पाजीन असाहि अर्थ होतो. सय्यद मझली हा जिहादच्या प्रेरणेने मोहिमेत भाग घेण्यास आला होता. त्या संदर्भात हे वाक्य आहे.)

खानबहादुर नुस्रतजंग याच्या पुढील सहकाऱ्यांना मन्सबीच्या बढत्या देण्यात आल्या. जिंजीच्या फत्तेनंतर ते बादशाही छावणीत आले होते. (१) सय्यद कबीर, (२) सय्यद नूर आलम, (३) सय्यद कुतब आलम, (४) सय्यद आसमान, (५) अहमद बेग.

खासगी जवाहिरखान्याचा मुशरफ शेख गुलाम मुहंमद उर्फ सीताराम (धर्मांतरित) याची लाहोर सुभ्यात नेमणूक करण्यात आली.

### बावीस जानेवारी १७००

इंदापूरचा ठाणेदार मोगलखान बादशहांना भेटून निरोप घेऊन गेला.

मरहूम खानदौरान याचा मुलगा मुहंमद सालेह हा वऱ्हाड सुभ्यात देवगाव या परगण्याला गेला होता. त्याला बडतर्फ करण्यात आले होते. त्याने विनंती केली की : मी

सफशिकनखान याजबरोबर राहून चाकरी बजावतो. ही वेळ मोहिमेची व काम करून दाखविण्याची आहे. मला विनाकारण बडतर्फ करण्यात आले आहे. बादशहांनी त्याची मन्सब बहाल केली.

सय्यद अब्दुस्सलामचा मुलगा सय्यद मदसर(?) याने विनंती केली की : मी आजारी आहे. मला सहा महिन्याची रजा मिळावी व तळावर (ब्रम्हपुरी) अगर बुऱ्हाणपूरला जाण्याची परवानगी देण्यात यावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'हकीम(वैद्य) अहमद यांनी जाऊन त्याची तपासणी करावी.'

मरहूम शरीफखान याचा मुलगा सय्यद अब्दुर्रहीम याने वऱ्हाडच्या सुभ्याच्या उत्पन्नात सत्याऐंशी हजार रुपयांची भर घातली. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : छावणीत बैल व उंट हे चरविण्यासाठी दक्षिणेकडे पाठवावे. वंजारी लोकांनाहि छावणीच्या बाहेर पाठवावे.

हत्तीखान्याचा अधिकारी खुदाबंदाखान याने पाहणीसाठी हत्ती आणावे अशी आज्ञा झाली.

अहमदनगरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : चांदोर(चांदवड)चा ठाणेदार जाधवराय (जाधवराव) याने काही वाटमाऱ्यांना ठार मारले. त्यांच्यापाशी एक हजार मोहरा व पाचशे रुपये मिळाले. ते जाधवरावनी स्वतःपाशी ठेवून घेतले आहेत.

याबाबतीत मुखलिसखानाने चोकशी करून वृत्तांत सादर करावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

चीनकुलीजखानाच्या सैनिकांना (ब्रम्हपुरी)तळावरील खजिन्यातून तीन महिन्याचा पगार द्यावा अशी आज्ञा झाली. बुऱ्हाणपूर सुभ्याच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : मरहूम इल्हामखान याचा नातू शेखुला हा बुऱ्हाणपूरच्या बादशाही रमण्यात (राखीव कुरण) गेला. त्याने बंदुकीने नीलगाईची शिकार केली. यामुळे करावलीच्या लोकांनी त्याला पकडून बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिमदखान याजपाशी नेले. मोतिमदाखानाने त्याला कैद करून ठेवण्यासाठी कोतवालाकडे पाठविले.

## तेवीस जानेवारी १७००

सकाळी पुढीलप्रमाणे बातमी कळली : बादशाही सैन्यातील मावळे हे रात्री संधी साधून तटाला दोर लावून सातारा किल्ल्यावर चढण्याच्या बेतात होते. याच वेळी बरसा(?) किल्ल्याहून दोनशे(मराठ्यांचे) पायदळ सातारा किल्ल्याच्या कुमकेसाठी येत होते. तटावर जाण्याच्या तयारीत असलेले मावळे(बादशाही सैन्यातील)पाहून किल्ल्याच्या मदतीस येणाऱ्या मराठ्यांनी आरडाओरडा केला. त्यामुळे किल्ल्यातील लोक सावध झाले. बादशाही सैन्यातील मावळ्यांनी मराठ्यांवर हल्ला चढविला. चकमकीत मावळ्यांनी पाच गनीम ठार मारले आणि पंधरा जणांना कैद केले. गनिमांचे इतर लोक पळून गेले. मावळ्यांनी कैद्यांना मन्सूरखानाकडे आणले. मन्सूरखानाने आपला मुलगा मुहंमद काजम याच्या हस्ते कैदी आणि मृतांची डोकी हुजुरात पाठविली. कैद्यांना नायब कोतवाल मुहंमद अमीन याने बंदोबस्तात ठेवावे अशी आज्ञा झाली.

डफळापूर(जत तालुका, सांगली जिल्हा)चा ठाणेदार अमानुल्लाखान याच्या जागी बरसा(?)चा ठाणेदार व अलीचा मुलगा मुहंमद रजी याला नेमण्यात आले. अमानुल्लाखानाच्या मन्सबीत कपात करण्यात आली. अमानुल्लाखानाचा भाऊ हिदायतुल्ला याला अंदी(उम्दी, इंडी ?)चा ठाणेदार म्हणून त्याच्या भावाच्या ऐवजी नेमण्यात आले.

हत्तीखाना तळावर(ब्रम्हपुरी) पाठविण्याचे तूर्त स्थगित करावे अशी आज्ञा झाली.

निजामराव याने बहरामंदखानाच्या मध्यस्थीने विनंती केली की : जहागीर नसल्यामुळे मी त्रस्त आहे. जहागीर द्यावी व मदतीदाखल काही मिळावे. त्याला एक हजार रुपये द्यावे व त्याला जहागीर मुकर्र करून द्यावी आणि त्या कामासाठी एक सजावली(अंमलबजावणीचा अधिकारी) नेमावा अशी आज्ञा झाली. निजामरावला एक हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब आहे.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव वगैरे गनीम सरदारांनी खानापूरच्या ठाण्याला वेढा घातला. तेथील ठाणेदार आवजी आढळराव हा त्यांच्याशी लढला. गनिमांची (मराठ्यांची) पाच माणसे ठार झाली. शेवटी गनिमांनी त्याला कैद करून नेले. खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान) हा सोळा कोसावरून गनिमांच्या पाठलागास जात आहे.

**चोवीस जानेवारी १७००**

बादशहांनी काल आज्ञा केली होती की : चीनकुलीजखानबहादुर याने बादशाही छावणीतून एक काफिला ब्रह्मपुरीच्या तळावर पोहोचवावा व विजापूरला जाऊन तेथून दारूगोळा आणावा. नाहरखानाने तीन हजार स्वारांसहित खटावपर्यंत त्याची सोबत करावी. खटावपासून म्हसवडपर्यंत मंबाजी व रामचंद्र(ठाणेदार) यांनी चीनकुलीजखानाबरोबर असावे. आज आज्ञा झाली की : नाहरखानाने चीनकुलीजखानाची सोबत करण्याची जरूर नाही.

सकाळी बादशहांनी ख्वाजा मुहरमखान याला बोलावून म्हटले, 'लष्करातील मावळ्यांनी चाळीस गनीम(मराठे)यांना कैद करून आणले आहे. याशिवाय तीन माणसे पूर्वीपासून कैदेत आहेत. नायब कोतवाल मुहंमद अमीन याजपाशी ही माणसे ठेवली आहेत. त्या सर्वां(कैदी)ना कृष्णेच्या काठावर घेऊन जा आणि त्यांचा वध करा.' या सुमारास बादशहांना कळविण्यात आले की : कैद्यांमध्ये एक मुलगा आहे. त्याच्या संबंधी काय आज्ञा ? बादशहांनी काजी मुहंमद अक्रम याला बोलावून विचारले, 'त्यांना ठार मारून नमाज पढून मोकळे होणे धर्माला अनुसरून आहे की नाही!' काजी मुहंमद अक्रम म्हणाला, 'त्यांना ठार मारण्यात यावे.'

आज्ञेप्रमाणे ख्वाजा मुहरमखान कैद्यांना कृष्णेच्या काठी घेऊन गेला. तेथे सर्वांचा वध करण्यात आला. दारूगोळा विजापुराहून आणण्यासाठी चीनकुलीजखानाकडे पाचशे उंट पाठविण्यात यावे अशी उंटखात्याचा दारोगा व खिदमतगुजारखानाचा मुलगा अब्दुलकादर याला आज्ञा करण्यात आली. औरंगाबादेचा हकीम(वैद्य) याची त्याचा बाप रघुनाथसिंग याच्या वैद्यकीच्या जागेवर नेमणूक करण्यात आली.

### पंचवीस जानेवारी १७००

शहाजादा बेदारबख्त, मुल्तानचा सुभेदार मुहंमद मुइजुद्दीन, असदखान जुम्लतुल्मुल्क यांच्या नावाने पत्रे रवाना झाली. सरफराजखान हा सहा हजार जात व पाच हजार स्वार असलेला मन्सबदार होता. तो बेदारबख्तापाशी तैनात होता. त्याला हूजुरात बोलावण्यात आले. येण्यात त्याने टाळाटाळ चालविली. त्याची मन्सब एक हजाराने कमी करण्यात आली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने कही आणण्यासाठी उद्या जावे अशी बादशहाने आज्ञा केली. नंतर त्याच्या विनंतीवरून मुखलिसखान याने जावे अशी आज्ञा झाली. फतेहुल्लाखानाला हत्ती वगैरे तळावर पोहोचविण्यासाठी पाठविण्याचे ठरले. फतेहुल्लाखानाच्या ऐवजी मुखलिसखानाच्या बरोबर मुहंमद इसहाक याने जावे अशी आज्ञा झाली.

ख्वाजा मुहरमखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली : माझा नायब आणि इस्माइल-बगचा मुलगा मुहंमद इब्राहीम हा अहमदनगरच्या सरकारी बागांचा व्यवस्थापक आहे. त्याने बागेच्या मागील उत्पन्नात चार हजार आठशे रुपयांची भर घातली आहे. पूर्वी त्याला तेथील बक्षी व वाकनीस हे हुद्दे होते. तेथील सवानेहनिगार(वृत्तांत लिहून पाठविणारे) याच्या तक्रारीवरून त्याला वरील हुद्यावरून काढले. तो निरपराधी आहे. त्याला पूर्वीचे हुद्दे बहाल व्हावे. बादशहांनी ती मान्य करून त्याच्या मन्सबीत वाढ केली.

मुखलिसखानाने विनंती केली की : गनीम कृष्णेच्यापलीकडे आक्रमण करतील तर सावधगिरी म्हणून निजामरावला मी तिकडे नेमतो. बादशहांनी विनंती मान्य केली.

काल रात्री बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर याला बोलावून म्हटले, 'तीन–चार दिवसात सातारगड आपल्या ताब्यात येईल. तुम्ही कुणाला तरी पाठवून कऱ्हाडवरून उजव्याबाजूने पन्हाळगडचा रस्ता आणि आमच्या निवासासाठी (दौलतखाना) योग्य जागा पाहून येण्यास सांगा.'

मरहूम इखलासखन (हा मराठ्यांशी लढताना मारला गेला होता) याची समशेर तहव्वुरखानाने बादशहांच्या नजरेखालून घातली.

### सव्वीस जानेवारी १७००

काल रात्री गुर्जबर्दारांचा अधिकारी सियादतखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली : शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन (मुल्तानचा सुभेदार), जुम्लतुल्मुल्क असदखान (पंतप्रधान व ब्रह्मपुरीच्या तळाचा व्यवस्थापक), व ठठ्ठाचा (सिंध) सुभेदार हिफजुल्लाखान यांच्या नावाची पत्रे, त्यांच्याकडे पाठविण्यासाठी म्हणून माझ्याकडे देण्यात आली आहेत. पण बादशाही छावणीपासून तळापर्यंत (ब्रह्मपुरी) घोडे व डाक चौकी यांची व्यवस्था नाही. याशिवाय वाटेत गनिमांची (मराठ्यांची) भारी धामधूम आहे. संरक्षक पथक (बदर्का) बरोबर असल्याशिवाय गुर्जबर्दारांना पत्रे घेऊन जाणे शक्य होणार नाही. बादशहांनी आज्ञा केली की, 'पत्रे यारअलीबेग याच्यापाशी द्या. म्हणजे तो हरकाऱ्यांच्या बरोबर ती पाठवील.'

उस्मान करावल हा मोर्चे पाहून परत आला. तो म्हणाला, 'सुरुंग एका बुरूजापर्यंत पोहोचला आहे. अजून एक टप्पा शिल्लक राहिला आहे.' तरबियतखान मीर आतिश (दारूगोळ्याचा अधिकारी) याची विनंती आहे की: माझ्या सैनिकांना पगार न मिळाल्याने ते त्रस्त आहेत. त्यांना खर्चाला म्हणून काही मदत व्हावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'फतेह दौलत कौल याने महालातून दहा हजार रुपये घेऊन तरबियतखानाकडे पाठवावे. त्याने तरबियतखानाबरोबर असलेल्या जहागिरदारांच्या (मन्सबदार) सैनिकांना पगार वाटावा.'

**सत्तावीस जानेवारी १७००**

काल रात्री बादशहांनी, बादशहाजादा आज्जम याचा वाढदिवस म्हणून त्याच्याकडे दहा हजार रुपयांची मोत्ये, पाचू, माणके इत्यादी रत्ने पाठविली.

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, सफशिकनखान, मुहंमद इसहाक, मतलबखान, नाहरखान वगैरे सरदार हे कही आणण्यासाठी गेले आहेत. फतेहुल्लाखानाने विनंती केली की : परवानगी असल्यास मीही बक्षीउम्मुल्काबरोबर जाईन. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांनी अल्लाहबख्श व खुदाबख्श या न्हाव्यांना खिलतीची वस्त्रे दिली.

डफळापूरचा बदललेला ठाणेदार अमानुल्लाखान याला हुजुरात बोलावण्यासाठी मुद्दाम एक सजावली (अधिकारी) पाठविण्याची आज्ञा झाली.

शहाजादा बेदारबख्त याचा बक्षी नेकनामखान व वाकनीस इखलास केश हे बादशहाचा निरोप घेऊन गेले. पण बेदारबख्ताला जाऊन न मिळता ते परंड्यात बसून राहिले आहेत असे कळले. बादशहांनी त्यांच्या मन्सबीत कपात केली.

गुलबर्ग्याहून सय्यद मझली हा (जिहादसाठी) आला होता. त्याच्या सहकाऱ्यांना देण्यासाठी तीन घोडे काढून ठेवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'तुम्ही जाऊन तरबियतखान व मन्सूरखान यांचे मोर्चे आणि सुरुंग पाहून या.' त्याप्रमाणे तो गेला.

**अठ्ठावीस जानेवारी १७००**

सातारगड किल्ल्याच्यासमोर शमशीरखानाच्या मुलांचे ठाणे होते. तिकडून किल्ल्याकडे गनिमांची (मराठ्यांची) वर्दळ चालू आहे का हे पाहून येण्यासाठी उस्मान करावल याने तिकडे जाऊन यावे अशी आज्ञा झाली. याबाबतीत तरबियतखानाच्या सूचनांप्रमाणे अंमल करण्यात यावा अशीही आज्ञा बादशहांनी दिली.

आवजी आढळराव याला मराठ्यांनी कैद करून नेले होते. त्याला दोन हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती. त्याची मन्सब काढून घेण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेचा अधिकारी खाने आलम याने विनंती केली की : मला अगर नांगादव(?)चा परगणा जहागीर द्यावा. तेथील फौजदारी पण देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

यारअलीबेग याने बादशाही सैन्यातील मावळ्यांची तक्रार मांडली. मावळे म्हणाले, 'बादशहांनी पगार वाटपासाठी एक लाख छत्तीस हजार रुपये दिले होते. मन्सूरखान याने नऊ हजार मोहरा पगार म्हणून वाटल्या. बाकीचा पगार देत नाही. सातारा फत्ते झाल्यावर देईन म्हणतो.' पगार देण्यास मन्सूरखानास हुकुम देण्यात यावा. मावळ्यांची बाकी किती आहे हे लेखी कळविण्यात यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

सुलेमान बेगचा मुलगा मुहंमद सैफी हा हैदराबादेत तैनात होता. त्याने विनंती लिहून पाठविली की : मी रुस्तमदिलखान याच्याबरोबर राहून कामगिरी केली आहे. चिंचोळीचा परगणा मला तनखाजहागीर आहे. तेथील फौजदारी पण मला देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

इंदापूरचा ठाणेदार मोगलखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : यमाजी (निमाजी किंवा ममाजी ?) शिंदे याला दोन हजारी जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. तो खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेतून वेगळा झाला आहे. त्याने मला पुढीलप्रमाणे निरोप पाठविला आहे : मला पाच हजारी जात व पाच हजार स्वार अशी मन्सब देण्यात यावी. माझा मुलगा खमाजी (रखमाजी ?) याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तो वारला. त्याच्या ऐवजी त्याच्या मुलाला मन्सब मिळावी. असे झाले तर मी त्याला हुजुरात घेऊन येईन.

बादशहांनी आज्ञा केली की : यमाजी शिंदे याची पूर्वीची मन्सब कायम ठेवण्यात येईल. त्याच्या मयत मुलाच्या मुलाला त्याच्या योग्यतेप्रमाणे मन्सब देण्यात येईल.

अहमदनगरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : शहाजी वगैरे सरदार (मराठ्यांचे) पाच हजार स्वार व आठ हजार पायदळ घेऊन मौजे कोनला (गोंदा ?) जवळ तळ देऊन आहेत. तिकडील फौजदारांना ताकीदपत्रे लिहावीत अशी आज्ञा झाली.

बादशहाजादा आज्जम याने कळविले की : तरबियतखानाच्या मोर्च्यातून दगडीगोळे तोफातून उडविण्यात येतात. काही गोळे माझ्या शय्यागृहाजवळ येऊन पडले. (मारा किल्ल्याच्या दिशेने आणि गोळे माझ्या तंबूजवळ.) तोफांच्या भडिमाराची ही काय पद्धत आहे? हमीदुद्दीनखानबहादुर याने त्यांना (गोलंदाज) ताकीद द्यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

## एकोणतीस जानेवारी १७००

हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : आज्ञेप्रमाणे मी मन्सूरखानाच्या मोर्च्यावर गेलो होतो. गुर्गे अली तोफ मी पाहिली. ही तोफ दुसरीकडे हलवून जरी गोळे सोडले तरी बादशहाजादा आज्जमशहा यांच्या मोर्चाच्या दिशेने ते जाणार. तोफ हलवायला दुसरी जागा नाही. यावर बादशहा म्हणाले, 'तोफ हलविण्याची जरुर नाही. गोळे मात्र काळजीपूर्वक सोडण्यात यावेत.'

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग याने खजिना व काफिला हा परंड्याहून तळावर (ब्रह्मपुरी) आणीत होता. धनाजी जाधव वगैरे सरदार हे दहा

हजार स्वार घेऊन उंदरगाव(?) परगण्यात चालून आले. जुल्फिकारखान याने खजिना व काफिला तेथे ठेवला व तो गनिमांच्या पारिपत्यासाठी धावून गेला. चवदा शाबान(पंचवीस जानेवारी) रोजी युद्ध झाले. जुल्फिकारखान नुस्रतजंग, दाऊदखान, रामसिंग (हाडा), राव दल्पत (बुंदेला) वगैरेंनी गनिमांच्या सैन्यात आपले घोडे घातले. गनिमांच्या (मराठ्यांच्या) शंभर सैनिकांना नरकात पाठविण्यात आले (मारण्यात आले). गनीम पळून गेले. घोडे, भाले इत्यादी लूट गाजींच्या (मोगलांच्या) हाती लागली. बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली. मजुरा झाला.' हरकाऱ्यांना चार होन बक्षीस म्हणून देण्यात आले.

तहव्वुरखानाने विनंती केली की : दोनशे बाण (धनुष्याचे) तयार झाले आहेत. आज्ञा झाली की : मीर सामानच्या कचेरीचा दारोगा (अधिकारी) याने ते (बाण) मोर्च्यात पाठवून द्यावे.

अजमीरचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान याने विनंती लिहून पाठविली की : सुजान-सिंग राठोड याचा नातू राजसिंग हा कामाचा माणूस आहे. टोडा परगण्याची फौजदारी व मन्सब त्याला देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

**तीस जानेवारी १७००**

पाईन विलायतचा देशमुख सूर्याराव (पिसाळ) हा येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

काल हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : मुहंमदबेग हा मुखलिसखान याच्याबरोबर कही आणण्यासाठी गेला होता. वाटेत त्याने बंदुकीने एका वाघिणीची शिकार केली. वाघिणीला आणले आहे. बादशहांनी वाघीण पहिली. ते म्हणाले, ' शकुन छान झाला.' वाघीण शहाजादा आज्जम याजकडे पाठवावी अशी आज्ञा झाली.

फतेहुल्लाचा मुलगा फकीरुल्ला, सुभे दख्खानचे नियम लागू असलेल्या अधिकाऱ्यांच्या, खात्याचा हिशेबतपासनीस सुरदास, यांच्या मन्सबी वाढविण्यात आल्या.

पाईन विलायतचा ठाणेदार नाहरखान, खुदाबंदाखान व कौरखान्याचा अधिकारी तहव्वुरखान यांना प्रत्येकी एकेक हत्ती बक्षीस देण्यात आला.

मतलबखान करावल बेगी याने अर्ज केला की : मी कहीच्या पथकाबरोबर डोंगराळ भागात गेलो होतो. तेथे खुप हरिणे आढळतात. बादशहा म्हणाले, 'शिकार करून या.'

हरकाऱ्यांच्या तोडून कळले की : यक्कताजखान याचा भाऊ मीर नूरुल्ला हा टेह-ळणी (गस्त) साठी संगमाच्या पलीकडे आहे. बादशहांनी आज्ञा केली की : त्याने बादशाही छावणीच्या समोर दोन बाणाच्या अंतरावर दहा स्वारांनिशी टेहेळणी करीत राहावे.

नागोजी माने व मसूरचा ठाणेदार मंबाजी यांना प्रत्येकी पाच हजार रुपये किंमतीचा हत्ती बक्षीस म्हणून देण्याची आज्ञा झाली.

**एकतीस जानेवारी १७००**

काल रात्री हमीदुद्दीनखानबहादुर याने मुहंमद अमीनखान, सियादतखान, नजरकुली व त्यांच्या मोगल सैनिकांना बादशहाच्या आज्ञेप्रमाणे कळविले की : मराठे चंदनवंदन किल्ल्या-

तून बाहेर पडतात व प्रवासी व बादशाही सैनिक यांच्यावर हल्ले करतात. तुम्ही तिकडे जाऊन दबा धरून बसा. मराठे बाहेर आले की हल्ला करून त्यांना ठार मारा. आज्ञेप्रमाणे सादतखान, तुर्कताजखान व हुसेन सय्यद हे मध्यरात्रीच्या सुमारास तिकडे गेले. गनिमांचे सहा सैनिक उंटावर स्वार होऊन (किल्ल्यातून) बाहेर रस्त्यावर आले. तुर्कताजखान, हुसेन सय्यद वगैरे त्यांच्यावर चालून गेले. त्यांनी एकाला ठार मारले आणि तीन माणसे जिवंत पकडली. घोडे, शस्त्रे वगैरे गाजींच्या (मोगलांच्या) हाती पडली. कैद्यांना कचेरीत आणण्यात आले. बादशहांनी आज्ञा केली की : कैद्यांना मुहंमद अमीन नायब कोतवाल यांच्या हवाली करण्यात यावे. घोडे व शस्त्रे लुटीत ज्यांनी मिळविली त्यांनी आपल्यापाशी ठेवावी. अशीच पद्धत चालू राहावी.

मझीराम व जगतराम हे चाकरीच्या आशेने बादशहांना भेटले. पुढील इसमांच्या मन्सबी वाढविण्यात आल्या. सीमबरचा मुलगा ताज, शेख नूरुल्हक याचा जावई सय्यद बहादुर, सय्यद हाशम, मीर खलील, मुहंमद हयात कारीगर.

बादशहाजादा आज्जमशहाने सांगितले की, 'सातारा किल्ल्यावरून एक हुक्का आतिशी (अग्निबाण, ग्रिनेड) मोर्चात येऊन पडला होता. तो आणला आहे.' बादशहांनी तो पाहिला. त्यांनी म्हटले, 'तोफखान्यात द्या. असाच हुक्का आतिशी आपल्याकडेही तयार करा म्हणावे.'

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान परत येईपर्यंत त्याच्या गोटाची व्यवस्था सजावलांचा मुशरफ मस्त अली याने पाहावी अशी आज्ञा झाली. हत्तीखाना वगैरे कारखाने तळावर घेऊन जाण्यासाठी बादशहांनी फातेहा खैर पढून फतेहुल्लाखानाला निरोप दिला. याच संदर्भात सकाळी हमीदुद्दीनखानबहादुर यांनी विनंती केली की : हत्ती कही अणण्यासाठी गेले आहेत. त्यांना आणण्यात यावे अशी आज्ञा झाली. मुहंमद गुल यानेहि कारखान्याबरोबर तळावर जावे अशी आज्ञा झाली.

मुल्तफतखानाच्या विनंतीवरून हरिदास जव्हेरी याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. हाजी ख्वाजा गैस याला शाल देण्यात आली. हत्तीखान्याचा करोडी मीर नोमान याला हत्तीखान्याबरोबर तळावर (ब्रम्हपुरी) जाण्याठी निरोप देण्यात आला.

नळदुर्गच्या बातम्यात पुढील मजकूर होता : खाने आलम याच्या भावकीचा (बिरादरी) अब्दुल्कादर हा दोन हजारी व हजार स्वार असा मन्सबदार होता. तो स्वतःच्या जहागिरीवर आला होता. तो मरण पावला.

रूहुल्लाखानाच्या विनंतीवरून गुलाबराय यास जहागिरदारांच्या हिशेबतपासणीच्या कामावर नेमण्यात आले. शेख सिराजुद्दीन हा घोड्यांना डाग देण्याच्या कामावर देखरेख अधिकारी (अमीन) म्हणून काम करीत होता. मक्केला पाठविण्याच्या खैरात व नजर याचा व्यवस्थापक म्हणून त्याला मक्केला पाठविण्यात आले. त्याच्या जागेवर काजी मुहंमद अक्रम याच्या विनंतीप्रमाणे मरहूम काजी अब्दुल्ला याचा मुलगा ख्वाजा मुहंमदशहा याची नेमणूक करण्यात आली.

## एक फेब्रुवारी १७००

बादशहाजादा मुअज्जम याने (काबुलहून) डाळिंबाच्या दोन व नासपातीची एक अशा करंड्या पाठविल्या होत्या. त्या काल बादशहांच्या नजरे खालून गेल्या.

छावणीतील हकीम (वैद्य) सादिक याचा भाऊ हिदायतुल्ला शहाजहानाबाद (दिल्ली) सुभ्यात अत्तरखान्याचा अधिकारी (मुशरफ) होता. तो मरण पावला. बादशहांनी हकीम सादिक याला सुतकातून काढून आपल्याजवळ बोलावून त्याला एक बालाबंद (अलंकार) देऊन त्याचे समाधान केले.

फतेहुल्लाखान याला हत्ती व इतर कारखाने तळवार (ब्रह्मपुरी) घेऊन जाण्यासाठी त्याच्याबरोबर पंधराशेऐंशी स्वारांचे सैन्य देण्यात आले. यादी बादशहांनी पाहिली. त्यांनी आज्ञा केली की : खटावचा ठाणेदार रामचंद्र व बुध पाचगावचा ठाणेदार रणदुलाखान व इतर ठाणेदार यांनी आपापल्या हद्दीत फतेहुल्लाखानाची सोबत करावी अशा अर्थाची ताकीदपत्रे पाठविण्यात यावीत.

बादशहा म्हणाले, 'उद्या शुक्रवारी बक्षीउलमुल्क बहरामंदखान हा कही घेऊन येईल. शहाजाहादा आज्जमच्या पथकांनी दोन तीन कोस पुढे जाऊन त्याची वाट पाहावी व मुहंमद अमीनखान याने घाटापाशी तळ देऊन राहावे.' मावळ्यांचा अधिकारी अब्दुर्रहीम याला तोफखान्यातून बदलून इतर सैन्याच्या तुकड्यात बदलावे अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान याजबरोबर सैन्य थोडे आहे. तरीही त्याने त्याचे आघाडी, पिछाडी, उजवी फळी अशी रचना केली. त्याने भक्कम कही (दाणाचारा, गवत, लाकूडफाटा इत्यादी) आणली आहे. बादशहाच्या चौकशी-वरून सांगण्यात आले की : मुहंमद आकिल हलगर्जीपणा करीत नाही. असदखान, यार मुहंमद अली, शर्फुद्दीन हुसेन हे बक्षींच्या बरोबर गेले आहेत. फौजेची तपासणी मरहूम सैफुल्लाखान याचा मुलगा असदुल्ला याने करावी अशी आज्ञा झाली.

विजापूरच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : (राजा) रामाची सकुटुंबीय व संबंधी माणसे यांना राव सरुपसिंग याने विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान यांच्या हवाली करून त्याबद्दलची रसीद (पोच) घेतली आहे. बादशहाची आज्ञा होती की : त्यांना विजापूरच्या किल्ले अर्क (आतील कोट) मध्ये ठेवावे. पण किल्ले अर्कचा किल्लेदार इनायत-खान याला तसे हुकुम मिळाले नाहीत. त्यामुळे लुत्फुल्लाखान याने वरील मंडळींना कोतवाली चबुऱ्यापाशी ठेवले आहे. काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'इनायतखानाला याबद्दल लिहा.'

## दोन फेब्रुवारी १७००

बादशहा म्हणाले, 'रूहुल्लाखानाच्या मोर्चाच्या दिशेने एक मशीद आहे. ती पाहून या.' अधिकारी तिकडे गेले. त्यांनी पाहणी केली. परत येऊन ते म्हणाले, 'तेथे एक ओटा आहे. भोवती सर्वत्र कबरीच कबरी आहेत.' त्यांनी जागेचा नकाशा बादशहांना दाखविला. बादशहांनी आज्ञा केली की : येथून त्या जागेचे अंतर किती आहे हे पाहून मस्त अली व उस्मान करावल यांनी यावे.

### तीन फेब्रुवारी १७००

सकाळी बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर, हाफिज ख्वाजा मुईज व फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन यांना म्हटले, 'तुम्ही पण जाऊन (मोर्च्याजवळील) मशीद पाहून या.' त्याप्रमाणे ते गेले. परत येऊन त्यांनी कळविले की : मशिदीची डागडुजी होणे आवश्यक आहे. बादशहा म्हणाले, 'डागडुजी (मरम्मत) करा.' मस्त अलीने कळविले की : येथून मशिदीपर्यंतचे अंतर एक कोसाला थोडे कमी आहे. बादशहांनी म्हटले, 'या महिन्याच्या सत्तावीस तारखेस(सात फेब्रुवारी, १७००) त्या ठिकाणी माझ्यासाठी तंबू उभा करा.'

आज्ञेप्रमाणे मन्सूरखान हा मोर्च्यातून येऊन बादशहांना भेटला. दोन घटकांनंतर बादशहांनी त्याला मोर्च्यात परत पाठविले. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम हाही मोर्च्यातून येऊन बादशहांना भेटला.

यासीनखानबहादुर वगैरेंनी धान्याच्या गोण्यांनी भरलेले आठ हजार बैल छावणीत आणले. यासीनखानबहादुर व त्याचा सहकारी कादरदादखान हे येऊन बादशहांना भेटले. फतेहुल्लाखान याला कारखाने बरोबर घेऊन तळाकडे(ब्रम्हपुरी) पाठविण्यात आले.

खान फीरोजजंग याने लिहिले की : बंडखोर निगूनबख्त(गोंड राजा) याने माहूरचा परगणा उध्वस्त करण्यासाठी आपले सरदार पाठविले. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी मी महामदखान, बख्तरखान, अब्बासअलीखान व फकीर मुहंमदखान यांना सैन्य देऊन पाठविले. त्यांनी गनिमांचे पारिपत्य केले व त्यांना माहूरच्या परगण्यात येऊ दिले नाही. माझ्या सरदारांनी कामगिरी बजावली आहे. तिचे चीज व्हावे. त्यांचे हुद्दे व दर्जा काय आहे याची चौकशी करावी अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : अनूपसिंगाचा मुलगा राव सरूपसिंग(बीकानेरचा राजा) हा देवीच्या रोगाने ब्रम्हपुरीच्या छावणीत वारला.

### चार फेब्रुवारी १७००

सकाळी बादशहा हे ख्वाजा दौलतला म्हणाले, 'तुम्ही, बक्षीउलमुल्क मुखलिसखान व करावलखान असे तिघे तरबियतखानाच्या मोर्च्यावर जाऊन(काय चालले आहे)पाहणी करून या.' त्यांनी मोर्चे पाहून व परत येऊन कळविले की : दमदुमा व सुरंग तयार होत आहेत.

मुहियुद्दीन कुली गुर्जबर्दार याने फतेहुल्लाखान आणि त्याच्या बरोबरचे कारखाने म्हसवडपर्यंत पोहोचवावे. तेथून खाने आलम व मुनव्वरखान यांनी तळावरून(ब्रह्मपुरी) येऊन हत्ती ब्रह्मपुरीला घेऊन जावे. आणि तेथून खजिना व रसद ही फतेहुल्लाखान, सरफराजखान व राजा अवधूतसिंग(ओछर्याचा राजा) यांनी बादशाही छावणीत आणावी अशी आज्ञा झाली.

फतेहुल्लाखानाने विनंती केली की : माझ्या पथकाची पगारबाकी देण्यात यावी अथवा तळावरच्या (ब्रह्मपुरी) खजिन्यावरून पगार मिळण्याची व्यवस्था व्हावी. खजिना बादशाही छावणीत आला की पगार देण्यात येईल असे बादशहांनी सांगितले.

अननासगड(?)च्या बातम्यावरून कळले की : तेथील किल्लेदार व सय्यद नूरूद्दीन याचा मुलगा शेख हा मरण पावला. त्याच्या जागी सय्यद अब्दुल्हादी याचा मुलगा सय्यद अली याची नेमणूक करण्यात आली.

शेख सिराजुद्दीन याला दानधर्माच्या वस्तू घेऊन मक्केला पाठविण्याचे ठरले होते. ते स्थगित करण्यात आले.

तरबियतखानाने कळविले की : मरहूम जहांगीर कुलीखान याचा मुलगा मुहंमद अश्रफ हा मोर्च्यात उत्कृष्ट कामगिरी बजावीत आहे. त्याच्या आणि भीमसिंगाच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिकदखान याने इल्हामुल्लाचा मुलगा शबीरा (याने परवानगीवाचून राखीव बादशाही जंगलात शिकार केली होती) याला हुजुरात पाठवावे असे आज्ञापत्र त्याला पाठविण्यात आले.

इंदापूरचा ठाणेदार लालखान याने लिहिले की : द्राक्षांचा मोसम बहरात आहे. आज्ञा झाल्यास कहारांच्या बरोबर द्राक्षे पाठवीन. आज्ञा झाली की, 'संरक्षक पथकाची व्यवस्था (द्राक्षे आणण्यासाठी) करण्यास ठाणेदारांना लिहिण्यात यावे.'

नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या तैनातीतून बडतर्फ झालेले पन्नास मोगल स्वार (मध्य आशियातून आलेले) हे छावणीत आले. जुल्फिकारखानाचा छावणीतील वकील (कारभारी) कासिम अली याला त्यांनी पगारबाकीसंबंधी फार त्रास दिला. त्याची बेअब्रू करावी असा त्यांनी बेत केला. बादशहांनी मुहंमद अमीन नायब कोतवाल याला म्हटले, 'त्यांची समजूत घाला.' त्याला ते जमले नाही. ते न्यायकचेरीत गेले. कासिम अलीला बोलावण्यासाठी काजीने प्याद्याला (पायदळ शिपाई) धाडले. तो येण्यापूर्वीच कासिम अलीने आपली मालमत्ता सुल्तान नजर वकील याजपाशी ठेवली आणि तो स्वतः शहाजादा आज्जम याच्या गोटात लपून बसला. मोगल स्वारांनी फारच उच्छाद मांडला.

या सुमारास बादशहांस कळविण्यात आले की : कासिम अलीला एक लाख रुपयांचे कर्ज आहे. जुल्फिकारखानाने त्याच्या ऐवजी शेख जमालुद्दीन याला आपला वकील म्हणून नेमला आहे. आता मोगल स्वार त्याच्या मागे लागले. बादशहा म्हणाले, 'त्या फुटक्या नशिबाच्या जमालुद्दीनला कशासाठी नेमले? इतर कुणाला तरी नेमण्यासंबंधी नुस्रतजंगाला लिहा.' कासिम अली एक आठवडाभर गैरहजर राहिला. त्याला बादशाही लष्करात आणण्यात आले. नायब कोतवालान त्याचे रक्षण करावे अशी आज्ञा झाली. कोतवाल चबुऱ्याजवळ कासिम अलीचा तंबू उभा करण्यात आला.

## पाच फेब्रुवारी १७००

सुभे वऱ्हाडच्या बक्षीगिरीवर व वाकनिसीवर मुइजुद्दीन होता. त्याच्या ऐवजी मरहूम अतीकुल्लाखान याचा मुलगा नसीरुद्दीन याची नेमणूक करण्यात आली.

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याच्या नावाने फर्मान पाठविण्यात आले.

जगतरामचा मुलगा लछराम हा करकराकखान्याचा अधिकारी (मुशरफ) होता. त्याच्याकडे गल्लूरखान्याचे काम पण देण्यात आले.

चांभार गोंद्याचा ठाणेदार खुदायारखान याने लिहून विनंती केली की : अहमदनगरचा बक्षी व वाकनीस हा माझ्याविरुद्ध आहे. त्याने माझ्याविरुद्ध काही लिहिले तर त्याची आधी चौकशी करावी. त्याची विनंती मान्य करण्यात आली.

तरबियतखानाने लिहिले की : मरहूम दिलावरखान याची मुले असदुद्दीन व अब्दुलकरीम ही मोर्च्यात छान काम करीत आहेत. त्यांना पथक देण्यात यावे. वीस वीस माणसांचे पथक देण्याची आज्ञा झाली.

बक्षीउलमुल्कखान (मुखलिसखान) याने कही आणण्यासाठी जावे अशी आज्ञा झाली.

## सहा फेब्रुवारी १७००

सुरत बंदरचा अधिकारी दियानतखान याच्या नावाने आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

मुल्तफतखान याची आई वारली. मुल्फतखानाचा मुलगा अब्दुर्रहीम याने तिचे शव तळावर (ब्रह्मपुरी) न्यावे अशी आज्ञा झाली.

बारामती व बाली(?) वगैरेचा ठाणेदार यासीनखान हा हुजुरात होता. मला बारामतीकडे जाण्यास निरोप मिळावा अशी त्याने विनंती केली. बादशहा म्हणाले, 'त्याने प्रथम फतेहुल्लाखानाबरोबर म्हसवडपर्यंत जावे.' यासीनखानाने विनंती केली की : आज्ञा असेल तर किल्ले बालागीर(?)च्या वाड्या जाळून मी बारामतीकडे जाईन. विनंती मान्य करण्यात आली. बादशहा म्हणाले, 'बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने कही आणण्यासाठी त्या किल्ल्याकडेच जावे.' आज्ञेप्रमाणे मुखलिसखान, यासीनखान वगैरे तिकडे गेले. त्यांनी वाड्या जाळल्या. नंतर ते कही आणण्यासाठी पुढे रवाना झाले.

ठाणेदारांनी फतेहुल्लाखानाबरोबर आपले सैनिक द्यावे अशी आज्ञा झाली.

शेख मुइनुद्दीन याचा मुलगा मुहंमद जाफर याला देशी जाण्यासाठी दोन वर्षांची रजा देण्यात आली.

(मोर्च्याजवळच्या मशिदीपाशी) तंबू पाठविण्यासंबंधी काय आज्ञा म्हणून फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन याने विचारले. बादशहा म्हणाले, 'तेथे कबरी फार आहेत. तंबू पाठविणे स्थगित करा.'

आज्ञेप्रमाणे काल संध्याकाळी हमीदुद्दीनखानबहादुर व मतलबखान हे तरबियतखानाचे मोर्चे व दमदुमा पाहाण्यास गेले. ते परत येऊन म्हणाले, 'तरबियतखान खूप मेहनत करून दमदुमा तयार करीत आहे. आताच आपण तेथे जावे असे नाही. दमदुमा तयार झाल्यावर जावे.'

## सात फेब्रुवारी १७००

बादशहाजादा आज्जमशहा यांनी दोन कनाती व पडदे पाठविले. ते पाहून बादशहा खुश झाले.

विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान व कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान यांच्या नावे फर्माने पाठविण्यात आली. बादशहांना कळविण्यात आले की : कोण्या एका सौदागराचे मालाने भरलेले जहाज फिरंग्यांनी लुटले. बादशहा म्हणाले, 'दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याला लिहून लुटलेल्या मालाचा तपशील मागवा.'

बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने अर्ज केला की : खटावचा ठाणेदार रामचंद्र याने लिहिले आहे की, 'दलपतरावचा मुलगा बाळाजी हा माझा नातेवाईक आहे. त्याला माझ्या पथकात (बिरादरी) घेण्याची आज्ञा व्हावी.' विनंती मान्य करण्यात आली.

सरकारी बागांचा व्यवस्थापक ख्वाजा मुहरमखान याने विनंती केली की : रहमतपूरच्या सरकारी बागातून आंब्यांना खूप बहर आला आहे. पण धामधूम (गनिमांची) आणि बादशाही सैनिकांच्या व अधिकाऱ्यांच्या वर्दळीमुळे, बागेचे रक्षण होत नाही. खटावचा ठाणेदार रामचंद्र याला लिहून रहमतपूरला ठाणे कायम करण्याची आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

## आठ फेब्रुवारी १७००

मुहंमद नसीरुद्दीन याला वऱ्हाडची बक्षीगिरी व वाकनिशी या जागांवर नेमण्यात येऊन तिकडे जाण्यास निरोप देण्यात आला. सियादतखानाने पुढीलप्रमाणे विनंती केली : मतलबखान याचा आजा अब्दुर्रसूल हा सुभे अकबराबाद येथे तैनात आहे. त्याने मला पुढीलप्रमाणे लिहिले आहे :–बादशहा सध्या जिहादची मोहीम करीत आहेत. मला त्या प्रदेशातील किल्ले घेण्याच्या कामाची माहिती आहे. मला हुजुरात बोलावून घ्यावे.' बादशहांनी विनंती मान्य करून म्हटले की, 'या बाबतीत मुखलिसखानाने लिहावे.'

नायब कोतवाल मुहंमद अमीन याने कळविले की : खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या स्वारांनी त्याचा वकील कासिम अली याला त्रास दिला. त्याचे रक्षण करावे म्हणून आज्ञा झाली. त्याला कोतवाली जवळ आणून ठेवला आहे. चौकशीत आढळले की स्वारांना एकतीस हजार रुपये पगारबाकीचे द्यावे लागतात. त्यापैकी पंधरा हजार रुपये वसूल झाले. बाकी वकीलाकडून मिळावे व वराती हातात देण्यात याव्या (असे स्वारांचे म्हणणे आहे). वकीलाने म्हटले, 'खान नुस्रत (जुल्फिकारखान) याने मला सनद पाठविली नाही. स्वारांनीही काही आणले नाही. जुल्फिकारखानाची तर माहिती आहे. मला सरकारातून सात हजार रुपये मिळावे म्हणजे मी (पगारबाकीची) कशीबशी तरतूद करीन. काय आज्ञा?'

बादशहा म्हणाले, 'कासिम अली वकील ही मातबर असामी आहे. वजाहतखानाने खान नुस्रतजंग याला लिहावे. पगारासाठी सरकारातून बक्षीस म्हणून रक्कम मागू देऊ नये.'

बादशहांना कळविण्यात आले की : सियादतखान याने मराठ्यांचे तीन सरदार कैद करून आणले आहेत. त्यांना कोतवालाच्या हवाली करण्यात आले आहे. कैद्यांपैकी एक जण चंदनवंदनच्या किल्लेदाराचा मुलगा आहे. तो म्हणतो की :– मला जीवदान मिळाल्यास मी चंदनवंदनचा किल्ला बादशहांना मिळवून देईन. बादशहाच्या आज्ञेने त्याला (किल्लेदाराच्या मुलाला) मुल्तफतखानाकडे पाठविण्यात आले. मुल्तफतखानाने काही गोष्टी त्याला विचारल्या व नंतर बादशहांना त्या कळविल्या. बादशहांनी आज्ञा केली की : त्याला (किल्लेदाराच्या मुलाला) गुलालबार (बादशहाचे निवासस्थान) मध्ये ठेवण्यात यावे.

रात्री बादशहांनी काजी मुहंमद अक्रम याला आपल्या शय्यागृहात बोलाविले. बादशहा त्याला म्हणाले, 'बसा.' काजी अक्रम एका कोपऱ्यात बसला. बादशहा आपल्या जागेवरून उठून त्याच्यापाशी येऊन बसले आणि म्हणाले, 'रमजानचा महिना आणि ईद ही सोलापुरात पार पाडावी अशी माझी इच्छा होती. पण माझे अधिकारी बादशाही कामगिरी मन:पूर्वक करीत नाहीत (नोकरान दर कारे बादशाही तन नमी देहंद). मी असंख्य वेळा ताकीद करतो (ताकीद ब ताकीद मी फर्मायम), पण त्याचा काहीच परिणाम होत नाही (हेच असर नमी कुनद).' बादशहा दोन घटकांपर्यंत आपल्या अधिकाऱ्यांची गाऱ्हाणी सांगत होते. यानंतर त्यांनी काजी अक्रमला आपल्या तंबूकडे परतण्यास निरोप दिला.

आज रात्री बादशहांनी यारअली बेग याला एकांतात बोलावून म्हटले, 'बक्षीउल्मुल्क बहरामंदखान हा कही आणण्यासाठी जाईल तेव्हा तुम्ही त्याचा नायब म्हणून काम करावे. अर्थात या गोष्टीला बहरामंदखान राजी असेल तर.' ही गोष्ट यारअलीबेग याने बहरामंदखानाला कळविली.

**नऊ फेब्रुवारी १७००**

बादशहाजादा मुहंमद मुअज्जम याने (काबुलहून) डाळिंबे व नासपाती याच्या दोन करंड्या पाठविल्या. इंदापूरचा ठाणेदार मुगलखान याने साडेचार शेर द्राक्षे पाठविली. ती राजपुत्र यांना व इतरांना देण्यात आली. काही द्राक्षे बादशहांनी खाल्ली.

काल रात्री बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : सातारगडच्या लोकांनी किल्ल्यातून दमदुम्यावर दगडांची सतत वृष्टी केली. त्यामुळे एक मनुष्य ठार आणि चार माणसे जखमी झाली. दमदुम्याचे तीन कजावे (वरखाली नेण्याची पेटीवजा वाहने) दमदुम्याहून निसटून मोडून गेले. नायब कोतवाल मुहंमद अमीन याने खजिन्यातून व सराफयातून रिकाम्या संदुकी (पेट्या) दमदुम्याच्या भोवती कसून बांधण्यासाठी मोर्च्यात पाठविल्या. अमीर उमरावांजवळचे दीडशे शक्का (भिस्ती, पाणी वाहणारे) यांना मोर्च्यात ठेवण्यात आले. मराठ्यांनी आगी लावल्या तर पाण्याने विझविण्यासाठी ही तजवीज करण्यात आली.

## दहा फेब्रुवारी १७०० (एक रमजान)

लाहोरची सुभेदारी व जम्मूची फौजदारी या हुद्यावर इब्राहीमखान हा होता. त्याला बदलण्यात येऊन त्याच्या जागेवर बादशहाजादा मुअज्जम बहादुर शहा याची नेमणूक (काबुल सुभ्याला जोडून) करण्यात आली. लाहोरवर मुअज्जमचा नायब म्हणून सफशिकनखान तनबक्षी याचा भाऊ मुहंमद अस्करी व जम्मूवर फौजदार म्हणून निसारखान उर्फ मीर गुल याने काम करावे असे ठरले.

इब्राहीमखानाने हुजुरात दोन तीन महिन्याच्या आत यावे. वाटेत त्याने दोन हजार बुंदेले स्वार व पाच हजार बुंदेले पायदळ यांची भरती करावी व त्यांना घेऊन यावे. यासाठी अकबराबाद आग्र्याच्या खजिन्यातून त्याला पन्नास हजार रुपये देण्यात यावे अशी आज्ञा करण्यात आली.

ख्वाजा मुहरमखान याने कळविले की : छावणीतील लोकांनी छावणीभोवती काकडी वगैरे भाजीपाल्याची लागवड केली आहे. मुहरमखानाने काकडी वगैरेच्या करंड्या बादशहा समोर आणल्या. बादशहांनी संबंधितांना अकरा होन बक्षीस म्हणून दिले.

आज बादशहाच्या कारकिर्दीचे चव्वेचाळीसावे वर्ष सुरू झाले.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने शनिवारी कर्हा आणण्यासाठी जावे अशी आज्ञा झाली.

हमीदुद्दीनखानबहादुर याने बादशहांना कळविले, 'बहिर्जी पांढरे हा गवत व लाकुड-फाटा आणण्यासाठी नांदगिरी किल्ल्याकडे गेला होता. मराठ्यांच्या वीस स्वारांनी गुरे-ढोरे लुटून नेली. हे कळताच बहिर्जी पांढरे हा त्यांच्यावर चालून गेला. गनिमांची बरीच माणसे ठार झाली. गनिमांचा पराजय झाला. त्यांचे वीस घोडे धरण्यात आले. गुरेढोरे सोडवून घेण्यात आली.' बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला. सेवा मान्य झाली.'

पाईन विलायतचा (वाई वगैरेचा प्रदेश) ठाणेदार नाहरखान याने रसद व धान्य आणण्यासाठी स्वतःच्या ठाण्याकडे जावे अशी आज्ञा करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव हा बादशाही इलाख्यातून महादेवाच्या डोंगराकडे येत आहे. त्याचा पाठलाग करीत खानबहादुर नुस्रतजंग हा तळाच्या (ब्रम्ह-पुरी)च्या पलिकडे सात कोसावर आला आहे.

तळावरच्या (ब्रम्हपुरी) बातम्यावरून कळले की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त याने खजिना भाळवणी (मंगळवेढा तालुका) पर्यंत आणला (त्यावेळी आम्दा परगण्यात भाळवणीचा समावेश होता).

बादशहांना कळविण्यात आले की : फतेहुल्लाखान याने कारखाने खाने आलम याच्या हवाली केले. आणि रसद, धान्य व खजिना ही घेऊन तो सरफराजखान व राजा अवधूतसिंग (ओछर्याचा राजा) यांच्याबरोबर हुजुरात येण्यासाठी म्हसवडहून रवाना झाला आहे.

मिरज मुर्तजाबादेचा किल्लेदार मुफ्तखरखान याला मुहंमद शरीफ याच्या जागी फीरोजगड यादगीर (गुलबर्गा जिल्हा) च्या किल्लेदारीवर नेमण्यात आले.

दौलताबादेचा किल्लेदार सय्यद मुर्तजाखान हा मरण पावला होता. त्याच्या जागी त्याचा मुलगा सय्यद मुबारकखान याची दौलताबादेच्या किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली.

मुफ्तखरखानाचा मुलगा जुहूरुल्ला यास त्याच्या बापाच्या जागी मुर्तजाबाद मिरजेचा फौजदार म्हणून नेमण्यात आले.

### अकरा फेब्रुवारी १७००

फतेहुल्लाखान हा म्हसवडपर्यंत हत्ती पोहोचवून आणि तेथून खजिना व रसद घेऊन हुजुरात आला. तो येऊन बादशहांना भेटला. छावणीतील धान्यबाजाराचा करोडी सय्यद इमामुद्दीन हा सांपगावाला धान्य आणण्यासाठी गेला.

मरहूम सरबराहखानाचा मुलगा व गवंडी खात्याचा प्रमुख जमाल याने कळविले की : सातारगडच्या किल्ल्याच्या बांधण्यात जे दगड वापरले आहेत तसेच (परिसरातून) काढण्यात आले आहेत त्याला दहा मोहरा बक्षीस म्हणून देण्यात आल्या.

काल बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'तुम्ही जाऊन दमदुमा पाहून या.' त्याने विनंती केली की : आयुष्यात माझा एकही (रमजानचा) उपवास चुकला नाही. येथे घाटमाथ्यावर फार श्रम पडत आहेत. तरी पण आपला हुकुम मानण्यात कसूर होणार नाही. बादशहा म्हणाले, 'आता जाणे स्थगित करा. रात्र संपण्यास सहा घटका राहिल्या असता जा. तुम्हाला खुदादाद हा गुलालबारचा दरवाजा उघडून देईल.'

आज्ञेप्रमाणे हमीदुद्दीनखानबहादुर हा दमदुमा पाहून आला. त्याने सांगितले की, 'तरबियतखान हा दमदुमा उत्तम रीतीने तयार करीत आहे. बेलदारांचा दारोगा खिदमत गुजारखान याचा मुलगा हीराचंद हा खूप देखरेख करीत आहे.' हीराचंदच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

सफशिकनखानाचा भाऊ मुहंमद अस्करी याला लाहोरचा नायब सुभेदार म्हणून नेमण्यात आले होते. त्याच्या ऐवजी काश्मीरचा सुभेदार फाजलखान याला शहाजादा मुअज्जमचा नायब म्हणून लाहोरवर नेमण्यात यावे असे ठरले.

हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : अवधूतसिंग बुंदेला (ओछर्याचा राजा) हा खजिन्याबरोबर (ब्रह्मपुरीहून) आला आहे. माझ्या फौजेत तैनात होण्याची त्याची इच्छा आहे. त्याची विनंती मान्य करण्यात आली.

अस्करखान याच्या नावे मुहंमदाबाद बीदरच्या सुभेदारीचे फर्मान रजाबेग गुर्जबर्दार हा पोहोचवून आला.

बादशहाजादा आज्जमशहा हा बादशहांना भेटण्यास आला. बादशहांनी सातारा किल्ल्याचा नकाशा मागविला. बादशहा म्हणाले, 'तुमचे स्वतःचे मोर्चे कुठे व आमच्या बादशाही सैन्याचे मोर्चे कुठे आहेत हे मला दाखवा.' बादशहाजादा आज्जमशहा म्हणाला, 'तीन बाजूचे मोर्चे आपले (बादशहाचे, बादशाही सैन्याचे) व दोन बाजूचे मोर्चे माझे आहेत.'

बादशहा म्हणाले, 'किल्ल्याला चोहोकडून चांगलाच वेढा पडला आहे. पण मग हे कळत नाही की मराठ्यांची किल्ल्यातून ये–जा होते ती कोणीकडून.' शहाजादा आज्जमने म्हटले, 'मरहूम शमशेरखान याची मुले माझ्या तैनातीत आहेत. त्यांचे मोर्चे रूहुल्लाखानाच्या मोर्च्याला जवळ आहेत. त्यामधील अंतरातूनच कदाचित गनिमांची ये–जा होत असावी.'

यावर बादशहा काही बोलले नाहीत.

**बारा फेब्रुवारी १७००**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) हा पन्हाळगडापासून बारा कोस तातडीने सैन्यासहित चालून गेला. त्याने धनाजी जाधवाचे बाजारबुणगे लुटले. धनाजी जाधव हा पळून भूदरगड किल्ल्याकडे गेला. बादशहा म्हणाले, 'शाबास, आफरीन बाद. सेवा मान्य झाली, मजुरा झाला.'

सुरत बंदरातून दोन दोन हजार मण दारू गोळा तयार करण्याचे सरब आदि सामान विजापूर सुभ्यात पोहोचवावे अशी ख्वाजा सलाह गुर्जबर्दार याला आज्ञा करण्यात आली. सद्रुद्दीन मुहंमदखान व मुनीमखानाचा मुलगा काजम यांनी सरकारी हत्ती तळावर नेऊन पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

आज्ञेप्रमाणे बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, सरफाराजखान व सफशिकनखान वगैरे (कही आणण्यासाठी) गेले आहेत असे बादशहांना कळविण्यात आले.

मुखलिसखान (बक्षीउल्मुल्क), राजा अवधूतसिंग बुंदेला (ओछर्चाचा राजा), सद्रुद्दीन मुहंमदखान कोरबेगी विजापूर, बेदारबख्ताच्या तोफखान्याचा दारोगा मिर्जाबेग, बकाबिलखान, इत्यादी मंडळी येऊन बादशहांना भेटली.

घनश्यामराम हा मागे दिवंगत संताजी (घोरपडे) चा दिवाण होता. तो राणोजी (घोरपडे) चा सहकारी होता. तो चाकरीच्या आशेने रूहुल्लाखान याच्या मध्यस्थीने येऊन बादशहांना भेटला. त्याने सात मोहरा नजर केल्या. बादशहांनी त्याला खिलतीची वस्त्रे दिली व त्याला एक घोडा देण्यात यावा अशी आज्ञा केली.

**तेरा फेब्रुवारी १७००**

मुखलिसखान याने कळविले की : सोलापूरहून बदललेला किल्लेदार याह्याखान हा (ब्रह्मपुरीच्या) तळावर पोहोचला आहे. त्याच्यासंबंधी काय आज्ञा ? बादशहांनी आज्ञा केली की : याह्याखानाने, जुम्लतुलमुल्क असदखान (मुख्यप्रधान) याजबरोबर ब्रह्मपुरीला राहावे. याह्याखानाला सहाशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती.

तरबियतखानाने लिहिले की : कहारांचा दारोगा मुहंमद दूला व गवंड्यांचा दारोगा जमाल कौल हे दमदुमा तयार करण्याच्या कामात खूप झटत आहेत. त्यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मरहूम अघारखान याचा नातू शमशेरबेग याला हमीदुद्दीनखानबहादूर याच्या विनंतीप्रमाणे त्याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

### चवदा फब्रुवारी १७००

अब्दुलकरीमखान हा मराठ्यांच्या हल्ल्यात (यातच इखलासखान मारला गेला) जखमी झाला होता. तो येऊन बादशहांना भेटला. त्याची मन्सब वाढविण्यात आली. गुर्जदारांचा दारोगा सियादतखान याने अर्ज केला की : माझ्या पथकातील इसमांचे चाळीस महिन्याचे पगार बाकी आहेत. औरंगाबादच्या व ब्रह्मपुरीच्या खजिन्यातून देवविण्याची व्यवस्था व्हावी. आज्ञा झाली की : येथे सरकारातून पाच महिन्याचा पगार देण्यात येईल. बाकीचा ब्रह्मपुरीच्या तळावरून देण्यात येईल.

मतलबखानाने विनंती केली की : माळव्यातील माझ्या जहागिरीत नसरी अफगाण याने दोन हजार स्वार गोळा करून धामधूम चालविली आहे. त्याचे पारिपत्य करण्यासाठी माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याला आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

### पंधरा फेब्रुवारी १७००

बादशहांना कळविण्यात आले की : काल रात्री बादशाही छावणीतील मावळे सातारा किल्ल्याच्या दरवाज्यापर्यंत गेले. दरवाज्यासमोर मराठ्यांचा चौकी पहारा होता. त्या ठिकाणी चकमक झाली. मराठ्यांची दोन तीन माणसे मारली गेली व दहा माणसे जखमी झाली. तीन तरवारी व इतर वस्तू हाती सापडल्या. त्या मन्सूरखानाने बादशहाकडे पाठविल्या.

### सोळा फेब्रुवारी १७००

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याचा भाऊ शरफुद्दीन हा शहाजहानाबाद(दिल्ली)ला होता. आज्ञेप्रमाणे तो येऊन बादशहांना भेटला.

चीनकुलीजखान हा आज्ञेप्रमाणे विजापूर सुभ्यातून सरब व बारूद(बंदुकी दारू) घेऊन छावणीजवळ आला. त्याला छावणीत येण्याची परवानगी(दस्तक) देण्यात आली.

आज बुऱ्हाणपुर सुभ्याचा सवानेहनिगार(वृत्तांत लिहिणारा) मुहंमद जमील, खानबहादुर नुस्रतजंग जुल्फिकारखान याच्या फौजेचा सवानेहनिगार ख्वाजा लुत्फुल्ला, बादशहाजादा आज्जम याचा मुलगा शहाजादा मुहंमद आलीतबार ही मंडळी येऊन बादशहांना भेटली.

### सतरा फेब्रुवारी १७००

चीनकुलीजखान हा येऊन बादशहांना भेटला. मुहतशमखान याची मन्सब काढून घेण्यात येऊन त्याला बारा हजार रुपयांचे वर्षासन देण्यात आले होते. त्याने मन्सब बहाल व्हावी म्हणून विनंती केली. बादशहांनी विनंती मान्य केली नाही. त्यांनी आज्ञा केली की : त्याला (मुहतशमखान) महालातील(अंत:पुरातील) खजिन्यातून दोन हजार रुपये वाटखर्चासाठी द्या. त्याला जा म्हणावे.

### अठरा फेब्रुवारी १७००

राजा बिशनसिंग(जयपूरचा राजा) याचा मुलगा कुंवर विजयसिंग याने पुढीलप्रमाणे

अर्ज पाठविला : माझे वडील राजा ब्रिशनसिंग हे बादशहाजादा मुहंमद मुअज्जम बहादुरशहा याजपाशी तैनात होते. ते एकोणीस रजब रोजी (एकोणीस डिसेंबर १६९९) वारले. त्यांना अडीच हजार जात व अडीच हजार स्वार, त्यात पाचशे स्वार दो अस्पा (दुघोडी) अशी मन्सब होती.

बादशहांनी अंबरच्या जमीनदारी (राज्य) वर कुंवर विजयसिंग याची नेमणूक केली. त्याला मन्सब व राजा ही पदवी देण्यात आली. बिशनसिंगाच्या दुसऱ्या मुलालाही मन्सब देण्यात आली.

बादशहांनी चीनकुलीजखानाला आज्ञा केली की : उद्या तुम्ही कही आणण्यासाठी जा. कही घेऊन आल्यावर कऱ्हाडची गढी दुरुस्त करण्यासाठी मी पाठविणार आहे. या कामासाठी खिदमतगुजारखानाचा मुलगा अब्दुल्कादर व तीनशे बेलदार यांनी चीनकुली-जखानाबरोबर (कऱ्हाडला) जावे अशीही आज्ञा झाली.

सातगड (जिंजी प्रांत) चा किल्लेदार दर्याखान याने किल्लेदारीचा राजीनामा नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याचा नायब जमशीदखान याजकडे पाठवून लिहिले की : माझा मुलगा मुहंमद मुराद याचा मृत्यू झाल्यापासून माझी बुद्धी ठिकाणावर नाही. त्याला तूर्त किल्ले-दारीवरून बदलण्यात यावे पण मन्सब बहाल ठेवण्यात यावी अशी आज्ञा झाली.

## एकोणीस फेब्रुवारी १७००

डफळापूरचा बदललेला ठाणेदार अमानुल्लाखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहाच्या आज्ञेप्रमाणे साजबेग गुर्जदार हा डाळिंब्याच्या दोन करंड्या नवाब जीनतुन्निसा बेगम (बादशहाची मुलगी) यांजकडे तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचवून परत आला.

आज्ञेप्रमाणे सकाळी हमीदुद्दीनखानबहादुर हा तरबियतखानाचे मोर्चे व दमदुमे पाहून आला आणि त्याने बादशहाला वृत्तांत सादर केला.

मुखलिसखान याने कळविले की : काकरोनचा किल्लेदार सय्यद नूरमुहंमद फजा-इलखानी याने लिहिले आहे की :– मी किल्ल्याचा ताबा घेण्यास गेलो. पण तेथील बदललेला किल्लेदार व इरादतखानाचा मुलगा हिदायतुल्ला किल्ला ताब्यात देत नाही. बादशाही फर्मान हाती आल्याशिवाय मला तसे करता येत नाही असे तो म्हणतो. तर डाकचौकीने फर्मान पाठविण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

आज्ञेप्रमाणे शेख हिदायतकेश व उस्मान करावल हे बादशहाजादा आज्जम याचे मोर्चे पाहण्यास गेले होते. त्यांनी येऊन सांगितले की : बादशहाजाद्याचे मोर्चे किल्ल्याच्या पायथ्यापर्यंत पोहोचले आहेत. दमदुमाही तयार होत आहे. तेथील नकाशा तयार करून दाखवावा अशी आज्ञा झाली. चीनकुलीजखान हा कही आणण्यासाठी किलीद फतह (वसंतगड) कडे गेला आहे असे बादशहांना कळविण्यात आले.

## वीस फेब्रुवारी १७००

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याने बादशहांना अर्ज पाठविला होता तो त्यांनी नजरेखालून घातला. रूहुल्लाखान याने पुढीलप्रमाणे विनंती केली : राजा बिशनसिंग याचा

मुलगा विजयसिंग याला जयसिंग (हाच सवाई जयसिंग) ही पदवी देण्यात आली आहे. दुसऱ्या मुलाला विजयसिंग ही पदवी मिळाली आहे. त्यांच्या हुजुरात येण्यासंबंधी काय आज्ञा. बादशहांनी आज्ञा केली की : जयसिंग (सवाई जयसिंग) याने सैन्यासहित हुजुरात यावे. येथे कामे करावयाची आहेत. विजयसिंगाने काबुलला राहावे. जयसिंगाची इच्छा असेल तर त्याने भावाला आपल्याबरोबर हूजुरात आणावे नाहीतर आपल्या देशात (राज्यात) ठेवावे.

बादशहांना कळविण्यात आले की : सियादतखान हा भल्या पहाटे गस्त घालण्यासाठी गेला होता. आज्ञा झाली की, 'गनिमांची डोकी (कापलेली) हुजुरात आणावी.'

बागांचा व्यवस्थापक खोजा मुहरमखान याने विनंती केली की : कडूस (पुणे जिल्हा) च्या ठाण्यात मंदीछूर नावाचा अप्रतिम आंबा होतो. निजामराव (तेथील ठाणेदार) याला आज्ञा व्हावी की :– त्या आंब्याच्या करंड्या सुरक्षितपणे हुजुरात पाठवीत जाव्या. विनंती मान्य करण्यात आली.

अनवा (माळव्यात, सिरोंजच्या उत्तरेस) चा फौजदार शेर अफगनखान याने सामन धंधेरा वगैरे बंडखोरांची डोकी पाठविली होती. ती नायब कोतवालाच्या हवाली करावी अशी आज्ञा झाली.

### एकवीस फेब्रुवारी १७००

बादशहांनी आज्ञा केली होती की : बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा यांच्या मोर्च्यातील गोलंदाजांना बोलावून घेण्यात यावे. त्याप्रमाणे ते हजर झाले. बादशहा हिदायतकेशला म्हणाले, 'या गोलंदाजांना विचारा, या अवधीत त्यांनी काय कामगिरी केली? कोणता बुरुज पाडला? कोठले तट ढासळले?' गोलंदाज म्हणाले, 'किल्ल्यातील लोक आमच्यावर मारा करतात तसे दगडी व लोखंडी गोळे आम्हाला कोण देतो?' बादशहांनी हिदायतकेशला म्हटले, 'हमीदुद्दीनखानबहादुरपाशी चौकशी करून कळवा.' गोलंदाजांना इनायतुल्ला व हिदायतकेश यांनी बादशहाजाद्याकडे घेऊन जावे अशी आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : बीडहून वंजारी लोक रसद घेऊन येत होते. ते चंदनवंदन नजीक पोहचले तसे गनिमांचे सैनिक त्यांच्यावर तुटून पडले. उभय पक्षाची बरीच माणसे मृत अगर जखमी झाली. गनीम (मराठे) हे पाचशे बैल व रसद लुटून घेऊन गेले.

### बावीस फेब्रुवारी १७००

काल जुम्लतुल्मुल्क असदखान (मुख्यप्रधान) यांनी तळावरून (ब्रम्हपुरीच्या) मुरंबा, चटण्या, बदाम, पिस्ते इत्यादींच्या चार बरण्या पाठविल्या. त्यापैकी काही मुरंबा व चटणी ही शहाजादा आज्जम याजकडे पाठविण्याची आज्ञा झाली.

बादशहांनी फतेहुल्लाखानाबरोबर एक हजार स्वार देऊन रवाना केले. ते म्हणाले, 'गनीम (मराठे) हे चंदनवंदन किल्ल्यातून बाहेर पडले आणि त्यांनी वंजाऱ्यांचे बैल, रसद व धान्य ही लूटून नेली. तुम्ही जाऊन त्यांचे पारिपत्य करा आणि बैल सोडवून आणा.'

आज्ञेप्रमाणे फतेहुल्लाखान गेला. त्याला कळले की, मराठ्यांनी रसद नांदगिरी किल्ल्याच्या पायथ्याशी ठेवली आहे. फतेहुल्लाखान नांदगिरीकडे गेला. किल्ल्याखालच्या वाड्या त्याने जाळल्या. तेथील मालमत्ता व गुरेढोरे त्याने लुटली. मराठ्यांनी रसदेचे धान्य किल्ल्यात नेऊन ठेवले होते. मराठ्यांनी किल्ल्यावरून बंदुकीचा व दगडांचा मारा केला. त्यात फतेहुल्लाखानाचा मुलगा फकीरुल्ला व इतर तीन चार माणसे जखमी झाली. त्यानंतर फतेहुल्लाखान हा हुजुरात आला. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला. सेवा मान्य झाली.'

## तेवीस फेब्रुवारी १७००

आज शहाजादे आज्जम यांनी दोन ईडलिंबू (तुरंज) व दोन अननस ही बादशहांना दिली. बादशहांनी मुद्दाम स्वाराबरोबर एक ईडलिंबू तळावर (ब्रम्हपुरीच्या) जीनतुन्निसा बेगमकडे पाठविला.

बारामावळचा जमीनदार (देशमुख) खंडोजी हा बहरामंदखानाच्या मध्यस्थीने मुसलमान झाला. खंडोजीला दोन हजार पाचशे जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. बादशहांनी तीत पाचशे (जात) ची वाढ केली. खंडोजीला खिलतीची वस्त्रे, घोडा व सियादतमंदखान ही पदवी देण्यात आली.

कृष्णा नदी पार करण्यासाठी नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याजकडे नावा देण्यात आल्या होत्या. त्या विजापूर सुभ्यात होत्या. त्या इस्लामपुरी (ब्रह्मपुरी) च्या घाटावर आणण्यात याव्यात अशी आज्ञा झाली.

## चोवीस फेब्रुवारी १७००

चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात असलेला जाधवराव हा येऊन बादशहांना भेटला. त्याला अडीच हजार जात व दोन हजार चारशे स्वार अशी मन्सब होती. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात येऊन कऱ्हाडची गढी दुरूस्त करण्यासाठी त्याने जावे अशी आज्ञा करण्यात आली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने कही आणण्यासाठी जावे अशी आज्ञा झाली.

## पंचवीस फेब्रुवारी १७००

आज बादशहांनी एका दरवेशाबरोबर (फकीर) एकांतात एक घटका चर्चा केली. बादशहांच्या आज्ञेने त्याला बोलावण्यात आले होते. चर्चेनंतर त्याला निरोप देण्यात आला.

जाधवराव याला मंबाजीच्या जागी कऱ्हाडची ठाणेदारी देण्यात आली. त्याची एंकदर मन्सब तीन हजार जात व दोन हजार सातशे स्वार अशी होती.

सकाळी हमीदुद्दीनखानबहादुर, मतलबखान व उस्मान करावल हे दमदुमा पाहाण्यासाठी जाऊन आले. बादशहा म्हणाले, 'मी तिकडे जाणार आहे. वाटेत बंदुकची ठेवा.' तरबियतखानाचा मुलगा मुहंमद इसहाक यास अशी सूचना देण्यात आली. तरबियतखानाकडे बादशहाची व शहाजादा कामबक्ष याची नोकर माणसे, घोडे, कहार इत्यादि पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

## सव्वीस फेब्रुवारी १७००

बादशहांनी आज्ञा केली की : सातारा किल्ल्याच्या पायथ्याशी शामियाना व कनाती

उभ्या कराव्या. दुपारी हमीदुद्दीनखानबहादुर, मस्त अली, सरकारखान वगैरेंना वाट नीट करणे व वाटेवर माणसे नेमणे या कामासाठी पाठविण्यात आले. त्याप्रमाणे करून ते परत आले. उद्या सहा घटका दिवस आला असता आपण जाऊ असे बादशहा म्हणाले. बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'राजा अवधूतसिंग, अमानुल्लाखान वगैरेंना आपापली पथके घेऊन शहाजादा आज्जमच्या मोर्च्याच्या टेकडीजवळ थांबा म्हणून सांगा. कुणालाही आमच्या वाटेवर जाऊ देऊ नये. याची व्यवस्था तुम्ही करावी. रूहुल्लाखान याने उद्या सकाळी मोर्च्यातून येऊन भेटावे.'

मन्सूरखानाला मोर्च्यातून बोलावण्यात आले. तो रात्री येऊन भेटला. दोन घटकांनंतर त्याला परत जाण्यासाठी निरोप देण्यात आला.

काल बादशहांना कळविण्यात आले की : अघरखानाचा नातू शमशेर बेग हा गस्त घालण्याठी चंदनवंदन किल्ल्याच्या अलीकडे सहा कोस पर्यंत गेला होता. तेथे त्याची गनिमांशी लढाई झाली. गनिमांची जवळजवळ सव्वीस माणसे ठार अगर जखमी झाली. नऊ गनिमांची डोकी कापून व सात घोडे पकडून शमशेर बेग हुजुरात आला. बादशहा म्हणाले, 'मजुरा झाला. सेवा मान्य झाली.'

### सत्तावीस फेब्रुवारी १७००

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन तरबियतखानाचे मोर्चे पाहण्यासाठी निघाले. छावणीच्या बाहेर पडून ते पुढे निघाले. तसे ते मेण्यात स्वार झाले. ते हमीदुद्दीनखान बहादुरला म्हणाले, 'बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा, शहाजादा मुहंमद वालाजाह, मुखलिसखान, रूहुल्लाखान व मुल्तफतखान यांनी बरोबर यावे. यांच्याशिवाय आणखी कोणीही येऊ नये. गर्दीगोंधळ होता कामा नये. नाहीतर किल्ल्यातून तोफेचे गोळे येऊ लागावयाचे.'

यानंतर बादशहा हे ओढयाच्या वाटेने किल्ल्याच्या पायथ्याशी पोहोचले. त्यानी मोर्चे व दमदुमा ही पाहिली. या सुमारास तरबियतखान हा आज्ञेप्रमाणे मोर्च्यातून येऊन बादशहास भेटला. बादशहांनी तेथील परिस्थितीसंबंधी त्याच्यापाशी चौकशी केली. बादशहा म्हणाले, 'बाणदारांना बाण (रॉकेट वजा शस्त्र) किल्ल्यात सोडण्यास सांगा.' त्याप्रमाणे तीन चार बाण किल्ल्यात सोडण्यात आले. बादशहा तेथे दोन घटकापर्यंत होते. नंतर त्यांनी तरबियतखानाला निरोप दिला व ते शामियान्याकडे (तो आज्ञेप्रमाणे उभा करण्यात आला होता) आले. तेथे ते जोहरची नमाज पढले. त्यानंतर ते तख्ते रवांवर स्वार होऊन एक प्रहर दिवस राहिला असता आपल्या निवासस्थानास परतले. जाऊनयेऊन हे अंतर दीड कोसाचे होते.

### अठ्ठावीस फेब्रुवारी १७००

आज आज्ञेप्रमाणे शेख हिदायतकेश याने बादशहाजादा आज्जम याच्या मोर्च्याचा नकाशा बादशहासमोर ठेवला.

मरहूम मामूरखान याचा जावई सय्यद मन्सूर हा येऊन बादशहांना भेटला. सिरहिंद

(पंजाब)चा फौजदार वजीरखान(याचा शिखांशी संबंध आला) याच्या नावे अहमद बेग गुर्जबर्दाराच्या हस्ते फर्मान पाठविण्यात आले. त्यात वजीरखानाने लाहोरला जाऊन नवीन सुभेदार फाजलखान हा येईपर्यंत तेथील बंदोबस्त पाहावा अशी आज्ञा होती.

**एकोणतीस फेब्रुवारी १७००**

आज कचेऱ्या बंद होत्या(शुक्रवारमुळे).

**एक मार्च १७००**

दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान हा आज्ञेप्रमाणे काल रात्री येऊन बादशहांना भेटला. त्याने विनंती केली की : माझे स्वतःचे मोर्चे सातारगडच्या दरवाज्याजवळ कायम करावे अशी माझी इच्छा आहे. फतेहुल्लाखानाने यात माझे सहकारी व्हावे. मला बेलदार व इतर आवश्यक सामग्री पुरविण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली. त्यांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनखानबहादुर व फतेहुल्लाखान यांनी जाऊन किल्ल्याच्या मोर्च्यासाठी योग्य जागा पाहून यावे. त्याप्रमाणे ते दोघे जाऊन जागा पाहून आले. हमीदुद्दीनखान-बहादुर हा बादशहांना म्हणाला, 'फतेहुल्लाखानाने मोर्च्याची जागा निवडली आहे.' बादशहांनी आज्ञा केली की : फतेहुल्लाखान व मन्सूरखान यांच्याबरोबर चारशे कर्नाटकी (बंदुकची), शंभर बेलदार व वीस सक्का(पाणी वाहणारे भिस्ती) नेमण्यात यावेत. व हमीदुद्दीनखानबहादुर यांनी दमदुम्यासाठी लागणारी आवश्यक सामग्री पुरवावी. बादशहांनी मुखलिसखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांना निरोप देऊन म्हटले, 'तुम्ही रूहुल्ला-खानाच्या मोर्च्याकडे जाऊन मला थांबण्यासाठी योग्य जागा पाहून या. मी तिकडे जाईन. फराशखान्याचा दारोगा शरफुद्दीन याने शामियाना व कनाती पुढे पाठवाव्या.'

बादशहांनी आज्ञा केली की : रूहुल्लाखान याने मन्सूरखान व मीर ख्वाजा याच्या जागेवर जाऊन (ती जागा पाहावी). तरबियतखानाच्या मोर्च्यातून कहारांचा दारोगा दूइला, बेलदारांचा दारोगा हीराचंद व पाथरवटांचा दारोगा जमाल यांना बोलावून घ्यावे.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान, मतलबखान व खुदाबंदाखान हे कही आणण्यासाठी गेले होते. ते येऊन बादशहांना भेटले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : (ब्रम्हपुरीच्या)तळावरून एक काफिला उत्तर भारताकडे चालला होता. जळगाव व औरंगाबाद यांच्या दरम्यान हणमंतराव(मराठा सरदार) हा चालून आला. त्याने काफिला संपूर्णपणे लुटला. बुऱ्हाणपूरचा सुभेदार नजाबत-खान हा पण त्याच्या पारिपत्यासाठी त्या ठिकाणी आला.

**दोन मार्च १७००**

आज रूहुल्लाखान व मन्सूरखान यांचे सातारगड किल्ल्याच्या प्रवेशद्वाराकडील मोर्चे पाहण्यासाठी बादशहा हे तख्ते रवांवर बसून निघाले. वाटेत त्यांनी बादशहाजादा आज्जम यास आपल्या तंबूकडे परत जाण्यास निरोप दिला. रूहुल्लाखानाच्या मोर्च्यापाशी आल्यावर बादशहा तख्ते रवांवरून उतरून मेण्यात बसले. ते हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'रूहुल्लाखान, फतेहुल्लाखान व मन्सूरखान एवढेच माझ्या जवळ राहतील. याशिवाय इतर

कुणालाहि सोडू नका.' बादशहा हे ओढयाच्या वाटेने निघून मन्सूरखानाच्या मोर्च्यात गेले. त्यांनी किल्ल्याचा दरवाजा व ख्वाजा मुहंमद याचे मोर्चे पाहिले. बादशहा रूहुल्लाखानाला म्हणाले, 'मोर्चे दरवाज्याच्याजवळ कायम करण्यात आले तर उत्तम होईल.' फतेहुल्ला-खानाने विनंती केली : मला आज्ञा झाल्यास मी मोर्चा दरवाज्याजवळ स्थापन करीन. बादशहांनी विनंती मान्य केली आणि म्हटले, 'रूहुल्लाखान याने सर्व सामग्री तयार करून (फतेहुल्लाखानाला) द्यावी.' बादशहा तेथे दोन घटिका थांबले. नंतर तेथून निघून ते शामियान्याखाली उभ्या केलेल्या मशिदीपाशी आले. तेथे ते तख्ते रवांवर स्वार होऊन पावणेतीन कोसाचा प्रवास करून पाच घटका दिवस राहिला असता मुक्कामाला परतले. बादशहा मोर्च्याजवळ असता रूहुल्लाखानाने त्यांना नर्गिसच्या फुलांचा गुच्छ व एक रंजकदानी (लहान पेटीवजा वस्तू) या वस्तू अर्पण केल्या. याच संदर्भात बादशहांना पुढील हकीकत कळविण्यात आली :– काल रूहुल्लाखान हे मोर्चे पाहाण्यासाठी गेले होते. त्यावेळी गोळयामुळे त्यांचा स्वारीचा घोडा मारला गेला. जवळ असलेला एक सेवक जखमी झाला. बादशहांनी अडीचशे रुपये किंमतीचा घोडा रूहुल्लाखानाला बक्षीस दिला. शाही तबेल्याचा अधिकारी अब्दुस्सलाम याने घोडा रूहुल्लाखानाकडे पोहोचवावा अशी आज्ञा झाली.

काल शहाजादा मुअज्जम यांनी (काबुलहून) खर्बुज, डाळिंबे, नासपाती यांची करंडी पाठविली होती ती मुल्तफतखान याने बादशहासमोर ठेवली.

**तीन मार्च १७००**

आज आज्ञेप्रमाणे शहाजादा आज्जम याने आपल्या मोर्च्याचा (लाकडकाम दाख-विणारा) नकाशा तयार करून बादशहांना दाखविला. आज दिलेरखान, मुरादुल्लाखान, ऐवजखान आणि अनिरुद्धसिंहाची आई यांच्या अर्ज्या बादशहांकडे आल्या.

**चार मार्च १७००**

बादशहांना कळविण्यात आले की : हमीदुद्दीनखानबहादुर हा सहा हजार स्वार बरोबर घेऊन कही आणण्यासाठी गेला आहे. त्याला कही आणण्यासाठी मदत म्हणून सर्फराजखान याने खानजहानचे सैनिक घेऊन जावे अशी बादशहांनी आज्ञा केली. बादशहांनी पुढीलप्रमाणे नेमणुका केल्या :–

हमीदुद्दीनखानबहादुर याच्या जागी दीवाणेखासचा दारोगा मतलबखान. हा खास चौकीचा दारोगा होता. त्याच्या जागी मुरीदखान मीर तुजक (मास्टर ऑफ प्रोटोकोल) याची नेमणूक करण्यात आली.

मरहूम अमीरखान (काबुलचा सुभेदार) याची मीर खान वगैरे मुले, अमीरखानाची मालमत्ता घेऊन औरंगाबादेपर्यंत आली आहेत असे कळले. त्यांना आणण्यासाठी चीनकुलीज-खान यांनी जावे अशी आज्ञा झाली.

मुहतसिब (नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारा) शेख नूरुल्हक याने विनंती केली की : तळावरचा (ब्रम्हपुरीचा) कोतवाल सरबराहखान हा आमच्या खात्याच्या इसमांवर जुलुम

करीत आहे. बादशहांनी सरबराहखानाची मन्सब कमी केली.

चीनकुलीजखानबहादुर याजबरोबर मुहियुद्दीन कुली वगैरे पन्नास गुर्जबर्दार तैनात असावेत अशी आज्ञा झाली.

पुढील इसमांना पत्रे पाठविण्यात आली :– शहाजादा बेदारबख्त, जीनतुन्निसा बेगम, उदयपुरी महल, खिदमतगारखान.

**पाच मार्च १७००**

बादशहांनी फराशखान्याचा मुश्रफ शर्फुद्दीन याला आज्ञा केली की : एक राहुटी, दोन शामियाने व इतर सामान मशिदीपाशी नेऊन उभे करा. खिदमतगुजारखान व जवाहरमल (बांधकाम खात्याचा मुख्य) यांना बादशहा म्हणाले, 'भिंतीचा घेर करून मशीद तयार करा. मतलबखानाने ते (काम झालेले) पाहून यावे. मी उद्या तेथे जाऊन मशिदीत एकांत ध्यानासाठी (एतिकाफ) बसणार आहे.'

चीनकुलीजखानाकडे ब्रम्हपुरीपासून फर्दापूर (अजिंठ्याजवळ) पर्यंतची राहदारी (मार्गाचे संरक्षण) सांगण्यात आली. या मार्गावरील फौजदार व ठाणेदार यांनी चीनकुलीज-खानाशी सहकार्य करावे असे हुकुम पाठविण्यास मुखलीसखानाला सांगण्यात आले. मुखलिस-खानाने विनंती केली की : कऱ्हाडचा ठाणेदार जाधवराव हा पूर्वी चीनकुलीजखानापाशी तैनात होता. त्याला पूर्ववत आपल्यापाशी तैनात करावे अशी चीनकुलीजखानाची विनंती मान्य करून कऱ्हाडच्या ठाणेदारीवर इतर कुणाची तरी नेमणूक करावी म्हणून आज्ञा झाली.

बादशहांनी इस्माईलखान, मियानाखान, युलबारसखान इत्यादी चिनकुलीजखानाच्या सहकाऱ्यांना निरोप दिला.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : ब्रम्हपुरीहून लोकांचा एक मोठा तांडा (काफिला) हा उत्तरेकडे जाण्यासाठी निघाला. हणमंतराव (मराठा सरदार, निंबाळकर?) याने अहमदनगरहून दौड करून औरंगाबाद व जळगाव या स्थळांच्या मध्ये काफिला गाठला व तो लुटून फस्त केला. तेथील सुभेदार नजाबतखान याने साहाय्य केले नाही. बादशहांनी नजाबतखानाची मन्सब पाचशे स्वारांनी कमी केली.

सूर्याराव देशमुख हा तरबियतखानाच्या मोर्च्यात तैनात आहे. संध्याकाळी तो हुजुरात आला. मतलबखानाच्या द्वारे त्याने बादशहांना कळविले की : रामा (राजाराम) हा या महिन्याच्या एकवीस तारखेस (रमजान, एक मार्च १७००) मरण पावला. याच संदर्भात बापू पंडित व नाहरखानाचा मुलगा शहा मलिक यांनी पण हीच बातमी कळविली. बादशहांनी यारअलीबेगला बोलावू पाठविले. तो आल्यावर त्यांनी त्याला विचारले, 'बादशाही हरकाऱ्यांनी बातमी आणली की नाही?' यानंतर बादशहांनी मुहंमद तकी (कुतार, निरोपे यांचा अधिकारी) याला दहा माणसे बरोबर देऊन शहाजादा आज्जमकडे पाठविले. (राजारामाच्या मृत्यू बद्दल) आज्जमकडे आपले अभिनंदन पोहोच-विण्यास त्यांना सागण्यात आले. ते काम आटोपून त्यांनी परत यावे अशी आज्ञा झाली.

### सहा मार्च १७००

आज बादशहा तख्ते रवांवर बसून निघाले. आज त्यांनी पागोटयात शिरपेच बांधला होता. ते रूहुल्लाखानाच्या मोर्च्याजवळ आले. तेथे मशिदीजवळ शामियाना उभा करण्यात आला होता. तेथे उमरावांचे तंबू उभे केलेले त्यांना आढळले. बादशहा म्हणाले, 'इतके तंबू कशासाठी ? अगदी आवश्यक असे तंबू ठेवून बाकीचे काढून टाका.' त्याप्रमाणे करण्यात आले. यानंतर बादशहा सर्वांना तेथे सोडून मेण्यात बसले व बादशहाजादा आज्जम व शहाजादा वालाजाह यांना घेऊन सातारगडच्या दरवाज्याच्या दिशेने गेले. किल्ल्यातील लोक(मराठे) हे सर्व पाहात होते. त्यांनी किल्ल्यावरून तोफांचा मारा केला. बादशहांनी किल्ल्याचा दरवाजा पाहिला. यानंतर ते परत फिरले. तख्ते रवांवरून त्यांनी एकंदरीत दीड कोस अंतर कापले. ते (मोर्च्याजवळील) शामियान्यापाशी पोहोचले. नंतर त्यांनी आज्जम व त्याचा मुलगा यांना आपापल्या तंबूत जाण्यास निरोप दिला. नगारखाना छावणीच्या जागेतच (शामियान्याजवळ नाही) रमजान संपेपर्यंत राहावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : मुहंमद अमीनखान हा गस्त घालण्यासाठी नांदगिरीकडे गेला होता. तेथे गनिमांशी (मराठयांशी) चकमकी झाल्या. चार गनिमांची डोकी कापण्यात आली. बारा घोडे आणि इतर गुरेढोरे व शस्त्रे अशी लूट मिळाली. बादशहा म्हणाले, 'मजूरा झाला. सेवा मान्य झाली.' बादशहांनी पाचशे रुपये बक्षीस म्हणून देण्याची आज्ञा केली.

### सात मार्च १७००

मशिदीच्या आवारात राहुटी घातली होती तेथे बादशहा राहिले. आज कचेऱ्यांचे काम झाले नाही. बादशहाजादा कामबक्ष याची राहुटी जवळच होती. तो भेटण्यास आला. तसे बादशहा म्हणाले, 'येथून तुम्ही छावणीतील आपल्या डेऱ्याकडे जा. तुमची राहुटी येथून काढून घ्या. मी पण उद्या छावणीतील माझ्या निवासस्थानाकडे परत येईन.'

सातारगडच्या किल्ल्यावरून मराठयांनी तोफांचा मारा केला होता. त्यातील दोन लोखंडी गोळे तरबियतखान याने उस्मान करावल याच्या बरोबर पाठविले. ते बादशहांनी पाहिले.

### आठ मार्च १७००

आज बादशहा मोर्च्याजवळच्या मशिदीहून निघून छावणीतील निवासस्थानाला परतले. मशिदीच्या आवारात असलेली राहुटी व शामियाना परत आणण्याची त्यांनी आज्ञा केली.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'चीनकुलीजखानाला ब्रह्मपुरीपासून औरंगाबादेपर्यंतच्या मार्गाचे रक्षण करण्यासाठी नेमले होते. पण आता त्याला पुढीलप्रमाणे हुकुम पाठवा :– "तुम्ही खेळण्याला (विशाळगड) जा आणि (राजा) रामाचा (नरकवासी) कबिला

धरा." मीर तुजक मुहंमद तकी याने जाऊन चीनकुलीजखानला त्वरेने खेळणा किल्ल्याकडे नेऊन पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

मुहंमद आरिफ कौल याने पुढील सामग्री चीनकुलीजखानाकडे पोहोचवावी अशी बादशहांनी आज्ञा केली : शहाजादा आजमशहा याच्या मोर्च्यातून तोफा व इतर सामग्री, कऱ्हाड येथे व हुजुरात असलेले बेलदार, एकंदर दोनशे माणसे सक्का (पाणी वाहणारे) वीस माणसे.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'बादशहाजादा कामबक्ष याची बायको आरामबानू, मुलगा मुहीइस्लाम व इतर पंधरा इसम यांना तळावरून (ब्रह्मपुरीच्या) बोलावून घ्या. शहाजादा बेदारबख्त याच्यातर्फे खाने आलम याने त्यांना खटावपर्यंत आणावे. असदखान (मुख्य प्रधान व ब्रह्मपुरीचा व्यवस्थापक) याची पथके पण खटावपर्यंत येतील. येथून पथके खटावपर्यंत जाऊन त्यांना घेऊन येतील.'

**नऊ मार्च १७००**

बादशहा हे हमीदुद्दीनखानबहादुर यास म्हणाले, 'तयार रहा. तुम्हाला आणि नाहर-खान वगैरेंना मोहिमेसाठी साटण्याचा घाट, मलठण व महादवाचा डोंगर (जबलुल्-इस्लाम, इस्लामचा डोंगर) या दिशेने पाठवायचे आहे.'

**दहा मार्च १७००**

आज बादशहाच्या आज्ञेने शिकारी गेले व त्यांनी चार हरणांची शिकार केली. शिकार काही मुदपाकखान्यात व काही सरदार शहाजाद्यात देण्यात आली. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'चीनकुलीजखानाला लिहा की :– आधी येथे या आणि मग खेळण्याला जा.'

यासीनखानाने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : (तो महादेवाच्या डोंगराचा व तेथील परिसराचा ठाणेदार होता). धनाजी जाधव, हणमंतराव व राजारामाचे इतर सरदार या प्रदेशात येण्याचा बेत करीत आहेत. माझ्याजवळ फार थोडे सैन्य आहे. कुणातरी अधिकाऱ्याला माझ्या सहाय्यार्थ येण्याची आज्ञा होईल अशी आशा बाळगून आहे. बादशहांनी आज्ञा केली की : हमीदुद्दीनखानबहादुर यांनी सैन्य घेऊन महादेवाचा डोंगर, बारामती साटण्याचा घाट व मलठण या भागात संचार करून यावे. मुख-लिसखानाने विनंती केली की : हमीदुद्दीनखानाची प्रकृति बरी नाही. यावर मुहंमद अमीनखान सदर याने सैन्य घेऊन जावे अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : उद्या बक्षी बहरामंदखान यांनी कही आणण्यासाठी जावे व फतेहुल्लाखान यांनी भाले बनविण्यासाठी वेळू कापून आणण्यासाठी जावे.

काल मतलबखान करावलबेगी व दीवाणेखासचा दारोगा याने बादशहांना पुढील हकीकत सांगितली : पायीन विलायतचा देशमुख सूरयाराव (सूर्याजी पिसाळ) हा म्हणतो की, 'पायीन विलायतहून माझ्या आईने मला लिहिले आहे की रामा (राजाराम) हा या महिन्याच्या बावीस तारखेस (दोन मार्च १७००) वारला. बादशहा म्हणाले,

'त्या देशमुखाला मुखलिसखानाकडे पाठवा. त्यांनी याची चौकशी करावी.' रात्रीची एक घटिका होऊन गेल्यावर नाहरखान याची याच अर्थाची (राजारामाच्या मृत्यूची) पत्रे आली.

बादशहांनी स्वत: आपल्या हाताने पत्र लिहून राजारामाच्या मृत्यूची बातमी बादशहा-जादा आज्जमशहा याजकडे पाठविली. नाहरखानाने पाठविलेले पत्र त्यांनी मोर्च्यात असलेल्या तरबियतखानाकडे पाठविले. यारअलीबेग यानेही कळविले की : हेरांनी बातमी आणली आहे की, रामा (राजाराम) मकहूर (ज्याच्यावर कोप झाला असा) वारला.

### अकरा मार्च १७००

आज ईदुल्फित्र (रमजानचा सण). आज कचेऱ्या बंद होत्या. बादशहाजादा आज्जम-शहा, कामबक्ष, शहाजादा वालाजाह, मतलबखान, मुल्तफतखान इत्यादींनी बादशहांना तसली-मात (मुजरे) केले. मुहंमद अकबरचा मुलगा सुल्तान बलंदअख्तर हा बादशहांना भेटला. शहाजादा बेदारबख्त, नवाब जीनतुन्निसा बेगम, उदयपुरी बेगम इत्यादींनी पत्रे (ईदनिमित्त) पाठविली.

मतलबखानाने विनंती केली की : बहरामंदखानाचे म्हणणे आहे की, 'उद्या ईद आहे. कही आणण्यासाठी मी गुरूवारी जाईन.' विनंती मान्य करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : पाईन विलायतचा देसाई हा रामा (राजा-राम)च्या पदरी होता. (राजा)रामाचा कारभारी रामचंद्र (रामचंद्रपंत अमात्य) हा त्याला परळीगडाकडे पाठवीत होता. देसायाने ते मान्य केले नाही. तो म्हणाला, 'आमची पगाराची थकबाकी दिली तर मी जाईन.' यावर दोघांच्यात बोलाचाली झाली. देसायाने कट्यारीने रामचंद्र याला ठार मारले. नाहरखानाने पण याच अर्थाचे पत्र लिहिले.

असदखानाने विलायती खर्बुजांची करंडी पाठविली ती मुहरमखान (बागांचा व्यव-स्थापक) याने बादशहाच्या नजरेखालून घातली. खर्बुजांपैकी काही शहाजादे व सरदार यांना देण्यात आली.

### बारा मार्च १७००

रूहुल्लाखान याने बादशहाकडे पुढीलप्रमाणे विनंती केली : रामा मकहूर (राजाराम) याच्या बायकोने मला पुढीलप्रमाणे लिहिले आहे :– रामा (राजाराम)च्या औरस पुत्रांना सात हजार जात व सात हजार स्वार अशा मन्सबी नव्याने मिळाव्या. दक्षिणची देशमुखी मिळावी. हुजुरात हजर राहाण्याची माफी मिळावी. तर पाच हजार स्वारांनिशी दक्षिणच्या सुभेदारांच्या बरोबर राहून बादशाही कामगिरी बजावू. सातारा, पन्हाळगड, चंदन-वंदन, परळी, नांदगड इत्यादी सात किल्ले बादशहांच्या ताब्यात देऊ.

बादशहांनी हे मान्य केले नाही. ते म्हणाले, 'सर्व किल्ले देऊन टाका. मग मन्सब व देशमुखी इत्यादींच्यावर नेमणुका करण्यात येतील.'

वेंकटराव हरकारा याने अर्ज केला की : मला बक्षी बहरामंदखानाबरोबर कही आणण्यासाठी तैनात करण्यात आले आहे. माझी माणसे सातारगडच्या किल्ल्याच्या आत

गेली आहेत. माझ्या ऐवजी माझ्या भावाला बक्षी बहरामंदखानाबरोबर पाठवावे. विनंती मान्य करण्यात आली.

### तेरा मार्च १७००

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : सातारगडच्या दरवाज्याला भिडवून मोर्चा कायम करण्यासाठी फतेहुल्लाखान चालला आहे. जाण्यापूर्वी बादशहांचा निरोप घेण्यासाठी तो दिवाणेखास मध्ये बसला आहे. बादशहांनी म्हटले, 'त्याला म्हणावे, फातेहा पढून तसाच मोर्च्याकडे जा.' सातारगडच्या दरवाज्याजवळील मोर्च्यापाशी नेमण्यासाठी सैनिक गोळा करण्याची आज्ञा झाली होती. हे रूहुल्लाखानापाशी तैनात होणार होते. फतेहुल्लाखान, मन्सूरखान, ख्वाजा मुहंमद वगैरे दोन हजार सातशे स्वारांची यादी (तूमार) तयार करण्यात आली. ती रूहुल्लाखानाकडे पाठवावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

शहाजहानाबाद(दिल्ली)च्या बातम्यांवरून समजले की : तेथे एक दरोडा पडला. त्यात तेथील कोतवाल जुल्फिकारबेग जखमी झाला.

### चवदा मार्च १७००

फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यावर दीडशे कजावे(वर–खाली नेण्या–आणण्याची पाळण्यासारखी वाहने) पोहोचवून यावे अशी बादशहांनी शादम कौल याला आज्ञा केली.

मुहंमद अमीनखान सदर याने तळावरील(ब्रह्मपुरी) आपल्या इहतिसाब(लोकांच्या नीतिमत्तेवर देखभाल ठेवणारे खाते) खात्यावरचा नायब बदलून दुसरा इसम नेमावा अशी आज्ञा झाली. तेथे काम करीत असलेल्या नायबाला हुजुरात बोलावण्यात आले.

### पंधरा मार्च १७००

बादशहा सकाळी सरकारखान याला म्हणाले, 'एक ढाल व चाळीस लाकडी ढाली (संरक्षणासाठी) मुखलिसखानाकडे पाठवा. त्याला म्हणावे की, "तू तरबियतखान्याच्या मोर्च्यात जा. तेथील दमदुम्याचे नीट निरीक्षण कर. दमदुमा व बुरुज यांचा नकाशा तयार करवून घेऊन मला दाखवायला घेऊन ये."'

### सोळा मार्च १७००

कर्नाटकचा फौजदार खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान) याचा नायब हमीदुद्दीन-खान याने ढाल व कुराण या वस्तू पाठविल्या. त्या बादशहांनी नजरेखालून घातल्या. बाद-शहाच्या निवासस्थानासाठी लागणारे सामान आणण्यासाठी खुस्रौखान यसावल याला तळावर(ब्रह्मपुरी) पाठविण्यात आले.

### सतरा मार्च १७००

बादशहांनी आज आज्जम, कामबक्ष, ख्वाजा मंजूर, जहांजेब बानू(आज्जमची बायको) यांच्याकडे अर्गजाचे पेले पाठविले.

बादशहांना कळविण्यात आले की : लुत्फुल्लाखान याचा भाऊ व किल्ले अर्क विजापूरचा माजी व्यवस्थापक इनायतखान(निजामुल्मुल्काचा मामा) हा मरण पावला. त्याचा जनाजा

(शवपेटी) हुजुरात पाठवावा अशी आज्ञा झाली. इनायतखान हा दीड हजार जात व चारशे स्वार असलेला मन्सबदार होता.

## अठरा मार्च १७००

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, खुदाबंदाखान व मुरीदखान हे कही आणण्यासाठी गेले होते. ते रानातून वेळू(बांबू)चे भारे घेऊन आले.

विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : पूर्वीचा सुभेदार मरहूम मामूरखान याच्यापाशी पाच हजार स्वारांचे सैन्य असे. माझ्यापाशी फार थोडे सैन्य आहे. तेथे चार हजार फौज ठेवण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

शेख गुलाम मुहंमद हैद्राबादी कौलार(कामकरी यांचा व्यवस्थापक) याने दीड हजार बांबू आणले. ते फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यात पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

रूहुल्लाखानाने विनंती केली की : माझ्या मोर्च्यात सक्का(पाणी वाहणारे भिस्ती) कमी आहेत. सत्तर सक्का तैनात व्हावेत. नायब कोतवाल मुहंमद अमीन याने तितकी माणसे पुरवावीत अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : रूहुल्लाखानाच्या फौजेचा बक्षी व वाकनीस याजपाशी काही हेर(जासूस) तैनात करण्यात यावेत.

खानजमान फतेहजंग मरहूम याचा मुलगा खानेआलम याला विजापूरला पाठविण्यात येणार होते. तिकडे न जाता त्याने कामबक्षाचा कबिला तळावरून(ब्रह्मपुरीच्या) छावणीत आणावा अशी आज्ञा झाली.

## एकोणीस मार्च १७००

काल तरबियतखान मीर आतिश(तोफखान्याचा मुख्य) याने कळविले की : दमदुमा तयार झाला आहे. आज्ञा झाली तर हल्ला चढवू. बादशहा म्हणाले, 'उद्या बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, राजा अवधूतसिंग व सैनिक यांनी मोर्च्यात जाऊन बसावे. दमदुमा पूर्णपणे तयार झाला असल्यास हल्ला करावा.'

आज्ञेप्रमाणे बक्षीउल्मुल्क वगैरे जाऊन दमदुमा पाहून आले. ते म्हणाले, 'दमदुम्यापासून तट चार दरआ(गज?)च्या अंतरावर आहे. अजून एक दरआभर दमदुमा तयार केला तर हल्ला चढविणे योग्य होईल.' तो तयार करावा व राजा अवधूतसिंग वगैरेंनी मोर्च्यात हजर राहावे अशी आज्ञा झाली.

## वीस मार्च १७००

पायीन विलायतचा ठाणेदार नाहरखान हा येऊन बादशहांना भेटला. तनख्याचा दिवाण इनायतुल्लाखान हा आजारी होता. तो बरा होऊन बादशहांना भेटला.

मुहंमद अमीनखान याने पाच हजार स्वार बरोबर घ्यावे व कऱ्हाडला जाऊन तेथील गढी बांधून काढावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

ईरज(माळवा)हून पुढील बातमी कळली : कमाल बेग गुर्जदार हा आज्ञेप्रमाणे ओछर्याला आला. राजा अवधूसिंग याच्या कारभाऱ्याने शेरअफगनखानाला जाऊन

मिळावे म्हणून गुर्जदाराला पाठविण्यात आले होते. पण कारभारी या कामात लक्ष घालीत नाही. बादशहा म्हणाले, 'अवधूतसिंग छावणीत आहे. त्याने आपल्या कारभाऱ्याला ताकीद द्यावी असे त्याला सांगा.'

**एकवीस मार्च १७००**

कोल्हापूरचा ठाणेदार रणबाजखान याने पुढीलप्रमाणे लिहिले : तवरी (?) चा जमीनदार (देशमुख) देव मनहार (मल्हार?) याने मोठ्या सैन्यासहित मला वेढा घातला आहे. माझ्यापाशी सैन्य फार थोडे आहे. लवकर कुमक पाठविण्यात येईल अशी आशा आहे. नाहीतर मी मारला जाईन.

हे वाचून बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान, नाहरखान, मन्सूरखान व राजा अवधूतसिंग यांनी संध्याकाळच्या नमाजानंतर आपल्याला भेटावे अशी आज्ञा केली. आज्ञे-प्रमाणे ही मंडळी भेटली. बादशहांनी मुहंमद अमीनखान याला खास खिलतीची वस्त्रे दिली. मन्सूरखानाला खिलतीची वस्त्रे दिली. त्यांच्या बरोबर पाच हजार दोनशे स्वार देऊन गनि-मांचे पारिपत्य करण्यासाठी जाण्यास त्यांना निरोप देण्यात आला. त्यावेळी बादशहा फातेहा खैर पढले. मुखलिसखान याने कळविले की : राजा अवधूतसिंग या मोहिमेत जाईल. नाहर-खान व नजरबे हे बादशहा बरोबर राहातील.

काल रात्री बादशहा हे मुखलिसखान याला म्हणाले, 'तरबियतखान हा दमदुमा तयार करीत आहे. तो पाहाण्यासाठी जाऊन या.'

**बावीस मार्च १७००**

मुहंमद अमीनखान याने विनंती केली की : नाहरखान, नजरबे वगैरेंना माझ्या पथका-तून दूर केले आहे. मोहिमेची चांगली संधी आहे. त्यांना माझ्यापाशी तैनात करावे. बादशहांनी विनंती मान्य केली. नाहरखानासाठी एक घोडा काढून ठेवावा अशी आज्ञा झाली. दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान हा मुहंमद अमीनखानापाशी तैनात होता. त्यालाच अमीन-खानाच्या फौजेचा दिवाण करण्यात आले. राजा अवधूतसिंग बुंदेला हा निरोप घेऊन अमीन-खानाबरोबर गेला. त्याला सहाशे रुपयांची पोंची व वीस लाख दाम (सुमारे वीस हजार रुपये) अशी बक्षिसी देण्यात आली. अर्जाजुल्ला यास अमीनखानाच्या फौजेचा बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले. त्याला एक घोडा देण्यात आला.

बक्षीउलमुल्क मुखलिसखान हा तरबियतखानाचा दमदुमा पाहून आला. दोन तीन दिवसात तो तयार होईल असे मुखलिसखान म्हणाला. बक्षीउलमुल्क बहरामंदखानाने पुढील प्रकरण बादशहासमोर ठेवले : अंबरचा जमीनदार जयसिंग (भावी सवाई जयसिंग) याचा वकील छावणीत आहे. त्याचे म्हणणे असे :– जयसिंगाच्या वडिलांच्या मृत्यूनंतर बादशहांनी जयसिंगाच्या मन्सबीत व मानमरातबात वाढ दिली. पण ती कधीपासून समजावी असा वाद उपस्थित करून दीवाणे आलाच्या खात्यातील (महसूलचे सर्वात वरिष्ट खाते) अधिकारी (मुहर्रिर म्हणजे लेखक) हे कटकटी निर्माण करीत आहेत. बादशहांनी तो वाद निकालात काढण्याची विनंती मान्य केली. जयसिंगला दीड हजार जात, एक हजार स्वार दुघोडी

(दो अस्पा) अशी मन्सब देण्यात आली होती. या शिवाय त्याला पन्नास लाख दाम (सुमारे पन्नास हजार रुपये) बक्षीस म्हणून देण्यात आले होते.

**तेवीस मार्च १७००**

बादशहांनी पाईन विलायतचा (वाई प्रांत) ठाणेदार नाहरखान याला खिलतीची वस्त्रे देऊन मुहंमद अमीनखानाच्या सैन्याबरोबर जाण्यासाठी निरोप दिला.

यारअलीबेग याने कळविले की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान तीन दिवसापासून आजारी आहे. कही आणण्यासाठी कुणाला पाठवावे याबद्दल काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'रूहुल्लाखान, सरफराजखान, खुदाबंदाखान वगैरेंनी पाच हजार सहाशे स्वार बरोबर घेऊन कही आणण्यासाठी उद्या जावे. व मोर्च्यात फतेहुल्लाखानाला मदत म्हणून रूहुल्लाखानाच्या ऐवजी मुखलिसखानाने जाऊन बसावे.'

बादशाही छावणीपासून तळापर्यंतच्या (ब्रम्हपुरीच्या) मार्गाच्या रक्षणाचे (राहदारी) काम पुढील अधिकाऱ्यांना देण्यात आले :–

(१) बादशाही छावणीपासून सांपगावपर्यंत सात कोस, मरहूम अघरखान याचा नातू शमशेरबेग.

(२) सांपगाव ते म्हसवड सोळा कोस, हुसेन सय्यद व रणदूलाखान.

(३) म्हसवडहून ब्रम्हपुरीपर्यंत सव्वीस कोस, फतेहानखान.

मुहंमद अमीनखानाच्या जागेवर सियादतखान याची नेमणूक करण्यात आली. खुस्रोखानाच्या जागी ख्वाजा मान याची नेमणूक झाली.

**चोवीस मार्च १७००**

बादशहांना कळविण्यात आले की : रूहुल्लाखान, सर्फराजखान, सफशिकनखान वगैरे आज्ञेप्रमाणे कही आणण्यासाठी गेले आहेत. आणि रूहुल्लाखानाच्या ऐवजी मुखलिसखान हा (मोर्च्यात) फतेहुल्लाखानाच्या मदतीस गेला आहे. बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर यास दुपारी बोलावून तरबियतखानाचे मोर्चे बघून येण्यास सांगितले. त्याने परत येऊन तेथील परिस्थिति, लेखी, बादशहासमोर ठेवली. त्यावरून कळले की : किल्ल्यातील लोक दमदुम्यावर दगडाचा मारा करीत आहेत. एक दगड तर हमीदुद्दीनखानबहादुर याच्या ढालीवर येऊन आदळला. हमीदुद्दीनला थोडा मार लागला.

**पंचवीस मार्च १७००**

तरबियतखानाने (मोर्च्यातून) लिहिले की : मला काही विनंती करावयाची आहे. परवानगी असल्यास हुजुरात येईन. परवानगी देण्यात आली. बादशहांनी म्हटले, 'मुखलीसखान व तरबियतखान यांनी रात्री येऊन मला भेटावे.'

**सव्वीस मार्च १७००**

बादशहा मुखलिसखान याला म्हणाले, 'कजावे वगैरे सामग्री फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यात तातडीने आणि ताकीद देऊन पाठवा.' मुखलिसखानाने विनंती केली की : बेलदार फार कमी आहेत. बादशहांनी आज्ञा केली की, 'इतर शंभर इसम पाठवा.'

आज्ञेप्रमाणे मुखलिसखान व तरबियतखान हे मोर्च्यातून येऊन रात्री बादशहांना भेटले. तरबियतखानाने म्हटले, 'दमदुमा व सुरूंग तयार झाले आहेत. आज्ञा होत असेल तर बारुद (दारु) भरून सुरुंग उडवू. नंतर दमदुम्याच्या वाटेने हल्ला चढवू.'

बादशहा म्हणाले, 'शाबास, आफरीनबाद, छान काम केलेत. योग्य वाटल्यास सुरुंगांत दारू भरा. नाही तर नको. एक होईपर्यंत दुसरे न करणे योग्य होईल.' यानंतर तरबियतखानाने बादशहाचा निरोप घेतला.

बादशहांनी आज्ञा केली की : कडकबिजली तोफ टेकडीच्या पायथ्यावरून नेऊन फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यात पोहोचवावी. बादशहांनी मतलबखान व सरकारखान यांना म्हटले, 'तुम्ही तरबियतखान व फतेहुल्लाखान यांच्या मोर्च्यापर्यंत जाऊन साखळी (जरीब) ने किती अंतर होते हे पाहून या.' तहव्वुरखानाने विनंति केली की : मुहंमद अमीनखान याला दोनशे धनुष्य व पाचशे बाणांचे दस्ते हवे आहेत. बाजारातून विकत घेऊन देण्यात यावेत. विनंती मान्य करण्यात आली.

**सत्तावीस मार्च १७००**

काल संध्याकाळी मतलबखान, मस्त अली व सरकारखान यांनी आज्ञेप्रमाणे बादशहांच्या निवासस्थानापासून तरबियतखान व फतेहुल्लाखान यांच्या दमदुम्यापर्यंत साखळीच्या द्वारे अंतर मोजण्याचे काम केले. बादशहांनी आज्ञा केली की : पूर्वी जेथे तरबियतखानाची राहुटी होती तेथे माझ्यासाठी एक राहुटी व शामियाना उभा करा. आणि सध्या जेथे तरबियतखानाची राहुटी आहे तेथे बादशहाजादा आज्जम याची राहुटी उभी करा. मी मंगळवारी तेथे जाईन. काल बादशहांनी आज्ञा केली होती की : बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा यांनी उद्या फतेहुल्लाखानाचे मोर्चे पाहून यावे. त्यास अनुसरून आज्जम हे मोर्चे पाहून बादशहांना आज भेटले.

मुखलिसखानाने विनंती केली की : (ब्रम्हपुरीहून) असदखान (मुख्य प्रधान) यांनी लिहून पाठविले आहे की :– तेथील कोतवाल सरबराहखान हा निरपराधी आहे. त्याची मन्सब बहाल करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. बादशहांनी आज्ञा केली की : एक लाख सात हजार अश्रफ्या चीनकुलीजखानबहादुर याजकडे पोहोचविण्यात याव्या. मुखलिसखान याने विनंती केली की : नाहरखानाचा मुलगा घोरीखान हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेतून सुटून छावणीजवळ आला आहे. आज्ञा असेल तर त्याचे भाऊ व मुले ही त्याला घेऊन येण्यासाठी (छावणी बाहेर) जातील. बादशहांनी विनंती मान्य केली.

**अठ्ठावीस मार्च १७००**

तीन प्रहराच्या सुमारास बादशहा हे मुखलिसखानाला म्हणाले, 'तरबियतखानाचे मोर्चे पाहून रात्री परत या. उद्या मी हल्ला करण्यासाठी जाणार आहे.' आज्ञेप्रमाणे मुखलिसखान हा मोर्चे पाहून आला. त्याने बादशहांना कळविले की : दमदुमा अद्याप हल्ला करण्यायोग्य असा तयार झाला नाही. बादशहा म्हणाले, 'माझे जाणे स्थगित समजावे.'

### एकोणतीस मार्च १७००

बादशहांनी आज्ञा केली की : मुखलिसखान, फतेहुल्लाखान, हमीदुद्दीनखानबहादुर व मतलबखान यांनी जाऊन दमदुमा व सुरुंग यांची बारकाईने तपासणी करून यावे. त्याप्रमाणे करण्यात आले. तीन प्रहराच्या सुमारास बादशहांनी मुल्तफतखान याला सांगितले, 'दमदुमा हल्ला करण्यायोग्य झाला की नाही पाहून या.' त्याने पाहून येऊन विनंती केली की : ती जागा आपण जाण्यायोग्य नाही. अद्याप दमदुम्याचे काम बाकी आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'ते काम करून टाका, म्हणजे फतेहुल्लाखान दरवाज्या-पर्यंत पोहोचू शकेल.'

जुम्दतुल्मुल्क असदखान याने (ब्रम्हपुरीहून) दोन कलिंगडे व इंदापूरचा ठाणेदार मुगलखान याने दोन शेर द्राक्षे बादशहाकडे पाठविली. या सुमारास दंडराजपुरीचा फौजदार सिद्दी याकूतखान व विजापूर कर्नाटकचा फौजदार पुरदिलखान यांची पत्रे बादशहाकडे आली.

### तीस मार्च १७००

शहाजादा बेदारबख्त याजकडे आज बादशहांनी एक पत्र (फर्मान) धाडले. काल रात्री खुस्रौखान हा (ब्रम्हपुरीहून) बादशहाच्या निवासस्थानासाठी लागणारी सामग्री घेऊन आला. नाहरखान यास त्वरित मुहंमद अमीनखान याच्या सैन्यात पोहोचवावे अशी खुस्रौखानाला आज्ञा करण्यात आली.

रूहुल्लाखान हा कही (घासदाणा, लाकूडफाटा इत्यादी) घेऊन आला. तो बाद-शहांना भेटला. त्याला त्याच्या मोर्च्यात जाण्यास आज्ञा करण्यात आली. फतेहुल्लाखान याने पन्नास धनुष्य व शंभर बाण मागितले. ते देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : फतेहुल्लाखानाने बेलदारांना एक हत्ती बक्षीस म्हणून दिला आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'पाच हजार रुपये फतेहुल्लाखानाकडे पाठवा. बेलदारांना ती रक्कम देऊन त्याने आपला हत्ती परत घ्यावा.'

### एकतीस मार्च १७००

रात्रीच्या पाच घटिका (घडी) झाल्या असता मुखलिसखान व तरबियतखान हे आज्ञेप्रमाणे बादशहाकडे आले. बादशहांनी त्यांना आपल्या तस्बीहखान्यात (जप करण्याची जागा) बोलाविले. नंतर तरबियतखानाला मोर्च्याकडे जाण्यास व मुखलिसखानाला स्वतःच्या तंबूकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

सकाळी बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : रात्री गनीम (मराठे) हे परळी किल्ल्यातून बाहेर पडून सातारगडच्या कुमकेला येत होते. रूहुल्लाखान व फतेहुल्ला-खान यांनी गनिमांपैकी काहींना जखमी केले. गनीम पळून गेले.

हमीदुद्दीनखानबहादुर याने आज्ञेप्रमाणे खेळण्याच्या (विशाळगड) किल्ल्याचा नकाशा तयार केला होता. तो त्याने बादशहांना दाखविला. बादशहांनी तो पाहिला. त्यानंतर त्यांनी हमीदुद्दीनखानबहादुर यास तरबियतखानाचे मोर्चे पाहाण्यासाठी पाठविले.

बादशहांनी आज्ञा केली की : गुलाम मुहंमद याने बादशहाजादा आज्जम याच्या

मोर्च्यातील दोन तोफा व खजिना या चीनकुलीजखानाच्या सैन्यात पोहोचवाव्या.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : चार घटिका दिवस राहिला असता सातारगडच्या किल्ल्यातून तीनशे गनीम (मराठे) बाहेर पडले. ते फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यावर तुटून पडले. त्यांनी एक दोन कजावे उध्वस्त करून टाकले. फतेहुल्लाखान हा सावध झाला. त्याने त्यांचा प्रतिकार केला. उभय पक्षात चकमक झाली. गनिमांची पाच माणसे ठार व बरीच माणसे जखमी झाली. गनीम पळून किल्ल्यात गेले. फतेहुल्लाखानाने कजावे नेऊन पुन्हा कायम केले. मारामारीत एक मुघल व इतर दहा माणसे जखमी झाली. फतेहुल्लाखानाला दगडाचा मार बसला.

बादशहा म्हणाले, 'आफरीन बाद, शाबास.' बादशहांनी वरील मजकुराचे पत्र उंटाच्या स्वाराबरोबर बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याजकडे पाठविले.

## एक एप्रिल १७००

बादशहांनी काल रात्री मुखलिसखानाला बोलावून त्याच्याबरोबर खलबत केले. बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'मी उद्या तरबियतखानाच्या मोर्च्याकडे जाईन. सकाळी वाहन हजर ठेवा.' शामियाना व राहुटी ही पुढे पाठविण्यात आली. दिवस पाच घटिका वर आला असता, वाहन तयार असल्याचे बादशहांना सांगण्यात आले. बादशहा म्हणाले, 'आमचे जाणे स्थगित करतो. शामियाना व राहुट्या परत बोलावून घ्या.'

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : नरकवासी रामा (राजाराम) याचा मुलगा शिवाजी हा खेळणा किल्ल्यात (विशाळगड) गादीवर बसला होता. तो या महिन्याच्या (शव्वाल) चौदा तारखेस (चोवीस मार्च १७००) देवी येऊन मरण पावला.

आज बहरामंदखान, सियादतखान व रुस्तमबेगखान हे आजारातून बरे होऊन बादशहांना भेटले.

## दोन एप्रिल १७००

सकाळी बादशहांनी मतलबखान, सरकारखान व करावलखान यांना साखळी घेऊन (अंतर मोजण्यासाठी) फतेहुल्लाखानाच्या मोर्च्याकडे पाठविले. त्याप्रमाणे ते तिघे निघाले. बादशहाच्या निवासस्थानापासून रूहुल्लाखानाच्या मोर्च्यापर्यंत दीड कोस, टेकडीच्या पायथ्यापासून रेवणीपर्यंत तीस साखळी (जरीब म्हणजे प्रत्येकी अकरा यार्डच्या पाच साखळ्या किंवा साठ गज), अशी मोजणी करून ते परत आले आणि तसे त्यांनी बादशहाला कळविले.

मुखलिसखानाने विनंती केली की : आपल्या आज्ञेप्रमाणे खास चौकीचा दारोगा (व्यवस्थापक) याला मी दमदुम्याच्या डाव्या बाजूला नेमले आहे.

तरबियतखानाने लिहून कळविले की : मी आज्ञेप्रमाणे दमदुमा हा मोठा करून सातारगडाच्या तटाच्या बरोबर नेईन. मला दीड हजार सैनिक, दीड हजार उंटस्वार व शंभर माणसे देण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली. तरबियतखानाच्या विनंतीवरून बादशहांनी ख्वाजाखान, खुदानजर व त्यांचे भाऊबंद यांना तरबियतखानाच्या

मोर्च्यात तैनात केले. त्यांनी पगाराच्या बाकीची मागणी केली. पगार देण्याची आज्ञा देण्यात आली.

नाहरखानाचा मुलगा घोरीखान हा गनिमांच्या (मराठ्यांच्या) कैदेत होता. तो सुटून येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

कौरखान्याचा दारोगा तहव्वुरखान याने एक ढाल बादशहांना नजर केली. ती बादशहांना आवडली. बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखानकडे तोफ पाठविण्याचे ठरले होते. आता पाठविण्याची जरूर नाही.

बुधपाचगावचा ठाणेदार पदाजी (बुधाजी?) याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली :–

(१) माझी कमी केलेली मन्सब बहाल करण्यात यावी. मी आपल्या पथकांच्याद्वारे मर्दनिगडचा किल्ला मिळवून देईन. बादशहांनी आज्ञा केली की : तुमच्या पथकाच्याद्वारे तुम्ही किल्ला घेऊ शकला तर तुमची कमी करण्यात आलेली मन्सब बहाल करण्यात येईल.

(२) कंदोला (गोंदवले?) चे ठाणे माझ्याकडे देण्यात आले आहे. त्यासाठी दिलेला सरंजाम (माणसे, दारूगोळा, तोफखाना) कमी आहे. त्याची भरती करण्यात यावी. आज्ञा झाली की : आहे त्यांत भागवावे, नसल्यास रामचंद्र (खटावचा ठाणेदार) याची नेमणूक करण्यात येईल.

बहरामंदखान बक्षीउल्मुल्क याने कळविले की : (बीकानेरचा) राजा अनूपसिंगाचा मुलगा सुजानसिंग हा आला आहे. त्याने गुरुवारी भेटावे अशी आज्ञा झाली. बहरामंदखान म्हणाला, 'उद्या मला कही आणण्यासाठी जावे लागेल.' बादशहा म्हणाले, 'परवा जा.' रूहुल्लाखान याने विनंती केली की : दलपत बुंदेला याचा मुलगा रामचंद याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

### तीन एप्रिल १७००

काल रात्री बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, तरबियतखान व मुहंमद बाकर मिगबाशी हे बादशहांना भेटले. बादशहांनी त्यांच्याशी एकंदर परिस्थितीची चौकशी केली आणि नंतर त्यांना निरोप दिला.

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : सिकंदर आदिलखान (विजापूरचा माजी सुल्तान) हा छावणीत गुलालबारमध्ये हमीदुद्दीनखानबहादुरच्या देखरेखीखाली राहात होता. त्याला एक लाख रुपयांचे वर्षासन होते. तो मरण पावला. बादशहा हे त्याच्या शवावर नमाजे जनाजा पढले. शव नेऊन विजापुरात दफन करावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### चार एप्रिल १७००

रात्री चार घटिका झाल्या असता बादशहांना कळविण्यात आले की : हीराचा मुलगा जवाहरमल (बांधकामाचा मुख्य) याने तरबियतखान व रूहुल्लाखान यांच्या

मोर्चाचा नकाशा तयार केला आहे. बादशहांनी नकाशा पाहिला. यानंतर बादशहांनी आज्ञा केली की : जवाहरमलने मोर्चात जावे. त्याला स्वारीसाठी सरकारातून एक घोडा देण्यात यावा अशीही आज्ञा करण्यात आली.

बादशहांच्या खास तैनातीतील (जल्लू, निकटचे) ऐवजबेग व त्याचे पथक यांचा पगार म्हणून बावन्न हजार रुपये द्यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

**पाच एप्रिल १७००**

जनावरे चरायला नेण्यासाठी म्हणून मुहंमद बारसचा मुलगा मुहंमद मुनव्वर याला बादशहांनी बक्षीस देऊन निरोप दिला. मयत राजा अनूपसिंग (बीकानेर) याचा दुसरा मुलगा सुजानसिंग हा आपला भाऊ राजा स्वरूपसिंग (बीकानेरचा राजा) याच्या मृत्यूनंतर बादशहाकडे आला होता. त्याने बक्षीउलमुल्क बहरामंदखानाबरोबर कही आणण्यास जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

सिकंदर आदिलखान (विजापूरचा माजी बादशहा) याचे शव विजापूरला घेऊन जाण्यासाठी दोनशे सैनिक (अहदी–शिलेदारासारखे) नेमण्यात आले. त्यांना पगार म्हणून एक हजार रुपये देण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की : गुर्जदारांचा दारोगा (व्यवस्थापक) हा आज्ञेप्रमाणे काल चंदनवंदन गडाकडे गेला होता. त्याने किल्ल्याच्या पायथ्यापासून मुले, बायका पुरुष वगैरेंना कैद केले. शिवाय अडीचशे गुरेढोरे त्याने हस्तगत केली. सर्वांना घेऊन तो छावणीत आला आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'मुलांना ख्वाजा मंजूर याच्या हवाली करण्यात यावे. इतरांना नायब कोतवालाकडे देण्यात यावे. गुरेढोरे गाजींनी (सैनिकांनी) घ्यावी.'

**सहा एप्रिल १७००**

आज बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा व त्यांचा मुलगा शहाजादा मुहंमद वालाजाह हे येऊन बादशहांना भेटून गेले. त्यानंतर बादशहांनी जवाहरमल (बांधकामाचा मुख्य) यास बोलाविले. त्याने येऊन दमदुमा व तरबियतखानाचा मोर्चा यांचे नकाशे दाखविले. बादशहांनी ते पाहून नकाशे व स्वदस्तूरचे पत्र बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याजकडे पाठविले.

नाहरखानाचा मुलगा घोरीखान याला पन्नास रुपये किंमतीची एक कटयार बक्षीस म्हणून देण्यात आली. गुर्जदारांचा दारोगा सियादतखान याला मुहंमद अमीनखान सदर (न्यायखाते) याचा नायब म्हणून नेमण्यात आले. हरकाऱ्यांच्या तोंडून पुढीलप्रमाणे कळले : 'रामाजी हा मराठा सरदार हा दोन हजार स्वार घेऊन तळाजवळ (ब्रह्मपुरीच्या) अनरकी (अंभोळी?) जवळ आला. शहाजादा बेदारबख्त याने त्याचे पारिपत्य करण्यासाठी खाने-आलम व मुनव्वरखान यांना पाठविले. त्यांनी शत्रूशी गाठ घेतली. लढाई झाली. शत्रूचे अनेक लोक ठार झाले. शंभर घोड्या, तीनशे गुरेढोरे धरण्यात आली. गनीम (मराठे) पळून गेले.

### सात एप्रिल १७००

चीनकुलीजखानबहादुर याने पुढीलप्रमाणे कळविले : आज्ञेप्रमाणे मी स्वतःच्या सैन्यासहित आलो असून परळी किल्ल्यानजीक छावणी करून आहे. आपण आज्ञा कराल त्या दिशेने वेढा घालीन. बादशहांनी करावलखान यास आज्ञा केली की : तुम्ही जाऊन मोर्च्यांच्या जागा पाहून या. चीनकुलीजखानाला म्हणावे की, 'तुम्ही वेढयाचे काम चालू करा. तुम्ही येथून किल्ल्यापर्यंतचे अंतर साखळीने (जरीब) मोजा, किल्ल्याचा नकाशा तयार करा आणि घेऊन या.' करावलखानाने विनंती केली की : नकाशा तयार करण्यासाठी एक मेमार (बांधकाम खात्याचा मनुष्य) माझ्या बरोबर देण्यात यावा. विनंती मान्य करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : गनीम (मराठे) हे मोठे सैन्य घेऊन आले. त्यांनी इंडीच्या ठाण्याला वेढा दिला. तेथील ठाणेदार दलपत कंबू याचा मुलगा गजपत याने गनिमांशी युद्ध केले. तो शौर्याने लढला. पण त्याला जखमा लागून तो जमिनीवर पडला. गनीम (मराठे) त्याला उचलून घेऊन गेले. त्यांनी इंडीचे ठाणे उध्वस्त केले.

### आठ एप्रिल १७००

बिजापूर कर्नाटकचा फौजदार पुरदिलखान याने लिहून पाठविले की : छत्रसाल राठोड हा जुल्फिकारखानाच्या फौजेत तैनात असून त्याने मराठ्यांशी झालेल्या युद्धात चांगली कामगिरी बजाविली आहे. त्याची कमी झालेली मन्सब बहाल करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. छत्रसालला एक हजार जात व सातशे पन्नास स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली.

बादशहाजादा कामबक्ष याची मुलगी हयातुन्निसा, राजा जयसिंग व अनव्याचा (माळवा, सिरोंजच्या उत्तरेस) फौजदार यांना प्रत्येकी एकेक हत्ती बक्षीस देण्यात आला.

सियादतखान याने विनंती केली की : आज्ञेप्रमाणे महंमद आदिल गुर्जदार हा रहमतपूरच्या देशमुखाला घेऊन आला आहे. त्याला रूहुल्लाखानाकडे पाठवावे अशी आज्ञा करण्यात आली.

यारअलीबेग याने सांगितले की, 'तळावरची (ब्रह्मपुरी) पत्रे दहा दिवसात येथे हुजुरात येतात.' बादशहा म्हणाले, 'तळापासून (ब्रह्मपुरी) इंडी अठरा कोस आहे. गनिमांनी येऊन ते ठाणे उध्वस्त केले. गजपत हा शौर्याने लढता लढता जखमी झाला. गनीम (मराठे) त्याला घेऊन गेले. जुम्दतुल्मुल्क असदखान (मुख्य प्रधान) याने त्याला साहाय्य केले नाही.' जुम्दतुल्मुल्क असदखान याला पुढीलप्रमाणे मन्सब होती :– सात हजार जात, चार हजार स्वार, एक हजार दुघोडी स्वार. त्यापैकी एक हजार स्वारांनी मन्सब कमी करण्यात यावी अशी आज्ञा झाली.

खानेआलम यास सहा हजार जात व पाच हजार स्वार अशी मन्सब होती. ती पाचशे स्वारांनी कमी करण्यात आली.

**नऊ एप्रिल १७००**

सुभ माळव्यातील बातम्यावरून पुढील हकीकत कळली : राव गोपाळसिंग याचा मुलगा रतनसिंग हा इसलामपूर उर्फ रामपूरचा जमीनदार होता. तो माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याजकडे गेला आणि धर्मांतर करून मुसलमान झाला. (बशर्फे इस्लाम मुशरफ शुद, इस्लामधर्म ग्रहण करण्याचा मान त्याने संपादन केला.) ही बातमी कळल्यावर बादशहांनी रतनसिंगाला त्याचा बाप गोपाळसिंग याच्या जागी इसलामपूर व गोपाळसिंगाचे वतन (जहागीर) याचा जमीनदार (राजा) म्हणून मान्यता दिली. रतनसिंगाला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब देण्यात आली. बादशहांनी आज्ञा केली की : रतनसिंगाला खिलतीची वस्त्रे, एक घोडा, एक हत्ती व ध्वज हे पाठवण्यात यावे. बादशहांनी रतनसिंगाला राजा इस्लामखान ही पदवी दिली. मन्सबीचे व किताब दिल्याचे फर्मान खास तयार करून पाठवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

सिकंदर आदिलखान (विजापूरचा माजी सुलतान) याला एक लाख वर्षासन होते. त्याच्या मुलांना पन्नास हजार रुपयांचे वर्षासन द्यावे. सिकंदरची मालमत्ता जप्त करावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

नेमाजीचा भाऊ मालोजी हा चीनकुलीजखानापाशी तैनात होता. चीनकुलीजखानाच्या लिहिण्यावरून बादशहांनी त्याला एक हजार जात व सातशे स्वार अशी मन्सब दिली.

छावणीत नावा नाहीत असे बादशहांना कळविण्यात आले. तळावरून (ब्रह्मपुरी) दहा नावा बोलावून घ्याव्या अशी आज्ञा झाली.

अर्जी बादशहांसमोर ठेवण्याच्या खात्याचा मुशरफ (अधिकारी) छत्रमल याला पाचशे रुपये बक्षीस व सिद्दी इब्राहीमचा मुलगा सिद्दी इब्राहीम यास खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

**दहा एप्रिल १७००**

काल रात्री मुखलिसखान व तरबियतखान हे बादशहांना येऊन भेटले. बादशहांनी त्यांच्याशी खलबते केली. दोन घटिकानंतर त्यांना परत जाण्यास निरोप देण्यात आला.

बीकानेरचा सुजानसिंग हा बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याच्या मध्यस्थीने बादशहांना भेटला. त्याचा भाऊ मयत स्वरूपसिंग याच्या जागी बादशहांनी सुजानसिंगाची बीकानेरवर स्थापना केली. एक हजार जात, एक हजार स्वार त्यात पाचशे स्वार दुघोडी, अशी मन्सब, हत्ती, घोडा, ध्वज व राव ही पदवी असे सुजानसिंगाला देण्यात आले.

बुधपाचगावचा ठाणेदार बुधाजी (पदाजी?) याने यारअलीबेग याजसाठी अंजिराची करंडी व चाफ्याची फुले पाठविली होती. ती त्याने बादशहासमोर ठेविली. बादशहा म्हणाले, 'तिकडे (बुधपाचगाव) अंजिरे छान होतात. तेथील ठाणेदाराला म्हणावे, अंजिराच्या करंड्या हुजुरात पाठवीत चला.'

खटावच्या बातम्यांवरून पुढील हकीकत कळली : बादशहाच्या आज्ञेप्रमाणे ख्वाजा-

मंजूरच्याद्वारे जीनतुन्निसा बेगम, शहाजादा मुहंमद मुइजुद्दीन व महंमद आज्जम यांच्या नावे पत्रे रवाना झाली होती. खटावचा ठाणेदार रामचंद्र याने आपला बदर्का(संरक्षक पथक) देऊन पत्रे नेणाऱ्यांना आपल्या हद्दीतून पुढे पोहचविले. ते बुधपाचगावचा ठाणेदार बुधाजी (पदाजी) याच्या हद्दीत पोहोचले. तेथे बेरडांनी पत्रे फोडली. बुधाजी ठाणेदार याला दोन हजार पाचशे जात व दीड हजार स्वार अशी मन्सब होती. त्याची मन्सब पाचशेनी कमी करण्यात आली.

बादशहाच्या छावणीतील बाजाराच्या व्यापाऱ्यांनी बादशहाकडे पुढीलप्रमाणे तक्रार केली: येथील बाजाराचा करोडी(व्यवस्थापक) सय्यद इमामुद्दीन याने व्यापारी व वंजारी यांना बंदी केली आहे. तो स्वतः महाग दराने धान्य विकत आहे. याशिवाय तो बैलामागे एक रुपया वसूल करतो. वास्तविक पाहता हा कर माफ आहे. (ब्रह्मपुरीच्या)तळावरून त्याने आम्हापासून आजपर्यंत दोन लाख रुपये घेतले आहेत. त्याने याचा जाब द्यावा नाहीतर आमचा साठा परत पोहोचवावा. बादशहांनी सय्यद इमामुद्दीनला त्या कामावरून काढले व त्याच्या ऐवजी मीर सामानच्या खात्याचा व्यवस्थापक अली रजा याची नेमणूक केली.

### अकरा एप्रिल १७००

बादशहांना कळविण्यात आले की : सियादतखान व ख्वाजाखान हे चंदनवंदन किल्ल्याकडे गस्त करण्यास (टेहेळणी) गेले होते. त्यांनी किल्ल्याखालील वाड्यांना आग लावली. लहान मुले, तसेच तीनशे गुरेढोरे त्यांनी हस्तगत केली.

रुहुल्लाखानाने बादशहांना पत्र लिहिले होते. बादशहांनी त्याला बोलावू पाठविले. तो रात्री येऊन भेटला. बादशहांनी त्याला काही सुचना केल्या. नंतर त्यांनी रुहुल्लाखानास मोर्च्यास परत जाण्यासाठी निरोप दिला.

### बारा एप्रिल १७००

बादशहांनी ख्वाजा दौलत यास जाऊन तरबियतखानाचे मोर्चे आणि दमदुमा पाहून येण्यास सांगितले.

बाजाराचा माजी व्यवस्थापक व मरहूम शरीफखान याचा मुलगा सय्यद इमामुद्दीन याला घोड्यांना डाग देण्याच्या खात्यावर नेमण्यात आले.

बादशहांनी रुहुल्लाखानास बोलावू पाठविले. तो आल्यावर बादशहांनी आपल्या नोकरांना बाजूला सारले. रुहुल्लाखानास जवळ बोलावून त्यांनी त्याला काही सूचना केल्या. या नंतर त्याला निरोप देण्यात आला.

पाईन विलायतचा(वाई प्रांत) ठाणेदार नाहरखान हा मुहंमद अमीनखान याच्या फौजेत तैनात होता. त्याने लिहून कळविले की: नेमा(नेमाजी शिंदे तर नव्हे ?) सरदार याने कोल्हापूरचा ठाणेदार रणबाजखान याला सांवगांव(?) मध्ये कोंडले होते. आमच्या फौजा येत आहेत हे ऐकून त्याने वेढा उठविला आणि तो चिकोडीकडे निघून गेला. मी रणबाजखानाला घेऊन कोल्हापूरला आलो. रणबाजखान व शहा मलिक यांना गनि-

मांच्या पारिपत्यासाठी कोल्हापुराहून पाठवावे असा माझा बेत आहे.

**तेरा एप्रिल १७००**

बादशहांनी आपल्या निवासस्थानाभोवती (दौलतखाना) रात्री गस्त घालण्याचे काम मुहंमद आरिफ कौल याजकडे दिले. कोण कोण येतात त्याची चौकशी करून मला कळविण्यात यावे अशी बादशहांनी त्याला आज्ञा केली.

कुतुबुल्मुल्क (गोवळकोंड्याचा माजी बादशहा) याचे जावई (स्वीश किंवा अगदी निकटचे आप्त) व सय्यद अहंमदची मुले सय्यद हसन व सय्यद मन्सूर यांनी मुखलिसखानाच्या द्वारे विनंती केली की : आमचा परिवार मोठा आहे. आमची मन्सब बहाल ठेवण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

चांभारगोंद्याचा फौजदार खुदायारखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : सातशे मुकाहीर (दंगल करणारे, मराठे) या प्रांतात आले. त्यांनी येथील खेडी उध्वस्त केली. मी त्वरेने जाऊन त्यांचे पारिपत्य केले. पळविलेली गुरेढोरे सोडवून संबंधितांना परत केली. पण काही जण सापडले नाहीत. ती गुरेढोरे विकली. त्याचे पाचशे रुपये हुजुरात पाठवीत आहे. मी नियमापेक्षा अधिक सैनिक बाळगले आहेत. माझ्यावर कृपा व्हावी (मन्सब वाढवावी). मुखलिसखानाने चौकशी करून कळवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

नुस्रतजंगच्या फौजेत तैनात असलेला रामसिंग (हाडा, कोट्याचा राजा) याची विनंती नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या द्वारे आली की : माझा मुलगा भीमसिंग हा माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याजपाशी तैनात झाला आहे. त्याला खर्चासाठी पैसे लागतील. त्याला त्यासाठी माळव्यातून आपल्या जहागिरीकडे (कोटा) जाण्याची परवानगी द्यावी. विनंती मान्य करण्यात आली.

काल रात्री तरबियतखान हा मुखलिसखानाच्या मोर्च्यातून आला. त्याने करकज (?) चा नकाशा तयार केला होता. मोर्च्याची परिस्थिति सांगण्यासाठी त्याने नकाशा केला होता. तो बादशहांना दाखविण्यासाठी आणला होता.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : इंडीचा ठाणेदार गजपत कंबू हा मराठ्यांच्या कैदेत होता. त्याने आपला मुलगा ओलीस ठेवून स्वतःची सुटका करून घेतली. तो हळसंगीला आला असून त्याला जखमा झाल्या आहेत. त्याने तळावर (ब्रह्मपुरी) राहून आपला इलाज करून घ्यावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

**चौदा एप्रिल १७००**

काल बादशहा शेख हिदायतकेश याला म्हणाले, 'तुम्ही तरबियतखानाला आज रात्री सुरुंग उडविण्यासाठी हुकुम लिहा.' त्याप्रमाणे तरबियतखानाला हुकुम पाठविण्यात आला.

बादशहांनी मुखलिसखान, हमीदुद्दीनखानबहादुर, सियादतखान वगैरेंना पुढीलप्रमाणे आज्ञा केली : रात्रीचा एक प्रहर राहिला असता तुम्ही स्वतःची पथके घेऊन हल्ला करण्यासाठी म्हणून तरबियतखानाच्या मोर्च्यात जा.

दिवसाच्या चार घटिका झाल्या असता बादशहांना कळविण्यात आले ते असे : आज्ञे-प्रमाणे तरबियतखान याने दोन्ही सुरुंग उडविले. किल्ल्याची भिंत किल्ल्याच्या आत पडली. पण बुरुजाचा वरील भाग, वीस दरआ(?) लांबी रुंदीचा उडून दमदुम्यावर पडला. पुढील माणसे ठार झाली :–खास चौकीची माणसे, मरहूम दिलावरखानाची मुले सखीखान, बुदीखान, असदुद्दीन, मरहूम लोधीखान याचा मुलगा अहमद, मुहंमद जमान वगैरे काकड जमातीचे लोक, सटवाजी डफळे याचा मुलगा बुदीखान, हजारी पथकातील माणसे, बंदुकची, दक्षिण सुभ्यातील तैनात सैनिक.

अशी एकंदरीत जवळजवळ एक हजार माणसे दगडांच्या उडण्यामुळे त्या माराने मारली गेली आहेत. गनीम(मराठे) हे बुरुजाच्या पलीकडच्या बाजूला ठाण मांडून उभे असून बाण आणि बंदुकी यांचा मारा करीत आहेत. मुखलिसखान, तरबियतखान, हमीदुद्दीनखानबहादुर, मतलबखान वगैरे सरदार हे लढत आहेत (हमला मी नुमायद, हल्ला करीत आहेत). पण वरून बाण व बंदुकी यांचा इतका वर्षाव होत आहे की त्यांना पुढे सरकण्यास वाट सापडत नाही.

बादशहा म्हणाले, 'माझे वाहन हजर करा.' बक्षीउलमुल्क बहरामंदखान वगैरे हजर झाले. बादशहा म्हणाले, 'फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन याला म्हणावे, आमचा तंबू नेऊन तरबियतखानाच्या मोर्च्यात तरबियतखानाचे ठिकाण आहे त्याच्या जवळ उभा करा.' या सुमारास मुखलिसखानाचा अर्ज आला की : आपण येथे मोर्चे कायम करणेच कठीण आहे. आपण आपले येणे रहित कराल अशी आशा करतो.'

बादशहा म्हणाले, 'शर्फुद्दीनने तेथे जाऊन तंबू उभा करावा.'

ख्वाजा दौलत महली मोर्च्यातून आला. तो म्हणाला, 'कामाची माणसे होती तितकी कामी आली आहेत (आंचे के मर्दुम कारआमदनी बूद हमा बकार आमदा). इतर पथके पाठविली तर मोर्चे कायम होतील.'

बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : खुस्त्रौखान यानी यसावल (खासगीचे सैनिक) यांना घ्यावे. सर्फराजखान याने बरोबर राहावे. मसूरचा ठाणेदार मंबाजी हा सध्या हुजुरात आहे. चारशे स्वार बरोबर घ्या. आणि मुद्दाम माणसे पाठवून बक्षीउलमुल्क बहरामंदखान याचा सगळा तोफखाना मोर्च्यात पोहोचवा. छावणीचा नायब कोतवाल मुहंमद अमीन याने सक्का(पाणी वाहणारे), बेलदार वगैरेंची त्वरेने तरतूद करावी.

बादशहांनी मुहंमद मुराद पलावली याचा मुलगा मुहंमद मुहसिन याला निरोप देऊन आज्ञा केली की : जा आणि जे जे मुसलमान मारले गेले त्यांच्या प्रेतांना गुसल देऊन(आंघोळ घालून) त्यांचे दफन करा. बादशहांनी आज्ञा केली की : मुनीमखान, खिदमत तलबखान, खिदमत गुजारखान, इला व हीराचंद यांनी रात्री येऊन मला भेटावे.

सुरुंग उडाल्याचा तपशील बादशहांना दिवस पांच घटिका वर आला असताना कळविण्यात आला. तो असा : तरबियतखानाने सुरुंगात दारू भरून ठेवली होती. सकाळी

त्याने सुरुंग उडविला. बुरूज फुटला. दहा दरआ(हात?) रुंद व वीस दरआ लांब असा बुरुजाचा भाग उडाला. बुरुजाच्या पायथ्याशी हल्ला करण्यासाठी आमचे सैनिक (दबा धरून) बसले होते. बुरुजाचे दगड उडून त्यांच्यावर पडल्यामुळे जे मारले गेले ते असे :–

(१) मुनीमखानाच्या भाऊबंदापैकी सखीखान,
(२) कोथलज उर्फ मिफ्ताहुल-फुतूहचा किल्लेदार व मरहूम लोधीखान याचा मुलगा अहमद,
(३) मरहूम दिलावरखान याची मुले, रशीदुद्दीन व अब्दुल्हकीम,
(४) सटवाजी डफळे याचा अधिकारी व सेवक बदी,
(५) मुहंमद जमान सुल्तान काकड याचा भाऊ बदीउज्जमान व मुलगा नुस्रत,
(६) चौकीखासचे मन्सबदार.

याशिवाय चार पाचशे बहेलिये मारले गेले अगर जखमी झाले. याशिवाय किल्ल्याच्या बुरुजावर जे मराठे(गनीम) होते त्यांनीहि डोकी (मोगल सैनिकांची) कापली. बुरूज तुटून पडल्यामुळे रस्ता झाला. मोगल सैनिक त्या खिंडारापाशी आहेत. उभय पक्षाकडून बाण(तीर), बंदुकी(तफंग), तोफ व बाण(दारू भरलेले लांबट आकाराचे बाणाच्या आकाराचे आयुध?), हुक्का(दारू भरलेले चिलीमवजा, फेकण्याचे आयुध?) यांचा मारा चालू आहे. बक्षीउलमुल्क मुखलिसखान व हमीदुद्दीनखान-बहादुर यांना तरबियतखानाच्या मदतीस जाण्याची बादशहांनी आज्ञा केली.

फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन हुसेन याला बादशहा म्हणाले, 'तरबियत-खानाच्या मोर्च्यात मतलबखानाने जागा पाहून ठेवली होती. तेथे रात्री शामियाना नेऊन उभा करा. माझे वाहनही तयार ठेवा.'

बादशहांनी कचेरीचे कामकाज बंद केले. दुपारच्या नमाजानंतर(जुहर) बाद-शहांना कळविण्यात आले की : आज्ञेप्रमाणे हत्ती व घोडे हे स्वारीसाठी हजर आहेत. बादशहा म्हणाले, 'मी जाणे स्थगित केले आहे.'

मरहूम शायिस्ताखान याचा मुलगा व आग्र्याचा सुभेदार एतिकादखान याला हिंदून बयानाची फौजदारी पण देण्यात आली. तेथील फौजदार अमरसिंग याला बदलण्यात आले.

## पंधरा एप्रिल १७००

सय्यद हुसेन हा तरबियतखानाच्या मोर्च्यात होता. तो जखमी झाला होता. त्याला पंधरा मोहरा व दहा होन बक्षीस देण्यात आले. सर्फराजखान दखनी याला तलवार व फतेहुल्लाखानाला ढाल या वस्तू देण्यात आल्या.

अकरामखान हा शहाजादा मुइजुद्दीन(मुल्तान) याजकडे तैनात होता. त्याला हुजुरात बोलावण्यात आले. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

नाहरखानाची मुले घोरीखान व संग्रामखान(शिरवळचा ठाणेदार)यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

मरहूम लोधीखान याचा मुलगा अहमद याच्या वकिलाने पुढीलप्रमाणे विनंती केली : माझे मालक अहमद हे तरबियतखानाच्या मोर्च्यात मारले गेले. त्यांचा मुलगा जमाल याला त्याच्या बापाच्या जागी मिफ्ताहुल-फुतूह (कोथळज) ची किल्लेदारी, फौजदारी, मन्सब व जहागीर मिळावी. बादशहांनी विनंती मान्य केली. बादशहांनी मुखलिसखानाला विचारले, 'अहमदला काय मन्सब होती?' त्याने म्हटले. 'पाचशे जात, साडेतीनशे स्वार त्यापैकी शंभर स्वार दुघोडी आहेत. त्याचा मुलगा जमाल याला दीडशे जात, तीस स्वार अशी मन्सब आहे.' बादशहांनी त्याच्या मन्सबीत दीडशे जात व दोनशेवीस स्वार अशी वाढ केली. अहमदची उरलेली मन्सब त्याच्या इतर मुलात वाटावी अशी आज्ञा झाली.

जालन्याचा (औरंगाबाद जिल्हा) दरवेश (फकीर) अजीजुल्ला याने पुढीलप्रमाणे तक्रार लिहून पाठविली : येथील फौजदार सय्यद गजनफर हा येथील व्यापारी व इतर रयत यांच्यावर जुलुम करीत आहे. त्याच्या ऐवजी इतर कुणाची तरी नेमणूक करण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य करून त्या जागेवर काजी नजीब याची नेमणूक केली.

### सोळा एप्रिल १७००

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याला एक घोडा बक्षीस म्हणून देण्यात आला.

माहुलीचा किल्लेदार व फौजदार जैनुद्दीन अलीखान याने नऊ कलिंगडे पाठविली. बादशहांनी अर्धे कलिंगड खाल्ले. अर्धे कलिंगड आज्जमशहाकडे पाठविण्यात आले.

बुधपाचगावचा ठाणेदार बुधाजी याने अंजिराची करंडी व चाफ्याची फुले पाठविली. काही फुले आसारे शरीफ (पैगंबरांच्या काही स्मारक वस्तू यांना बादशहा छावणीत बाळगीत. त्यासाठी वेगळी जागा होती) मध्ये ठेवावी, काही रुहुल्लाखानाच्या मुलांकडे पाठवावी व उरलेल्यांचे हार गुंफावे अशी आज्ञा झाली.

मरहूम खानजहान याची बहीण हाजी खानम हिने (ब्रह्मपुरीहून) विनंती लिहून पाठविली की : आपला मुलगा अबुल्फतहखान याची नेमणूक शहाजहानाबाद (दिल्ली) येथे करण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली. हाजी खानम बरोबर अबुल्फतहखानाने दिल्लीला जावे अशीही आज्ञा झाली.

दिल्लीचा सुभेदार मुहंमद यारखान याने दिल्लीहून भेटीदाखल वस्तू पाठविल्या.

बादशहांना कळविण्यात आले की : रुस्तमबेगखान यास त्याच्या एका नोकराने स्वतःच्या पगारबाकीसाठी ठार मारले.

### सतरा एप्रिल १७००

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा हा येऊन बादशहांना भेटला. तरबियतखान हा आज्ञेप्रमाणे आला असून भेटीसंबंधी काय आज्ञा अशी विनंती करण्यात आली. बादशहा म्हणाले, 'भेटण्याची जरूर नाही. त्याला स्वतःच्या मोर्च्यात परत जाण्यास सांगा.'

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : कही आणण्यास जावे अशी मला आज्ञा झाली आहे. माझ्या बरोबर सर्फराजखान व मयाजी (सयाजी?) यांना पूर्वीप्रमाणे तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली. याशिवाय आज्जमशहाच्या

पथकातील पाचशे स्वार बरोबर घेऊन अमानुल्लाखान याने बहरामंदखानाबरोबर जावे अशीही आज्ञा झाली.

गुलालबारचा देखरेख अधिकारी व खुदादादचा मुलगा मुराद याला बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : मोठी तोफ बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याच्या मोर्च्याच्या टेकडीवर आहे. त्याचे गोळे किल्ल्यात पडत नाहीत. ती तोफ हुजुरात परत घेऊन या.

## अठरा एप्रिल १७००

आज बादशहांनी न्यायकचेरीचे काम केले नाही. ते मुखलिसखानाला म्हणाले, 'बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याच्या विनंतीवरून सातारगडच्या किल्लेदाराचे अपराध माफ करण्यात आले आहेत. किल्लेदाराने सातारा किल्ला रिकामा करून बादशाही अधिकाऱ्यांच्या ताब्यात द्यावा. बादशहाजादा मुहंमद आज्जमशाहा तुम्हाला बोलावतील तेव्हा आपली पथके वगैरे लवाजमा घेऊन तुम्ही त्यांच्याकडे जा.'

## एकोणीस एप्रिल १७००

बादशहाच्या आज्ञेवरून मतलबखान याने बादशहाच्या निवासस्थानापासून फतेहुल्लाखानाच्या ठिकाणापर्यंत(मोर्चाच्या) साखळीने(जरीब) अंतर मोजले. सव्वाकोस व आठ जरीब(साखळी) असे अंतर भरले.

सत्रसाल बुंदेला(राठोड पाहिजे) हा शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. साताऱ्याच्या किल्लेदारीवर त्याची नेमणूक करण्यात आली. त्याला बेदारबख्ताच्या सैन्यातून बोलावण्यात आले. त्याला एक हजार जात, पाचशे स्वार दुघोडी अशी मन्सब होती.

बादशहा हे फतेह दौलतला म्हणाले, 'तुम्ही फतेहुल्लाखानाला कळवा की, किल्ल्यातील लोकांचे अपराध माफ करण्यात आले आहेत. तोफांचे बार (विजयाबद्दल) करा.'

बादशहा हे बक्षीउलमुल्क मुखलिसखान यास म्हणाले, 'रेहकल्याचा गोलंदाज मीरदाद याला फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यातील तोफा आणण्यास सांगा.'

गजपत कंबू(इंडीचा ठाणेदार)हा मराठ्यांच्या कैदेतून सुटून हळसंगीला आला होता. त्याला बडतर्फ करण्यात आले.

## वीस एप्रिल १७००

काल बादशहा फतेह दौलत कौल याला म्हणाले, 'रूहुल्लाखान व फतेहुल्लाखान यांना माझा हुकुम पोहोचवा. त्यांनी आपल्या मोर्च्यातून परत यावे.' त्याप्रमाणे रूहुल्लाखान परत आला. त्याला आपल्या तंबूकडे जाण्यास निरोप देण्यात आला. फतेहुल्लाखानही आला. त्याला ख्वाजा मंजूरच्या द्वारे बादशहांनी निरोप धाडला की, 'आफरीन बाद, शाबास, तुम्ही खूप शर्थ केली. तुमची सेवा मान्य झाली. उद्या भेटा.' बादशहांनी फळांचे ताट फतेहुल्लाखानाच्या डेऱ्यावर पाठविले. दुसऱ्या दिवशी त्याला द्यावे म्हणून खिलतीची वस्त्रे व हत्ती हे वेगळे काढून ठेवावे अशी आज्ञा झाली.

बादशहांनी छावणीचा नायब कोतवाल मुहंमद अमीन कौल याला आज्ञा केली की : तुम्ही दोन्ही मोर्च्यांवर जा. कजावे (टोपली किंवा पेटयावजा) व लाकूडकाम ही सुरक्षित ठेवा. परळीच्या वेढ्यात ही सामग्री उपयोगी पडेल.

काल रात्री बादशहांनी आज्ञा केली होती की : बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा यांनी किल्ल्याच्या दरवाज्यासमोर आपल्या तोफखान्याचा दारोगा अमानुल्ला बेग याला बसवावे. मतलबखानाने तेथून बाजूला व्हावे. शहाजादा आज्जम याने येऊन विनंती केली की : किल्ल्यातील लोक दरवाज्यातून बाहेर येऊ इच्छितात पण मोगल सैनिकांची दरवाज्यासमोर गर्दी आहे. जिवाच्या भीतीमुळे ते येऊ शकत नाहीत. आपल्या सैनिकांनी त्यांना उपद्रव देऊ नये आणि त्यांची वाट अडवू नये. यासाठी कुणाला तरी आज्ञा व्हावी. बादशहांनी विनंती मान्य केली. मतलबखानाला त्यांनी पाठवून त्यास आज्ञा केली की : तेथे पहारे बसवा.

फतेहुल्लाखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी त्याला परळी किल्ल्याचा नकाशा दाखविला. त्याला खिलतीची वस्त्रे, हत्ती ही बक्षिसे देऊन त्याला बादशहांनी परळीला वेढा घालण्यास जाण्यासाठी निरोप दिला. बादशहा म्हणाले, 'तोफा, लवाजमा, दोन्ही मोर्चा (साताऱ्च्या)तील सैनिक हे फतेहुल्लाखानाबरोबर द्या. मी या महिन्याच्या (जिलकाद) अठरा तारखेस (सव्वीस एप्रिल १७००) परळीला येईन.' मुखलिसखानाने फतेहुल्लाखानाबद्दल विनंती केली तेव्हा बादशहा म्हणाले, 'परळी जिंकून घेतल्यावर फतेहुल्लाखानाला काय बढती द्यायची ती देता येईल.'

मोर्च्यातून पुढील माणसे येऊन बादशहांना भेटली :– ख्वाजा मुहंमद, रूहुल्लाखानाचा बक्षी व वाकनीस मुहंमद समी, कहारांचा दारोगा व दिवाणे आमचा नाझर इला, खुदाआमानचा मुलगा कादरजमान, बेलदारांचा दारोगा हीराचंद. त्यांना विविध बक्षिसे देण्यात आली.

राजारामाचा कबिला आणण्यासाठी खानेआलम हा तळावरून (ब्रह्मपुरीच्या) विजापूरला गेला होता. त्याने कबिला तळावर आणला असे बादशहांना कळविण्यात आले.

### एकवीस एप्रिल १७००

यारअलीबेग याने कळविले की : सातारा किल्ल्यातील माणसे एक प्रहर सहा घटिका दिवस आला असता किल्ल्यातून बाहेर पडू लागली आहेत. साताऱ्च्या किल्लेदारासाठी बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याने आपल्या लष्करापाशी तंबू उभा केला आहे. किल्ल्यातील लोक तेथे जमा होत आहेत. दिवस मावळण्यास एक प्रहर राहिला असता सुभानजी (किल्लेदार) हा किल्ल्यातून बाहेर पडला, खुदाबंदाखान (बयूतात, सरकारी मालमत्तेचा अधिकारी), तोफखान्याचा दारोगा अब्दुऱ्रहीम, खानसामाचा दारोगा सय्यद अली रजा, तोफखान्याच्या हशमाचा मुशरफ कुंजमन यांनी बादशहांना नजराणे दिले. बादशहा हे नगारखान्याचा दारोगा खिदमत तलबखान याला म्हणाले,

'नौबती वाजवा' सहा घटिका पर्यंत नौबती वाजत होत्या. सुल्तान नजर कौल याला खिलतीची वस्त्रे व कौलच्या इतर दोन इसमांना दोनशे रुपये बक्षीस देऊन बादशहा म्हणाले, 'आताच जाऊन बादशहाजादांना अभिनंदन कळवा.'

अजमीर सुभ्याचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान याने सातारच्या विजयाबाबत एक हजार रुपये नजर म्हणून पाठविले. तुमचे पत्र पोहोचेल त्याच वेळी बादशहाच्या हाती किल्ला पडलेला असेल असा मला साक्षात्कार झाला होता असे त्याने पत्रात लिहिले होते. बादशहाजाद्यांनी सुभानजी किल्लेदार याला एक रत्नजडित पदक दिले. त्याची किंमत चारशेचाळीस रुपये बादशहांनी बादशहाजादा आज्जम याजकडे पाठविली.

मोगल सैनिकांनी चंदनगडच्या पायथ्याहून दोन बायका धरून आणल्या होत्या. त्यांना अंतःपुरांत दाखल करण्यात आले. त्यांनी विनंती केली की: आमची दोन मुले मोगल सैनिकांनी धरून ठेवली आहेत. ती परत मिळावीत. ती शोधून काढावी अशी आज्ञा झाली. फतेहुल्लाखानाने जाऊन परळीच्याभोवती टेहेळणी केली. राजारामाचा कारभारी परशुराम याचे वकील तहाची बोलणी करण्यासाठी बादशहाजाद्यांपाशी आले आहेत असे कळले. ग्रंथालयाचा व्यवस्थापक काबिलखान हा वारला.

* * *

# ४

# २२ एप्रिल ते ३१ ऑक्टोबर १७००

### बावीस एप्रिल १७००

आज सकाळी बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान यास म्हटले, 'तुम्ही सातारा किल्ल्यात जाऊन आतील सर्व काही पाहून या. अफजलखान याला बरोबर घेऊन जा.' त्याप्रमाणे ते किल्ल्यात जाऊन आले आणि त्यांनी तेथील हकीकत बादशहास सांगितली. अमानुल्लाखान याला किल्ल्यात ठेवण्यात आले.

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा व शहाजादे हे बादशहापाशी आले. त्यांनी सातारगडच्या विजयाबद्दल अभिनंदन म्हणून पुढीलप्रमाणे नजरा दिल्या :– मुहंमद आज्जम दोन हजार मोहरा, शहाजादा मुहंमद बालाजाह दोनशेचाळीस मोहरा व एक रुपया, शहाजादा आली तब्बार शंभर मोहरा, आज्जमची बायको जहांजेब बानू हिने दोनशे मोहरा पाठविल्या.

काल संध्याकाळी नमाजच्या वेळी, बादशहाजादा कामबक्ष व त्याची मुले बादशाहाला अभिनंदनाचे मुजरे(तसलीमात मुबारकबाद) करून व ओवाळणीचे (निसार)नजर देऊन गेली. आज सकाळी सुलतान बलंद अख्तर(बंडखोर शहाजादा अकबर याचा मुलगा) हा नऊ मोहरा नजर देऊन गेला. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान हा कही अणण्यासाठी गेला होता. तो सकाळी बादशहांना भेटला. त्याने पाचशे मोहरा नजर केल्या. बादशहांनी त्यांची माफी दिली(मोहरा घेतल्या नाहीत). खालील मंडळींनी बादशहांना भेटून पुढीलप्रमाणे नजरा दिल्या :– मुखलिसखान एक ग्रंथ, रूहुल्लाखान एक तलवार, मतलबखान एक भाला, मुल्तफतखान नऊ मोहरा, राजा शाहू दहा मोहरा(बादशहांनी मोहरां घेतल्या नाहीत. माफ केल्या), काजी मुहंमद अकरम ग्रंथ, सफशिकनखान एक मोहर, सर्फराज़खान नऊ मोहरा, कुदरतखान दोन मोहरा(माफ केल्या), इंद्रसिंह तीन मोहरा(माफ केल्या), ख्वाजाखान एक मोहर(माफ), अर्शदखान, खालश्याचा दिवाण दहा मोहरा(माफ), भास्करराव एक मोहर(माफ), हिदायतकेश एक तलवार, सय्यद मझली(जिहादसाठी

आलेला व गुलबर्ग्याच्या काजीचा भाऊ) कुराणाची प्रत.

खुदाबंदाखान (बयूतात, सरकारी मालमत्तेचा व्यवस्थापक व शायिस्ताखानाचा मुलगा) याने काल रात्री सातारा किल्ल्यावरून चमेलीची फुले पाठविली होती. ती बादशहांना दाखविण्यात आली.

बादशहांनी मुहरमखान वगैरेंना आज्ञा केली की : तुम्ही जवाहरमल (बांधकाम-खात्याचा मुख्य) याला बरोबर घेऊन जा व किल्ल्यातील मशीद पाहून या.

मोर्च्यातील पुढील मंडळी आली आणि त्यांनी नजरा दिल्या. तरबियतखान, मुरीद-खान, मुनीमखान, जलालुद्दीनखान. बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा हा किल्लेदार सुभानजी याचे हात बांधून त्याला बादशहाकडे घेऊन आला. त्याचे हात मोकळे करावे अशी बादशहांनी आज्ञा केली. बादशहांनी सुभानजीला पुढीलप्रमाणे बक्षिसे दिली : खिलतीची वस्त्रे, दोनशे मोहरांच्या किमतीचा घोडा, पाच हजार रुपये किमतीचा हत्ती, पन्नास रुपये किमतीची कटयार, वीस हजार रुपये रोख, पाच हजारी जात व दोन हजार स्वार अशी मन्सब, ध्वज व नगारे नौबतीचा मान.

कंधार (नांदेड जिल्हा, मराठवाडा) चा फौजदार सय्यद शम्सुद्दीन हा येऊन बाद-शहांना भेटला. त्याने नऊ मोहरांची नजर दिली.

बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याचा जनानखाना तळावरून (ब्रह्मपुरी) बोलावून घेण्यात यावा.

दौलत बेग गुर्जदार याला बादशहांनी आज्ञा केली की : तुम्ही मुहंमद अमीनखान, नाहरखान वगैरेकडे जा. पन्हाळगडच्या परिसराचा फौजदार अब्दुल्लतीफ याची कुमक करण्यासाठी त्यांना त्याच्याकडे पोहोचवून या.

चीनकुलीजखान याने सातारगडच्या फत्तेबाबत पन्नास मोहरा निसार (ओवाळणी) म्हणून पाठविल्या. छावणीतील पाचशे घोडे सुजानसिंग याने तळावर (ब्रह्मपुरीच्या) पोहोचवून यावे अशी आज्ञा झाली.

**तेवीस एप्रिल १७००**

शहाजादा अकबर याचा मुलगा बलंद अख्तर व काजी मुहंमद अकरम यांना बादशहांनी सातारचा किल्ला पाहून येण्यासाठी पाठविले. मी किल्ला पाहाण्यास उद्या जाईन असे बादशहा म्हणाले.

**चोवीस एप्रिल १७००**

आज दिवसाच्या सात घटिका झाल्या असता बादशहांनी डोक्याला शिरपेच बांधला. ते तख्ते रवांबर बसून सातारचा किल्ला पाहाण्यास निघाले. ते किल्ल्यात दाखल झाले तसे तोफखान्याचा प्रमुख तरबियतखान याने सर्व तोफांना सरवत्ती दिली. बादशहा किल्ल्यातील मशिदीत गेले. तेथे ते प्रार्थना पढले. त्यानंतर ते किल्ल्याच्या आतील वाटेने बादशहाजादा आज्जमशहा याच्या मोर्च्यापाशी आले. त्यांनी ते मोर्चे पाहिले. बादशहाजाद्याने रत्नाचे एक ताट व सोनेचांदीच्या फुलांची दोन ताटे

नजर केली. बादशहा तेथे दोन घटका होते. तेथून ते परतले. किल्ल्याच्या पायथ्याशी त्यांनी शहाजादा आज्जम यास परतण्यास निरोप दिला. त्यानंतर एकदरीत जाण्यायेण्याचे चार कोस अंतर प्रवास करून बादशहा आपल्या डेऱ्यास परतले.

वाटेत पुढील मंडळींनी त्यांना नजरा दिल्या :– बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, तरबियतखान, सफशिकनखान, रूहुल्लाखान, मतलबखान, सदरुद्दीन मुहंमदखान, खिदमत गुजारखान, अब्दुल्कयूमखान, सिद्दी बलालखान, मस्त अली, इरादतखानाचा मुलगा मीर शुक्रुल्ला, ख्वाजा अबुल्कादर, शेख गुलाम मुहंमद, मुहंमद आकिल, फखरूल इस्लाम, फखुद्दीन, हसनयार व मुहंमद यार.

बादशहा म्हणाले, 'आसार मुबारक(प्रेषितांच्या संबंधीचे अवशेष, कपडे, केस इत्यादी)च्या जागेजवळ कनाती उभ्या करा. मी तेथे प्रदक्षिणा करीन.'

बादशहांनी आज्ञा केली की : अमानुल्लाखान याने सातारा किल्ल्यातून उतरावे. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम याने किल्लेदार छत्रसाल याच्या बरोबरीने किल्ल्यात खबरदारीने राहावे.

मुखलिसखान व मन्सूरखान यांनी मुहंमद अमीनखानाच्या फौजेतून लवकर यावे अशी आज्ञा करण्यात आली.

तळावर(ब्रह्मपुरीच्या) छावणीतील घोडे पाठविण्याचे स्थगित करण्यात आले. मतलबखान करावलबेगी याला जरीब(अंतर मोजण्याची साखळी) देऊन सातारगडाकडे (परळी पाहिजे) पाठविण्यात आले.

### पंचवीस एप्रिल १७००

काल संध्याकाळी बादशहा आसार मुबारक(पैगंबरांचे काही अवशेष) ग्रहाची प्रदक्षिणा करण्यास गेले. तेथे नमाज पढले. दोनशे रुपये व दहा तोळे अत्तर तेथे ठेवून ते आपल्या निवासस्थानी परतले.

परळीपर्यंतचे अंतर मोजून मतलबखान परतला. बादशहाच्या निवासस्थानापासून किल्ल्याच्या अलीकडे अर्धा कोस पर्यंतचे अंतर सव्वासात कोस असून त्याच्या तीन मजला होतील असे कळविण्यात आले. शरफुद्दीन याने तंबू परळी किल्ल्याच्या दिशेने पाठवावे अशी आज्ञा झाली.

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याने परळी किल्ल्याच्या दरवाज्याबाहेर तळ द्यावा अशी बादशहांनी आज्ञा केली. जहांजेब बानू(आज्जमची बायको) व बादशहाजादा कामबक्ष यांना सातारा किल्ला पाहून येण्यास परवानगी देण्यात आली.

नाहरखान यास कोल्हापुराहून घेऊन येण्यासाठी अब्दुल्खालक गुर्जबर्दार याला नेमण्यात आले.

सातारचा किल्लेदार सुभानजी याचे सहकारी नरसिंगराव वगैरे यांना पुढीलप्रमाणे मान मरातब देण्यात आले :– नरसिंगराव यास पाचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब, माणिकराव यास पाचशे जात व शंभर स्वार, भास्करराव यास चारशे जात व

शंभर स्वार, विठ्ठलराव यास चारशे जात व पन्नास स्वार, महबाजी यास तीनशे जात व पन्नास स्वार, महदाजी यास दोनशे जात व वीस स्वार. वरील प्रकारे मन्सबी देण्यात आल्या.

**सव्वीस एप्रिल १७००**

रुद्राजी यास कन्हाडाबादची देशमुखी देण्यात आली. इंद्रसेन हा हुजूर नवीस या हुद्यावर होता. त्याला दीवाणे तन(तनखा)च्या कचेरीत नेमण्यात आले. नरसिंग यास सुभे खुजस्ताबुनियाद(औरंगाबाद)च्या जिन्सी तोफखान्याचा अमीन म्हणून नेमण्यात आले.

सय्यद चिराग याचा मुलगा व कंधारचा(नांदेड जिल्हा, मराठवाडा) किल्लेदार व फौजदार सय्यद शम्स याने विनंती केली की : सातान्याची किल्लेदारी आपल्याला मिळावी. बादशहांनी विनंती मान्य केली. सय्यद शम्स याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. त्याला शम्सुद्दीन मुहंमदखान अशी पदवी देण्यात आली. सत्रसाल याची सातारच्या किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली होती. ती रद्द करण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : यापुढे सातारगडचा उल्लेख आज्जमतारा असा करण्यात यावा.

सातारगडचा बक्षी व वाकनीस म्हणून सय्यद मुजफ्फरचा मुलगा सय्यद सादुल्ला याची नेमणूक करण्यात आली.

**सत्तावीस एप्रिल १७००**

बादशहांनी काल रात्री बक्षीउल्मुल्क मुखलिसखान व मन्सूरखान यांना एकांतात बोलावून त्यांच्याशी खलबते केली.

जबलुल् इस्लाम(महादेवाचा डोंगर) व बारामती येथील ठाणेदार हा आज्ञेप्रमाणे धान्याची रसद घेऊन आला होता. तो ठाणेदार यासीनखान होय. त्याला आज्जमतारागड उर्फ सातारगडच्या प्रदेशाच्या फौजदारीवर नेमण्यात येऊन त्याची मन्सब वाढविण्यात आली. त्याला खिलतीची वस्त्रे, घोडा, ध्वज व नगारे नौबती यांचा मान देण्यात आला. शिबंदी किती लागेल याची तजवीज अर्शदखान याने करावी अशी आज्ञा झाली.

सातारगडचा(माजी) किल्लेदार सुभानजी याचे नरसिंगराव आदी सहा सहकारी यांना मन्सबी व खिलतीची वस्त्रे देण्यात आली. मरहूम फौजदारखान याचा मुलगा मुहंमद रहीम याला सातारा किल्ल्यातील चीजवस्ताच्या तहवीलदारीचे(रक्षण, देखरेख) काम देण्यात आले.

बादशहांना पुढील हकीकत कळविण्यात आली : राव गोपाळसिंग चंद्रावत हा शाहजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात होता. त्याला कळले की :– आपला मुलगा रतनसिंग हा मुसलमान झाला. त्याला राजा इस्लामखान ही पदवी देण्यात आली असून आपली जहागीर त्याच्या नावाने करण्यात आली आहे. हे ऐकून मनात विपरीत विचार बाळगून तो बेदारबख्ताच्या छावणीतून निघून आपल्या देशाकडे पळाला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : वाटेवरील सुभेदार व फौजदार यांना हुकुम पाठवा. गोपाळसिंग कोठेही

सापडला तर त्याला पकडावा अगर ठार मारावे. गोपाळसिंगाला दोन हजार जात व दीड हजार स्वार अशी मन्सब होती.

सातारगडात पुढीलप्रमाणे सामग्री असल्याचे कळविण्यात आले :– सात तोफा, रेहकले पाच, जंबूरक नऊ, बारूद (दारूगोळा) चवदा, सरब (दारूगोळ्यास लागणारी माती) एक मण साठशेर, हुक्का आतिशी दोनशेसाठ, बाण दहा.

### अट्ठावीस एप्रिल १७००

आज दिवसाचा एक प्रहर झाला असता बादशहा तख्ते रवांवर स्वार होऊन परळी-कडे रवाना झाले. सव्वादोन कोसाची मजल मारून ते कृष्णेच्या काठावर असलेल्या आपल्या मुक्कामावर दाखल झाले. पुढील मुक्कामाचे तंबू पुढे रवाना करावे अशी फराशखान्याचा अधिकारी शर्फुद्दीन हुसेन याला आज्ञा झाली. तरबियतखान हा चंदावलीला (पिछाडी) होता. लष्करातील सैनिक त्याने पुढे रवाना करावे अशी त्याला आज्ञा करण्यात आली. पुढील रस्ता उंचनिच आहे असे बादशहांना कळविण्यात आले. बेलदारांचा दारोगा हीराचंद याने पुढे जाऊन रस्ता नीट करावा अशी त्याला आज्ञा करण्यात आली.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिकदखान व माळव्याचा सुभेदार मुख्तारखान यांच्या नावे आज्ञापत्रे रवाना झाली. बादशहांनी आज्ञा केली की : छत्रसाल (बुंदेला) याच्या पारि-पत्याचे काम नालवा (इटावा) चा फौजदार खैर अंदेशखान याने आपल्यावर घ्यावे. अनव्याचा फौजदार शेरअफगनखान याने आपले निम्मे पथक घेऊन माळव्याच्या सुभेदारपाशी रुजू व्हावे.

दंडराजपुरीचा फौजदार सिद्दीयाकूतखान, कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान व रायरी (रायगड) चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग यांच्या नावे आज्ञापत्रे पाठविण्यात आली. मरहूम अमीरखान (काबुलचा सुभेदार) याची मुले तळावर (ब्रह्मपुरी) आली आहेत असे कळले. त्यांनी छावणीत यावे अशी आज्ञा झाली.

### एकोणतीस एप्रिल १७००

आज अडीच कोस व पंधरा जरीब (साखळी) अशी मजल मारून बादशहा पुढील मुक्कामावर पोहोचले. बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा व शहाजादा मुहंमद वालाजाह हे आपल्या तंबूतून दीड कोस पुढे जाऊन बादशहांना भेटले.

गोपाळसिंग चंद्रावत याचे पारिपत्य अनव्याचा फौजदार शेरअफगनखान याने माळ-व्याच्या सुभेदारापाशी रुजू होऊन करावे अशा अर्थाचा हुकुम शेरअफगनखानाला पाठ-विण्यात आला. तसेच खैर अंदेशखान याने छत्रसाल (बुंदेला) याचे पारिपत्य करावे असा हुकुम देण्यात आला.

### तीस एप्रिल १७००

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार झाले. बादशहाजादा आज्जम हा बरोबर होता. प्रवासात वाटेत एक मशीद लागली. तेथे बादशहा प्रार्थना पढले. एकंदरीत अडीच कोसा-ची मजल मारून बादशहा परळी किल्ल्यानजीकच्या मुक्कामावर पोहोचले.

सातारगडाच्या विजयाबद्दल पुढील मंडळींनी भेटी व अभिनंदनाची पत्रे पाठविली :– शहाजादा बेदारबख्त, जुम्दतुल्मुल्क असदखान (मुख्य प्रधान) यांनी प्रत्येकी एक हजार मोहरा पाठविल्या.

बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, चीनकुलीजखानबहादुर व मतलबखान हे बादशहाच्या आज्ञेने फतेहुल्लाखानाचे मोर्चे पाहाण्यास गेले. त्यांनी परत येऊन सांगितले की, 'बादशहाच्या निवासस्थानापासून मोर्चे एक कोसाच्या अंतरावर असून किल्ल्याचा घेर दीड कोसाचा आहे.'

रुहुल्लाखान व मतलबखान यांनी तोफखान्यातील सैनिकांना मोर्च्यात पोहोचवावे अशी आज्ञा करण्यात आली. फतेहुल्लाखान याला लागेल ती सामग्री पुरविण्यात यावी व या कामासाठी शमर (तैमूर ?) बेग याला फतेहुल्लाखानापाशी तैनात करण्यात यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहाच्या जल्लूत (निकट) असलेल्या पुढील अधिकाऱ्यांना बढत्या देण्यात आल्या :– मुहंमद इसहाक याची मुले सय्यद मुहंमद जमान वगैरे, सरअमान, मुहंमद अलीचा मुलगा बहमन यार, सय्यद अली, अहंमद ख्वेशगीचा मुलगा मुहंमद.

नाहरखान याचा मुलगा घोरीखान याला जखमा झाल्या होत्या. उपचारासाठी पाईन बिलायतकडे जाण्यास त्याला परवानगी देण्यात आली.

**एक मे १७००**

साताराविजयाबद्दल पुढील मंडळींना खान ही पदवी व मन्सबी देण्यात अगर वाढविण्यात आल्या :– आज्जमशहाचा बक्षी जलालुद्दीनखान, अदालतीचा दारोगा मुनीमखान, मरहूम आकिलखान याचा मुलगा अब्दुल्कयूमखान, सरकारचा दिवाण अफजलखान सरकारी सामानाचा व्यवस्थापक मीर मिहदी (याला मौलवीखान ही पदवी देण्यात आली), मीर तुजक (दरबारचा व्यवस्थापक) अमानुल्ला, तोफखान्याचा दारोगा अब्दुर्रहीम, मुनीम खानाचा मुलगा मुहंमद काजम, घोरीखानाचा मुलगा व नाहरखानाचा नातू, मुहंमद यासीन याला तहमसखान ही पदवी देण्यात आली.

नाहरखानाचा दुसरा नातु मुहंमद तकी यास खिलतीची वस्त्रे, मुहंमद रजी हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मुखलिसखानाच्या विनंतीवरून सरकारी घोडे तळावर (ब्रह्मपुरी) घेऊन जाण्यासाठी हुसेन सय्यद, मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम व मुहंमद गुल याची नेमणूक करण्यात आली. गाजिउद्दीन फीरोजजंग याने सातारगडविजयाबद्दल अभिनंदनपत्र व एक हजार मोहरा पाठविल्या.

जलालुद्दीनखान व अफजलखान यांनी शहाजादा आज्जम याची पत्रके घेऊन परळीच्या वेढ्यात त्वरित सामील व्हावे अशी आज्ञा करण्यात आली.

इस्लामपूर (रामपूर) चा जमीनदार राजा इस्लामखान (गोपाळसिंगाचा मुलगा रतनसिंग) याच्या नावे फर्मान, खिलतीची वस्त्रे, ध्वज ही घेऊन जाण्यासाठी अलीबेग वगैरे

दोन गुर्जबर्दार यांची मुद्दाम नेमणूक करण्यात आली.

**दोन मे १७००**

बादशहांनी आज बक्षीउल्मुल्क मुखलिसखान व मतलबखान यांना आज्ञा केली की : तुम्ही जाऊन चीनकुलीजखानबहादुर व फतेहुल्लाखान यांचे मोर्चे पहा. तसेच किल्ल्याभोवती फिरून वेढ्याचे काम काय व कसे चालले आहे हे पाहून या. त्याप्रमाणे ते जाऊन काम पाहून आले.

**तीन मे १७००**

मरहूम फतेहजंगखान याचा नातू कादरदादखान हा बादशहांना भेटला. सातारा भागाचा फौजदार यासीनखान याने मुखलिसखानाच्या द्वारे विनंती केली की : कादरदादखान याला माझा नायब म्हणून कोहे जबलुल् इस्लाम (महादेवाचा डोंगर) येथे ठाणेदार म्हणून काम करण्यास मान्यता देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. कादरदादखान याला पाचशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तीत दोनशे जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली.

साताऱ्याच्या किल्ल्यावर सय्यद शम्सुद्दीन मुहंमदखान (कंधार, नांदेड जिल्हा, मराठवाडा येथील किल्लेदार) याची नेमणूक करण्यात आली होती. ती रद्द करण्यात येऊन त्याच्या जागेवर सत्रसाल (राठोड) याची नेमणूक करण्यात आली. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

आका अलीखान यानेच सातारच्या वेढ्यात सुरुंगाला वत्ती दिली होती. तो मारला गेला होता. त्याचा पुतण्या हाजी कमाल हा बादशहांना भेटला. त्याला साडेचारशेची मन्सब देण्यात आली.

**चार मे १७००**

आज बादशहांनी सत्रसाल (साताऱ्याचा किल्लेदार) याला साताऱ्याकडे जाण्यास निरोप दिला.

मुहतशिमखान (शेख मीर याचा मुलगा) याला दोन हजार जात अशी मन्सब बहाल करण्यात आली. त्याला नगदी पगार द्यावा अशी आज्ञा झाली.

राजा अवधूतसिंग (ओछर्याचा राजा) व मन्सूरखान यांना चीनकुलीजखानाच्या फौजेत (मोर्च्यात) व बीकानेरचा राजा राव सुजानसिंग (अनूपसिंगाचा मुलगा) याला फकीरुल्लाखानाच्या फौजेत (मोर्च्यात) तैनात करण्यात आले.

हैद्राबाद सुभ्याच्या खजिन्यातून पाच लाख रुपये गजिउद्दीन फीरोजजंग याच्या सैन्याच्या पगारासाठी पाठवावे अशी आज्ञा झाली. विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याने हस्तीसिंग वगैरे पाचशे बंदूकची छावणीत पाठवावे असा हुकुम त्याच्याकडे पाठविण्याची आज्ञा केली.

सरकारी घोडे छावणीतून तळावर (ब्रह्मपुरी) पोहोचवायचे हे काम हुसेन सय्यद, मुहंमद गुल व मुहंमद काजम यांनी एक हजार स्वारांचे पथक बरोबर नेऊन पार पाडावे;

खटावपर्यंत त्यांनी सरकारी घोडे न्यावे; तेथे खानेआलम याने तळावरून येऊन पुढे न्यावे; कामबक्षाचा जनानखानाही खानेआलमने खटावपर्यंत आणावा; तेथून मुहंमद काजम वगैरेंनी छावणीत आणावा अशी आज्ञा झाली.

**पाच मे १७००**

काल बादशहांना कळविण्यात आले की : फतेहुल्लाखान (परळीच्या वेढयाचा प्रमुख सरदार) याचा मुलगा फकरुल्लाखान हा गोळी लागून ठार झाला. त्याला पाचशे जात व दीडशे स्वार अशी मन्सब होती.

बादशहा मुल्तफतखानाला म्हणाले, 'आमचे खाशाचे भोजन (उलिश) घेऊन तुम्ही फतेहुल्लाखानाकडे जा. त्याचे समाधान करा. त्याला जेवू घाला. त्याला म्हणावे, "परमेश्वरी इच्छेपुढे इलाज नाही. तुमच्या मुलाला जी मन्सब होती ती नातवाला बहाल करण्यात येईल."'

बादशहांनी न्यायखात्याचा मुख्य (सदर) मुहंमद अमीनखान यास म्हटले, 'तुम्ही जाऊन फतेहुल्लाखान यास सुतकातून काढून माझ्याकडे घेऊन या.' त्याप्रमाणे करण्यात आले. बादशहांनी फतेहुल्लाखानाचे सांत्वन केले. आणि त्याला स्वतःचा बालाबंद (अलंकार) बक्षीस म्हणून दिला. त्याच्या हुद्याविषयी व मान मरातबाविषयी चौकशी करून कळविण्याची मुखलिसखान यास आज्ञा झाली.

मुल्तानच्या नायब सुभेदारीवर अबूनस्रखान याची नेमणूक करण्यात आली.

जुन्नर (शिवनेरी) चा फौजदार व किल्लेदार नसीरुल्लाखान याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : आपण जिहादची मोहीम चालविली आहे. किल्ले घेण्यास उपयुक्त असे पाचशे मावळे मी जमविले आहेत. आपली आज्ञा व्हावी. येथे शेखहुसेन यास माझा नायब म्हणून ठेवून मी स्वतः मावळयांच्या बरोबर आपल्या हुजुरात येईन आणि कामगिरीची शर्थ करून दाखवीन.

बादशहांनी विनंती मान्य केली आणि नसीरुल्लाखान यास हुजुरात ये म्हणून लिहिण्यात यावे अशी मुखलिसखान यास आज्ञा केली.

परळीगडच्या परिसरात शिकार मुबलक मिळते असे बादशहांना कळविण्यात आले. पाहणी करून कळवा अशी बादशहांनी शिकारखान यास आज्ञा केली.

सय्यद शम्सुद्दीनखान याला सातारगडच्या किल्लेदारीवर नेमण्यात आले होते. त्यावेळी त्याच्या मन्सबीत दोनशे जात व दोनशे स्वार अशी वाढ करण्यात येऊन त्याला खान ही पदवी देण्यात आली. पण आता त्याची किल्लेदारीची नेमणूक रद्द करण्यात आली आहे, त्या अर्थी त्याची दोनशे स्वार अशी वाढवून दिलेली मन्सब तेवढीच रद्द करण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**सहा मे १७००**

काबुलचा सुभेदार बादशहाजादा मुहंमद मुअज्जम याला सहा हजार रुपयांचा शिरपेच, शहाजादा मुहंमद वालाजाह (आज्जमचा मुलगा, हा छावणीत होता) याला पाच

हजार रुपयांचा एक पोंच (अलंकार) व चार हजार रुपयांचा शिरपेच, या वस्तू पाठविण्यात आल्या.

खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान), अजमीर सुभ्याचा सुभेदार सय्यद अब्दुल्ला, यांना खिलतीची वस्त्र पाठविण्यात आली.

फतेहुल्लाखान (परळीच्या वेढ्याचा मुख्य) याला दोन हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे जात अशी वाढ करण्यात आली.

बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'येथून फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यापर्यंतचे अंतर मोजून या. मी उद्या मोर्चे पाहाण्यास जात आहे. या वाटेवर पहारे बसवा.' छावणीच्या-भोवती नायब कोतवाल मुहंमद अमीन याने बंदूकच्याचे पहारे बसवावे अशी आज्ञा झाली.

### सात मे १७००

आज बादशहा डोक्याला शिरपेच (जफरपेच) बांधून तख्ते रवांवर स्वार होऊन मोर्चे पाहाण्यास निघाले. मोर्च्याच्या हद्दीवर आल्यावर ते मेण्यात स्वार झाले. आपल्याबरोबर बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा, शहाजादा वालाजाह, बक्षीउलमुल्क बहरामंदखान, मुखलिसखान, चीनकुलीजखान, रूहुल्लाखान व मतलबखान यांनीच तेवढे यावे. इतरांना येऊ देऊ नये अशी आज्ञा झाली. मोर्च्यावर फतेहुल्लाखान हा येऊन भेटला. त्याने नऊ मोहरा भेट म्हणून दिल्या. जिल्ले सुभानी (बादशहा) यांनी फक्त एक मोहर घेतली. बाकीची माफ केली. त्यांनी फतेहुल्लाखानापाशी मोर्च्यासंबंधी चौकशी केली. बाणदारांनी किल्ल्यात बाण (रॉकेटसारखे) फेकावे अशी आज्ञा झाली. त्याप्रमाणे बाण-दारांनी दोन बाण किल्ल्यात फेकले. यानंतर बादशहा मुक्कामावर परतले.

### आठ मे १७००

आख्ताबेगी हमीदुद्दीनखानबहादुर यांनी कळविलें की : सरकारी घोडे आज्ञेप्रमाणे (ब्रह्मपुरीला) रवाना करण्यात येत आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखान यांनी कही आणण्यासाठी खटावच्या दिशेने सरकारी घोडे (पागा, तबेला) यांच्याबरोबर जावे. सर्फराजखान याने चीनकुलीजखानाबरोबर राहावे. चीनकुलीजखान परत येईपर्यंत पाचशे बहेले कुमक म्हणून परळीच्या वेढ्यात तैनात करण्यात यावेत. बादशहांनी पुढील-प्रमाणे नेमणुका केल्या :– खान फीरोजजंग याच्या फौजेच्या तोफखान्याचा दारोगा म्हणून हाजी मुनीमखानाच्या जागेवर मिर्जाबेगखान, खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेचा वाकनीस म्हणून रुस्तम जंग.

### नऊ मे १७००

बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'आमच्या निवासस्थानापासून चीनकुलीजखानाच्या मोर्च्यापर्यंत अंतर मोजून या.' सव्वा कोसाचे अंतर निघाले. बादशहा म्हणाले, 'मोर्चे पाहाण्यासाठी मी जाईन.'

बादशहांना कळविण्यात आले ते असे : आज्ञेप्रमाणे परळी किल्ल्याच्या समोरील टकडीवर मोठी तोफ फतेहुल्लाखानाने चढविली. तेथून तो किल्ल्याच्या आत तोफांचा मारा

करीत आहे. बादशहांनी त्या कामात गुंतलेल्या माणसांना दोनशे रुपये बक्षीस म्हणून दिले.

**दहा मे १७००**

अहदियान(शिलेदाराप्रमाणे)चा मीर बक्षी सद्रुद्दीन मुहंमदखान याने सरकारी पागा खटावपर्यंत पोहोचवावी व खटावहून कामबक्षाचा जनानखाना छावणीत आणावा अशी आज्ञा झाली.

चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात असलेला मन्सूरखान हा आज्जमतारागडाहून (सातारा) येऊन बादशहांना भेटला. त्याने छावणीत बरोबर राहावे अशी आज्ञा झाली. सातान्याचा माजी किल्लेदार सुभानजी याला देण्यासाठी पाच हजार रुपये किंमतीचा हत्ती बादशहासमोर आणण्यात आला. तो हत्ती (प्रथम) शहाजादा आज्जम याजकडे (त्याच्या मार्फतीने सुभानजीस देण्यासाठी) पाठविण्यात यावा अशी आज्ञा झाली.

माळवा सुभ्यातील बातम्यावरून पुढील हकीकत कळली : शहाजहानाबाद (दिल्ली) येथून चोवीस हजार दोनशे अश्रफ्यांचा व दहा लाख रुपयांचा खजिना येथे आला आहे. तो लवकर (छावणीत) आणावा अशी आज्ञा झाली.

**अकरा मे १७००**

वसंतगड उर्फ किलीदे फतह किल्ल्याचा माजी मराठा किल्लेदार रतनराव याला एक घोडा(पन्नास मोहरांचा) बक्षिस म्हणून देण्यात आला. रतनराव याला यापूर्वी एक हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब देण्यात आली होती.

बादशहांनी दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान याला आज्ञा केली की : तुम्ही चीनकुलीजखानाच्या मोर्च्यावर जाऊन काळजीपूर्वक बंदोबस्त ठेवा व खबरदारी बाळगा.

मोर्च्यासाठी दोनशे बहेले पाहिजेत अशी विनंती फतेहुल्लाखानाने तरबियतखानाच्या द्वारे केली. माणसे पुरविण्यात यावीत अशी आज्ञा झाली. आज चीनकुलीजखानाच्या मोर्च्यात जाणे बादशहांनी रहित केले.

**बारा मे १७००**

अनवा(माळवा, सिरोंजच्या उत्तरेस) येथील फौजदार शेरअफगनखान याची पुढीलप्रमाणे हकीकत कळली : छत्रसाल(बुंदेला) याचे पारिपत्य करावे म्हणून शेर-अफगनखान हा चालून गेला. जिल्काद महिन्याच्या सोळा तारखेस(चोवीस एप्रिल १७००) झूना व बरना या गावाजवळ उभय दलांची गाठ पडली. बुंदेल्यांची सुमारे सातशे माणसे मृत अगर जखमी झाली. शेरअफगनखानाचे अनेक सैनिक ठार अगर जखमी झाले. खुद्द शेर-अफगनखान हा गोळी व बाण यांच्या जखमांमुळे मरण पावला. छत्रसाल हा जखमी होऊन पळाला.

शेरअफगनखानाच्या मृत्यूमुळे रिकाम्या झालेल्या जागांवर बादशहांनी पुढीलप्रमाणे नेमणुका केल्या :- ग्वाल्हेरचा फौजदार जान निसारखान याजकडे नरवर व शहाबाद येथील फौजदारी पण देण्यात आली. इटाव्याचा फौजदार खैर अंदेशखान याला धामोनीचीही

(सागरच्या उत्तरेस) फौजदारी देण्यात येऊन छत्रसालच्या पारिपत्याचे काम त्याच्याकडे सोपविण्यात आले.

शेरअफगनचा मुलगा जाफर अली याला अनव्याची फौजदारी (बापाच्या जागी) देण्यात आली. इतर मुले मीर अली, शेर अली, शमशेर अली व रुस्तम अली यांना मन्सबी देण्यात आल्या.

फतेहुल्लाखान हा मोर्च्यातून येऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले, 'आफरीन-बाद (शाबास), तुम्ही टेकडीवर तोफ चढविली.' त्याला एक तल्वार व एक खंजीर ही बक्षीस म्हणून देण्यात आली.

नाहरखानाची मुले मुहंमद अमीन व मुहंमद अली यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

**तेरा मे १७००**

कोलारचा किल्लेदार व फौजदार मीर नूरुद्दीन याने बादशहाचा निरोप घेतला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

शेर अफगनखानाचा मुलगा जाफर अली याला शेरअफगनखान ही पदवी देण्यात आली.

विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याने पुढील प्रमाणे लिहिले : या प्रांतात गनिमांची (मराठ्यांची) भलतीच धामधूम आहे. येथे सैन्य किती कमी आहे हे आपल्याला माहीत आहे. अधिक पथके नेमण्यात यावी. बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखानाच्या फौजेत असलेले एकोजी वगैरेंना विजापूर सुभ्यात तैनात करण्यात यावे. लुत्फुल्लाखानाने एक हजार स्वार व एक हजार पायदळ उभे करावे. त्याचा खर्च विजापूर सुभ्यातील खालसा इलाख्याच्या उत्पन्नातून भागविण्यात यावा. एकोजीला तीन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती.

**चवदा मे १७००**

इंदापूरचा ठाणेदार मुगलखान व औरंगाबादचा कोतवाल अमानुल्ला यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

विजापुर कर्नाटकचा फौजदार पुरदिलखान याला त्याच्या बापाची मामूरखान ही पदवी देण्यात आली.

परळीच्या वेढयात गुंतलेल्या सैन्यातील इसमांची रात्रीच्या वेळी पाहणी करण्याचे काम पुढील जणांना देण्यात आले :– चीनकुलीजखान याचे सैन्य, मुहंमद अन्वर व शेख नूर-मुहंमद, रूहुल्लाखानाची फौज, असदुल्ला व मीर फतेहुल्ला, तोफखाना, गुलाम मुहंमद व कुंजमन. दौलताबादेचा किल्लेदार व फौजदार सय्यद मुर्तजाखान याला आज्ञा करण्यात आली की : तेथून सरब, दारूगोळा ही पाठवावी. त्यासाठी अली रजा व इतर एक गुर्जबर्दार यांना मुद्दाम दौलताबादेस पाठविण्यात आले.

फजाइलखानाचा मुलगा इब्राहीम याला त्याच्या बापाचा नायब म्हणून तळावरील (ब्रह्मपुरीच्या) किताब खान्याचा ग्रंथपाल म्हणून नेमण्यात आले.

## पंधरा मे १७००

फतेहुल्लाखान याने मोर्च्यातून पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : काल रात्री परशुराम (परशुरामपंत प्रतिनिधि) याचा एक अधिकारी परळी किल्ल्यातून निघून त्याच्याकडे (परशुरामपंताकडे) चालला होता. माझ्या सैनिकांनी त्याला कागदपत्रांसहित पकडले आहे. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : त्याला घालवून द्या. त्रास देऊ नका.

बादशहांना कळविण्यात आले की : यलंगतोशखान बहादुर (हा म्हणजे औरंगजेब आणि अंतःपुरातील एक तुर्क दासी यांच्या गुप्त प्रणयाचे फळ, असा सार्वत्रिक समज असल्याचे मनूचीने लिहून ठेवले आहे) हा येत आहे. सुल्तान बलंद अख्तर (शहाजादा अकबर याचा मुलगा) याच्या तंबूच्या मागे त्याचा तंबू उभा करण्यात यावा अशी आज्ञा करण्यात आली.

जीनतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिच्या शिफारसीवरून इस्लामपुरी (ब्रम्ह-पुरी) चा किल्लेदार बशारतखान याची मन्सब वाढविण्यात आली.

मुहंमद काजम हा पाईन विलायत (वाई पुणे प्रांत) चा दिवाण होता. त्याची नेमणूक वरघाटाचा (सातारा प्रांत) दिवाण म्हणून करण्यात आली.

बादशहांनी मन्सूरखान यास आज्ञा केली की : तुम्ही जाऊन आज्जमताराराड (सातारा) च्या बुरुजाची दुरुस्ती करा.

## सोळा मे १७००

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : गनिमांचा (मराठ्यांचा) सरदार खंडोजी हा तीन हजार स्वारांचे सैन्य घेऊन धामधूम करण्याच्या उद्देशाने चंदनवंदन व नांदगिरी या भागात आला आहे. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'नागोजी, पांढरे वगैरेंनी दोन हजार नऊशे स्वार घेऊन सियादतखानापाशी तैनात व्हावे व सियादतखान याने खंडोजीचे पारिपत्य करावे अशी व्यवस्था करा.'

सियादतखानाने विनंती केली की : राजा अवधूतसिंग (बुंदेला, ओरछचाचा राजा) याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : कडकबिजली तोफेच्या माऱ्याने परळी किल्ल्याच्या तटाची भित सहा दरआ (हात?) पडली आहे.

## सतरा मे १७००

आज ईदुज्जुहाची (बकरीद) ची सुरवात. कचेऱ्या बंद होत्या.

## अठरा मे १७००

बकरीदचा सण आज बादशहांनी साजरा केला. शहाजादे व अमीर उमराव यांनी सणाबद्दल बादशहाचे अभिष्टचिंतन केले.

## एकोणीस मे १७००

काबुलचा माजी सुभेदार मरहूम आमीरखान याची मुले मीरखान, मीर अबुल्हसन, मुहंमद हसन, मुहंमद काजम, मुहंमद ख्वाजा, मीर मुहंमद हादी, मीर मुहंमद इब्राहीम ही बादशहांना भेटली. त्यांना मन्सबी व बक्षिसे देण्यात आली. सुरतेचा अधिकारी मरहूम

अमानतखान याची मुले अहमद व मुहंमद तकी ही बादशहांना भेटली. त्यांना वस्त्रे देण्यात आली.

हाजी बेग याला किल्ले आज्जमतारागड (सातारा) च्या तोफखान्याचा दारोगा (व्यवस्थापक) म्हणून नेमण्यात आले.

सातारा किल्ल्याच्या विजयाबद्दल पुढील लोकांची पत्रे व भेटी आल्या :– दाऊदखान (पन्नी), राव दल्पत बुंदेला, बहादुरखान, गुलबर्ग्याचा किल्लेदार व फौजदार कामयाबखान, चांभारगोंद्याचा ठाणेदार ख्वाजा खुदायारखान.

### वीस मे १७००

रायचूरचा किल्लेदार व फौजदार समंदरखान याने सातारा विजयाबद्दल पत्र व अठरा अश्रफ्या पाठविल्या. अब्दुलमजीदचा मुलगा मुहंमद वजीर याला बहमनवाडयाची ठाणेदारी देण्यात आली.

लालमण हजारी हा सातारा किल्ल्याच्या वेढयात किल्ल्याच्या पायथ्याशी मारला गेला होता. त्याचा मुलगा इंद्रसिंग यास मन्सब व शाल ही देण्यात आली.

### एकवीस मे १७००

देना देवी वंजारा हा छावणीतील बाजाराचा अधिकारी (करोडा) अली अन्‌रजा याच्या मध्यस्थीने बादशहांना भेटला. त्याने पंधरा मोहोरा नजर केल्या. खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'आपल्या छावणीचा नकाशा तयार करून दाखवा. आपल्या अमीर उमरावांची किती पथके आली आहेत ते मला पहावयाचे आहे.'

अनवा (माळवा, सिरोंजच्या उत्तरेस) येथून पुढीलप्रमाणे बातमी आली : छत्रसाल बुंदेला याने जाफर अलीला पत्र लिहून कळविले की :– तुमचे वडील शेरअफगनखान हे जखमी होऊन रणांगणावर पडले असता आम्ही त्यांना उचलून घेऊन आलो आहोत. त्यांचे प्राण शिल्लक आहेत. कुणाला तरी पाठवून त्यांना घेऊन जा. त्याप्रमाणे जाफरअलीने छत्रसालाकडे पालखी पाठविली आहे. पुढे जे घडेल ते कळविण्यात येईल.

अबुलफतहखान याने विनंती लिहून पाठविली की : मला शहाजहानाबाद येथे तैनात करण्यात आले आहे. हुजुरात राहावे अशी माझी इच्छा आहे. विनंती मान्य करण्यात आली.

नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : विजापूरच्या जवळ मी धनाजी जाधवावर चालून गेलो. युद्ध झाले. धनाजी जवळ बरेच सैन्य होते. मी त्याला समोरून परतवून लावला. धनाजीने आमच्या सैन्याच्या पिछाडीला (चंदावल) रामसिंग होता त्याच्यावर हल्ला केला. रामसिंगने शर्थीने युद्ध केले. शत्रूचे अनेक लोक ठार झाले. युद्धात रामसिंग व राव दलपत यांनी उत्कृष्ट कामगिरी बजाविली. त्यांना आपल्या कृपेची आशा आहे.

त्यांचे मानमरातब कळवावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यांवरून पुढीलप्रमाणे कळले : राव गोपाळसिंग वगैरे येथे तैनात होते. ते येथून निघून गेले. पुढील माणसांची फरारी म्हणून नोंद करावी अशी आज्ञा झाली :– (१) गोपाळसिंग, दोन हजार जात व दीड हजार स्वार अशी मन्सब, (२) त्याचा मुलगा हिंमतसिंग, चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब, (३) परखोतमसिंग, अडीचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब.

### बावीस मे १७००

तूराण (मध्य आशियातील तुर्कस्थान) येथील अधिपतीचा एक अधिकारी मिहतर बाकी हा चाकरीच्या उद्देशाने बादशहांना येऊन भेटला. त्याला तीनशे जात व वीस स्वार अशी मन्सब देण्यात आली. सातारा विजयाबद्दल रायरी (रायगडचा) किल्लेदार व फौजदार शिवसिंग व सोलापूरचा किल्लेदार व फौजदार सैफुद्दीन यांची पत्रे व भेटी या आल्या. हरकाऱ्यांचा व्यवस्थापक (दारोगा) यारअलीबेग याने पुढीलप्रमाणे कळविले : परशुराम हा परळी गडावरून पळाला. पण त्यावेळी ही बातमी वेंकटराव गोविंद हरकारा यानी आपल्याला कळविली नाही. त्याच्या संबंधी काय आज्ञा? हरकाऱ्यांचे पगार कमी करण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत ली : कळनरकवासी (राजा) राम याची कुटुंबीय माणसे तळावर (ब्रह्मपुरी) नवाब जीनतुन्निसा बेगम (औरंगजेबाची मुलगी) हिच्यापाशी नजर कैदेत आहेत. या बायकामंडळीत एक दहा अकरा वर्षाचा मुलगा आहे. या मुलाला आपल्या आईपाशी ठेवावे की (जनानखान्याच्या) बाहेर ठेवावे. काय आज्ञा? त्याला आपल्या आईपाशी राहू द्यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : सियादतखान हा खंडोजीचे पारिपत्य करण्यासाठी म्हणून चालून गेला. जिल्हजच्या बारा तारखेस (वीस मे १७००) तो शिरवळ नजीक पोहोचला. खंडोजी हा रोहिडा किल्ल्याकडे निघून गेला.

### तेवीस मे १७००

फतेहुल्लाखानाचे मोर्चे पाहून येण्यासाठी बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान यांना सांगितले. आपण उद्या शिकारीला जाऊ असे बादशहा म्हणाले. तशी व्यवस्था करण्यात आली. नंतर बादशहा म्हणाले, 'परवा जाईन.'

खंडोजीच्या पाठलागावर सियादतखान गेला होता. तो पाईन विलायतच्या साल्पा-घाटापर्यंत पोहोचला. त्यापूर्वीच खंडोजी पळून गेला होता. सियादतखान यास हुजुरात बोलावण्यात आले.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, नाहरखान व सैय्यद शम्सुद्दीनखान यांनी कही आणण्यास जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### चोवीस मे १७००

बादशहांनी आज्ञा केली की : सय्यदखान दारोगा याने खटावचा ठाणेदार रामचंद्र व मसूरचा ठाणेदार महाजी (महादजी जगदाळे तर नव्हे ?) यांच्या पथकात किती

माणसे आहेत याची पाहणी करावी.

एकोजी याला तीन हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. तो चीन-कुलीजखानाच्या फौजेत तैनात होता. त्याला विजापूर सुभ्यात तैनात करण्यात आले. होते. तसे न करता त्याला पूर्वीप्रमाणे आपल्या फौजेत राहू द्यावे अशी चीनकुलीजखानाने विनंती केली. विनंती मान्य करण्यात आली.

खान फीरोजजंग याच्या फौजेतील पंचेचाळीस मोगल तेथून निघून आले होते. त्यांच्या मन्सबी कमी करण्यात आल्या होत्या. त्या परत बहाल करण्यात येऊन त्यांना फतेहुल्लाखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

### पंचवीस मे १७००

बादशहा आज शिकारीला जाणार होते. जाणे रहित करण्यात आले. मक्केच्या शरीफाचा (अधिपतीचा) वकील बादशहांना भेटला. त्याने भेटी आणल्या होत्या. त्या बादशहांना दिल्या.

सियादतखान हा (खंडोजीच्या पाठलागावरून) परत आला. तो आणि त्याचे सह-कारी ख्वाजाखान, तुर्कताजखान, हुसेन सय्यद व मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम हे बादशहांना भेटले.

### सव्वीस मे १७००

सातारा विजयाबद्दल जानसिपारखान (हैद्राबादचा सुभेदार) याने पत्रे व शंभर मोहरा पाठविल्या. धनाजी जाधवावर विजय मिळविल्याबद्दल जुल्फिकारखान नुस्रतजंग आणि त्याचे सहकारी यांना पुढीलप्रमाणे बढत्या देण्यात आल्या :–

(१) नुस्रतंजग याला सहा हजार जात, पाच हजार स्वार व एक हजार दुघोडी अशी मन्सब होती. त्याला खिलतीची वस्त्रे व एक ढाल;

(२) दाऊदखान (पन्नी) याला पाच हजार जात, पाच हजार एकशे स्वार त्यापैकी दीड हजार दुघोडी, एक तल्वार;

(३) राव दल्पत बुंदेला, अडीच हजार जात, दोन हजार तीनशे स्वार, त्याच्या मन्सबीत तीनशे स्वारांनी वाढ करण्यात आली;

(४) रामसिंग हाडा दीड हजार जात, एक हजार स्वार दुघोडी, मन्सबीत पाचशे स्वारांची वाढ करण्यात आली, वीस लाख दाम बक्षीस;

(५) राव कान्होजी (शिर्के) पाच हजारी पाच हजार स्वार, खिलतीची वस्त्रे;

(६) रशीद ओगलाल, मन्सबीत शंभराची वाढ.

बादशहांना कळविण्यात आले की : रजवीखान, मुहंमद शरीफ वगैरे मोगल, खान-फीरोजजंगाची छावणी सोडून येत आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : त्यांना परत फीरोज-जंगाच्या छावणीत नेऊन घालावे. ते न जातील तर त्यांच्यावर बादशहाचा कोप होईल असे त्यांना बजवावे. रजवीखानाची खान ही पदवी काढून घेण्याचीही बादशहांनी आज्ञा केली.

खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान)याने रामसिंग(हाडा) व राव कान्होजी (शिर्के) यांच्या विनंत्या बादशहाकडे पाठविल्या. राव कान्होजी (शिर्के) याने विनंती केली की : कचोली(?) परगणा हा माझ्या जहागिरीत आहे. त्याचे उत्पन्न कमी आहे. त्याच्या ऐवजी जर्मखिडी परगणा मला देण्यात यावा. बादशहांनी आज्ञा केली की : इनायतुल्लाखान याने चौकशी करून कळवावे.

## सत्तावीस मे १७००

काल बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'फतेहुल्लाखानाचे मोर्चे पाहून या.' त्याप्रमाणे तो मोर्च्यावर गेला. पाऊस पडत होता. त्यामुळे मतलबखान हा परत येऊन बादशहाला मोर्च्याची हकीकत कळवीपर्यंत मध्यरात्र झाली.

खान नुस्रतजंग(जुल्फिकारखान) याने लिहून कळविले की : माझ्या बरोबर मोगल पथके नाहीत. जी होती ती हुजुरात बोलावून घेण्यात आली आहेत. इतर मोगल पथके माझ्यापाशी तैनात करण्यात यावी. बादशहांनी आज्ञा केली की : जुम्दतुल्मुल्क(असदखान मुख्यप्रधान) याच्या सैनिकांपैकी एक हजार स्वार, पाचशे मोगल व पाचशे बर्कंदाज हे जुल्फिकारखान याजपाशी तैनात करण्यात यावेत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : धनाजी जाधव हा छावणी करण्याच्या उद्देशाने बेडरांचप्राकडे गेला. परंतु त्यांनी त्याला छावणीसाठी जागा दिली नाही. धनाजी जाधव तेथून परतून मुर्तजाबाद मिरजेकडे आला आहे. पन्हाळगडच्या प्रांतात छावणी करावी असा त्याचा उद्देश आहे. खान नुस्रतजंग हा त्याचा पाठलाग करीत येत आहे.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'इस्लामपुरी(ब्रह्मपुरी)चा किल्लेदार बशारतखान याला पुढीलप्रमाणे लिहा :– नरकवासी रामा(राजाराम)याचे मेहुणे हे मुसलमान होण्याची इच्छा करतील तर त्यांना शहाजादा बेदारबख्त याजपाशी पाठविले जावे नाही तर त्यांना कैदेत ठेवावे'(खुसरपूरा रामा जहन्नमी अगर इरादा इस्लाम दाश्ता बाशद निज्दे शहाजादा मुहंमद बेदारबख्त बहादुर ब फिरस्तंद ब इल्ला दर कैद दारंद).

मुहतसिब(नीतिमत्तेवर देखरेख करणारा अधिकारी)शेख नूरुल्हक याने अर्ज केला की : नागोजी(माने), बहिर्जी(पांढरे), राजा अवधूतसिंग(ओछर्याचा राजा), ख्वाजाखान, व इंद्रसिंग यांच्या छावणीत(मिस्ल, गोट) दारू पिणे व वेश्या, नर्तकी इत्यादी विपरीत प्रकार चालतात. काय आज्ञा?

बादशहांनी आज्ञा केली की : असे प्रकार करू नयेत म्हणून खिदमततलबखान यांनी मनाई करावी.

रायरी(इस्लामगड, रायगड)चा किल्लेदार व फौजदार शिवसिंग याने विनंती लिहून पाठविली की : आपण परवानगी देत असाल तर माझे काका मुकुंदसिंग यांना येथे ठेवून मी हुजुरात येईन. बादशहांनी विनंती मान्य केली नाही.

## अठ्ठावीस मे १७००

सरबराहखान कोतवाल याचा नायब मुहंमद अमीन याने मुखलिसखानाच्या द्वारे

विनंती केली की : तळावर(ब्रह्मपुरीच्या) नायब मुहतसिबच्या प्रकरणात जो दगा झाला त्यात सव्वीस मन्सबदार, चाळीस इसम व कोतवाली चबुत्र्यावरची सहाशे माणसे यांचा एक महिन्याचा पगार कापून घ्यावा अशी आज्ञा झाली होती. ती माणसे निरपराधी आहेत. त्यांना दंडाची माफी देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

साताऱ्याचा माजी किल्लेदार सुभानजी हा हजर झाला. त्याला पाच हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. त्याच्या तंबूवर फळफळावळे पाठवावीत अशी बादशहांनी आज्ञा केली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव याचा बेत किलीदे फतह उर्फ वसंत-गडच्या परिसरात येण्याचा दिसतो. बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखानाला म्हणावे, आपल्या फौजेसहित तयार रहा. गनिमाच्या(धनाजी जाधवाच्या) पारिपत्यासाठी मी तुम्हाला पाठविणार आहे.

### एकोणतीस मे १७००

आज्ञेप्रमाणे मन्सूरखान हा आज्जमतारागडावरून(सातारा) येऊन बादशहांना भेटला.

नायब कोतवाल मुहंमद अमीन याने विनंती केली की : नरकवासी रामा(राजा-राम) याच्या मुलाबरोबर तेहतीस माणसे तळावर(ब्रह्मपुरीच्या) कैदेत आहेत. त्यांना ठार मारावे अशी आज्ञा झाली आहे. तर याबाबतीत जुम्दतुल्मुल्क(असदखान मुख्यप्रधान व ब्रह्मपुरीच्या तळाचा रक्षक) यास आज्ञा देण्यात यावी. बादशहांनी विनंती मान्य केली. फजाइलखान याने तसे लिहावे अशी आज्ञा झाली.

मोर्च्यावरून फतेहुल्लाखान हा भेटण्यास आला. मुल्तफतखानाने कळविले की : गाजी-उद्दीन(फीरोजजंग) याचे सैनिक फतेहुल्लाखानापाशी तैनात आहेत. त्यांना जवळजवळ तीस महिन्याचा पगार मिळावयाचा आहे. बादशहांनी आज्ञा केली की : तीन हजार मोहरा व पन्नास हजार रुपये देण्यात यावेत.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग हा धनाजी जाधवाचा पाठलाग करीत मच्छींद्रगडापर्यंत पोहोचला असून तो वसंतगडच्या परिसरात येत आहे.

### तीस मे १७००

हरकऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : नरकवासी रामा(राजाराम) याचे कारभारी(पेशकार) रामचंद्र, (रामचंद्रपंत अमात्य) यांचा वकील रामाजी पंडीत व पर-शुराम(परशुरामपंत प्रतिनिधि) यांचा वकील अंबाजी (अंताजी आपदेव) हे छावणीत आले आहेत. बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याच्या मध्यस्थीने मोगलांना किल्ले द्यावे व (राजा)रामाच्या मुलाला जिवाचे अभय मिळवावे असा त्यांचा उद्देश आहे.

### एकतीस मे १७००

चांभारगोंद्याचा ठाणेदार ख्वाजा खुदायारखान याने आंब्याच्या दोन करंड्या पाठ-विल्या. बादशहांनी त्यातील तीस आंबे बादशहाजादा मुहंमद आज्जामशहा याला दिले.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान हा कही आणण्यासाठी गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

विजापुरात दोन साधू दरवेश राहात होते. त्यापैकी सय्यद मुस्तफा काद्री यास शंभर होन व अत्तर व सय्यद हुसेन यास पन्नास मोहरा पाठविण्यात आल्या.

मुखलिसखानाने कळविले की : शहाजादा मुहंमद बेदारबख्त याजपाशी पूर्वी चोवीस हजार स्वार होते. आता चौदा हजार स्वार राहिले आहेत. बाकीचे स्वार बादशहाच्या हुजुरात तैनात आहेत. तर काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली की : मरहूम अगरखान याचा नातू तैमूरबेग हा माझ्या पाशी राहील. बाकीच्यांना (बेदारबख्तापाशी) तैनात करा.

**एक जून १७००**

काल रात्री फतेहुल्लाखानाने लिहून पाठविले की : मी पगाराचे वाटप केले. उद्या मी हल्ला करणार. शिड्या तयार केल्या आहेत. मला धनुष्ये व बाणांचे भाते देण्यात यावेत. बादशहांनी आज्ञा केली की : तीनशे धनुष्ये व तितकेच बाणांचे दस्ते देण्यात यावेत. अगरखानाचा नातू शमशेरबेग व त्याच्या पथकातील सैनिक यांनी परळी किल्ल्याभोवती टेहेळणी करून यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

**दोन जून १७००**

काल संध्याकाळी बादशहा रूहुल्लाखान, मुरीदखान व मुनीमखान यांना म्हणाले, 'फतेहुल्लाखानान किल्ल्यावर हल्ला चढवील. तुम्ही, खास चौकीचे सैनिक, जल्लुचे (बादशहाच्या निकटचे) सैनिक, मीरखानाचे सैनिक वगैरेंनी जाऊन मोर्चात हजर राहावे.' त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्यात आली.

मध्यरात्रीच्या सुमारास मतलबखानाने लिहून पाठविले की : किल्ल्यातील माणसे सावध झाली आहेत. हल्ला करण्यास संधी नाही. काय आज्ञा? बादशहांनी आज्ञा केली, 'परत या. संधी पाहून फतेहुल्लाखान हल्ला करील.'

बादशहांनी आज्ञा केली की : खुशहालबेग कौल याने पन्नास माणसे बरोबर घेऊन जावे व लाकडे तोडून आणावी.

बुऱ्हाणपूरचा सुभेदार मोतिकदखान याने सातारा विजयाबद्दल पत्रे व अठरा मोहरा पाठविल्या. मोहरा माफ करण्यात आल्या.

**तीन जून १७००**

एक प्रहर पाच घटिका दिवस आला असता हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : परळीच्या किल्ल्याच्या बुरुजापाशी एक खडक आहे. फतेहुल्लाखान खडकावर दोन–तीन दरआ (हात) चढला. रुहुल्लाखान तेथे ठाण मांडून आहे. उभय पक्षात अग्निबाण, बंदुकी, तल्वारी व धनुष्यबाण यांचा मारा चालू आहे. कचेरीचे काम संपले तसे बादशहांना कळविण्यात आले की : उभयपक्षाचे बरेच लोक मारले गेले अगर जखमी झाले. खडकावर बाणांचा व बंदुकीचा मारा चालू आहे. फतेहुल्लाखान तेथे टिकून राहणे कठीण आहे.

बादशहांनी आज्ञा केली की : उस्मानकरावल याने जाऊन परिस्थितिची कसून चौकशी करावी. मतलबखानाने मोर्च्यावर जावे. तरबियतखानाने मोर्च्यावर दोनशे बाण पाठवावे.

सातारचा माजी किल्लेदार सुभानजी याच्या भाऊबंदापैकी नरसिंगराव याला शंभर मोहरांच्या किंमतीची एक घोडी बक्षीस म्हणून देण्यात आली.

**चार जून १७००**

बादशहांनी काल रात्री बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला एकांतात बोलावून त्याच्याशी खलबते केली. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'तुम्ही उद्या सकाळी बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याच्या डेऱ्यावर जा.' त्याप्रमाणे मुखलिसखानाने आज्जम बरोबर चार घटिका खलबते केली. त्यानंतर त्याने बादशहाकडे येऊन त्यांना एकंदर परिस्थिति समजावून सांगितली.

सुभानजी (सातारचा माजी किल्लेदार) च्या बिरादरीतील (भाउबंद अगर पथकापैकी) माणिकराव, भास्करराव व किशनराव यांना प्रत्येकी एक घोडा बक्षीस देण्यात आला.

मक्केच्या शरीफाचा (अधिपति) बकील शेख मुहंमद अफंदी याला दोन हजार रुपये बक्षीस द्यावे अशी आज्ञा झाली.

बादशहा मुहंमद मुहरमखान (बागांचा व्यवस्थापक) याला म्हणाले, 'आंब्याच्या दोन करंड्या जुम्दतुल्मुल्क असदखान याजकडे तळावर (ब्रह्मपुरी) पाठवा.'

**पाच जून १७००**

आज पाऊस पडत होता. यासाठी बादशाही कचेऱ्या व न्यायालये बंद होती.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : धनाजी जाधव याने स्वतःचे सैन्य पन्हाळगडच्या पायथ्यापाशी ठेवले. तो स्वतः खेळणा (विशाळगड) किल्ल्याकडे गेला आहे. दादो मल्हार व हणमंतराव हे आपली सैन्य घेऊन भाळवणी (मंगळवेढ्याजवळ) कडे गेले आहेत. बीदर उर्फ मुहंमदाबाद प्रांतात छावणी करावी असा त्यांचा उद्देश दिसतो. खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) हा त्यांच्या पाठलागावर गेला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : खान-नुस्रतजंग याला लिहा. त्याला म्हणावे, 'गनीम कोठेहि गेले तरी त्यांचा पाठलाग सोडू नकोस आणि त्यांना छावणी करू देऊ नकोस.'

**सहा जून १७००**

काल रात्री बादशहांना कळविण्यात आले की : पावसामुळे धान्याचे भाव रुपयाला दोन शेर झाले आहेत. गवतचारा यांचा पुरवठा होत नाही. छावणीतील लोकांची भयंकर दुर्दशा होत आहे. काय आज्ञा?

बादशहा म्हणाले, 'मुखलिसखान याने बादशहाजादा मुहंमद आज्जम याच्या डेऱ्यावर जावे.' त्याप्रमाणे मुखलिसखान गेला. त्यानंतर बादशहाजादा आज्जम व मुखलिसखान हे दोघे बादशहाकडे आले. ते म्हणाले, 'रामचंद्र (पंत अमात्य) व परशुराम (पंतप्रतिनिधि) यांचे वकील व परळी किल्ल्यातील लोक जिवाचे अभयदान मागत आहेत. ते

(वकील) म्हणतात की :– परळीचा किल्ला सध्या आम्ही आपल्या ताब्यात देतो. बादशहा खटावला जातील त्यावेळी चंदनवंदन वगैरे पाच किल्ले मोगलांचे हवाली करण्यात येतील.'

बादशहा (शहाजादा आज्जम व मुखलिसखान यास) म्हणाले, 'तुमच्या मनाला पटेल तसे करा.' बादशहांनी मुखलिसखानाला पुढीलप्रमाणे आज्ञा केली : कलीदे फतह (वसंतगड)चा किल्लेदार रावतमल झाला याला हुजुरात बोलावून घ्या. शम्सुद्दीन मुहंमदखान यास तेथे (वसंतगड) किल्लेदार म्हणून नेमण्यात येईल. रावतमल झाला हा परळीगडचा किल्लेदार म्हणून काम करील. मुहंमद आज्जमशहा व तरबियतखान यांच्या हरकाऱ्यांना बोलावून बादशहांनी आज्ञा केली की : परळीच्या किल्ल्यात जाऊन तेथील तोफा वगैरे सामग्रीची काळजीपूर्वक देखरेख करा. बादशहा म्हणाले, 'मतलबखान व बादशहाजादा आज्जम यांचे अधिकारी यांनी किल्ल्याच्या दरवाज्यावर ठाण मांडून बसावे. शहाजादा आज्जम यांनी बोलाविल्यावर बयूतात (सरकारी सामानाचे अधिकारी) व खान सामान यांच्या कचेरीतील दारोगा यांनी किल्ल्यात जाऊन तेथे असलेला धान्य आदि जिनसांचा साठा जप्त करावा.'

बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'उस्मान करावल व इतर अधिकारी यांना, पुढील मजलांचे व आमच्या उतरण्याच्या जागांचे ठरविण्यासाठी खटावच्या मुक्कामापर्यंत, वाटेवर नेमा. आमचे पुढे जाण्याचे तंबू (पेशखाना) पुढे जाऊ द्या. चीनकुलीजखान याने कही आणण्यासाठी जवळपास जावे.

बादशाही गंज (बाजार) याचा व्यवस्थापक (करोरा) सय्यद अली रजा याला बादशहांनी आज्ञा केली की : व्यापाऱ्यांच्याकडून धान्य चार पाच शेराच्या भावाने विकण्यास लावा.

फतेहुल्लाखान याने मोर्च्यातून निघून यावे अशी बादशहांनी आज्ञा केली. या संबंधात बादशहांना कळविण्यात आले की : नद्यांना पूर आले आहेत. नद्या पार करण्यासाठी फतेहुल्लाखानाकडे हत्ती पाठवावे अशी आज्ञा झाली.

### सात जून १७००

काल बादशहांनी शरफुद्दीनला आज्ञा केली की : तुम्ही फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यावर जावे. तेथून फतेहुल्ला व मोर्च्यातील माणसे यांना घेऊन यावे. त्याप्रमाणे करण्यात आले. बादशहांना कळविण्यात आले की : फतेहुल्लाखान उद्या येणार होता पण पाऊस व नद्यांना पूर यामुळे तो (आज) येत आहे.

### आठ जून १७००

पावसामुळे बादशहांनी आज कचेऱ्यांचे काम केले नाही.

बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : नदीच्या पलीकडे चीनकुलीजखान व रूहुल्लाखान यांच्या लष्करात रुपयाला एक शेराच्या हिशेबानेही धान्य मिळेनासे झाले आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'हत्तीवरून व नावातून धान्य पोहोचवा.' बादशहांना कळविण्यात आले की : धान्याच्या व गवतचाऱ्याच्या महागाईमुळे लष्करातील सैनिक क्षीणाव

सोडून खटावची वाट धरीत आहेत. बादशहा म्हणाले, 'त्यांना अडवू नका. चीनकुलीजखान याने खटाव व बादशाही छावणी यामध्ये राहावे.'

बादशहांना कळविण्यात आले की : बादशहाजादा आज्जम याने आपली नाव नदीत घातली आहे. त्याच्या तोफखान्याचा दारोगा अब्दुर्रहीम हा परळी किल्ल्याच्या दरवाज्यावर जाऊन बसला आहे. किल्लेदार व किल्ल्यातील माणसे बाहेर येत आहेत.

बादशहा हे फराशखान्याचा मुशरफ शर्फुद्दीन याला म्हणाले, 'लागणारे तंबू राहुट्या बरोबर घ्या. बाकीचे आज्जमताराग़डच्या (सातारा) किल्ल्यात ठेवून द्या.'

बादशहा उस्मान करावल यास म्हणाले, 'तुम्ही कऱ्हाडला जाऊन छावणीसाठी जागा पाहून या.' उस्मान करावल म्हणाला, 'येथून तेथपर्यंत काळी जमीन फार आहे.'

**नऊ जून १७००**

आज सकाळी बादशहा बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, तरबियतखान, मतलबखान, खुदाबंदाखान वगैरेंना म्हणाले, 'परळीचा किल्लेदार व किल्ल्यातील माणसे बाहेर आली आहेत. तुम्ही किल्ल्यात जा.' त्याप्रमाणे ते लोक किल्ल्यात गेले.

एक प्रहर सात घटिका दिवस आला असता शहाजादा आज्जम याचा वकील सुल्ताननजर आला. त्याने परळी किल्ल्याच्या सोन्याच्या किल्ल्या व परळी विजयाबद्दल शहाजाद्याकडून नजर (भेट, निसार, ओवाळणी) आणली.

बादशहा सिकंदर बेग कौल याला म्हणाले, 'नगारखान्यात हुकुम पाठवावा. पाच घटिकापर्यंत नौबती झडू द्या.'

बादशहांनी आज्ञा केली की : मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम याने किलीदे फतह (वसंतगड)ला जावे. तेथून रावतमल झाला यास पाठवावे. सय्यद शम्सुद्दीन मुहंमदखान याचे वसंतगड (किल्लेदारी)ला जाणे रहित करण्यात आले.

बादशहा शेख हिदायतकेश याला म्हणाले, 'खटावचा ठाणेदार रामचंद्र याला बोलवा. त्याला म्हणावे, 'छावणीसाठी खटाव किंवा इतर ठिकाणी योग्य जागा पाहून कळवा.'

फतेहुल्लाखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी नावांचा व्यवस्थापक मुहंमद तकी यास विचारले, 'कृष्णेला पूर किती आला आहे? त्याने सांगितले, 'दीड दरआ (पुरुष?).'

नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या लिहिण्यावरून बादशहांनी दाऊदखान (पन्नी) याची हैद्राबाद कर्नाटक, बालाघाट व पाईन घाट यांच्या फौजदारीवर नेमणूक केली.

**दहा जून १७००**

खटावचा ठाणेदार रामचंद्र याचा वकील याने वाकनीस हिदायतकेश यास कळविले की : छावणीसाठी भूषणगड किल्ल्यानजीक जागा चांगली आहे. बादशहांनी उस्मान करावल व असदुल्ला खुशमंजिल यांना बेलदार वगैरे देऊन (रस्ता नीट करण्यासाठी) पुढे जाण्यासाठी नेमले.

काल संध्याकाळी कळले की : तरबियतखान, मन्सूरखान व खुदाबंदाखान हे परळी किल्ल्यात राहिले. मुखलिसखान व मतलबखान हे हुजुरात आले.

बादशहा हे फराशखान्याचा मुशरफ शर्फुद्दीन याला म्हणाले, 'आम्ही येथून सोमवारी रवाना होऊ.'

बादशहांनी आज्ञा केली की : मार्गावरील फौजदार व ठाणेदार यांना लिहा :– पावसाळा आहे. मार्गात आपले अधिकारी उभे करा.

माळव्याचा सुभेदार मुख्तारखान याने पुढीलप्रमाणे लिहिले : राव गोपाळसिंग चंद्रावत हा या प्रांतात आला असून तो उपद्रव करण्याच्या उद्देशाने सैन्य गोळा करीत आहे. या भागातील जमीनदार व फौजदार यांनी मला लवकर येऊन मिळावे अशा आज्ञा मुद्दाम गुर्जबर्दारांच्या हस्ते रवाना व्हाव्या.

बालाघाटचा बदललेला फौजदार बख्तमंदखान याने खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याची इच्छा असेल तर तिकडे जावे नाही तर हुजुरात यावे अशी आज्ञा झाली. बक्षी बहरामंदखान याचा जावई मुहंमद तकीखान हा तळावर (ब्रह्मपुरी) मरण पावला. त्याला वीस हजार रुपयांचे वर्षासन होते.

**अकरा जून १७००**

बादशहांनी खिदमत गुजारखानाचा मुलगा अब्दुल्कादर याला बेलदार बरोबर देऊन निरोप दिला. भूषणगडच्या मार्गावरील चढ उतार नीट करावे अशी त्यांना आज्ञा करण्यात आली.

माळवा सुभ्याच्या बातम्यांवरून कळले की : शेरअफगनखानाच्या मृत्यूनंतर त्याचा नायब अल्लाह कुलीबेग हा शहाबाद सोडून कालाबाग येथे गेला. ही संधी पाहून शाहमन ढंढेरा याचा मुलगा देवीसिंग याने शहाबाद लुटून तेथे आपले ठाणे बसविले. बादशहांनी आज्ञा केली की : जाननिसारखान यास त्याचे पारिपत्य करण्यास लिहावे.

माळव्याच्या वृत्तांतावरून पुढीलप्रमाणे कळले : रामसिंग हाडा याचा मुलगा भीमसिंग याने राव गोपाळसिंग चंद्रावत याला सहा हजार रुपये व कापडाच्या दोन पेट्या दिल्या. याशिवाय त्याने राव गोपाळसिंग याला आपल्या इलाख्यात आश्रय दिला. काय आज्ञा ? बादशहांनी आज्ञा केली की : रामसिंग व त्याचा मुलगा यांचे मानमरातब काय आहेत चौकशी करून कळवावे.

काल गंजाचा (बाजाराचा) करोडा (व्यवस्थापक) अली रजा याने कळविले की : नदीला पूर आल्यामुळे धान्य येऊ शकत नाही. नावांच्या व्यवस्थापकाला (मीरे बहर) सांगितले की, 'नावा सोडा.' तो म्हणतो की, 'आपली ठाणी तिकडे कायम नसताना मी नावा सोडू शकत नाही.' बादशहा म्हणाले, 'नावा सोडा. चीनकुलीजखान तिकडे गेला आहे.'

**बारा जून १७००**

बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'येथून परळीच्या किल्ल्याचे अंतर किती साखळी आहे हे पाहून या. मी उद्या किल्ला पाहण्यासाठी जात आहे.'

रूहुल्लाखान याने लिहून पाठविले की : येथे ओझी वाहणारी माणसे व वाहने

मिळत नाहीत. बलूच्यांना नेमण्यात येऊन ओझी वाहणारी माणसे व वाहने मिळतील तेथून आणण्याची त्यांना ताकीद करण्यात यावी.

### तेरा जून १७००

आज बादशहा डोक्याला शिरपेच बांधून तख्ते रवांवर स्वार होऊन परळीचा किल्ला पाहाण्यास गेले. ते किल्ल्यात दाखल झाल्यावर बादशहाजादा आज्जम याने त्यांच्यावरून चांदीची फुले ओवाळून टाकली. आज्ञेप्रमाणे मन्सूरखान याने तोफांना सरबत्ती दिली. किल्ल्याच्या मशिदीत बादशहा प्रार्थना पढले. नंतर वाहनावर स्वार होऊन ते किल्ल्याच्या आतील वाटेने फतेहुल्लाखानाच्या मोर्च्यात गेले. मोर्चे पाहून ते परत आपल्या निवासस्थानाला आले. जाण्यायेण्याचे एकंदर अंतर तीन कोस भरले.

पुढील लोकांनी बादशहांना भेटून नजराणे अगर भेटी दिल्या :– बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा, बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, मतलबखान, रूहुल्लाखान, यलंगतोशखान, खुदाबंदाखान, इंद्रसिंग, बहादुरसिंग, मरहूम नजाबतखान याचा नातू, ख्वाजा अब्दुल्कादर, गुलबर्ग्याचा पीरजादा सय्यद मझली, गोविंदराय हरकारा, शहाजादा आज्जमचा खानसामा मूसवीखान.

### चवदा जून १७००

रूहुल्लाखानाने विनंती केली की : पुढील मुक्कामाचे तंबू रवाना झाले आहेत. उद्या आपण कूच करणार आहात. पण ओझी वाहाण्यासाठी उंटांचा पुरवठा झाला नाही. या कामासाठी गुर्जबर्दार नेमले गेले होते. काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'आम्ही अकरा मुहरम (सतरा जून)ला निघू.'

बादशहांनी आज्ञा केली की : सियादतखान याने दौलतखान्या (निवासस्थान)च्या पुढे टेहेळणी करीत असावे. ख्वाजाखान, सरकारखान व हुसेनखान हे त्याच्या बरोबर राहावेत.

कौलाराचा (शिपाई, हुजरे वगैरे) मुशरफ गुलाम मुहंमद हा पेशखान्याबरोबर (पुढे पाठविलेल्या तंबूबरोबर) गेला होता. त्याने दारूगोळा मागितला. द्यावा अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : परळीगडचे नाव यापुढे नवलतारा हे राहील कागदोपत्री याच नावाने त्याचा उल्लेख होत जावा.

मुखलिसखान याने विनंती केली की : नगोजी माने याची अर्जी आहे की :– म्हसवडचा ठाणेदार रणदुल्लाखान याला बदलून त्याच्या जागी मला म्हसवडची ठाणेदारी दिली तर मी गनिमांना (मराठ्यांना) त्या भागात येऊ देणार नाही. बादशहांनी नागोजीची विनंती मान्य केली. त्याला खिलतीची वस्त्रे द्यावी अशी आज्ञा करण्यात आली. नागोजी माने यास पाच हजार जात व चार हजार स्वार अशी मन्सब होती.

### पंधरा जून १७००

उस्मानखान करावल व असदुल्ला खुशमंजिल हे भूषणगडपर्यंतच्या मार्गाची पाहाणी

करून आले. भूषणगडपर्यंत अंतर चवदा कोसाचे असून सहा मजला होतील असे त्यांनी कळविले.

बादशहांनी बक्षीउल्मुल्क मुखलिसखान, हमीदुद्दीनखानबहादुर व जवाहरमल (बांधकामाचा मुख्य) यांना आज्ञा केली की : नवलतारा उर्फ परळीच्या किल्ल्याची जी मोडतोड झाली आहे ती दुरुस्त करावी. त्याप्रमाणे त्यांनी दुरुस्ती व डागडुजीच्या खर्चाचा अंदाज बादशहांना दिला. जवाहरमलने किल्ल्याची दुरुस्ती करावी अशी आज्ञा करण्यात आली.

## सोळा जून १७००

आज मुहरमचा दहावा दिवस. कचेऱ्या बंद होत्या. बादशहांनी आज पाच अनाथ मुलांना बोलावून त्यांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांना सोने व एक एक आंबा बक्षीस म्हणून दिले.

## सतरा जून १७००

आज बादशहा नवलतारागड उर्फ परळी येथून निघाले. तख्ते रवांवर ते स्वार होते. पाउणेदोन कोसाचा प्रवास करून ते आज्मतारागड (सातारा) जवळ येऊन मुक्कामावर पोहोचले. गंज (बाजार) च्या करोडी गिरीवर (व्यवस्थापक) अली रजाच्या ऐवजी पूर्वीप्रमाणे सय्यद इमामुद्दीन याची नेमणूक करण्यात आली.

पुढील मंडळींनी बादशहा प्रवासात असताना, त्यांना भेटून नजराणे दिले :– मरहुम अमीरखान याचा मुलगा मीरखान, बाजाराचा व्यवस्थापक सय्यद इमामुद्दीन, रूहुल्लाखान याची खलीलुल्लाखान वगैरे दोन मुले.

नाहरखान याची मुले जंगजूखान व अबू मुहंमदखान यांनी बादशहांना एक कलिंगड दिले. बादशहांनी विचारले, 'नाहरखान कुठे आहे?' ते म्हणाले, 'तो पाईन विलायत (शिरवळ प्रांत) हून आज्जमतारागड (सातारा) कडे येत आहे. उद्या येऊन आपल्याला भेटेल.'

मुखलिसखान, मतलबखान, यलंगतोशखान आदींच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

## अठरा जून १७००

काल रात्री यारअलीबेग याने अर्ज केला की : छावणीचे सामान मागच्या मुक्कामावरून अद्याप आले नाही. आपला पेशखाना (पुढे पाठवायचे तंबू) पुढे रवाना झाला आहे. येथेच मुक्काम करावा. विनंती मान्य करण्यात आली.

म्हसवडचा ठाणेदार नागोजी माने यास खिलतीची वस्त्रे व तुरकताजखान यास एक घोडा या वस्तू देण्यात आल्या.

तरबियतखान हा सैन्याची पिछाडी (चंदावल) सांभाळीत होता. त्याने विनंती लिहून पाठविली की :–

(१) बर्कंदाजांची पगारबाकी फार राहिली आहे. त्यांची दुर्दशा आहे. त्यांचा पगार मिळावा. पन्नास हजार रुपये सरकारी खजिन्यातून पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

(२) येथे धान्य नाही. आम्ही तेथे येऊन पोहोचेपर्यंत काही धान्य पाठविण्यास बाजाराचा व्यवस्थापक यास आज्ञा व्हावी. विनंती मान्य करण्यात आली.

आज्जमतारागडचा (सातारा) फौजदार यासीनखान याने लिहिले की : हणमंतराव (मराठा सरदार निंबाळकर) याने बारामती फलटण भागात छावणी घातली आहे. आज्ञा झाली तर येथे माझा नायब ठेवून गनिमांच्या पारिपत्यासाठी तिकडे जाईन. विनंती मान्य करण्यात आली.

**सव्वीस जून १७००**

शुक्रवार मुहरमची वीस तारीख. आज कचेऱ्या बंद होत्या.

**सत्तावीस जून १७००**

जहीरुद्दीन यास किल्ले किलीदे फतह (वसंतगड) येथे बक्षी व वाकनीस म्हणून नेमण्यात आले.

आज्जमतारागड (सातारा) चा फौजदार यासीनखान यास एक तल्वार बक्षीस देण्यात आली. यासीनखानाच्या बरोबर पंधरा हत्ती व दीडशे बैल देण्यात यावेत म्हणजे किल्ल्याच्या पायथ्यापासून (सातारा) तरबियतखान तोफा आणू शकेल अशी बादशहांनी आज्ञा केली.

फराशखान्याचा मुशरफ शरफुद्दीन याने विनंती केली की: आपला पेशखाना (पुढे पाठवायचे तंबू) कृष्णा पार झाला. आहे. तो पुढे रवाना करावा काय? बादशहा म्हणाले, 'येथेच उभा करा. आपले सर्व सैन्य कृष्णा ओलडूंन इकडे आले म्हणजे पेशखाना पुढे पाठवावा.'

कऱ्हाडचा ठाणेदार याने विनंती केली की : तोफांच्यासाठी लागणारा दारुगोळा व इतर सरंजाम देण्यात यावा. पुढीलप्रमाणे सरंजाम द्यावा अशी आज्ञा झाली :–

(१) कऱ्हाडची गढी मजबूत करण्यासाठी (नव्याने बांधकाम करण्यासाठी) तीन हजार रुपये,
(२) तीनशे बेलदार पाठविण्यात यावेत,
(३) सक्का (पाणी वाहाणारे) पंचवीस माणसे,
(४) रेहकले (लहान तोफा) पाच,
(५) बाण (अग्निबाण) दोनशे,
(६) कर्नाटकी प्यादे, पाचशे,
(७) सरब (दारुसाठी लागणारी माती) तीस शेर (?)
(८) बारुद पन्नास शेर(?).

नौरसतारागड (परळी) चा किल्लेदार रावतमल झाला याने विनंती केली की : मला घोडयांना डाग देण्याच्या अटीतून माफी मिळावी. विनंती मान्य करण्यात आली.

**अठ्ठावीस जून १७००**

दख्खनच्या तोफखान्याचा दारोगा मन्सूरखान व त्याचा मुलगा मुहंमद जफर हे

नौरसतारागडावरून (परळी) येऊन बादशहांना भेटले. त्र्यंबकचा वाकनीस व बक्षी असदुल्ला याने निरोप घेतला.

अब्बास कुलीखान हा खान फीरोजजंग याच्या फौजेत तैनात होता. त्याने हुजुरात यावे अशी आज्ञा झाली. त्याला एक हजार जात व दोनशे स्वार अशी मन्सब आहे.

बादशहांनी नायब कोतवाल मुहंमद अमीन यास आज्ञा केली की : लष्करातील जी माणसे कृष्णेच्या पलीकडे राहिली आहेत त्यांना मुद्दाम माणसे नेमून कृष्णापार करवा. या कामासाठी मीर बहर (नावांचा अधिकारी) मुहंमद नसीर याने चार नावा रूहुल्लाखान व तरबियतखान यांना द्याव्या.

मुखलिसखान याने कळविले की : मुनीमखान हा आपल्या आज्ञेप्रमाणे कृष्णेच्या पलीकडच्या घाटावर बसला आहे. त्याने लिहून कळविले आहे की :– कृष्णेचे पाणी ओसरले आहे. आज्ञा असेल तर मुहंमद नसीर (मीर बहर नावांचा अधिकारी) याला येथे सोडून मी हुजुरात येईन. विनंती मान्य करण्यात आली. रहमतपूरचा देशमुख निको (निळो) हा बादशहांना भेटला.

पेशखाना पुढे पाठविण्यात यावा अशी शरफुद्दीन यास आज्ञा करण्यात आली.

### एकोणतीस जून १७००

फराशखान्याचा मुशरफ शर्फुद्दीन याला पेशखान्याचे तंबू पुढे पाठवावे अशी आज्ञा करण्यात आली.

मुहतशिमखान हा मागे राहिला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

बादशहांनी आज्ञा केली की : नावांच्या दळाची तीन भागात विभागणी करावी. काही नावा तळावर (ब्रह्मपुरी, भीमा काठ) धान्याच्या ने–आणीसाठी राहाव्या. काही आपल्याबरोबर कृष्णेत आणि काही मुर्तजाबाद मिरज येथे.

काल रात्री बादशहांनी आज्ञा केली होती की : मी येथून कन्हाडला जाऊन तेथील मशिदीत नमाज पढून पुढे भूषणगडला जाईन. शेख हिदायतकेश याने विनंती केली की : येथून (कन्हाडचा) पल्ला लांब आहे. भूषणगडहून (कन्हाड) जवळ पडेल. बादशहा म्हणाले, '(येथून) कन्हाडला जाणे स्थगित.'

हिदायतुल्ला गुर्जबर्दार याला आज्ञा झाली की : तुम्ही अजमीरला जा. तेथे एक महिनाभर राहा. तेथे उंट विकत घेऊन बरोबर घेऊन या.

पाईन विलायत (शिरवळ वाई प्रांत) चा ठाणेदार नाहरखान हा येऊन बादशहांना भेटला. त्याला एक तल्वार बक्षीस देऊन निरोप देण्यात आला.

### तीस जून १७००

आज बादशहा तख्ते रवांवर स्वार झाले. कृष्णेच्या काठावरून ते निघाले. पावणेदोन कोसाचा प्रवास करून ते नेवी (सापगावजवळ) या गावी पोहोचले. (हे गाव रहमतपूर जवळील न्हावीबुद्रुक असावे).

फतेहुल्लाखान हा घोडे पोहोचविण्यासाठी खटाव परगण्यात गेला होता. तो या

मुक्कामी येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी त्याला आज्ञा केली की : गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी चंदनवंदनकडे जा. तेथून खटाववरून भूषणगडला या.

शेख हिदायतकेश याने सांगितले की, 'येथून भूषणगडपर्यंत दोन जबर मजला आहेत.' बादशहा म्हणाले, 'साखळयांच्या (जरीब) द्वारे अंतर मोजून कळवा.' कळविण्यात आले की : अंतर सहा कोसाचे आहे. बादशहा म्हणाले, 'दोन मजलांच्या चार मजला करा.' वाटेत घाट (कोतल) आहे असे कळले.

शर्फुद्दीन (फराशखान्याचा मुशरफ) याने कळविले की : पेशखाना मागे राहिला होता. तो आला आहे. तो पुढे रवाना करण्यासंबंधी काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'उद्या रवाना करा.'

तरबियतखानाने हुजुरात यावे, नाहरखान व यासीनखान यांनी तोफा वगैरे सामग्री याजवर लक्ष ठेवावे अशी आज्ञा झाली.

मसूर व कऱ्हडाचा ठाणेदार मयाजी (मंबाजी) याला आज्ञा झाली की : नावांना कृष्णेच्या वाटेने छावणीच्या जवळ आणीत चला.

रूहुल्लाखान खानेसामा हा कृष्णेच्या पलीकडे राहिला होता. तो येऊन भेटला. बादशहा त्याला म्हणाले, 'तुम्ही कृष्णेच्या पलीकडे राहून तिकडील कारखाने (सामान-सरंजाम) इकडे घेऊन या.' दप्तर आणण्यासाठी दीवाणे आलाच्या कचेरीचा दारोगा यारअलीबेग याला बरोबर हती देऊन आज्जमतारागडाकडे पाठविण्यात आले होते. तो येऊन बादशहांना भेटला.

**एक जुलै १७००**

आज सकाळपासून पावसाला सुरवात झाली. आज कचेरीचे व न्यायालयाचे काम बंद ठेवण्यात आले. बादशहांनी पेशखाना पुढे पाठवावा अशी आज्ञा केली.

**दोन जुलै १७००**

आज बादशहा नबेली (न्हावीबुद्रुक) सापगावहून निघाले ते दीड कोसावर थोडे अंतर प्रवास करून भूषणगडच्या वाटेवरच्या घाटाच्या अलीकडे मुक्कामाला आले.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'खानेआलम वगैरे दहा हजार स्वार शहाजादा बेदारबख्त याच्या तैनातीत आहेत. त्यांना हूजुरात बोलावून घ्या. खानेआलमला म्हणावे, "तळावरचा (ब्रह्मपुरी) खजिना येताना बरोबर घेऊन या."'

मुकुंद बागवान याने भाजीची करंडी बादशहांना भेट म्हणून दिली.

बादशहा म्हणाले, 'आम्ही उद्या येथे मुक्काम करणार. पेशखाना पुढे जाऊ द्या.'

**तीन जुलै १७००**

बादशहांनी आज्ञा केली की : चीनकुलीजखानाला सैन्यासहित खटावहून हुजुरात बोलावून घ्या.

करावलचा मुशरफ मस्त अली याला बादशहा म्हणाले, 'भूषणगडपासून दोन कोसावर नीमिसोड येथे छावणी करण्यास योग्य जागा आहे काय हे पाहून या.'

मुहंमद अमीनखान व फौजेतील इतर करावल(टेहेळणी करणारे) यांनी सकाळ-पासून संध्याकाळपर्यंत छावणीच्याभोवती सावधगिरीने गस्त घालीत राहावे अशी आज्ञा करण्यात आली.

**चार जुलै १७००**

रूहुल्लाखान हा मागे (कृष्णेच्या पलीकडे) राहिला होता. काल रात्री त्याने लिहून पाठविले की : आपण उद्या कूच करून पुढे निघणार. कारखाने (सरंजामसामग्री) तर इकडे पडले आहेत. आपण तेथेच मुक्काम करावा. त्याची विनंती मान्य करण्यात आली.

चीनकुलीजखानबहादुर हा खटावहून येऊन बादशहांना भेटला. छावणीतील गंजाचा (बाजार)व्यवस्थापक सय्यद इमामुद्दीन हा धान्य गोळा करण्यासाठी यापूर्वीच आला होता. तो बादशहांना भेटला. फतेहुल्लाखान हा आज्ञेप्रमाणे नांदगिरी वगैरे किल्ल्याची टेहेळणी करून परत आला. तो बादशहांना भेटला.

नाहरखानाची मुले जंगजूखान व अबूमुहंमदखान ही बादशहांचा निरोप घेण्यासाठी आली. त्यांना खिलतीची वस्त्रे देऊन उद्या निरोप द्यावा अशी आज्ञा झाली.

टेहेळणीच्या पथकात(करावल)डाव्याफळीला ख्वाजाखान हा असे. त्याच्या जागी मरहूम अघरखान याचा नातू शमशेर बेग याची नेमणूक करण्यात आली.

खटाव येथील हरकाऱ्याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : मराठे हे खटाव पासून एक कोसा-वर आले. त्यांनी प्रवासी व बंजारी यांना संपूर्णपणे लुटले व ते (मराठे)त्यांना घेऊन गेले.

खटावला रामचंद्र हा ठाणेदार होता. त्याला दोन हजार जात व दोन हजार स्वार, त्यापैकी एक हजार दुघोडी अशी मन्सब होती. त्याची मन्सब शंभर स्वारांनी कमी कर-ण्यात आली.

तरबियतखान हा पिछाडी(चंदावल)वर नेमला होता. त्याने बादशहांना पुढील-प्रमाणे लिहून कळविले : छावणीतील माणसे, कारखाने; चिखल व गाळ यामुळे कृष्णेच्या काठापासून छावणीपर्यंत अडकून पडली आहेत. मसूरचा ठाणेदार मंबाजी व खटावचा ठाणेदार रामचंद्र यांना चंदावलीला(पिछाडीला) माझ्यापाशी तैनात करावे म्हणजे छावणीतील माणसांना मी सुरक्षितपणे हुजुरात आणू शकेन. विनंती मान्य करण्यात आली.

**पाच जुलै १७००**

बादशहा आज पुढील प्रवासासाठी जाण्यास तख्ते रवांवर स्वार झाले. तरबियतखान हा येऊन त्यांना भेटला. बादशहांनी त्याला विचारले, 'लष्करातील माणसे मागे राहिली आहेत का?' तो म्हणाला, 'काही साधने व सोयी बरोबर नसल्यामुळे बरीच माणसे ठिकठिकाणी अडकून पडली आहेत.' बादशहांनी तरबियतखानाला तेथेच सोडले व त्याला सांगितले, 'लष्करातील लोकांना सुरक्षितपणे छावणीत आणा.'

यानंतर सव्वा कोस प्रवास करून बादशहा मुक्कामाला आले.

राजा अवधूतसिंग(बुंदेला, ओछर्याचा राजा) हा चीनकुलीजखानाच्या फौजेत तैनात होता. तो येऊन बादशहांना भेटला.

ख्वाजा मुहरमखान हा फळफळावळ व बागा यांचा व्यवस्थापक होता. बुऱ्हाणपूर बागांची दुरुस्ती करण्यासाठी बादशहांनी त्याला तिकडे पाठविले. बादशहा मुखलिसखान व हमीदुद्दीनखानबहादुर यांना म्हणाले, 'भूषणगड पासून तीन चार कोसावर निमसोड व मायणी ही गावे आहेत. तेथे छावणी करण्यायोग्य जागा पाहून तिचा नकाशा तयार करून आणा. मस्त अली व हिदायतकेश यांना बरोबर घेऊन जा.'

**सहा जुलै १७००**

सुभानखान याने लिहून पाठविले की : तळावरून (ब्रह्मपुरी) मी तोफांचा सरंजाम आणीत आहे. पण वाटेत गनिमांची (मराठ्यांची) धामधूम आहे. संरक्षक पथक देण्यात यावे. मुखलिसखान याने संरक्षक पथक (बदर्का) द्यावे अशी आज्ञा झाली.

मतलबखान आजारी आहे असे कळले. बादशहांनी त्याचा मुलगा असदल्ला याजपाशी त्याच्या प्रकृतीची चौकशी केली.

काल रात्री रुहुल्लाखान याने खालिकमान (खुदामानचा मुलगा) या दरवेशाला बादशहापाशी आणले. बादशहांनी पाच रुपये, दहा होन व बारापावली सोने देऊन निरोप दिला.

**सात जुलै १७००**

बादशहांना कळविण्यात आले की : मुखलिसखा व हमीदुद्दीनखानबहादुर वगैरे पुढील मुक्कामासाठी जागा पाहण्यास गेले आहेत. पेशखाना पुढे रवाना करावा अशी शर्फुद्दीनला आज्ञा झाली.

फतेहुल्लाखान याने विनंती केली की : तुर्कताजखान व चीनसबद यांची मन्सब कमी करण्यात आली आहे. ते निरपराधी आहेत. त्यांची मन्सब बहाल करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

**आठ जुलै १७००**

काल बक्षीउलमुल्क मुखलिसखान व हमीदुद्दीनखानबहादुर हे पुढील मुक्कामासाठी जागा पाहून आले. त्यांनी वृत्त लिहून पाठविले की : जेथे जागा चांगली आहे तेथे पाणी नाही. आणि जेथे पाणी आहे तेथे जागा चांगली नाही.

बादशहा म्हणाले, 'बक्षिउलमुल्क मुखलिसखान याला रात्री माझ्याकडे बोलावून घ्या.' शरफुद्दीन हुसेनला म्हणावे, 'पुढे पाठविलेला पेशखाना परत बोलवून घ्या.'

रात्रीच्या सहा घटिका झाल्या असता मुखलिसखान हुजुरात आला आहे असे कळले. बादशहांनी त्याने उद्या भेटावे अशी आज्ञा केली. याच वेळी शर्फुद्दीन येऊन हजर झाला. बादशहा म्हणाले, 'आज्ञेशिवाय पेशखाना पुढे का रवाना झाला?'

ख्वाजा मंजूरने सांगितले, 'त्याला पेशखाना पुढे पाविण्याची आज्ञा झाली म्हणून त्याने पाठविली. नाही तर त्याची काय मजाल होती.' बादशहा म्हणाले, 'पुढील मुक्कामाची जागा अद्याप ठरली नाही आणि पेशखाना पुढे पाठविला. तुमची मन्सब कमी केली पाहिजे' शर्फुद्दीनला पाचशे जात व साठ स्वार अशी मन्सब होती. ती शंभरने कमी करण्यात आली. बादशहा म्हणाले, 'पेशखाना परत बोलावून घ्या.'

मुखलिसखान व हमीदुद्दीनखानबहादुर हे हुजुरात आले. ते म्हणाले, 'येथून चार कोसावर इरला नदीच्या काठी अंबेवाडी(आंबवड, भूषणगडजवळ) हे गाव आहे. तेथे छावणी योग्य जागा आहे.' करावलखान म्हणाला, 'सगळया जागांपैकी तीच जागा बरी दिसते.' बादशहा म्हणाले, 'जागेचा नकाशा तयार करून मला दाखवा.' बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'इतर जागांचीही चौकशी करून मला कळवा.'

हमीदुद्दीनखानबहादुर म्हणाला, 'पेशखाना परत आणण्यासाठी शर्फुद्दीनला हत्ती हवे आहेत.' बादशहा म्हणाले, 'पेशखाना तूर्त तेथेच राहू द्या.'

रूहुल्लाखान हा मागे राहिला होता. तो येऊन बादशहांना भेटला. बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'सरकारी पागा(घोडे)खटावला आहे. तो बोलावून घ्या.'

तरबियतखानाने विनंती लिहून पाठविली की : माझ्यापाशी सैन्य(जमियत) थोडे आहे. राव सुजानसिंग(बीकानेरचा राजा) व सर्फराजखान यांना मझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

**नऊ जुलै १७००**

बादशहा चीनकुलीजखानाला म्हणाले, 'तयार रहा. गनिमांच्या पारिपत्यासाठी मी तुम्हाला(चीनकुलीजखानाला) बारामतीला पाठवीत आहे.' बादशहा आज तख्ते रवांवर स्वार होऊन निघाले. पावणेदोन कोसाचा प्रवास करून ते मुक्कामाला पोहोचले. मुखलिसखानाने चीनकुलीजखानाबरोबर पाठवायच्या पथकांचे तूमार(सैनिकांची यादी, मस्टर) तयार करून द्यावे अशी आज्ञा झाली.

मुल्तफतखानाच्या विनंतीवरून शर्फुद्दीनची कमी केलेली मन्सब बहाल करण्यात आली.

बादशहांनी शेख हिदायतकेश याला विचारले, 'उद्याची मजल किती अंतराची राहील?' त्याने सांगितले, 'सव्वा कोस.' बादशहा शर्फुद्दीनला म्हणाले, 'येथे आम्ही दोन मुक्काम करू. पेशखाना तसाच उभा राहू द्या.'

**दहा जुलै १७००**

आज बादशहा दोन कोस चार साखळी(जरीब)प्रवास करून भूषणगडच्या पलीकडे सेरोनी (म्हसुर्णे, खटाव तालुका जवळील शेणवाडी ?) येथे पोहोचले. बादशहांनी शेख हिदायतकेश याला विचारले, 'उद्याची मजल किती लांब आहे ?' त्याने सांगितले, 'सव्वा कोस.' बादशहा शर्फुद्दीनला म्हणाले, 'येथे दोन मुक्काम राहतील. पेशखाना उभा राहू द्या.'

बादशहांनी आज्ञा केली की : दीवाणेखासच्या समोर खाशाचे दोन घोडे तयार ठवीत चला. आम्ही त्यांचा उपयोग करीत जाऊ.

शहाजादा बेदारबख्त याने पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : राव गोपाळसिंग याच्या पारिपत्यासाठी मला माळवा सुभ्याकडे जाण्याची आज्ञा झाली आहे. जाण्यापूर्वी एकदा आपल्या चरणांचे दर्शन घडावे अशी इच्छा आहे.

बादशहा म्हणाले, 'बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा यांनी तयार राहावे. त्यांना मी माळव्याच्या सुभ्यावर पाठवीत आहे. शहाजादे बेदारबख्त यांनी हुजुरात यावे.'

बादशहांना कळविण्यात आले की : चीनकुलीजखान हे गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी व धान्याची रसद आणण्यासाठी बारामतीला जाण्याबद्दल उजर (आक्षेप), करीत आहेत. काय आज्ञा?

बादशहा म्हणाले, 'मुखलिसखानाने चीनकुलीजखानाला सांगावे की, "त्याने (चीनकुलीजखानाने) आपल्या बापापाशी जावे."

मुखलिसखानाने चौकशी करून कळविले की : चीनकुलीजखान हा या गोष्टीला (बापाकडे वऱ्हाडात जाण्यास) राजी आहे. बादशहांनी चीनकुलीजखान याला बोलावून त्याला वऱ्हाडकडे जाण्यासाठी निरोप दिला. त्याला खिलतीची वस्त्रे व एक रत्नजडित खंजीर ही देण्यात आली. बादशहा त्याला म्हणाले, 'तुमच्या तैनातीत असलेले सैन्य इकडे ठेवून द्या. फक्त तुमची स्वतःची पथके व बिरादरीचे लोक घेऊन तुम्ही वऱ्हडात जा.'

चीनकुलीजच्या ऐवजी रसद आणण्यासाठी फतेहुल्लाखानने जावे अशी आज्ञा झाली.

तरबियतखानाने लिहून पाठविले की : रेहकले (लहान तोफा) व गुलालबारचे सामान मागे पडून आहे. खुदादादखान याने अद्याप वाहतुकीसाठी रेहकल्याचे घोडे व बैल पाठविले नाहीत. काय आज्ञा? बादशहांनी खुदादाद आणि त्याचा मुलगा मीरदाद यांची मन्सब अनुक्रमे शंभर व पन्नासने कमी केली.

बादशहांनी आज्ञा केली की : बहिर्जी पांढरे याचा मुलगा पूर्वीप्रमाणेच तरबियतखानाच्या फौजेत चंदावल (पिछाडी) ला तैनात राहावा.

मुखलिसखानाने विनंती केली की : खटावहून सरकारी पागेचे घोडे तेथील ठाणेदार रामचंद्र याने आणावे अशी आपण आज्ञा केली होती. पण आता रामचंद्र याला फतेहुल्लाखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले आहे. काय आज्ञा? बादशहा म्हणाले, 'रणदुलाखान व मुगलखान यांनी घोडे आणावे.'

काल रात्री मुखलिसखान याने पुढील छावणीच्या जागेचा नकाशा बादशहांसमोर ठेवला. बादशहांनी छावणीची जागा पसंत केली. करावलखान याने म्हटले, 'ती जागा येथून तीन कोसावर आहे. त्याच्यापुढे ईरला नदीच्या काठी छावणीसाठी जागा चांगली आहे. तेथे गवतचारा इत्यादी मुबलक आहे.' बादशहा म्हणाले, 'तुम्ही पुन्हा एकदा जाऊन ती जागा पाहून या.' करावलखानाबरोबर पन्नास स्वार देण्यात आले.

**अकरा जुलै १७००**

बुऱ्हाणपूर (खानदेश) सुभ्यातील बागांची दुरुस्ती करण्यासाठी ख्वाजा मुहरमखान याला निरोप देण्यात आला. त्याने विनंती केली की : माझ्या संरक्षक पथकाचे लोक मला अद्याप मिळाले नाहीत. त्यांना रवाना करण्याची आज्ञा व्हावी.

पाचगावचा ठाणेदार पदाजी (बुधाजी?) याने लिहून पाठविले की : रसद चोहोकडून येत आहे. पण गनिमांचा (मराठ्यांचा) उपद्रव भारी आहे. माझ्याकडून रसद (छावणीत) पोहोचविणे शक्य होत नाही. बादशहांनी त्याला आज्ञा केली की : तुम्ही हुजुरात या. आज बादशहा मुक्कामावरून निघाले ते रसगाव (इसगाव?) भूषणगडजवळ आले. तेथे

त्यांनी मुक्काम केला.

**बारा जुलै १७००**

आज बादशहा रसगाव (इसगाव, अलसगाव, रलसगाव?) हून निघाले. एक कोस व अर्धापावचा प्रवास करून इरलानदीजवळ असलेल्या अंबावाडी (आंबवड असावे) गावा जवळ येऊन पोहोचले.

बादशहांनी आज्ञा केली की : आमच्या तीन क्रमांकाच्या तबेल्यातील तख्ते रवां नावाचा घोडा बादशहाजादा आज्जम याच्यासाठी वेगळा काढून ठेवा. चारहि तबेल्यातील खाशांचे घोडे माझ्या समोर आणा.

सय्यद तातार याचा नातू आणि सय्यद अली अकबर याचा मुलगा सय्यद रुस्तम अली याची किलीदे फतह उर्फ वसंतगड या किल्ल्याच्या किल्लेदारीवर नेमणूक करण्यात आली. त्याला सहाशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती. तीत शंभर जात व दोनशे स्वार अशी भर घालण्यात आली.

पुढील अधिकारी बादशहांना भेटले :–शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला सहाफतखान (?) याने छावणीत दारूखाना (बारूत) आणला होता. बेदारबख्ताच्या छावणीतील माजी वाकनीस इखलासकेश, भूपणगडचा किल्लेदार व सय्यद नजाबतचा मुलगा सय्यद मुहंमद अली.

निसार सकशिकनखानी हा ब्रह्मपुरीच्या तळावरून येऊन बादशहांना भेटला.

ख्वाजा मंजूरने कळविले की : जवाहरमल (बांधकाम खात्याचा मुख्य) याच्या घरी चोरी झाली. चोरांनी सगळे घर धुवून नेले. याबद्दल हमीदुद्दीनखानबहादुर व शेख हिदा-यतकेश यांनी नायब कोतवालापाशी चौकशी करावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहा यारअलीबेग यास म्हणाले, 'येथून तळापर्यंत (ब्रम्हपुरी) व पेडगाव बहादुरगडपर्यंत किती मजला आहेत लिहून माझ्या समोर आणा.' बादशहा मुखलिस-खानाला म्हणाले, 'मी बहरामंदखानाला तळाच्या (ब्रम्हपुरी) संरक्षणासाठी पाठविणर आहे. पथकातील सैनिकांची यादी (तुमार, मस्टर रोल) तयार करा.

**तेरा जुलै १७००**

आज बादशहांचा मुक्काम आंबेवाडी येथे होता. आज बादशहांनी बक्षीउलमुल्क मुखलिसखान यास आज्ञा केली होती की : बंडखोरांच्या पारिपत्यासाठी मी बादशहा-जादा मुहंमद आज्जमशहा याला पाठवीत आहे. त्याच्याबरोबर सैन्य किती राहील याचा तपशील द्या. त्याप्रमाणे मुखलिसखानाने सैन्याचा पुढीलप्रमाणे तपशील दिला :– एकोणीस हजार व सहाशे स्वार. यात इंद्रसिंग याची पथके, माळव्याचा सुभेदार मुख्तारखान, अजमीरचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान, ग्वाल्हेरचा फौजदार जानसिपार-खान (जाननिसारखान पाहिजे) इत्यादींचीही काही पथके जमेत धरली होती.

हिंदुस्थानातून (उत्तर भारत) आलेला खजिना तळावर होता. तो म्हसवड-पर्यंत आणण्यात आला. तो छावणीत आणण्याची आज्ञा झाली.

बादशहांनी आपल्या खास पागातून चार इराकी घोडे, पाच तुर्की घोडे व एक सात हजार रुपये किमतीचा घोडा हे बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याच्यासाठी वेगळे काढून ठेवावे अशी आज्ञा केली. बादशहाजादा मुहंमद आज्जम हा बहादुरगडला असताना त्याच्यापाशी जितके हशम व तोफखाना हे तैनात होते तितकेच आता ही राहावेत अशी बादशहांनी आज्ञा केली.

सरमस्त उर्फ रजवीखान वगैरे माणसे गाजिउद्दीनखानबहादुर याच्या फौजेत तैनात होती. ती बादशाही छावणीजवळ आली असे कळले. ही माणसे कां आली याची चौकशी करावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

नरकवासी रामा(राजाराम) याचे मेहुणे(बायकोचे भाऊ, प्रतापराव गुजराची मुले)खंडूराव व जगन्नाथ हे शहाजादा बेदारबख्त याच्या हुजुरात मुसलमान झाले. ते यावेळी इनायतुल्लाखानाच्या मध्यस्थीने बादशहाच्या हुजुरात आले. बादशहांनी खिलतीची वस्त्रे देऊन त्यांना अब्दुर्रहीम व अब्दुर्रहमान ही नावे दिली.

इनायतुल्लाखानाचा चिटणीस केवलदास हा आज्ञेप्रमाणे तळावरून(ब्रम्हपुरीच्या) येऊन बादशहास भेटला.

काल बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : जुम्लतुल्मुल्क असदखान(मुख्यप्रधान), मरहूम खानजहानबहादुर याची मुले नुस्रतखान व अबुल्फतहखान, अजितसिंग, जयसिंग यांनी तळावरून(ब्रम्हपुरी) बादशाही छावणीत यावे. एक अबुल्मुआली याने तळावर राहावे. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याच्या बरोबर असलेल्या फौजेचा तपशील(तूमार) देण्यात यावा.

बादशहाजादा मुहंमद आज्जमशहा याला (माळव्यात जाण्यासाठी) निरोप देताना बक्षीस म्हणून देण्यासाठी मोती व पाचू यांचा तुरा, एक लाख बत्तीस हजार रुपयांचा वेगळा काढून ठेवावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहा बादशहाजादा आज्जम याला म्हणाले, ‘तयार व्हा. गोपाळसिंग चंद्रावत व दुष्ट सत्रसाल(छत्रसाल बुंदेला) यांच्या पारिपत्यासाठी मी तुम्हाला माळवा सुभ्याकडे पाठवीत आहे.’

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, ‘शहाजादे बेदारबख्त हे माझ्या बरोबर राहतील.’

आज्ञेप्रमाणे मुखलिसखानाने बादशहाजादा आज्जम याच्या बरोबर पाठविणाऱ्या फौजेचा तपशील दिला. सैनिकांची संख्या त्याने एकोणीस हजार सहाशे स्वार अशी दाखविली. सैन्यात माळवा, अजमीर या सुभ्यातील जमीनदार व फौजदार, ग्वाल्हेर व अनवा येथील फौजदार, राजा जयसिंग याची पथके, इंद्रसिंग व बहादुरसिंग (उदयपूरचा राणा अमरसिंग याचे काका) व राव सुजानसिंग(बिकानेर) यांचा समावेश करण्यात आला होता. यापैकी राव सुजानसिंग याने आपल्या बरोबर राहावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

शहाजादा बेदारबख्त याला हुजुरात येण्याविषयी आज्ञा पाठविण्यात आली.

बादशहा म्हणाले, ‘बक्षीउल्मुल्क बहरामंदखान यास तयार राहाण्यास सांगा. तळाच्या(ब्रम्हपुरी) रक्षणासाठी मी त्याला पाठवणार आहे. सय्यद अजमतुल्लाखान,

यक्कताजखान वगैरे अधिकारी त्यांच्या बरोबर राहतील.'

खिदमततलबखान याने विनंती केली की : रात्री कर्णे वाजविण्यासंबंधी काय आज्ञा? तीन रात्री कर्णे वाजवावे. यानंतर पुन्हा विचारावे, अशी आज्ञा झाली.

चीनकुलीजखान याने विनंति केली की : आपली परवानगी असेल तर बादशहाजादा आज्जम यांना भेटेन. परवानगी देण्यात आली. त्याप्रमाणे तो आज्जमला भेटला.

**चवदा जुलै १७००**

बादशहांनी आज्ञा केली की : उदयपूरचा राणा अमरसिंग (१६९८ ते १७१०) याच्यासाठी फर्मान, दोन हजार रुपयाची रत्नखचित कट्यार इत्यादी वस्तू तयार ठेवण्यात याव्या.

ख्वाजामसूद महली व बशीरबेग हे शिकारीसाठी बादशाही छावणीपासून सहा कोसावर गेले होते. एक नीलगाय, दोन चिकारे, एक दुऱ्राज (तीतर, चित्रपक्षी) व चार लावेपक्षी यांची शिकार करून ते घेऊन आले. बादशहा म्हणाले, 'येथे शिकार बरीच मिळते. तिचे संरक्षण करा.' (शिकार दरीनवाही बीसियार अस्त. मुहाफिजत नुमायद.)

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'जुल्फिकारखानाला पुढील अर्थाचे पत्र लिहा :— तुमच्या पाशी तेहतीस हजार तीनशेची फौज तैनात आहे. त्यापैकी काही कर्नाटकात ठेवून तुम्ही हुजुरात येऊन सेवा करावी.'

**पंधरा जुलै १७००**

आज बादशहांनी आंबेवाडी येथे न्यायदानाचे काम केले. बादशहाजादा मुहंमद आज्जम याला साडेचार हजार रुपयांचा बाजूबंद देण्यात आला. त्याच्या फौजेत जलालुद्दीन याची बक्षी म्हणून व इखलासकेश याची दुय्यम बक्षी व वाकनीस म्हणून नेमणूक करण्यात आली.

राणा अमरसिंग याच्यासाठी एक हत्ती व एक घोडा वेगळा काढून ठेवावा अशी आज्ञा झाली.

चार घटिका दिवस राहिला असता हरकाऱ्यांनी पुढील बातमी कळविली : शेख जमालुद्दीन याला दोनशे जात व वीस स्वार अशी मन्सब होती. तो शिकारीसाठी म्हणून छावणीहून दोन कोसावर गेला होता. इतक्यात गनीम (मराठे) मोठ्या संख्येने त्याच्यावर चालून गेले. त्यांनी त्याला कोंडले. शेख जमालुद्दीन व त्याचे काही सहकारी मारले गेले. गनिमांची माणसे ठार झाली. गनिमांनी (मराठ्यांनी) बरेचसे उंट व बैल पळवून नेले.' बादशहांनी आज्ञा केली की : मुहंमदअमीनखान व सियादतखान यांनी गनिमांचे पारिपत्य करण्यासाठी जावे. बादशहांनी मुखलिसखानाला सांगितले की, 'छावणी भोवतालच्या करावलांना (टेहेळणी करणाऱ्यांना) ताकीद करा. कही (संरक्षक पथक) असल्याशिवाय उंट व बैल हे छावणीच्या बाहेर त्यांनी जाऊ देऊ नये. असे काही दिसले तर ते पकडून खानसामाच्या हवाली करावे.'

बादशहांना कळविण्यात आले की : मरहूम अघरखान याचा नातू शमशेर बेग

याने काही बैल व उंट सोडवून आणले आहेत. त्याने गनिमांचे कांही घोडेही आणले आहेत. बादशहांनी त्याच्या मन्सबीत दहाची वाढ केली.

**सोळा जुलै १७००**

गनिमांनी छावणीच्या जवळ येऊन उंट वगैरे पळवून नेले होते. ख्वाजाखान वगैरे त्यांच्याशी लढले. एक स्वार जिवंत पकडला गेला. काहींचे गळे कापले गेले. पन्नास उंट सोडवून आणण्यात आले. चार घोडेही धरण्यात आले.

बादशहाजादा आज्जम यांचा पेशखाना (पुढे पाठविण्याचे तंबू) रवाना झाला होता. बादशहा म्हणाले, 'आज्जमनी आज आसार शरीफ (छावणीत एके ठिकाणी पैगंबरांशी संबंधित असलेले अवशेष ठेवण्यात आले होते) ला भेट द्यावी. आम्ही त्यांना उद्या निरोप देऊ.'

तरबियतखान हा लष्करच्या चंदावलीला (पिछाडीला) होता. तो येऊन बादशहांना भेटला.

नावांचा मुख्य मुहंमद नसीर याला बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा आज्जम सीमा पार करतील त्यासाठी टेंभुरणीच्या घाटावर दहा नावा पाठवून द्या.

**सतरा जुलै १७००**

आज बादशहांनी आपला मुलगा बादशहाजादा मुहमंद आज्जमशहा याला माळव्याच्या सुभ्याकडे जाण्यासाठी निरोप दिला.

उदयपूरचा राणा अमरसिंग यांचे काका इंद्रसिंग व बहादुरसिंग यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली. बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : हमीदुद्दीनखानबहादुर यांनी पुढे जाऊन छावणीच्या भोवतालचा प्रदेशात योग्य दिसेल तेथे ठाणी बसवावी व लहान गढया बांधाव्या. त्यांनी आपल्या बरोबर बेलदार, सक्का (पाणी वाहणारे) इत्यादींना पण घेऊन जावे.

फिरंग्यांचा वकील येऊन बादशहांना भेटला. त्याने आपल्या धन्याचे पत्र व दोन हजार रुपये (पेशकश नजराणा) बादशहांना दिले. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. त्याने बनातीचे कापड वगैरे जिन्नस आणले होते. मुखलिसखानाने ते दाखवावे अशी आज्ञा झाली. कही (रसद, घासदाणा, लाकूडफाटा आणण्यासाठी संरक्षक पथक) साठी तयार केलेला सैन्याचा पुढील तपशील मुखलिसखानाने बादशहासमोर ठेवला. बहरामंद-खानाबरोबर देण्यात आलेले सैन्य, सात हजार एकोणीस स्वार, मुहंमद अमीनखान याच्याबरोबर, पाच हजार एकोणचाळीस.

मुखलिसखान याने विनंती केली की : घासदाण्याच्या महागाईमुळे मन्सबदार व अहदी (बादशहाच्या निकटचे स्वार) यांच्या घोडयांची दुर्दशा झाली आहे. बादशहांनी मन्सबदारांची देणी माफ करावी अशी आज्ञा केली.

**अठरा जुलै १७००**

बादशहा रूहुलाखानाला म्हणाले, 'मंगळवेढ्याचा किल्लेदार मुहंमद सईद याला पुढीलप्रमाणे लिहा :– आम्ही तळावर (ब्रह्मपुरी) येत आहोत. तेथील मशीद चांगली तयार

ठेवा. हुजुरात एक गवंडी (मेमार, बांधकाम करणारा) पाठविण्यात यावा अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, मुखलिसखान, हमीदुद्दीनखानबहादुर, मतलबखान, सरकारखान, करावलखान, मस्त अली वगैरेंना आज्ञा केली की : छावणीच्या पुढील मुक्कामासाठी नदीचे दोन्ही काठ पाहून या. त्यांनी तपासणी करून लिहून कळविले की : नदीच्या या काठावर आपल्या निवासस्थानासाठी योग्य जागा आहे पण लष्करासाठी जागा नाही. नदीच्या पलीकडच्या काठावर सगळीकडे काळी माती आहे (ब्लॅक कॉटन सॉइल).

बादशहांनी उस्मानखान करावल याला बोलावू पाठविले. आणि त्याला आज्ञा केली की : तुम्ही तावडतोब म्हसवडपर्यंत जाऊन मजला ठरवून या. मुहंमद अमीनखान याची पन्नास माणसे, पन्नास बहेलिये व तोफा बरोबर घ्या. म्हसवडहून तुम्ही परत आल्यावर तुम्हाला मी तळावर (ब्रह्मपुरी) जाण्यास निरोप देईन.

**एकोणीस जुलै १७००**

काल हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : चारागवत आणण्यासाठी हत्तीखान्याच्या लोकांनी चार हत्ती नदीच्या पलीकडे दोन कोसावर नेले होते. गनीम (मराठे) येऊन दोन हत्ती घेऊन गेले. बाकीचे दोन हत्ती पळून छावणीत आले. याबाबतीत मुखलीसखानाने करावलांना (टेहळणीचे अधिकारी) ताकीद करावी अशी बादशहांनी आज्ञा केली. काल पावसामुळे कचेरी बंद.

**वीस जुलै १७००**

आज बादशहांना पुढील माणसे भेटली :–

मरहूम रूहुल्लाखान याचा मुलगा मुहंमद बाकर हा दिल्लीहून आला होता. त्याला बाकरखान ही पदवी देण्यात आली.

पुढील इसमांना बक्षिसे देण्यात आली :– काशघरचा वकील काबिलबेग. ख्वाजा सुल्तान हा मध्य आशियातून नुकताच आला होता. याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. बहिर्जी देशमुख हा मुसलमान झाला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली. खिदमतगुजारखानाचा मुलगा हीराचंद यास खिदमत राय ही पदवी देण्यात आली.

मनोहरदास गौड याचा नातू सूरतसिंग याला किलीदे फतह (वसंतगड) चा किल्लेदार व फौजदार म्हणून नेमण्यात आले. त्याला चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब होती. तीत शंभर जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली.

अजीजुल्लाखान याने विनंती केली की : माझी परिस्थिति शोचनीय आहे. मला दिल्लीला जाण्यासाठी दोन वर्षाची रजा देण्यात यावी. त्याची विनंती मान्य करण्यात आली. त्याला दीड हजार जात व सहाशे स्वार अशी मन्सब होती.

मामूरखान याचा भाचा मीर बहादुरअली हा बादशहांना भेटला. त्याला मन्सब देण्यात आली.

बादशहाजादा आज्जमशहा याने लिहून विनंती केली की : मला पन्नास घोडे देण्यात

यावेत. विनंती मान्य करण्यात आली. बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा आज्जम याच्यापाशी बहादुरगडच्या घाटापासून टेंभुर्णीच्या घाटापर्यंत नदी पार करण्यासाठी एक गुर्जदार नेमा.

### एकवीस जुलै १७००

काल हमीदुद्दीनखानबहादुर याने सांगितले की : आटपाडीच्या पलीकडे दोन कोसावर खवासपूर येथे छावणीसाठी जागा चांगली आहे. बादशहांनी विचारले, येथून किती लांब आहे ? उत्तर मिळाले, चवदा कोस, अधिकाऱ्यांनी चौकशी करून व मोजमाप करून कळवावे अशी आज्ञा झाली होती. नंतर आज्ञा झाली की : खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याने छावणीची जागा पाहून नकाशा करून पाठवावा.

म्हसवडचा बदललेला ठाणेदार रणदूलाखान हा येऊन बादशहांना भेटला. त्याला खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

फाजिलबेगचा मुलगा अहमदबेग हा नुकताच विलायत (मध्य आशिया, ईराण इत्यादि) हून आला होता. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : या पुढे गनिमांचा (मराठ्यांचा) उल्लेख चोर (दुज्दान) असा करण्यात यावा. बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले : परशुराम (परशुरामपंत प्रतिनिधि) व रामचंद्र (रामचंद्र पंत अमात्य) यांचे दोन वकील हे बादशहाजादा आज्जम याजपाशी होते. आज्जमने त्यांना सांगितले की, 'तुम्ही निघून जा. भास्करराव हरकारा व रुद्राजी कानूनगो (देशपांडे) यांनी त्या वकिलांना आपल्या घरी ठेवून घेतले आहे. बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर याला पुढीलप्रमाणे आज्ञा केली :– मुहंमद अमीन नायब कोतवाल याला सांगा की, 'वकिलांना बाहेर काढा. भास्करराव व रुद्राजी कानूनगो (देशपांडे) यांना छावणीच्या बाहेर हाकलून द्या.' त्यांची मन्सब काढून घेण्याची आज्ञा देण्यात आली.

### बावीस जुलै १७००

सियादतखान याने विनंती केली की : भास्करराव निरपराधी आहे. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'भास्करराव माझ्यापाशी राहील. रुद्राजी पंडित याला त्याच्या इलाख्याकडे पाठवून द्या.' दोघांची मन्सब काहीशी कमी करण्यात आली. भास्करराव याला दोनशेची मन्सब होती. ती पन्नासनी कमी करण्यात आली. रुद्राजी पंडित याला तीनशे जात व सत्तर स्वार अशी मन्सब होती. ती पन्नास जात व वीस स्वार यांनी कमी करण्यात आली.

काल रात्री उस्मानखान करावल हा आला. छावणीपासून म्हसवडपर्यंत त्याने चार मजला ठरविल्या होत्या. बादशहा फराशखान्याच्या मुख्याला, शर्फुद्दीनला म्हणाले, 'छावणी येथे आहे. उद्या दिवाणखाना उभा करा.' खवासपूर आटपाडीपासून दोन कोसावर आहे. मुखलिसखान वगैरेंनी छावणीपासून अंतर मोजून पुन्हा तेथे छावणी योग्य जागा पाहून यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

## तेवीस जुलै १७००

आज पावसामुळे दिवाण दरबारात बादशहांनी काम केले नाही.

बादशहांना कळविण्यात आले की : अन्न धान्याच्या गोण्या लादलेले बारा हजार बैल छावणीत येत आहेत. त्यांना पुढे छावणीत पाठविण्यात यावे अशी बादशहाजादा आज्जम याला आज्ञा पाठविण्यात आली.

## चोवीस जुलै १७००

मरहूम मुफख्खरखान याचा मुलगा जैनुलाबिदीन याला खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेची बक्षीगिरी व वाकनिसी देण्यात आली. मरहूम दिलेरखान याचा मुलगा अल्लाहदादखान याला आज्जमपाशी तैनात करण्यात आले. जयसिंग (सवाई) याने माळव्यात आज्जमला जाऊन मिळावे अशी आज्ञा त्याला खास गुर्जदाराच्या द्वारे पाठविण्यात आली.

## पंचवीस जुलै १७००

बादशहांनी मुखलिसखानाला पुढीलप्रमाणे आज्ञा केली :–

चोर(मराठे) हे बादशाही छावणीच्या नजीक येऊन धामधूम करीत आहेत. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी करावलाचे सैन्य पुढीलप्रमाणे तयार करा :–

उजव्या फळीला — दारूगोळयाचा मुख्य तरबियतखान आणि त्याचे बर्कंदाज (बंदूकची),
आघाडीला — फतेहुल्लाखान,
डाव्या फळीला — खुदाबंदाखान व शमशेरबेग,
पिछाडीला — सद्रुद्दीन मुहंमदखान व खुत्रौखान.

संध्याकाळी बादशहांना पुढीलप्रमाणे कळविण्यात आले :– करावलांनी छावणीच्या आसपास कूच करून पुढीलप्रमाणे चोर(मराठे) व घोडे पकडले :–

फतेहुल्लाखान याने आणलेले दोन कैदी(मराठे) व तीन घोडे. सियादतखान शिकारीसाठी गेला होता. त्याने तीन इसमांची डोकी कापून आणली. खुदाबंदाखान व शमशेरबेग यांनी दोन कैदी व घोडे पकडून आणले.

## सव्वीस जुलै १७००

बक्षीउलमुल्क बहरामंदखान हा आजारातून बरा होऊन बादशहांना भेटला. मुहंमद अमीनखान व फतेहुल्लाखान हे बादशहाला भेटले. शेख सादुल्ला हा तळावरून(ब्रह्मपुरी) येऊन भेटला.

संख (जत तालुका, सांगली जिल्हा) येथील गढीवर शेख अलीच्या (मुहमद रजा) जागी अमानुल्लाखान याची नेमणूक झाली. गदग(?)चा किल्लेदार मुहंमद कासिम याला निरोप देण्यात आला. चस्की(?)चा देशमुख कनाजी(गुणाजी) याला एक शाल देण्यात आली. ख्वाजा मुहंमदयार हा(मध्य आशियातून) येऊन बादशहांना भेटला. त्याला चारशे जात व पन्नास स्वार अशी मन्सब देण्यात आली.

सोलापूरच्या हसनवाडी बागेचा अधिकारी मीर असदुद्दीन याने बागेतून दीड हजार रुपयांचे उत्पन्न काढले होते. त्याची मन्सब वाढविण्यात आली.

माळव्यातील हकीकतीवरून कळले की : रामसिंग हाडाचा मुलगा भीमसिंग हा आपले गढबाधरीचे ठाणे सोडून देऊन आपल्या कोटा या गावी जाऊन बसला आहे आणि केशरीसिंग वगैरे बंडखोर ठाणे लुटीत आहेत. ताकीदपत्र लिहावे अशी आज्ञा झाली.

**सत्तावीस जुलै १७००**

मरहूम शुजाअतखान याचा नातू व इस्लामतारागड उर्फ भूषणगडहून बदललेला किल्लेदार सय्यद मुहंमद अली याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बादशहांनी मीर तुजक मुहंमद यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली : चोरांनी (मराठ्यांनी) भूषणगड नजीक छावणी केली आहे. तुम्ही जाऊन खानबहादुर नुस्रतजंग याला त्यांचे पारिपत्य करण्यासाठी पाठवा.

हमीदुद्दीनखानबहादुर याने सरकारी खजिना म्हसवडपर्यंत आला होता तो घेतला. तो घेऊन तो छावणीजवळ येत आहे असे कळले. बादशहांनी आज्ञा केली की : राजमार्गावर जेथे ठाणी कायम करण्याचे ठरले आहे. तेथे ठाणी कायम करावी व गढ्या बांधाव्या. इतर ठाण्यांचे नकाशे तयार करून दाखवावे.

**अठ्ठावीस जुलै १७००**

हमीदुद्दीनखानबहादुर हा म्हसवडहून सरकारी खजिना घेऊन आला होता. तो बादशहांना भेटला. मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजिम हा किलीदे फतह (वसंतगड) किल्ल्यावरून येऊन भेटला.

मरहूम खानजमान फतेहजंग (मुकर्रबखान) याचा मुलगा खानेआलम याला सहा हजार जात व साडेचार हजार स्वार अशी मन्सब होती. तो शहाजादा बेदारबख्ताच्या फौजेत तैनात होता. त्याची मन्सब कमी करण्यात आली होती. ती पुन्हा बहाल करण्यात आली.

रुस्तम सुल्तानचा मुलगा ख्वाजा मुहंमद सिद्दीक याचा वडील भाऊ विलायतेत (मध्य आशियात) मरण पावला. म्हणून तो सुतकात होता. त्याला सुतकातून उठवून आणण्याचे काम कबचाकखान याजकडे देण्यात आले.

अर्शदखान याने विनंति केली की : रुद्राजी कानूनगो (देशपांडे) निरपराधी आहे. त्याला क्षमा करून जवळ ठेवावे. विनंती मान्य करण्यात आली.

**एकोणतीस जुलै १७००**

सोलापूरचा किल्लेदार व फौजदार सैफुद्दीन याने अर्जी व नौरसतारागड (परळी) च्या विजयाबद्दल नऊ मोहरा पाठविल्या त्या बादशहांनी नजरेखालून घातल्या. मरहूम इस्लामखान याच्या सुनेने विनंती केली की : इस्लामखानाचा नातू अब्दुलकरीमखान याला मन्सब नसल्यामुळे तो विपन्नावस्थेत आहे. बादशहांनी त्याला मन्सब देऊन

मांडवगडचा (माळवा) फौजदार नवाजिशखान याजपाशी तैनात केले.

गावखान्याचा (बैल आदि पशूंचे खाते) दारोगा म्हणून मलिक महमूद व क्रोडी म्हणून मिह्दी बेग आणि खासचौकीचा दारोगा मुरीदखान याचा पेशदस्त (कारभारी) म्हणून आनंदरामचा मुलगा रामसिंग यांच्या नेमणुका करण्यात आल्या.

छावणीतील बाजाराचा क्रोडी सय्यद इमामुद्दीन याने पुढीलप्रमाणे विनंती केली : रसदेच्या गोण्यांनी भरलेले दीड हजार बैल म्हसवडला व एक हजार बैल भलोन (भाळवण, भाळवणी?) पर्यंत आले आहेत. बदर्का (संरक्षक पथक) पाठविण्याची आज्ञा झाल्याशिवाय ते छावणीत आणता येत नाहीत. बादशहांनी आज्ञा केली की : कबचाकखान याने रसद छावणीत आणावी.

अरसलानखान हा खान फीरोजजंग याच्या फौजेत तैनात होता. बादशहांनी त्याला हुजुरात येण्याची आज्ञा केली.

सुजानसिंगाचा मुलगा अभयराम याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**तीस जुलै १७००**

पायीन विलायत (वाईपासून पुढे पुणे प्रांत) चा ठाणेदार नाहरखान याने अर्ज करून पुढील मागण्या केल्या :–

(१) शंकराजी अहीरराव याला चार हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. त्याला माझ्याकडे तैनात करण्यात येत आहे. तसा हुकुम येण्यापूर्वी त्याला जहागीर व अंबाभायोनी (?) चे ठाणे देण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

(२) बहादुरगड उर्फ मीरानगड (?) च्या परिसरातील खेडी, माझा मुलगा मुहंमद इब्राहीम हा तेथे किल्लेदार व गोदरान (?) चा फौजदार आहे त्याला जहागीर म्हणून देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

(३) महादाजी हा पूर्वी मीरानगड (?) चा किल्लेदार होता. त्याला पाच हजारी जात व पाच हजार स्वार अशा मन्सबीचा कौल हमीदुद्दीनखानबहादुर यांनी दिला आहे. बादशहांनी आज्ञा केली की : महादाजीने हुजुरात यावे.

(४) दहंद (औंध) चा जमीनदार (देशमुख) खंडोजी याला दीड हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब देण्यात आली आहे. त्याला माझ्यापाशी तैनात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

खालील इसमांना छावणीच्या भोवतालच्या परिसरात ठाणेदार म्हणून नेमण्यात आले :–

(१) एकाजी घोरपडे यास अंबाभायोनी (?) ची ठाणेदारी.
(२) खंडोजी जगनाथ यास औंधची ठाणेदारी.
(३) चीनसवद यास भूषणगडच्या भोवतालची ठाणेदारी.
(४) सरमस्त यास अंबानाली (?) येथील ठाणेदारी.

आज शेवटचा गुरूवार असल्यामुळे बादशहांनी आंघोळ केली. यानंतर त्यांनी

दरबारचे कामकाज पाहिले.

कल्याण भिवंडीचा ठाणेदार मातबरखान याचा मुलगा अबू मुहंमद हा येऊन बादशहांना भेटला. बादशहांनी त्याला दोनशे जात व शंभर स्वार अशी मन्सब दिली. मातबरखानाच्या मन्सबीतही वाढ करण्यात आली. त्याला या पूर्वी दोन हजार जात व दीड हजार स्वार अशी मन्सब होती.

काल आलेल्या बातम्यावरून कळले की: हैद्राबादचा सुभेदार जानसिपारखान हा वारला. त्याच्या जागी बादशहांनी बादशहाजादा कामबक्ष याची सुभेदार म्हणून नेमणूक केली. जानसिपारखान याचा मुलगा रुस्तमदिलखान याने हैद्राबाद येथे कामबक्ष याचा नायब म्हणून काम करावे अशी आज्ञा झाली.

बादशहाजादा मुहंमद आज्जम याला भेटण्यासाठी त्याचा मुलगा शहाजादा बेदारबख्त हा तळावरून (ब्रह्मपुरीच्या) रवाना झाला असे कळविण्यात आले.

अलाहाबादचा सुभेदार याच्या नावे आज्ञा झाली की: दोन हजार बंदुकची प्यादे भरती करावे. त्यांना भरती करून हुजुरात आणण्यासाठी मुहंमद अमीन याला मुद्दाम नेमण्यात आले.

**एकतीस जुलै १७००**

मरहूम अघरखान याचा नातू शमशेरबेग याला छावणीपासून म्हसवडपर्यंतच्या प्रदेशाची ठाणेदारी सांगण्यात आली. पथकाच्या खर्चासाठी पहिल्या तिमाहीचे म्हणून त्याला अठरा हजार तीनशे रुपये देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

गदगचा किल्लेदार व जसवंतसिंगाचा मुलगा अमरसिंग हा मरण पावला अशी बातमी आली. त्याला दोनशे जात व पन्नास स्वार अशी मन्सब होती.

राजा भीम याचा मुलगा जोरावरसिंग याला बादशहाजादा आज्जम याच्या फौजेत तैनात करण्यात आले.

फतेहुल्लाखान याने विनंती केली की : छावणीचा परिसर व भोवतालचे मार्ग यांचे रक्षण माझ्याकडे सोपविण्यात आले आहे. छावणीतील सगळे मोगल (जमातीचे) सैनिक माझ्यापाशी तैनात करण्यात यावेत. बादशहांनी आज्ञा केली की : दोनशे मोगल व तीनशे स्वार फतेहुल्लाखानाकडे अधिक मदत म्हणून लावून देण्यात यावेत.

हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : येथे धान्य व चारा यांचे दुर्भिक्ष्य आहे. आज्ञा होत असेल तर सर्व हत्ती छावणीच्या बाहेर पाठवितो. बादशहांनी आज्ञा केली की : बारा हत्ती आमच्या जवळ राहू द्या. बाकीच्या हत्तींना भाळवणी, असदनगर (अकलूज), अगर तळावर (ब्रह्मपुरी) पाठवा.

मातबरखानाचा (कल्याण भिवंडीचा ठाणेदार) याचा मुलगा अबू मुहंमद याला बादशहांनी खिलतीची वस्त्रे देऊन विचारले, 'तुझे वय काय?' त्याचे वय बारा वर्षाचे आहे असे कळविण्यात आले. त्याला कुराण तोंडपाठ येते असे सांगण्यात आले. बादशहा म्हणाले, 'बादशहाजादा कामबक्ष यांना कुराण पाठ म्हणून दाखव.' करकंब (?) चा

ठणेदार बाकीबेग हा जुलुम करतो असे जुम्लतुलमुल्क (असदखान मुख्यप्रधान) याने लिहिल्या-वरून त्याला काढून त्याच्या जागी कडू(?)चा फौजदार व सरबराहखानाचा नायब सय्यद जैनुद्दीन याची नेमणूक करावी अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आपली मुलगी जीनतुन्निसा बेगम, नातू बेदारबख्त व मुख्यप्रधान (मावशीचा नवरा) असदखान यांजकडे तळावर (ब्रम्हपुरी) आंब्याच्या तीन करंड्या पाठविल्या.

**दोन ऑगस्ट १७००**

गोव्याचा फिरंगी फारिया सूजा याला एक घोडा देण्यात आला. बादशहांना कळविण्यात आले की : रसद आणि छावणीत येऊ पाहणारी माणसे तळावरून (ब्रम्हपुरी) म्हसवडपर्यंत आली आहेत. गनीम (चोर मराठे) यांच्या धामधुमीमुळे पुढे येऊ शकत नाहीत. बादशहांनी आज्ञा केली की : फतेहुल्लाखान याने छावणीतून प्रवासाला निघणाऱ्या काफिल्याला म्हसवडपर्यंत न्यावे व तेथून काफिला आणि रसद ही छावणीत आणावी.

मीरक हुसेन याला पाचशे जात व तीस स्वार अशी मन्सब होती. त्याला बडतर्फ करण्यात येऊन मक्केस जाण्यास सांगण्यात आले.

कामबक्ष याने कळविले की : अबू मुहंमद (मातबरखानाचा मुलगा) यास कुराण चांगलेच पाठ आहे. त्याला उत्तेजन मिळावे. बादशहांनी त्याची मन्सब शंभरनी वाढविली.

हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : हत्ती पाठवायचे आहेत. त्यासाठी बदर्का (संरक्षक पथक) हवा. बादशहांनी आज्ञा केली की : अमानुल्लाखान, हैद्राबादी कौलार (प्यादे) व बहिर्जी पांढरे यांनी हत्ती तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचवावे.

शमशेरबेग याला ठाणेदारीवर नेमण्यात आले होते, तो हुकुम रद्द करण्यात येऊन त्याला करावलात (टेहेळणी पथकात) घेण्यात आले.

बादशहांनी आज्ञा केली की : आमच्या छावणीत आमच्यापाशी तैनात असलेली मन्सबदार मुत्सद्दी यांची माणसे विपन्नावस्थेत आहेत. त्यांना दक्षिणच्या सुभेदारापाशी तैनात करण्यात यावे व त्यांच्या ऐवजी इतर माणसे बोलावून घेण्यात यावीत.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : चोरांचा (मराठ्यांचा) सरदार हणमंतराव हा सात हजार स्वार घेऊन म्हसवडच्या दिशेने बलोन (भालवण, भाळ-वणी ?) जवळ आला असून त्याने भीमा(?) ओलांडली आहे. मोगलांचा काफिला व रसद लुटून न्यावी असा त्याचा बेत आहे. बादशहांनी मुखलिसखानाला आज्ञा केली की : चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करण्यासाठी फतेहुल्लाखानाबरोबर दोन हजार स्वार देण्याची तयारी करा.

बादशहा मुखलिसखान याला म्हणाले, 'हिंदुस्थानातील (उत्तर भारतातील) सुभेदारांना तुम्ही पुढीलप्रमाणे लिहा :- सुभेदारांनी आपापल्या सुभ्यातून उत्कृष्ट सैनिक व ताज्या दमाचे घोडे आपापल्या मुलांबरोबर हुजुरात पाठवावे. सुभ्याच्या दिवाणांनी त्यांना वाटखर्चासाठी वीस हजार रुपये द्यावे. कोणत्या सुभेदाराने व अधिकाऱ्याने किती स्वार पाठवायचे याची यादी पुढीलप्रमाणे :-

(१) काबुलचे सुभेदार बादशहाजादा मुअज्जम–दोन हजार मोगल बर्कंदाज,
(२) अहमदाबादेचा सुभेदार शुजाअतखान–एक हजार स्वार,
(३) अजमीरचा सुभेदार सय्यद अब्दुल्लाखान–एक हजार स्वार,
(४) माळव्याचा सुभेदार मुख्तारखान–एक हजार स्वार,
(५) आग्र्याचा सुभेदार एतिकादखान–एक हजार स्वार,
(६) ग्वाल्हेरचा फौजदार जाननिसारखान–एक हजार स्वार,
(७) इटाव्याचा फौजदार खैर अंदेशखान–एक हजार स्वार.

राजा जयसिंग (सवाई जयसिंग) हा बादशहाजादा आज्जम याजपाशी तैनात होता. त्याने आपल्या सैन्यासहित हुजुरात यावे अशी आज्ञा झाली.

जुम्दतुलमुल्क असदखान याचा दिवाण (कारभारी) छज्जमल याला कामावरून काढला होता. त्याने मुनीमखानाच्या मध्यस्थीने बादशहापुढे आपले गाऱ्हाणे पुढीलप्रमाणे मांडले :–
(१) माझे आठ लाख रुपये असदखानाच्या सरकारात अडकले आहेत. ते मला देत नाहीत.
(२) माझ्या भोवती चौक्या बसविण्यात आल्या असून माझा छळ करण्यात येत आहे.
(३) या प्रकरणाची चौकशी करण्यासाठी इनायतुल्लाखान याची नेमणूक करण्यात यावी व माझा छळ थांबावा म्हणून सरबराहखान यास आज्ञा करण्यात यावी.

बादशहांनी विनंती मान्य केली.

ख्वाजा मुहंमद यास आदिलखानी (शाही) तळकोकणची बक्षीगिरी व वाकेनवीसी सांगण्यात आली.

काल रात्री बादशहांना कळविण्यात आले की : छावणीचे एक हजार बैल आणि उंट लाकूडफाटा व गवतचारा आणण्यासाठी छावणीच्या मागे पाठविण्यात आले होते. चोरांचे (मराठ्यांचे) दीडशे स्वार त्यांच्यावर चालून आले. चारशे जनावरे आणि माणसे मारली गेली. बादशहांनी छावणीचा नायब कोतवाल मुहंमद अमीन याला बोलावून सांगितले की, 'छावणीत दवंडी द्या. यापुढे पथके बरोबर असल्याशिवाय कोणीही कही (घासदाणा, लाकूडफाटा, गवत) आणण्यासाठी छावणीच्या बाहेर जाता कामा नये.'

**तीन ऑगस्ट १७००**

अवधचा सुभेदार जबरदस्तखान याने पाचशे स्वार भरती करून पाठवावे. त्यांचा पगार म्हणून तेथील दिवाण याने दहा हजार रुपये त्यांना द्यावे.

काबुलचा सुभेदार बादशहाजादा मुअज्जम याने पाचशे घोडे, अडीचशे उंट व तितक्याच सांडण्या पाठवाव्या अशा आज्ञा बादशहांनी दिल्या.

बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर याला सांगितले की, 'काबुल सुभ्यातून दोन हजार घोडे विकत घ्या. यासाठी खास अधिकारी म्हणून सुल्तान बेग याची नेमणूक करा.' अमानुल्लाखान याच्या विनंतीवरून हत्ती तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचविण्यासाठी मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याला अमानुल्लाखानाबरोबर देण्यात आले.

चोर(मराठे) इस्लामतारागड उर्फ भूषणगडभोवती पसरले आहेत अशी बातमी आली. तरबियतखान, हमीदुद्दीनखानबहादुर, मुनीमखान, ख्वाजा मुहंमद व गुलाम मुहंमद यांनी जाऊन त्यांचे पारिपत्य करावे अशी आज्ञा झाली.

नौरसतारागड(परळी)चा किल्लेदार रावतमल झाला याने विनंती लिहून पाठविली की : परळी किल्ल्याला फतेहुल्लाखानाचा मोर्चा होता तिकडील भिंत आणि आणखी एके ठिकाणची भिंत मोडकळीस आली आहे. दुरुस्त करण्यासाठी गवंडी व पाथरवट यांची व्यवस्था करण्यात यावी. खानसामान याने व्यवस्था करावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

**चार ऑगस्ट १७००**

सय्यद सरमस्त उर्फ रजवीखान वगैरे मोगल जमातीची दोनशे माणसे खान फीरोजजंग याची छावणी सोडून आली होती. त्यांना नुस्रतजंगाच्या(जुल्फिकारखान) छावणीत पोहोचते करण्यात यावे अशी आज्ञा झाली.

हैद्राबाद कर्नाटकचा बदललेला नायब फौजदार जमशीदखान याला खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान) याच्या फौजेत पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

ग्वाल्हेरचा फौजदार जाननिसारखान याची मुले ख्वाजा मुहंमदशहा व मुहंमद इब्राहीम यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : फतेहुल्लाखान हा रसद व काफिला घेऊन म्हसवडहून मरोला (?) या गावापर्यंत आला. याच सुमारास पंचवीस स्वार व रसदेने भरलेले सुमारे पन्नास उंट हे काफिल्यापासून वेगळे झाले होते. ते छावणीच्या दिशेने येत होते. मकाजी पांढरे हा तीनशे स्वार घेऊन त्यांच्यावर चालून आला. त्याने रसद लुटली. अनेकांना जखमी करून अगर ठार मारून तो उंट वगैरे घेऊन गेला.

**पाच ऑगस्ट १७००**

बादशहांनी मुनीमखान यास पुढीलप्रमाणे आज्ञा केली : फतेहुल्लाखान हा म्हसवडहून काफिला व रसद घेऊन येत आहे. तुम्ही पुढे जा. विलंब लावू नका. न जाणो चोर (मराठे) रस्त्यात धामधूम करावयाचे.

हत्तीखान्याचे हत्ती चरण्यासाठी पाठवायचे होते. ख्वाजाखान व चीनसबद यांनी त्यांच्याबरोबर जावे अशी आज्ञा झाली.

दोन हजार घोडे मासिक साठ रुपये खर्चाचा अंदाज ठेवून, सरकारात विकत घेण्यात यावेत अशी बादशहांनी आज्ञा केली.

ब्रह्मपुरीला बशारतखान हा किल्लेदार होता. त्याला बदलण्यात येऊन त्याच्या जागी खासचौकीचा दारोगा व मरहूम हिंमतखान याचा मुलगा मुरीदखान याला किल्लेदार म्हणून नेमण्यात आले.

**सहा ऑगस्ट १७००**

तळकोकणचा फौजदार बसालतखान याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली :–

दोन हजार बहेलिये यांची शिबंदी माझ्यापाशी देण्यात आली आहे. त्यांचा पगार सव्वा लाख रुपये होतो. सोंध्याच्या संस्थानातील पंचमहालाची खंडणी (पेशकश) एक लाख पासष्ट हजार रुपये भरते. ती हशमाच्या (शिबंदी) खर्चासाठी माझ्याकडे लावून देण्यात यावी. तशा अर्थाची सनद लवकर पाठविण्यात यावी.

बादशहांनी विनंती मान्य केली. फतेह्दौलत कौल याने सनद पाठवून द्यावी अशी आज्ञा करण्यात आली.

हत्तीखाना तळावर (ब्रह्मपुरी) पोहचविण्यासाठी तुर्कताजखान यास निरोप देण्यात आला.

ख्वाजा आदिलखान याजकडे करावली (आघाडीवरील टेहेळणी, स्काउटिंग) चे काम होते. ते काढून घेऊन त्याने दौलतखान्या (बादशहाचे निवासस्थान) भोवती रात्री गस्त (पहारा) घालीत जावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

मुखलिसखानाने विनंती केली की : खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या सैन्यातील मोगल जमातीचे सय्यद सरमस्त उर्फ रजवीखान वगैरे इसम यांचे म्हणणे आहे की : तीन वर्षापासून आम्हाला पगार मिळाला नाही. त्यांना चार हजार मोहरा देण्यात याव्या अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहांनी आज्ञा केली की : खानाजादखान याचा मुलगा मुहंमद सईद याने दोनशे बत्तीस स्वार बरोबर ठेवावे आणि टेहेळणी पथकांची डावी फळी सांभाळीत जावी.

**सात ऑगस्ट १७००**

शर्फुद्दीन हुसेन याने विनंती केली की : सरकारी तंबू तळावरून (ब्रह्मपुरी) छावणीत आणण्यात येत होते. बेल (भाळवणी ?) गावाजवळ चोरांनी (मराठ्यांनी) हल्ला केला. आणि ते लुटून नेले.

बादशहांनी आज्ञा केली की, 'मुनीमखानाने तंबूचा खर्च म्हणून त्या भागातील ठाणे-दारांच्या कडून रक्कम वळती करून घ्यावी.'

बादशहांनी आज्ञा केली की : टेहेळणी पथकाच्या डाव्या फळीचा प्रमुख अधिकारी यापुढे रूहुल्लाखान राहील. खुदाबंदाखान (शायिस्ताखानाचा मुलगा) राहाणार नाही. रूहुल्लाखान याने टेहेळणीसाठी रशीदखान व अबुतालिबखान यांना आपले सैनिक बरोबर देऊन पाठवीत जावे.

रुबा (रुई ? ) या गावी जाऊन तेथे गढी बांधावी म्हणून हमीदुद्दीनखानबहादुर यास निरोप देण्यात आला. ख्वाजा आदिलखान मीर तुजक याला मुरीदखान याच्या जागी खास चौकीचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

घोडे विकत घेण्यासाठी काबुलच्या सुभ्याला जाण्यासाठी म्हणून सुल्तानबेग यास निरोप देण्यात आला.

**आठ ऑगस्ट १७००**

आज शहाजादा बेदारबख्त व खानबहादुर नुस्रतजंग (जुल्फिकारखान) यांच्या नावे

फर्माने आणि म्हसवडचा ठाणेदार नागोजी माने याच्या नावे आज्ञापत्र(हस्बुल्हुकुम) ही पाठविण्यात आली.

**नऊ ऑगस्ट १७००**

कल्याणचा ठाणेदार मातबरखान याचा मुलगा अबू मुहंमद यास आपल्या बापाकडे जाण्यास निरोप देण्यात आला. त्याच्यासाठी मातबरखानाकडे खिलतीची वस्त्रे पाठविण्यात आली. इनायतुल्लाखान याचा मुलगा हिदायतुल्लाखान यास बशारतखानाच्या जागी तळाची(ब्रह्मपुरी) बाकनिशी सांगण्यात आली. मरहूम सय्यद मुनव्वरखान याचा मुलगा सलाहबेग याला हसनकुलीखान ही पदवी देण्यात आली.

**दहा ऑगस्ट १७००**

अब्दुन्हीम अहरारी व ख्वाजा मुहंमद सिद्दीक यांना मुहंमद अमीनखान याज-बरोबर जाण्यास निरोप देण्यात आले. बादशहांनी फातेहा खैर(कुराणातील कुशल इच्छिणाच्या ओळी) पढून त्यांना निरोप दिला.

हाजी कमाल मिगबाशी याला तोपची व बर्कंदाज यांचा देखरेख अधिकारी म्हणून सुरत बंदराकडे पाठविण्यात आले. नाशिक गुलशनाबाद(व कल्याण) वगैरेचा ठाणेदार मातबरखान याला सिद्धगड(?)ची फौजदारी व किल्लेदारी देण्यात आली. त्याच्या मन्सबीत शंभर स्वारांची वाढ करण्यात आली. अब्दुलरसूल उर्फ खिदमत तलबखान याला निरोहा(तिरव्हे?)ची ठाणेदारी देण्यात आली.

मुहंमद सालेह कंबू याचा जावई रणदूला हा बऱ्हाणपूरला गेला होता. त्याने पाचशे पायदळ शिपाई उभे करून बरोबर आणावे अशी आज्ञा झाली. यासाठी बऱ्हाण-पूरच्या सुभेदाराने तेथील खजिन्यातून त्याला वीस हजार रुपये द्यावे असा हुकुम देण्यात आला.

**अकरा ऑगस्ट १७००**

बादशहा काल रात्री मुल्तफतखान याला म्हणाले, 'हमीदुद्दीनखानबहादुर याला लिहून उद्या बोलावून घ्या.'

धान्याची रसद म्हसवडला येऊन पोहोचली असे बादशहांना सांगण्यात आले. मुहंमद अमीनखान याने म्हसवड व थातरूर(ताथवड?) या मार्गाने रसद छावणीत आणून पोहोचवावी अशी आज्ञा झाली.

बादशहांनी छावणीचा नायब कोतवाल मुहंमद अमीन याला आज्ञा केली की : बादशाही छावणीभोवती खंदक तयार करा. त्याने अर्ज केला की : बेलदारांची पगारबाकी देण्यात यावी. मुहरम महिन्यापर्यंतचा पगार त्यांना खजिन्यातून देण्यात यावा, अशी आज्ञा झाली.

खान फीरोजजंग याने लिहून पाठविले की : माझ्यापाशी तैनात असलेल्या दक्षिणी अधिकाऱ्यांपाशी पथके नाहीत. त्यांना जे काही द्यावयाचे ते माझ्या गुमाश्त्याचा सल्ला घेऊन त्याच्या मताप्रमाणे देण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

मुबारकरू यास इस्लामतारागड (भूषणगड)च्या परिसराची ठाणेदारी देण्यात आली.

**बारा ऑगस्ट १७००**

धुळयाहून बदलेला फौजदार व मरहूम एतिमादखान याचा जावई येऊन बादशहांना भेटला.

छावणीच्याभोवती गस्त करून या असे बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर यास सांगितले. शिपाईसैनिक हे गंज (बाजार)च्या दिशेने एकटेदुकटे येत, तसे न करता त्यांनी मिळून येत जावे म्हणून त्यांना वजावण्यात यावे अशी अहदियानच्या पगाराचा बक्षी मीर हसन यास आज्ञा करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : मीर हसन हा टेहेळणीसाठी गेला होता. तीन चारशे चोर (मराठे स्वार) त्याच्यावर चालून आले. चकमक चालू आहे. मीर हसन-पाशी सैनिक थोडे आहेत. गनीम (मराठे) हे चरण्यासाठी नेलेली गुरेढोरे वळवून नेत आहेत.

बादशहांनी आज्ञा केली की, 'फतेहुल्लाखान व हैद्राबादी कौलार (पायदळ पथके) यांनी जाऊन गनिमांचे पारिपत्य करावे.'

औरंगाबादेत तैनात असलेले बर्कंदाज व अहदी यांना छावणीत घेऊन यावे अशी ऐवजबेग गुर्जबर्दार याला आज्ञा करण्यात आली.

विजापूरचा सिकंदर (आदिलशाहा) याच्या कुटुंबियांना (ब्रम्हपुरीच्या) तळावर पोहोचविण्यात यावे अशी आज्ञा झाली. वेंकटराव हरकारा याने पीलखान्याच्या बरोबर (बादशाही गजशाला) जावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

**तेरा ऑगस्ट १७००**

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याचा वकील सुल्तान नजर याने विनंती केली की : आज्ञे-प्रमाणे शहाजादे जवळ येऊन पोहोचले आहेत. पण त्यांच्यापाशी बारबर्दार (ओझ्याची वाहने) कमी आहेत. बादशहांनी आज्ञा केली की, 'शंभर उंट शहाजाद्याकडे पाठवून द्या. शहाजाद्यांनी येऊन मला उद्या भेटावे. मुखलिसखान, रूहुल्लाखान व मन्सूरखान यांनी पुढे जाऊन शहाजाद्याचे स्वागत करावे व सरकारखान व मस्त अली यांनी शहाजाद्याला काय हवे काय नको याची व्यवस्था (सरबराई) पाहावी.'

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : सुरवातीपासून मी आर्थिक अडचणीत आहे. यावेळी माझ्यापाशी फक्त सातशे स्वार आहेत. मला काही मदत देण्यात यावी. त्याला अंतःपुरातील खजिन्यातून एक लाख रुपये द्यावे अशी आज्ञा झाली. खुदा-बंदाखान (शायिस्ताखानाचा मुलगा) यालाही चाळीस हजार रुपये द्यावे अशी आज्ञा झाली.

परलोकवासी सुभानजी याचा मुलगा बाबाजी चोरांच्या (मराठ्यांच्या) कैदेत होता. तो सुटून आला. त्याला दोन हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब देण्यात आली. त्याच्या बापाची हत्ती, घोडे वगैरे मालमत्ता बाबाजीला बहाल करण्यात यावी, अशी बादशहांनी आज्ञा केली.

**चवदा ऑगस्ट १७००**

हमीदुद्दीनखानबहादुर यास मतलबखानाच्या ऐवजी दिवाणेखासची दारोगागिरी देण्यात आली. त्याने बादशहासाठी तीन घोडे आणले. त्यांची नावे तख्ते रवां, तमाम अय्यार आणि रुस्तम बहादुर. बादशहांनी घोड्यांवर स्वारी केली. घोडे बादशहांना पसंद पडले.

खानाजादखानाचा मुलगा मुहंमद सईद यास जवळच्या परिसराची (रकबा) ठाणेदारी देण्यात आली. बक्षीउलमुल्क बहरामंदखान याच्या शिपायांनी पगारासाठी दंगा केला. तो मिटविण्यासाठी हमीदुद्दीनखानबहादुर व तरबियतखान यास हुकुम देण्यात आला.

आज शहाजादा बेदारबख्त हा येऊन बादशहांना भेटला. जीनतुन्निसा बेगमकडे तळावर (ब्रह्मपुरी) डाळिंबाची करंडी पाठविण्यात आली. फतेहुल्लाखानाने जाऊन रूया (गावाचे नांव?) येथून रसद छावणीत आणावी अशी आज्ञा झाली.

**पंधरा ऑगस्ट १७००**

पैगंबराचे अवशेष (आसार मुबारक) ज्या ठिकाणी ठेवले होते तेथपर्यंत बादशहाच्या निवासस्थानापासून कनाती उभ्या करण्यात याव्या अशी आज्ञा करण्यात आली.

**सोळा ऑगस्ट १७००**

आज बादशहांनी शहाजादा बेदारबख्त, हमीदुद्दीनखानबहादुर, मुल्तफतखान यांना बरोबर घेऊन पायी चालत जाऊन आसार मुबारक (पैगंबराचे अवशेष) ला भेट दिली. नंतर बादशहाजादा कामबक्ष व सुल्तान बलंदअख्तर हेही आले. बादशहांनी कुराण पठण केले. आसार मुबारकला प्रदक्षिणा घातल्या. दोनशे मोहरा नजर म्हणून ठेवल्या. दोन घटिका तेथे राहून ते परतले.

अवधूतसिंग (ओछर्याचा राजा) वगैरे रजपूत आणि इस्माईलखान वगैरे सरदार यांच्या वकिलांकडून यापुढे मुचलके घेऊ नये अशी आज्ञा झाली. बेदारबख्ताच्या फौजेचा बक्षी नेकनामखान याने बदारबख्ताचे सैन्य नक्की किती आहे व त्याची काय स्थिती आहे याची माहिती द्यावी अशी आज्ञा झाली.

करडेनिमोणे येथील ठाणेदार अबुल्खैर याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

जुन्नर शिवनेरीचा किल्लेदार नसीरुल्लाखान हा छावणीजवळ आला आहे असे कळले. त्याला छावणीत येण्यासाठी दस्तक (परवानगीपत्र) देण्यात यावे अशी आज्ञा झाली. नसीरुल्लाखान यास सातशे जात व सातशे स्वार अशी मन्सब होती.

**सतरा ऑगस्ट १७००**

बादशहांना कळविण्यात आले की: खवासपूर येथे छावणी करण्यायोग्य जागा आहे. बादशहा म्हणाले, 'या महिन्याच्या (रबिलावल) एकवीस तारखेस (पंचवीस ऑगस्ट १७००) आम्ही येथून कूच करू. येथून खवासपूर व मौजे बाहरा(?) येथपर्यंत योग्य जागा कोणती याची चौकशी करून या. या कामासाठी उस्मानखान

करावल व असदुल्ला खुशमंजिल यांनी जावे. फतेहाबखान व त्याची माणसे आणि शंभर बहेलिये यांनीहि त्यांच्याबरोबर जावे.'

बादशहा म्हणाले, 'मुहंमद अमीनखान यांना लिहा की :– तुम्ही जेथे पोहोचला आहात त्याजागेपासून हत्तीखाना वगैरे कारखाने घेऊन हुजुरात परत या.'

कंधार(जिल्हा नांदेड, मराठवाडा) येथील फौजदार व किल्लेदार सय्यद शम्सुद्दीन मुहंमदखान हा बादशाही छावणीत होता. त्याने विनंती केली की : काफरांनी(मराठ्यांनी) कंधार भागात तळ दिला आहे. आज्ञा होत असेल तर मी त्यांना तेथून हुसकून लावीन. बादशहांनी विनंती मान्य केली. त्यांनी शंभर मोहरांच्या किंमतीचा एक घोडा त्याला बक्षीस देऊन त्याला (कंधारकडे जाण्यास) निरोप दिला.

मुहंमद खुशहाल यास कर्नाटकी प्याद्यांचा दारोगा म्हणून नेमण्यात आले.

**अठरा ऑगस्ट १७००**

काल रात्री हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील बातमी कळली : नरकवासी रामा(राजाराम)चा सरदार हणमंतराव हा चार पाच हजार स्वार घेऊन खटावच्या ठाण्यात दाखल झाला. त्याने खटावच्या दिशेने थोडे सैन्य पाठविले. तेथील ठाणेदार रामचंद्र हा स्वतःची पथके घेऊन बाहेर पडला. गनीम(मराठे) पळाले. रामचंद्र याने दोन कोसपर्यंत त्यांचा पाठलाग केला. तो मौजे तूनी( लोणी? ) येथे पोहोचला. हणमंतराव तेथे होता. मराठ्यांनी रामचंद्राला चहूबाजूनी घेरले. युद्ध चालू आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'फतेहुल्लाखान, अघरखानाचा नातू शमशेरबेग आणि खान फीरोजजंग याचे इतर सैनिक यांनी ताबडतोब रामचंद्राच्या मदतीस जावे.' त्याप्रमाणे ते रवाना झाले.

नंतर बादशहांना कळविण्यात आले की : रामचंद्राने अनेक गनिमांना ठार मारले, पण त्याचे सर्व सहकारी जखमी अगर मृत झाले. स्वतः रामचंद्राला चार पाच जखमा लागून तो मैदानात पडला. तो मेला किंवा त्याला मराठे उचलून घेऊन गेले हे कळत नाही. रामचंद्रचा भाचा जानोजी याने ठाणे राखले आहे. रामचंद्राला दोन हजार जात व दोन हजार स्वार, त्या पैकी नऊशे दुबोडी, अशी मन्सब होती. ही मन्सब व जहागीर भाच्याच्या(जानोजी) नावाने बहाल समजण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

बादशहा रूहुल्लाखानाला म्हणाले, 'तुम्ही विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याला पुढीलप्रमाणे पत्र लिहा :– विजापूरमधील खवासखानाची हवेली दुरुस्त करण्यात यावी. आम्ही खवासपूरला पोहोचलो की नवाब जीनतुन्निसा बेगम व तळावरील(ब्रह्मपुरीच्या) इतर माणसे ही विजापूरला जातील.

मुकर्रबखानाची मुले खानेआलम, मुनव्वरखान, इख्तिसासखान ही बेदारबख्तापाशी तैनात होती. ती येऊन बादशहांना भेटली. मुरादखान व यासीनखान हेही बादशहांना भेटले.

जुन्नर शिवनेरीचा किल्लेदार व फौजदार नसीरुल्लाखान हा बादशहांना भेटला.

**एकोणीस ऑगस्ट १७००**

फतेहुल्लाखान याने काल रात्री पुढीलप्रमाणे लिहून पाठविले : आपल्या आज्ञेप्रमाणे मी खटावला पोहोचलो. हणमंतराव सरदार हा मोठे सैन्य घेऊन येथून चार कोसावर तळ देऊन आहे. माझे बरेच सहकारी अद्याप मला येऊन मिळाले नाहीत. ते येतील अशी मुद्दाम अधिकारी पाठवून व्यवस्था करावी. म्हणजे गनिमांचे पारिपत्य करता येईल. शिवाय मला आणखी कुमक हवी. बादशहांनी आज्ञा केली की, 'फतेहुल्लाखानाचे येथे उरलेले मोगल सनिक आणि खानेआलम व त्याची पथके यांनी त्वरित खटावकडे जावे.'

मन्सूरखान याचा मुलगा मुहंमद गजनफर याला तोफखान्याचा नायब दारोगा म्हणून नेमण्यात आले.

बादशहा शहाजादा बेदारबख्त याला म्हणाले, 'तयार रहा. पन्हाळयाच्या वेढ्या-साठी तुम्हाला पाठवीत आहे.' मुखलिसखान याने नुस्रतजंग (जुल्फिकारखान) व खान फीरोजजंग यांना पत्रे लिहावीत अशी आज्ञा झाली.

बादशहांनी शेख हिदायतकेश याला विचारले, 'येथून खवासपूर, खवासपुराहून तळापर्यंत (ब्रम्हपुरीच्या) व खवासपुरापासून मिरज असे किती अंतर आहे?' त्याने उत्तर दिले, 'येथून खवासपूर अकरा कोस, खवासपुरापासून तळ (ब्रम्हपुरीचा) वीस कोस आणि खवासपुरापासून मिरज मुर्तजाबाद एकोणीस कोस असे अंतर आहे.' बादशहा हमीदुद्दीन-खानबहादुर यास म्हणाले, 'शहाजादा बेदारबख्त याचे बुणगे येथून सहा कोसावर आहे. ते घेऊन यण्यासाठी दोनश स्वार व दोनशे बंदूकची पाठवून द्या'

**वीस ऑगस्ट १७००**

खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेत राव दलपत (बुंदेला) हा तैनात होता. त्याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : माझ्याबरोबर असलेल्या सैन्याची रचना पुढील-प्रमाणे व्हावी :– आघाडीला शहाजादा बेदारबख्त, उजव्या फळीला बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, डाव्या फळीला सर्फराजखान आणि पिछाडीला तरबियतखान.

धान्याची रसद म्हसवडला आली असे कळले. बादशहांनी आज्ञा केली की : सर्फ-राजखान याने जाऊन रसद छावणीत आणावी. या कामासाठी त्याच्याबरोबर पाच हजार सहाशे स्वार देण्यात यावे.

खान नुस्रतजंग (जुल्फिकारखान) याच्या फौजेत कान्होजी (शिर्के) तैनात होता. त्याने बादशहांना पुढीलप्रमाण विनंती अर्ज पाठविला : मला कऱ्हाडची ठाणेदारी द्यावी व कऱ्हाड मला वतन जहागीर म्हणून देण्यात यावे. मी त्या भागात गनिमांना (मराठ्यांना) येऊ देणार नाही. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'तुम्ही कान्होजीला लिहा, आम्ही तिकडे आलो की तुमची नेमणूक करण्यात येईल.'

बादशहांना कळविण्यात आले की : गनिमांचा (मराठ्यांचा) सरदार हा दोनशे स्वार व पाचश प्यादे घेऊन वसंतगडच्या परिसरात संचार करीत आहे. वसंतगडचा

किल्लेदार सूरतसिंग याजपाशी पथके नाहीत. बादशहांनी सूरतसिंगाच्या ऐवजी वसंतगडावर अब्दुलरसूल उर्फ खिदमत तलबखान याची किल्लेदार म्हणून नेमणूक केली व त्याला अब्दुलगनीखान ही पदवी दिली.

बादशहांना कळविण्यात आले की : खटावचा ठाणेदार रामचंद्र हा जखमी होऊन पडला. मराठे त्याला कैद करून घेऊन गेले. तो वारला. बादशहांनी आज्ञा केली की, 'रामचंद्राचा भाऊ मयाजी (सयाजी, मंबाजी) हा येईपर्यंत जहागीर बहाल समजण्यात यावी.'

### एकवीस ऑगस्ट १७००

खुदाबंदाखान (शायिस्ताखानाचा मुलगा) हा बयूतात (सरकारी मालमत्ता) चा अधिकारी असून बादशहाबरोबर होता. याशिवाय वृत्तनिवेदकाचे (वाकियाख्वान) कामही त्याच्याकडे होते. त्याची मुहंमदाबाद उर्फ बीदर याच्या सुभेदारीवर नेमणूक करण्यात आली. तेथील सुभेदार अस्करखान याला हुजुरात बोलावण्यात आले. खुदाबंदाच्या जागी वृत्तनिवेदक म्हणून दीवाण कचेरीचा दारोगा यारअलीबेग याची नेमणूक करण्यात आली.

मुहंमद अमीनखान याने हत्तीखाना व काफिला तळावर (ब्रह्मपुरीच्या) नेला होता. त्याने कारखाने छावणीत आणावे अशी ताकीद त्याला द्यावी अशी आज्ञा झाली.

उंटांचा दारोगा खिदमत गुजारखान याची मन्सब वाढविण्यात आली.

### बावीस ऑगस्ट १७००

उस्मानखान व असदुल्ला खुशमंजिल हे बादशाही छावणीसाठी म्हणून खवासपूरची पाहणी करून आले. त्यांनी वृत्तांत सादर केला की : येथून खवासपूर (साखळीने) तेरा कोस असून त्याच्या पाच मजला होतील. खवासपुरात निवासाला योग्य जागा आहे पण पाण्याची तितकीशी सोय नाही. माखरा (नाझरे) व सांगोला येथे पाणी (नदी) आहे. बादशहा म्हणाले, 'आम्ही खवासपूरला जाऊ.'

### तेवीस ऑगस्ट १७००

बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउलमुक बहरामंदखान यांनी कही (लाकूडफाटा, रसद, इत्यादी) आणण्यासाठी जावे. खानेआलम व सर्फराजखान यांनी त्यांच्याबरोबर जावे.

### चोवीस ऑगस्ट १७००

काल खानेआलम याने यारअलीबेगच्या द्वारे विनंती केली की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान याला बादशहांनी आपल्यापाशी राहू द्यावे. मी कही आणण्यासाठी पथके घेऊन जाईन. विनंती मान्य करण्यात आली.

आज हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : चोर (मराठे सैनिक) हे बादशाही छावणीजवळ धामधूम करीत होते. खानेआलम त्यांच्या पाठलागावर गेला आहे.

गाजिउद्दीनखानबहादुर फीरोजजंग याने ससैन्य यावे म्हणून आज्ञापत्रे पाठविण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : मसूरचा ठाणेदार मंबाजी(?) हा आला असून आपला दिवंगत भाऊ रामचंद्र (खटावचा ठाणेदार) याच्या सुतकात बसला आहे. बादशहांनी आज्ञा केली की, 'मुनीमखानाने जाऊन मंबाजीला सुतकातून काढून (अज मातम बर्दाश्ता) हुजुरात आणावे.' मंबाजीच्या वकीलाने विनंती केली की : राजा अवधूतसिंग (ओछर्याचा राजा) याने मंबाजीला सुतकातून काढले असून तो त्याला हुजुरात घेऊन येत आहे.

**पंचवीस ऑगस्ट १७००**

चांद्याचा राजा वीरसिंग याला हुजुरात आणण्यासाठी माणसे रवाना करण्यात आली.

बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : सरकारातून मला एक कोटी दाम (सुमारे एक लाख रुपये) येणे आहे. जसजसा सरकारात पैशाचा भरणा होत जाईल तसतसे माझे पैसे मला मिळावे. विनंती मान्य करण्यात आली. दुसरे, माझ्या अधिकाऱ्यांना योग्यतेनुसार मन्सबी देण्यात याव्या. बादशहा म्हणाले, 'त्यांना माझ्या समोर आणा.' तिसरी विनंती अशी की, ही वेळ मोहिमेची आहे. पाचशे मन्सबदार माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

**सव्वीस ऑगस्ट १७००**

आज बादशहांनी पन्हाळगड किल्ल्याचा नकाशा मागवून पाहिला. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : गनीम (मराठे) भूषणगडच्या परिसरात संचार करीत आहेत व कहीच्या पथकावर चालून जात आहेत. आज्ञा झाली की : मन्सूरखान व सियादतखान यांनी जाऊन त्यांचे पारिपत्य करावे. वंजारी लोकांनी दरबारात विनंती केली की : येथून सहा कोसावर आमची व गनिमांची (मराठ्यांची) झटपट चालू आहे. कुमक म्हणून कुणाला तरी पाठवावे. मुनीमखान, हैद्राबादी कौलार (प्यादे पथके), दोनशे बर्कंदाज व शंभर अहदी यांनी कुमकेवर जावे अशी आज्ञा झाली.

राजा शाहू हा हुजुरात आला. त्याने मुजरा केला. त्याला पाहून बादशहा म्हणाले, राजे यांचा चेहरा नेहमी फिक्कट (पिवळसर) वाटतो. काय कारण आहे?' हाफिज अंबर याने विनंती केली की : राजे डाळ, पोळ्या व शिजविलेला भात खात नाहीत. फक्त पक्की रसोई खातात. बादशहांनी विचारले, 'असे का?' विनंती करण्यात आली की : राजे स्वतःला बंदी समजतात. बादशहा म्हणाले, 'राजांना म्हणावे हमीदुद्दीनबहादुरपाशी जा. त्याला तुमच्याशी काही बोलायचे आहे.'

मंबाजीला त्याचा भाऊ दिवंगत रामचंद्र याच्या जागी खटावचा ठाणेदार म्हणून नेमण्यात आले. त्याला खटावला पोहोचविण्यात यावे अशी मुनीमखानाला आज्ञा देण्यात आली.

**सत्तावीस ऑगस्ट १७००**

बक्षीउलमुल्क बहरामंदखान व मुनव्वरखान हे कही आणण्यासाठी गेले होते. ते येऊन बादशहांना भेटले. काल रात्री बादशहांना कळविण्यात आले की : मुनीमखान हा गनिमांचे पारिपत्य व वंजाऱ्यांचे बैल सोडवून आणणे या कामावर गेला होता.

त्याने बैल सोडवून आणले आहेत. वृत्तांत सादर करण्याची त्याला आज्ञा करण्यात आली. हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे :– छावणीतील बलूची लोक हे इस्लामताराराड (भूषणगड)च्या पायथ्यापाशी तळ देऊन होते. उंटांना चरविण्यासाठी किल्ल्यावरून पाठविण्यात आले होते. चोरांनी (मराठ्यांनी) त्यांच्यावर हल्ला केला. बलुच्यांनी त्यांना वेढून पाच स्वार कैद करून आणले आहेत. त्यांचे घोडेही बरोबर आणले आहेत. मुहंमद अमीनखान याने हत्तीखाना व काफिला (प्रवाशांचा तांडा) बहिरुर (म्हसवड?) हून मौजे रुया (?) पर्यंत आणला आहे असे कळले. तेथून हत्तीखाना घेऊन येण्यासाठी राजा अवधूतसिंग, मिर्जा गुल व हमीदुद्दीनखानाचे अधिकारी यांनी जावे अशी आज्ञा झाली.

नसीरुल्लाखान (शिवनेरीचा किल्लेदार व जुन्नरचा फौजदार) याचा पुतण्या ख्वाजा मुहंमद अरसलान हा येऊन बादशहांना भेटला. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

खटावचा दिवंगत ठाणेदार रामचंद्र याच्या कुटुंबियांना पुढीलप्रमाणे मन्सबी देण्यात आल्या :–

रामचंद्राचा भाऊ मंबाजी याला दोन हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे स्वारांची वाढ करण्यात आली. रामचंद्राचा मुलगा किशनराव (कृष्णराव) याला एक हजार जात व तीनशे स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशेची वाढ करण्यात आली. रामचंद्राचा दुसरा मुलगा भवानजी याला पाचशे जात व तीनशे स्वार व तिसरा मुलगा जगन्नाथ याला चारशे जात व दोनशे स्वार अशा, मन्सबी देण्यात आल्या.

**अठ्ठावीस ऑगस्ट १७००**

फतेहुल्लाखान हा खटावहून परत येऊन बादशहांना भेटला. त्याचे खटावच्या मोहिमेतील सहकारी सय्यद सरमस्त, रजवीखान, इस्माईलबेग, मुहंमद शरीफ हे ही बादशहांना भेटले.

मुहंमद अमीनखान हा तळावरून (ब्रम्हपुरी) कारखाने (हत्तीखाना वगैरे) घेऊन आला असून तो लष्करात दाखल झाला असे बादशहांना कळविण्यात आले.

बादशहा फराशखान्याचा अधिकारी शर्फुद्दीन याला म्हणाले, 'पेशखान्याचे तंबू खवासपूरच्या दिशेने या महिन्याच्या (रबिलावल) सत्तावीस तारखेस रविवारी पाठवून द्या मी सोमवारी निघेन.'

बादशहांनी बक्षीउलमुल्क बहरामंदखान यास म्हटले, 'आमच्याबरोबर कूच करताना सैन्याची रचना पुढीलप्रमाणे असावी :–

| | | |
|---|---|---|
| शहाजादा बेदारबख्त | — | आघाडीवर |
| बक्षीउलमुल्क बहरामंदखान | — | डाव्या फळीला |
| बादशहाजादा कामबक्ष | — | उजव्या फळीला |
| तरबियतखान | — | पिछाडीला. |
| मुहंमद अमीनखान | — | पुढे |
| फतेहुल्लाखान | — | डावीकडे |

ख्वाजाखान — उजवीकडे
खुलीखान — मागे

छावणीतील सैनिकांनी आपले सामान वाहून नेण्याची व्यवस्था स्वतः करावी अशी ताकीद करण्यात आली. तरबियतखानाने कूच होईल त्या दिवशी दोन प्रहरपर्यंत मागे राहून सर्वांना पुढे घालवावे अशी आज्ञा करण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याने विनंती केली की : पगाराच्या नगदीच्या मोबदल्यात मला पन्नास घोडे देण्यात यावेत. बादशहांनी आज्ञा केली की 'तूर्त तीस घोडे द्या.'

राजा शाहू शिजवलेले अन्न (पोळया वगैरे) का खात नाही, पक्की रसोई (पुरी वगैरे) का खातो याची चौकशी करण्यासाठी बादशहांनी हमीदुद्दीनखानबहादुर यास आज्ञा केली होती. त्याने चौकशी करून सांगितले की, 'हिंदू लोक कैदेत असताना शिजवलेले अन्न खात नाहीत. फक्त पक्की रसोई खातात.' बादशहांनी आज्ञा केली की : राजा शाहू याने शिजविलेले अन्न खात जावे.

### एकोणतीस ऑगस्ट १७००

आज शुक्रवार. कचेऱ्या बंद होत्या.

### तीस ऑगस्ट १७००

पेशखाना (पुढे पाठवायचे तंबू) रवाना करण्याची आज्ञा देण्यात आली. छावणीतील सैनिकांना त्रास होऊ नये म्हणून नवीन मुक्कामावर पाण्याचे झरे सापडले तर शोधून काढण्यासाठी खिदमतगुजारखानाचा मुलगा अब्दुल्कादर याला बेलदार बरोबर देऊन पुढे पाठविण्यात आले. आता सैन्याचे कूच ठरले आहे तर लष्कराभोवतालची ठाणी उठविण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

बुऱ्हाणपूरच्या बातम्यावरून कळले की : (काबुलचा माजी सुभेदार) मरहूम अमीरखान याच्या मुलांनी आपल्या बापाचे दोन लाख रुपये, अश्रफ्या व जडजवाहीर बुऱ्हाणपुरात लपवून ठेवले होते. ते जप्त करण्यात आले.

### एकतीस ऑगस्ट १७००

पेशखाना पुढे पाठविताना त्याच्यासंरक्षणाची पुढीलप्रमाणे तरतूद करण्यात आली :— अहदीचे बक्षी सद्रुद्दीन मुहंमदखान व मीर हसन यांनी पाचशे स्वार घेऊन पेशखान्याच्या बरोबर जावे. वाटेत खानेआलम याने ठाण मांडून राहावे. आघाडीच्या टेहेळणीसाठी बिलबारसखान याने जावे. मुहंमद अमीनखान याने बादशहापाशी राहावे. कबचाकखान याने अघाडीवर पण जवळच असावे, खुलीखान याने तरबियतखानाच्या जवळ राहावे. रूहुल्लाखान मीर सामान याने काही आर्थिक मदत मागितली. त्याला एक हजार मोहरा द्याव्या अशी आज्ञा झाली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : चोरांनी (मराठयांनी) चाल करून येऊन वंजारी लोकांना वेढले आहे. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी बादशहांनी फतेहुल्लाखानाला रवाना केले.

**एक सप्टेंबर १७००**

आज दिवसाच्या सात घटिका झाल्या असता, बादशहा भूषणगडजवळील इरला नदीच्या काठावरील आपल्या छावणीतून निघाले. ते तख्ते रवांवर बसले होते. वाटेत खानेआलम याने त्यांची भेट घेतली. बादशहा त्याला म्हणाले, 'तुम्ही पेशखान्याच्या बरोबर आमच्या मागेमागे रहा.' बादशहा सव्वादोन कोसाचा प्रवास करून पाली(?) या मुक्कामी आले.

जुन्नरचा फौजदार नस्रुल्लाखान याने एक तलवार बादशहांना नजर केली.

काल हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे की : मराठा सरदार हणमंतराव याचा दत्तक मुलगा अंता(अंताजी?) हा खटाव येथील युद्धात रामचंद्र ठाणेदार याच्याशी लढत असताना जखमी होऊन पळाला. हणमंतराव स्वत: आजारी पडला असून त्याच्या शरीरावर सर्वत्र सूज(आमास) आली आहे.

खानबहादुर नुस्रतजंग(जुल्फिकारखान) याच्या शिफारसीप्रमाणे दौलतचा मुलगा मुहंमद दबीर याला चिंगलपट(मद्रासजवळ ?)ची किल्लेदारी देण्यात आली.

शेरुल्ला दरवेश(फकीर) याला दोन मोहरा व चार होन बक्षीस म्हणून देण्यात आले.

**दोन सप्टेंबर २७००**

बादशहांनी आज्ञा केली की : मुहंमदअमीनखान, सियादतखान व तुर्कताजखान यांनी वाटेत आमच्या मागे राहावे. लष्कराची पिछाडी मागाहून आली की त्यांनी हुजुरात यावे.

बादशहा हे काजी मुहंमद अक्रम याला म्हणाले, 'मायना(मायनी) गावात एक मशीद आहे. ती तुम्ही पाहून या.' त्याप्रमाणे काजी ती मशीद पाहून आला. येताना त्याने मशिदीचे दोन मुतवल्ली(मशिदीची देखरेख करणारे) बरोबर आणले. त्यांना वीस बिघे जमीन इनाम म्हणून देण्यात आली.

अजीजुल्लाखान याची तैनाती शहाजहानाबाद(दिल्ली) सुभ्यात झाली होती. त्याला खानदेश सुभ्यात जाण्यास सांगण्यात आले.

अब्दुर्रहीम हा मुहंमद अमीनखान सदर(न्यायाधीश) याजपाशी तैनात होता. त्याला अब्दुस्समदखान ही पदवी, सहाशे जात व शंभर स्वार अशी मन्सब देण्यात आली. (हा पुढे अब्दुस्समदखान दिलेरजंग या नावाने पंजाबचा सुभेदार झाला.)

**चार सप्टेंबर १७००**

आज बादशहा मुक्कामाहून निघाले. सव्वादोन कोसाचा प्रवास करून ते कलाढोणला पोहोचले(कळेढोण, खटावपासून बावीस मैल दक्षिण पूर्व, खटाव तालुका, सातारा जिल्हा). शहाजादा बेदारबख्त याने विनंती केली की : छावणीत एक मस्त हत्ती घोड्याच्या बरोबर धावतो. तो आपल्याला नजर करावा म्हणतो. बादशहांनी हत्ती पाहिला. त्यांनी बेदारबख्ताला विचारले, 'तुम्ही विकत घेतला काय?' त्याने 'हो' म्हटले. बादशहांनी हत्तीची किंमत एक हजार रुपये ठरविली. ती रक्कम त्यांनी शहाजाद्याला माफ केली. बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर याला म्हणाले, 'आपला हत्ती

बलंदबख्त हा घोड्याच्या बरोबर धावतो तो कुठे आहे?' तो आणल्यावर त्याला घोड्याबरोबर पळविण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की: काल संध्याकाळी चोर (मराठे) वाटेत चालून आले. त्यांनी बादशहाचे तंबू लादलेले पाच उंट पळवून नेले. ही बातमी कळताच खानेआलम हा आपली पथके घेऊन त्यांच्या मागे धावला. त्याने अनेक चोरांना (मराठ्यांना) ठार मारले. त्याने वीस घोडी पकडून आणून बादशहांना दाखविली. बादशहा म्हणाले, 'सेवेचा मजुरा झाला.'

बादशहांनी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान यास म्हटले, 'तुम्ही लष्करच्या एक कोस पिछाडीला राहात जा म्हणजे सगळे मिळून पोहोचू शकतील.'

बादशहांना कळविण्यात आले की: चोर (मराठे) हे भमरूर (म्हसवड?) च्या वाटेने आले. त्यांनी वंजारी लोकांचे तांडे अडविले आहेत. बादशहांनी त्यांच्या पारिपत्यासाठी फतेहुल्लाखान याला आज्ञा केली.

**पाच सप्टेंबर १९००**

शहाजादा बेदारबख्त यास मुर्तजाबाद मिरज येथे पोहोचविणे होते. अंतर अठ्ठावीस कोस होते. त्याच्या आठ मजला करण्यात आल्या. हे काम उस्मानखान करावल याने केले.

बादशहाजादा मुहंमद मुअज्जम (काबुलचा सुभेदार) याने लिहून कळविले की: परलोकवासी राजा बिशनसिंग (अंबरचा राजा) याची पथके त्याचा मुलगा विजयसिंग याजबरोबर होती. त्यातील बरेच लोक देशी (अंबर) निघून गेले. बाकीचेही जाण्याच्या तयारीत आहेत. राजा जयसिंग याला आज्ञा करण्यात यावी की: त्याने आपली पथके पाठवावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'विजयसिंगाने नियमास अनुसरून असलेली पथके घेऊन तेथेच (काबुल प्रांतात) राहावे. राजा जयसिंग हा हुजुरात येईल.'

**सहा सप्टेंबर १९००**

पेशखाना (पुढील मुक्कामासाठी पाठविण्याचे तंबू वगैरे) पुढे पाठविण्यासंबंधी काय आज्ञा म्हणून फराशखान्याचा अधिकारी शर्फुद्दीन याने विनंती केली. बादशहा म्हणाले, 'पेशखाना पुढे पाठवा. बक्षीउल्मुल्क बहरामंदखान व खानेआलम यांनी पेशखान्याबरोबर जावे. खानेआलमने तेथे राहावे आणि बहरामंदखानाने पेशखाना पोहोचवून हुजुरात यावे. बक्षीउल्मुल्क मखलिसखान, हमीदुद्दीनखानबहादुर व सियादतखान यांनी वाटेतील डोंगराच्या खिंडीजवळ तीन घटिका राहावे.' त्याप्रमाणे करण्यात आले.

बादशहा हमीदुद्दीनखानबहादुर यास म्हणाले, 'सुभे मुहंमदाबाद बिदरच्या सरकारी हत्तीखान्याच्या कारभाऱ्यांना लिहा की: त्यांनी तेथील हत्तीखाना हुजुरात आणावा. या कामासाठी मुहंमद अमीन वगैरेंना अंमलबजावणी अधिकारी म्हणून नेमण्याची आज्ञा झाली.

मीर सामान (सरकारी मालमत्तेची व्यवस्था पाहाणारा) रूहुल्लाखान याला बादशहा

म्हणाले, 'उंट, बैल इत्यादी कारखान्यांचे अधिकारी औरंगाबादेत आहेत. त्यांना म्हणावे उंटखाना, गाव(बैल)खाना इत्यादी कारखाने घेऊन हुजुरात या. हे काम पार पाडण्यासाठी कायमबेग गुर्जबर्दार नेमण्यात यावे.'

### सात सप्टेंबर १७००

आज बादशहा कळेढोणहून निघाले. सव्वातीन कोसाचा प्रवास करून ते झरे (आटपाडी महाल, सांगली जिल्हा) या गावी पोहोचले. उस्मानखान करावल यास बादशहा म्हणाले, 'येथून पन्हाळगड, मुर्तजाबाद मिरज व तळ(ब्रह्मपुरी), ही किती अंतरावर आहेत व मजला किती होतात हे चौकशी करून कळवा.'

बादशहा बक्षीउलमुल्क मुखलिसखान याला म्हणाले, 'गंज(बाजार)चा क्रोडी (अधिकारी) सय्यद इमामुद्दीन याने धान्याचे भाव खाली आणले आहेत.' त्याची मन्सब वाढविण्यात आली.

बादशहा बक्षीउलमुल्क बहरामंदखान याला म्हणाले, 'तुम्ही डोंगराच्या खिडीच्या अलीकडे सावधगिरीने रहा.'

### आठ सप्टेंबर १७००

बादशहाजादा कामबक्ष याने विनंती केली की : माझ्यापाशी स्वारी करण्यालायक घोडे नाहीत. सात घोडे देण्यात यावेत. विनंती मान्य करण्यात आली.

पेशखाना पुढे रवाना करावा आणि मुखलिसखान, खानेआलम व हमीदुद्दीनखानबहादुर यांनी नेहमीप्रमाणे त्याच्या पाठीमागून जावे अशी आज्ञा झाली.

### नऊ सप्टेंबर १७००

रूहुल्लाखान व तरबियतखान अद्याप येऊन पोहोचले नव्हते. रात्री रूहुल्लाखानाचा निरोप आला की : आम्ही लष्करानजीक येऊन पोहोचलो. तरबियतखान हा डोंगराच्या खिडीपाशी थांबला आहे. तो उद्या येईल. बादशहांनी खिदमत तलबखान यास कर्णे वाजविण्याची आज्ञा केली.

मीर निजामुद्दीन व इनायतुल्ला हे मध्य आशियातून नुकतेच आले होते. त्यांना खिलतीची वस्त्रे देण्यात आली. बक्षीउलमुल्क मुखलिसखान याने विनंती केली की : रामचंद्र (खटावचा दिवंगत ठाणेदार) याचा भाऊ किशनराव हा विजापूर सुभ्यातून हुजुरात आला असून तो सुतकात बसला आहे. भारोजी(बहरोजी?) याने त्याला सुतकातून उठवून हुजुरात आणावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

### दहा सप्टेंबर १७००

बादशहा आज सकाळी आठ घटिका दिवस आला असता झरा येथील मुक्कामाहून निघाले. अडीच कोसाचा प्रवास करून ते आटपाडी(सांगली जिल्हा)ला पोहोचले.

काल रात्री बादशहांनी शहाजादा मुहंमद बेदारबख्त याला आज्ञा केली की : तुम्ही उद्या सकाळी आपली पथके घेऊन उजव्या आणि डाव्या बाजूला तीन चार कोसापर्यंत गस्त घालून या.

प्रवासात असताना बादशहांनी आज्ञा केली की : बादशहाजादा कामबक्ष यांनी नीला नावाच्या घोड्यावर स्वार होऊन यावे.

पेशखाना पाठीमागून येत आहे. तो पुढे पाठविण्यासंबंधी काय आज्ञा म्हणून विनंती करता बादशहा म्हणाले, 'येथे मुक्काम आहे. पेशखाना उभा राहू द्या.'

**अकरा सप्टेंबर १७००**

बादशहांनी आज्ञा केली की : पेशखाना पुढे जाऊ द्या. सियादतखान, फतेहुल्लाखान व सर्फराजखान यांनी बरोबर जावे. बक्षीउल्मुल्क मुखलिसखान याने जाऊन खवासपुराच्या (सांगोला तालुका, सोलापूर जिल्हा) भोवती बादशहाच्या वास्तव्यासाठी योग्य जागा पाहून यावे.

शहाजादा मुहंमद बेदारबख्त याला एक लाख रुपये देण्यात यावे अशी आज्ञा झाली. ही रक्कम बेदारबख्ताच्या बंगाल मधील जहागिरीतून वसूल करून तेथील खजिन्यात भरावी असा हुकुम बंगालच्या दिवाणाकडे पाठवावा अशी आज्ञा झाली.

सुरत बंदरचा किल्लेदार हाजी मिहराब हा मरण पावला. त्याच्या जागी अबू तालिब याला नेमण्यात आले.

काल बादशहांना कळविण्यात आले की : यलबारसखान करावल याने तीन चोर (मराठे) व पाच घोड्या पकडल्या आहेत. चोरांना (मराठ्यांना) कोतवालाच्या हवाली करावे व जी मालमता मिळाली ती गाजींनी (शिपायांनी) वाटून घ्यावी अशी आज्ञा झाली.

आपल्यापाशी जिन्सी, शुतरनाळ, रेहकले इत्यादी सामग्री किती आहे याची माहिती देण्यात यावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

काल रात्री बादशहांना कळविण्यात आले ते असे :— जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग, राव दल्पत बुंदेला, रामसिंग हाडा हे मराठ्यांचा पाठलाग करीत आले. ते बादशाही छावणीपासून अर्ध्या कोसावर आले आहेत. त्यांनी अनेक चोरांना (मराठ्यांना) ठार मारले व घोडी धरली. बादशहांनी आज्ञा केली की, 'मीर तुजक (शिष्टाचाराचा अधिकारी) याने नुस्रतजंग जुल्फिकारखान यास मराठ्यांच्या पारिपत्यासाठी भूषणगडाकडे पोहोचवावे.'

**बारा सप्टेंबर १७००**

आज बादशहा आटपाडीहून निघाले. सव्वातीन कोसाचा प्रवास करून ते खवासपूरला पोहोचले.

बादशहांनी आज बढत्या बदल्यांचे हुकुम दिले. औरंगाबादच्या किल्ले अरकचा किल्लेदार याने विनंत्या केली की : (१) किल्लेदारीचा हुकुम मिळावा. विनंती मान्य करण्यात आली. किल्ल्याच्या बाहेर येण्यास परवानगी असावी. आज्ञा झाली की : गनीम नसल्यास बाहेर येऊ शकता. (२) घोड्यांना डाग देण्याच्या निर्बंधातून मला वगळण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली. (३) कुटुंबाला आणण्यासाठी मुलगा फजले अली याला दिल्लीला पाठवीत आहे. परवानगी देण्यात यावी. परवानगी देण्यात आली.

### तेरा सप्टेंबर १७००

बादशहांनी उस्मानखान करावल व मिर्जाबेग यांना बोलावून म्हटले, 'तुम्ही येथून सांगोल्यातील मशिदीपर्यंत अंतर किती आहे ते मोजून पहा. सांगोल्यात पाणी व गवत यांची काय परिस्थिति आहे हे मला कळवा.'

बागांचा व्यवस्थापक मुहरमखान याचा नायब ख्वाजा मसूद याला बादशहा म्हणाले, 'नदी (माणनदी)च्या काठावर भाजी लावा.'

बादहांनी शमशेरबेग याची नेमणूक माजरा (नाझरे?) येथे ठाणेदार म्हणून केली. त्याच्याबरोबर बेलदार देण्यात आले. तेथे एक गढी बांधून त्यांनी यावे अशी आज्ञा झाली.

### चौदा सप्टेंबर १७००

बादशहा बेदारबख्ताला म्हणाले, 'तयार रहा. पन्हाळगडाला वेढा घालण्यासाठी तुम्हाला पाठवीत आहे.' बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने शहाजाद्याच्या सैन्याचा तपशील (तूमार) तयार करावा अशी आज्ञा झाली. तरबियतखानाने पुढील सामग्री पुरवावी अशीही आज्ञा झाली :– दोनशे बर्कंदाज, एक हजार पायदळ, तीनशे बाण, शंभर मण दारू, शंभर मण सरब.

बेदारबख्ताने एक घोडा भेट म्हणून दिला. बादशहाच्या आज्ञेने चाबुकस्वाराने घोडा फिरविला. घोडा क्षुब्ध झाला. बादशहा म्हणाले, 'घोडा परत करा.' बेदारबख्ताने विनंती केली की : घोडा चांगला आहे. स्वारीत बरोबर राहू द्यावा. विनंती मान्य करण्यात आली.

सांगोल्याचा ठाणेदार अल्लाहकुली याने विनंती लिहून पाठविली की : आज्ञा असेल तर मी आपले निम्मे पथक सांगोल्याच्या ठाण्यात ठेवून उरलेल्या पथकानिशी हुजुरात येईन. विनंती मान्य करण्यात आली.

औरंगाबाद खुजस्ता बुनियादचा सुभेदार नजाबतखान याने विनंती लिहून पाठविली की : माझा वैद्यकीय इलाज करण्यासाठी दयानाथ मिश्र याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

फरीदूनबेग याला आठ दिवसांसाठी तळावर (ब्रह्मपुरीच्या) जाऊन येण्याची परवानगी मिळाली.

### पंधरा सप्टेंबर १७००

ख्वाजा मसूद महली व उस्मान करावल यांनी विनंती केली की : येथून सांगोल्याला जाण्यास दोन रस्ते आहेत. एक रस्ता सात कोसाचा असून त्याच्या तीन मजला होतील. दुसरा रस्ता पाच कोसाचा असून त्याच्या दोन मजला होतील. तेथे (सांगोल्यास) राहाण्यासाठी जागा चांगली आहे. तेथे गवतचारा, लाकूडफाटा मुबलक आहे. तेथील मशीद मोठी आहे.

हमीदुद्दीनखानाकडे हे सगळे लिहून द्या अशी आज्ञा झाली. हमीदुद्दीन हा रात्री बादशहांना भेटला. त्याचे म्हणणे ऐकून घेतल्यावर बादशहा म्हणाले, 'आम्ही येथेच (खवासपूर) मुक्काम करणार.'

नगारखान्याचा दारोगा (अधिकारी) खिदमततलबखान याने कर्णे वाजवून ही गोष्ट जाहीर करावी अशी आज्ञा झाली. बादशहा हमीदुद्दीनखानाला म्हणाले, 'उद्या तुम्ही व नायब कोतवाल मुहंमद अमीन यांनी छावणीच्या भोवती साखळीने अंतर मोजून कळवावे.' त्यांनी मोजणी करून सांगितले की, 'एकंदर घेर सव्वादोन कोसाचा होईल. सर्व अधिकारी व त्यांची पथके यांच्या राहाण्यासाठी व्यवस्थित आखणी केली तर छावणीच्या भोवती काटयाकुटयाचे मोठे कुंपण घालता येईल.' बादशहा म्हणाले, 'तसे करा.'

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : आज्ञेप्रमाणे शहाजादा बेदारबख्त याचा पेशखाना (पुढील मुक्कामाचे तंबू इत्यादी) पन्हाळयाच्या दिशेने रवाना झाला आहे.

बादशहांनी आज्ञा केली की : बक्षीउलमुल्क बहरामंदखान याने कही (लाकूडफाटा, गवत इत्यादी) आणण्यासाठी जावे.

राजा दुर्जनसिंग यास हुजुरात बोलावून घ्यावे अशी आज्ञा देण्यात आली.

## सोळा सप्टेंबर १७००

आज शहाजादा बेदारबख्त याने पन्हाळगडास जाण्यासाठी बादशहाचा निरोप घेतला. बादशहांनी त्याच्या पाठीवर हात ठेवून त्याला निरोप दिला. बेदारबख्ताला एक तल्वार व ढाल (किंमत दोन हजार रुपये), दोन घोडे (किंमत चारशे मोहरा) व खास खिलतीची वस्त्रे या वस्तू देण्यात आल्या. शहाजाद्याचे खानेआलम व इतर सहकारी यापैकी खानेआलमला घोडा, मन्सूरखान यास खिलतीची वस्त्रे, रजवीखान यास खिलतीची वस्त्रे देऊन निरोप देण्यात आला. उस्मानखान करावल याला घोडा बक्षीस देण्यात आला. याने शहाजाद्याला मुर्तजाबाद मिरजेपर्यंत नेऊन सोडावे अशी आज्ञा झाली.

राव दलपत (बुंदेला) याचा पुतण्या नरसिंगदेव याला अडीचशेची मन्सब देण्यात आली.

चांभारगोंद्याचा ठाणेदार खुदायारखान याला कोटरी पियारा (माळवा) येथील फौजदारीवर बदलण्यात आले.

बादशहांनी शेख हिदायतकेश याला विचारले, 'येथून मुर्तजाबाद (मिरज) किती कोस लांब आहे. आणि किती मजला होतील?' त्याने विनंती केली की : येथून मुर्तजाबाद मिरज चोवीस कोसावर आहे व त्याच्या सात मजला होतील. हे लिहून लवकर द्यावे अशी आज्ञा झाली.

बहरामंदखानाला बरे नाही असे कळले. बक्षीउलमुल्क मुखलिसखान व मुहंमद अमीनखान यांनी सहा हजार स्वार बरोबर घेऊन कही आणण्यास जावे अशी आज्ञा झाली.

## सतरा सप्टेंबर १७००

यलंगतोशखानबहादुर (औरंगजबाचा दासीपुत्र असे मनुची म्हणतो) याला मुलगा झाला. त्याने बादशहाला पाच मोहरांची नजर दिली.

बादशहांनी पुढील इसमांना शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात केले :– शेरयारखान, महमूदखान, शेख मुबाह, जियाउल्ला. बेदारबख्ताच्या फौजेचा बक्षी नेकनामखान याच्या मन्सबीत वाढ करण्यात आली. बेदारबख्ताच्या विनंतीवरून सरफराजखानाला त्याच्यापाशी तैनात करण्यात आले. तो सहा हजारी (जात) व पाच हजारी (स्वार) मन्सबदार होता. बेदारबख्ताकडे एक हत्ती (चांदीची अंबारी असलेला व तीन हजार रुपये किंमतीचा) व सतरा इतर हत्ती पाठवावे अशी आज्ञा झाली.

## अठरा सप्टेंबर १७००

शहाजादा बेदारबख्त याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली :–

(१) बादशाही छावणीपासून मिरजेपर्यंत ठाणी बसविण्यात यावीत. विनंती मान्य करण्यात आली.

(२) मिरजेच्या किल्ल्यात माझी माणसे व बुणगे ठेवावी लागल्यास किल्लेदाराने हरकत करू नये असा हुकुम त्याला देण्यात यावा. विनंती मान्य करण्यात आली.

नमाजानंतर बादशहांने खाशाचा घोडा मागविला. बादशहांनी घोड्यावर बसून त्याला फिरवला. बादशहा खुश झाले. घोड्याची किंमत साठ मोहरा अशी होती. बादशहांनी ती चाळीस मोहरांनी वाढविली. घोड्याची किंमत चंदन कुवर यास देण्यास आली.

जुल्फिकारखानाच्या विनंतीवरून रामसिंग हाडा याची मन्सब वाढविण्यात आली.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत तैनात असलेला अब्दुल्रसूलखान आजारी आहे असे कळले. शम्सुद्दीन हकीम याने जाऊन त्याचा इलाज करावा अशी आज्ञा झाली.

मुहंमद अमीनखान हा पथके बरोबर घेऊन कही आणण्यासाठी गेला असे बादशहांना कळविण्यात आले.

## एकोणीस सप्टेंबर १७००

बादशहांना कळविण्यात आले की : छावणीतून ब्रह्मपुरीकडे जाणारा माणसांचा काफिला (तांडा, थवा) संरक्षक पथक (बदर्का) नसल्यामुळे अडकून पडला आहे. फतेहुल्लाखानाने काफिला सांगोल्यापर्यंत पोहोचवून यावा अशी आज्ञा झाली.

औरंगाबादेचा बक्षी व वाकेनवीस याला औरंगाबादेस जाण्यास निरोप देण्यात आला.

बेदारबख्ताच्या फौजेत सर्फराजखान तैनात होता. त्याची मुले सय्यद अब्दुल्कादर व सय्यद असदुल्ला यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

खुजस्ताबुनियाद औरंगाबादच्या किल्ले अरकची किल्लेदारी औरंगाबादचा सुभेदार नजाबतखान याच्या अधिकारात राहावी अशी बादशहांनी आज्ञा केली.

सफशिकनखान मीर तुजक अव्वल (शिष्टाचाराचा प्रमुख अधिकारी, प्रोटोकोल) याबद्दल बादशहांनी विचारले, 'तो तळावर (ब्रह्मपुरी) गेला का येथेच आहे?' मुनीमखानाने विनंती केली की : येथेच आहे. बादशहा म्हणाले, 'त्याला सांगा, जायचे असल्यास काफल्याबरोबर ब्रह्मपुरीला जा.' सफशिकनखानाने सांगितले, 'मला आपल्याजवळ राहावयाचे आहे.' विनंती मान्य करण्यात आली.

मुनीमखानाने विनंती केली की : भालेरावचे घोडे निकामी झाले आहेत. मदत म्हणून दोन घोडे देण्यात यावेत अशी त्याची विनंती आहे. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : जाधवराव उर्फ जगदेवराव आजारामुळे ब्रह्मपुरीला गेला होता. तेथे तो मरण पावला. त्याला तीन हजार जात, दोन हजार स्वार, त्यापैकी एक हजार दुघोडी अशी मन्सब होती. बादशहांनी आज्ञा केली की : जगदेवरावचे भाऊ व मुले यांना काय काय मन्सबी, हुद्दे आहेत ते कळविण्यात यावे.

तोफखान्याचा प्रमुख, तरबियतखान, याने विनंती केली की : आज्ञा होत असेल तर कुटुंबियांना आणण्यासाठी माझा मुलगा मुहंमद इसहाक याला तळावर (ब्रह्मपुरी) पाठवितो. आज्ञा झाली की : तरबियतखानाने एक आठवडा तेथे राहावे. त्यानंतर गस्त घालीत बंडखोरांचे पारिपत्य करून हुजुरात यावे.

## एकवीस सप्टेंबर १७००

इसलामपुरीचा बदललेला किल्लेदार बशारतखान व त्याचा मुलगा मीर अमजद हे आज बादशहांना भेटले.

रूहुल्लाखान याने उद्या कही आणण्यासाठी जावे व मुखलिसखान याने त्याच्याबरोबर देण्यासाठी पाच हजार स्वारांची तरतूद करावी अशी आज्ञा झाली.

तरबियतखानाने सरंजाम सामग्री तळावर (ब्रह्मपुरी) पोहोचवावी अशी आज्ञा झाली.

तहव्वुरखानाने विचारले, 'मुर्तजाबाद मिरजेचा किल्लेदार मुफख्खरखान याने विचारणा केली आहे की :– शहाजादे मुहंमद बेदारबख्त येथे येत आहेत. त्यांना भेटण्यासंबंधी काय आज्ञा?' बादशहांनी आज्ञा केली की, 'भेटण्याची आवश्यकता नाही.'

हमीदुद्दीनखानबहादुर याने विनंती केली की : माझ्या भाचीचे लग्न अर्शदखानाच्या मुलाशी ठरले आहे. त्याला तळावर (ब्रम्हपुरी) जाण्यास परवानगी असावी. बादशहा म्हणाले, 'पोरीला आणि कुटुंबियांना इकडे बोलावून घ्या.'

## बावीस सप्टेंबर १७००

बादशहांना कळविण्यात आले की : आज्ञेप्रमाणे रूहुल्लाखान हा कही आणण्यास जात आहे. बादशहांनी आज्ञा केली की : मुहंमद अमीनखान ज्या दिशेने गेला त्याच दिशेने त्याने जावे. यापुढे एकेका आठवड्याच्या अंतराने दोघांनी जात असावे.

इंदापूरचा ठाणेदार मुगलखान याला आपल्या ठाण्याकडे जाण्यास निरोप देण्यात आला. त्याला एक घोडा देण्यात आला.

जाधवराव (जगदेवराव) चा मुलगा मानसिंग याला आपल्या दिवंगत बापाची जाधवराव ही पदवी देण्यात आली. मानसिंगाला सातशे जात व सहाशे स्वार अशी मन्सब होती. तीत तीनशे जात व सहाशे स्वार अशी वाढ करण्यात आली.

## तेवीस सप्टेंबर १७००

खानेआलम (मुकर्रबखानाचा मुलगा), याचे भाऊबंद शेख बुऱ्हाण, शेख जुनैद, अब्दुल्-अजीज, शेख नाहर व शेख कमाल यांना मन्सबी देण्यात आल्या.

दिवंगत जाधवरावच्या मुलांना पुढीलप्रमाणे मन्सबी देण्यात आल्या :–
(१) राघोजी पाचशे जात व दोनशे स्वार,
(२) भूपतराव(यशवंतराव?) तीनशे जात व शंभर स्वार,
(३) तानाजी(दत्ताजी?) दोनशे जात पन्नास स्वार.

जगदेवरावचा भाऊ रुस्तमराव यास पाचशे जात व शंभर स्वार अशी मन्सब होती. तीत शंभर जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'पाईन विलायतचा ठाणेदार नाहरखान याला लिहा की : बादशहाजादा मुहंमद कामबक्ष याचा जो काही सरंजाम आज्जमगडाच्या किल्ल्यात (पुरंदर) राहिला असेल तो त्याने बदर्का(संरक्षक पथक) देऊन पाठवावा.

नौरसतारागड(परळी) किल्ल्याच्या डागडुजीसाठी पाच हजार रुपये खर्च करण्यात यावेत अशी बादशहांनी आज्ञा केली.

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याने विनंती केली की : (१) माझा भाऊ शर्फुद्दीन याला दिल्ली येथे तैनात करण्यात यावे. (२) आणि माझा नातू(मुलीचा मुलगा) मुहंमद तकी हा आईला आणण्यासाठी तळावर(ब्रह्मपुरी) जात आहे. परवानगी असावी. दोन्ही विनंत्या मान्य करण्यात आल्या.

### चोवीस सप्टेंबर १७००

खान फीरोजजंग याने लिहिले की : ख्वाजा दानिश याला अलाहाबाद सुभ्यातील हसनपूर परगण्यात जहागीर आहे, पण तेथील फौजदाराच्या जुलुमामुळे उत्पन्न येत नाही. ख्वाजा दानिशचा भाऊ बख्तमंद याला तेथे फौजदार म्हणून नेमण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

मीर सामानच्या खात्याचा दारोगा अली रजा याने बावीसशे बैल विकत घ्यावे अशी आज्ञा झाली.

### पंचवीस सप्टेंबर १७००

बादशाही छावणीतील बाजाराचा करोडी(अधिकारी) हा रसद आणण्यासाठी तळावर(ब्रह्मपुरी) गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला. त्याने सांगितले की, 'मी धान्याच्या गोण्यांनी लादलेले जवळजवळ पन्नास हजार बैल छावणीत आणले आहेत.' बादशहा म्हणाले, 'आफरीन बाद, शाबास.'

मुखलिसखान हा बादशहाकडे येण्यास निघाला. दौलतखान्याजवळ(बादशहाचे निवासस्थान) तो आला तशी त्याला उलटी झाली. तो तसाच परत आपल्या तंबूकडे गेला. बादशहांना हे कळविण्यात आले.

बादशहांना कळविण्यात आले की : खास चौकीच्या मन्सबदाराची माणसे दुर्दशेत आहेत. बादशहा म्हणाले, 'ज्यांचे घोडे कामातून गेले अगर दुबळे झाले त्यांना तीन महिन्याच्या रजेवर तळावर(ब्रम्हपुरी) पाठवा.'

फराशखान्याचा अधिकारी शर्फुद्दीन याला बादशहा म्हणाले, 'दिवाणे खासचा

तंबू उभा करा.' त्याप्रमाणे तंबू उभा करण्यात आला.

रूहुल्लाखान याने उत्तम व्यवस्था करून कही आणली असे बादशहांना कळविण्यात आले.

**सव्वीस सप्टेंबर १७००**

तळावरून (ब्रह्मपुरी) खुशबूखाना (अत्तरे आदि द्रव्यांचे खाते) बादशाही छावणीकडे येत आहे असे कळले. फतेहुल्लाखानाने सांगोल्यापर्यंत जाऊन तो छावणीत आणावा अशी आज्ञा झाली.

तरबियतखान याला एक आठवड्यासाठी तळावर (ब्रह्मपुरी) जाण्यास रजा देण्यास आली. परत येतांना मरहूम बुजुर्ग उम्मेदखान याचा मुलगा अजीजुद्दीन याला छावणीत आणण्याची परवानगी त्याने मागितली. परवानगी देण्यात आली.

औरंगाबादचा सुभेदार नजाबतखान याने विनंती लिहून पाठविली की : शमशेरखानाचा पुतण्या मुहंमद हाशम याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांनी आज्ञा केली की : मन्सूरखानाचा मुलगा मुहंमद काजम याने छावणीतून रसदेच्या गोण्यांनी लादलेले पाच हजार बैल बेदारबख्ताच्या छावणीत पोहोचवून यावे.

**सत्तावीस सप्टेंबर १७००**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : शत्रूचे सरदार अल्मान वे सलना गुरग (नावाचा उलगडा होत नाही) हे डफळापूरच्या भागात पसरले आहेत. बादशहांनी आज्ञा केली की : काफला घेऊन येण्यासाठी फतेहुल्लाखान हा गेला आहे. त्याने चोरांचे (मराठ्यांचे) पारिपत्य करून, काफला छावणीत आणावा.

विजापूर कर्नाटकचा फौजदार मामूरखान याच्या नावे फर्मान पाठविण्यात आले.

**अठ्ठावीस सप्टेंबर १७००**

मुखलिसखान व बहरामंदखान हे आजारातून बरे होऊन बादशहांना भेटले. मुखलिसखानाचा मुख्य कारकुन शेख सादुल्ला याने विनंती केली की : माझे डोळे अधू झाले आहेत. मी निवृत्त होऊ इच्छितो. मला एक खेडे इनाम म्हणून देण्यात यावे. त्याचे वार्षिक उत्पन्न बाराशे रुपयांचे होते. खेडे देऊन त्याची तीनशे जात व पन्नास स्वार ही मन्सब काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

तरबियतखान हा रजेवर चालला होता. त्याला तीनशे मोहरांच्या किंमतीचा घोडा देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

ओरिसाचा सुभेदार मुजफ्फरखान हा वारला असे कळले. त्याच्या जागी नांदेडचा माजी सुभेदार अस्करखान याची नेमणूक करण्यात आली.

(**संपादकीय :** रबिलाखर महिन्याच्या अठ्ठावीस तारखेस (एक आक्टोबर १७००) माण नदीला एकाएकी पूर येऊन मोगल लष्कराची फार मोठी प्राण व वित्त यांची हानी झाली. खुद्द औरंगजेब हा ठेच खाऊन पडला. तो पुढे मरेपर्यंत लंगडत होता. या पुराचे वर्णन

त्यावेळी मोगल छावणीत असलेला औरंगजेबाचा कारकून साकी मुस्तैदखान याने आपल्या औरंगजेब चरित्रपर मासिरे आलमगीरी या ग्रंथात दिले आहे. अखबारामध्ये या काळातील चारपाच दिवसांच्या नोंदी आढळत नाहीत.)

### चार ऑक्टोबर १७००

पायात दुखणे असल्यामुळे बादशहा तीन दिवस दिवाणे अदालत (न्याय कचेरी) मध्ये येऊ शकले नाहीत. आज ते प्रार्थनागृहापर्यंत आले आणि त्याला लागूनच असलेल्या जागेत त्यांनी काम केले. बादशहाजादा कामबक्ष याने एक हजार अश्रफ्या, दोन हजार रुपये व एक स्फटिकाचा पेला निसार (ओवाळून टाकणे) म्हणून बादशहांना नजर केले. हमीदुद्दीनखानबहादुर याने एक हजार अश्रफ्या निसार म्हणून दिल्या.

बादशहांनी खवासांचा दारोगा मुल्तफतखान याला विचारले, 'पाण्यात तुमची मालमत्ता किती गेली?' त्याने म्हटले, 'आपल्या कृपेने माणसे वाचली.'

बादशहांना कळविण्यात आले की : मुहतशमखान हा नदीच्या काठाला लागून वाचला. पण त्याची सगळी मालमत्ता पाण्यात वाहून गेली. त्याला एक हजार रुपये देण्यात आले. बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'मजला ठरविणाऱ्यांनी (खुशमंजिल)' नदीच्या इतके जवळ काय म्हणून तंबू उभे केले? त्यांचे हुद्दे मला कळविण्यात यावे.'

### पाच ऑक्टोबर १७००

छावणीतील बाजाराचा करोडी सय्यद इमामुद्दीन याला निरोप देऊन बादशहांनी आज्ञा केली की : अनखेड (?) व परंडा येथून रसद आणा. त्यापैकी धान्याच्या गोण्यांनी भरलेले पाच हजार बैल बेदारबख्ताच्या फौजेत पाठवा.

खेळणा (विशाळगड) किल्ल्यातील माणसांची बायकामुले खानजमान फतेहजंग याचा मुलगा अब्दुल्लतीफ याच्या कैदेत होती. त्यांना सोडवून अब्दुल्लतीफखानाला हुजुरात आणावे अशी आज्ञा झाली.

### सहा ऑक्टोबर १७००

मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार खुदाबंदाखान याने विनंती लिहून पाठविली की : माझा भाऊ जफरखान याला बारा हजाराचे वर्षासन आहे. तो बादशाही छावणीत आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. येथील खजिन्यातून त्याला वर्षासन मिळत जावे. विनंती मान्य करण्यात आली.

### सात ऑक्टोबर १७००

बादशहांनी (आपली मुलगी) नबाब जीनतुन्निसा बेगम हिला लिहिले की : मला भेटावयाचे असल्यास लवकर येथे येण्याची तयारी करा. हमीदुद्दीनखानबहादुर यास या कामासाठी तळावर जाण्यासाठी तयार राहाण्यास सांगण्यात आले.

अर्शदखानाचा जावई मीर महमूद याने विनंती केली की : माझी आई बल्ख येथून आली असून ती औरंगाबादेत आजारी आहे. मला तेथे जाण्यास तीन महिन्याची

रजा देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

विजापूरचा सुभेदार लुत्फुल्लाखान याची मन्सब वाढविण्यात आली.

आज्जमगड(पुरंदर)च्या बातमीवरून कळले ते असे : हसन(?) हा शत्रूचा सरदार पाचशे सैनिकांना बरोबर घेऊन पुरंदरच्या परिसरात धामधूम करीत होता. तेथील फौजदाराने त्याच्यावर चालून जाऊन त्याला आणि इतर काही माणसांना ठार मारले. त्यांची डोकी हुजुरात पाठविण्यात आली. बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.'

## आठ ऑक्टोबर १७००

यासीनखान हा आजमतारागड(सातारा)चा फौजदार होता. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. मुखलिसखानाच्या विनंतीवरून त्याला कऱ्हाडच्या ठाणेदारीवर नेमण्यात आले. त्याची मन्सब पाचशे स्वारांनी वाढविण्यात आली.

फतेहुल्लाखानाने विनंती केली की : माझ्या पथकातील अनेकांपाशी घोडे नाहीत. घोडे देण्यात यावेत. वीस घोडे द्यावे अशी आज्ञा करण्यात आली.

राजा भीम याचा मुलगा सूरजमल हा शहाजादा मुईजुद्दीन याच्यापाशी(मुलतान सुभ्यात) तैनात होता. तो लढाईत मारला गेला. त्याचा मुलगा सुल्तानसिंग याला मन्सब देण्यात आली.

## नऊ ऑक्टोबर १७००

नवाब जीनतुन्निसा बेगम हिच्याकडे फळांची करंडी पाठविण्यात आली. तिने लिहून कळविले की : मी आपल्याला भेटण्यास तयार आहे. हमीदुद्दीनखानबहादुर याने जाऊन जीनतुन्निसा बेगम यांना घेऊन यावे अशी आज्ञा झाली.

## दहा ऑक्टोबर १७००

बादशहांनी आज्ञा केली की : रजवीखान याने छावणी व तळ(ब्रम्हपुरी) या मधील मार्गाबद्दल खबरदारी बाळगावी. हमीदुद्दीनखानबहादुर हा एकोणीस घटिकात(घडी) छावणीहून ब्रम्हपुरीला पोहोचला. असे कळले. बादशहांनी हिदायत केशला विचारले की, 'येथून तळापर्यंत(ब्रम्हपुरी) किती अंतर आहे?' त्याने सांगितले, 'सतरा कोस.' बादशहा म्हणाले, 'शाबास, लवकर पोहोचले.' रूहुल्लाखान हा कही आणण्यासाठी गेला असे कळविण्यात आले.

आज्ञा झाली की : गदगचा फौजदार शेरखान हमीद यास लिहा की :– त्याने निम्मे पथक जुल्फिकारखान नुस्रतजंग याजकडे पाठवावे व निम्मे आपल्यापाशी ठेवावे.

शेरबाजखान याला पाच हजार जात व तीन हजार स्वार अशी मन्सब होती. तो बेदारबख्तापाशी तैनात होता. पण तो तेथे रूजू झाला नाही असे कळविण्यात आले. त्याची मन्सब दोन हजार स्वारांनी कमी करण्यात आली.

एका सावकाराने सात मोत्यांची माळ विकण्यास आणली. बादशहा मुनीमखानाला म्हणाले, 'आम्हाला जरूर नाही. त्याने हवे तेथे विकावे.'

### अकरा ऑक्टोबर १७००

दिवंगत जगदेवराव याचा मुलगा मानसिंग याला जाधवराव ही पदवी देण्यात आली होती. आता त्याला रावमानसिंग अशीही पदवी देण्यात आली. त्याला एक हजार जात व नउशे स्वार, त्यापैकी तीनशे स्वार दुघोडी, अशी मन्सब आहे.

### बारा ऑक्टोबर १७००

मरहूम मुहंमद तकीखानाचा मुलगा व बहरामंदखानाच्या मुलीचा मुलगा मुहंमद-तकी, मतलबखानाची मुले असदुल्ला व अबूतालिब, ही बादशहांना भेटली.

राजा भीम याचा दुसरा मुलगा जोरावरसिंग हा आपला भाऊ सूरजमल याच्या सुतकात बसला होता. बादशहाच्या आज्ञेने पदमसिंगाचा नातू साहेबसिंग याने त्याला सुतकातून उठवून बादशहाकडे आणले. त्याला वस्त्रे देण्यात येऊन मन्सब वाढविण्यात आली.

### तेरा ऑक्टोबर १७००

नवाब जीनतुन्निसा बेगम या तळावरून(ब्रह्मपुरी) रवाना झाल्या असे कळले. बादशहांनी आज्ञा केली की : मुखलिसखान, बादशहाजादा कामबक्ष, सुल्तान बलंदअख्तर, बहरामंदखान, तहव्वुरखान, आदिलखान वगैरेंनी पुढे जाऊन त्यांचे स्वागत करावे. यासाठी बादशहाजादा कामबक्ष याच्या स्वारीसाठी म्हणून तमाम एतिबार व रुहुल्कुद्स हे घोडे त्याच्याकडे पाठविण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

### चौदा ऑक्टोबर १७००

काल दिवस मावळण्यास सहा घटिका राहिल्या असता बादशहा ख्वाजासरांना म्हणाले, 'तुम्ही बाहेर जा.' जीनतुन्निसा बेगम ही येऊन बादशहांना भेटली. रात्रीच्या दीड घटका पर्यंत ती बादशहापाशी होती. त्यानंतर ती निरोप घेऊन आपल्या मुक्कामावर गेली. पुढील मंडळी तळावरून(ब्रह्मपुरी) येऊन बादशहांना भेटली :–

हमीदुद्दीनखानबहादुर, तरबियतखान,खुदामान, कुलदिलखान, जीनतुन्निसाचा कोका (दूधभाऊ)मीर महमूद, हिदायतुल्ला, मीर निजामुद्दीन, सय्यदखान.

बादशहा मुखलिसखानाला म्हणाले, 'अवधचा सुभेदार जबरदस्तखान याला लिहा की :– तुम्ही आपला नायब तेथे ठेवून तुमच्या जवळचे निम्मे सैन्य बरोबर घेऊन हुजुरात यावे.'

बादशहांना कळविण्यात आले की : चीनकुलीजखानाच्या सैन्यात पुढील माणसे तैनात असूनही तेथे हजर नाहीत:–

(१) बायाजी, एक हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब,
(२) लखमोजी, सातशे जात व शंभर स्वार,
(३) सनाजी(?), दोनशे जात व पन्नास स्वार,
(४) रामजी, सातशे जात व तीनशे स्वार.

त्यांची फरारी म्हणून नोंद करण्यात यावी अशी आज्ञा झाली.

**पंधरा ऑक्टोबर १७००**

असदखान(मुख्य प्रधान) याच्या तोफखान्याचा दारोगा मिर्जा मुहंमद हा तळावरून (ब्रह्मपुरी) येऊन बादशहांना भेटला.

हाफिज मुहंमद नसीर हा नुकताच मध्य आशियातून आला होता. तो बादशहांना भेटला. मध्य आशियातील एक दरवेश मुहंमद सालेह याने एक पुस्तक भेट म्हणून पाठविले, ते त्याने बादशहांना दिले. बादशहांनी मुहंमद नसीरला खिलतीची वस्त्रे दिली.

बादशहांनी आज्ञा केली की : पाचशे स्वारांची नव्याने भरती करण्यात यावी.

**सोळा ऑक्टोबर १७००**

बीडच्या हरकाऱ्यांच्या लिहिण्यावरून कळले की : येथे तैनात असलेली पुढील माणसे हजर नाहीत :- सय्यद मदारी, सय्यद इब्राहीम, सादतुल्ला, हे पाचशेचे मन्सबदार. सय्यदअली चारशे जात व अडीचशेस्वार असलेला मन्सबदार. त्यांच्या जहागिरी काढून घ्याव्या अशी आज्ञा झाली.

**सतरा ऑक्टोबर १७००**

शहाजादा बेदारबख्त याने विनंती लिहून पाठविली की : बेलदार वगैरे पाठविण्यात यावेत. बादशहांनी आज्ञा केली की, 'तीनशे बेलदार, दोनशे तबरदार(कुऱ्हाडींनी जंगल कापणारे) व तीससक्का(पाणी वाहणारे, भिस्ती) पाठविण्यात यावेत.'

गाजिउद्दीनखान याच्या सैन्यातील बातम्यावरून कळले की :(१)तालेयारखान, अडीच हजार जात व पाचशे स्वार, (२) शेख मुस्तफा, एक हजार जात व तीनशे स्वार हे मन्सबदार सैन्यात हजर नाहीत. त्यांच्या जहागिरी काढून घेण्यात याव्यात अशी आज्ञा झाली.

**अठरा ऑक्टोबर १७००**

बादशहांनी मुनीमखानाला आज्ञा केली की : तुम्ही छावणीभोवती गस्त घालण्यास जात असावे.

**एकोणीस ऑक्टोबर १७००**

बादशहा बक्षीबहरामदखान याला म्हणाले, 'हमीदुद्दीनखानबहादुर याजबरोबर देण्यासाठी दोन हजार सैनिकांच्या फौजेची तरतूद(तूमार) करा.'

उस्मानखान करावल यास बादशहा म्हणाले, 'सांगोल्याला जाऊन आमच्या राहाण्यास योग्य जागा पाहा. आणि येथून किती व कोणत्या मजला कराव्या लागतील त्याही पाहून या.'

जवाहरमल मेमार(बांधकामाचा मुख्य) याला आज्ञा झाली की : कऱ्हाडची गढी बांधा. त्यासाठी बरोबर दोन हजार रुपये घेऊन जा.

गोध्र्याचा फौजदार मुहंमद मुरादखान याने लिहून पाठविले की : पुष्कळ दिवस झाले आपल्या चरणांचे दर्शन घडले नाही. हुजुरात कामगिरी करण्याची ही वेळ आहे. आज्ञा असेल तर हुजुरात येतो.

बादशहा इनायतुल्लाखानाला म्हणाले, 'त्याला लिहा :– निम्मे पथक घेऊन हुजुरात यावे, या शिवाय एक हजार स्वार नव्याने भरती करून बरोबर घेऊन यावे.'

तबेल्याचा प्रमुख मिर्जाबेग याला आज्ञा झाली की : औरंगाबादेहून हत्तीखाना व इतर बारबरदारी (ओझी वाहणे) ची साधने बोलावून घ्या.

जुल्फिकारखानाच्या सैन्यातील बातम्यावरून समजले की : नेकबहादुरखानाचा भाऊ मीरे मीरान हा येथे तैनात असूनही हजर नाही. त्याची जाहागीर काढून घ्यावी अशी आज्ञा झाली.

आज्ञेप्रमाणे मुहंमद अमीनखान हा कही आणण्यासाठी गेला आहे असे बादशहांना कळविण्यात आले.

## वीस ऑक्टोबर १७००

आपण कुलंब्रीहून पुढे (उत्तरेकडे) कूच केले असे बादशहाजादा आज्म याने लिहून कळविले.

जळगावच्या बातम्यावरून पुढीलप्रमाणे कळले : अमानुल्ला इत्यादि पाच गुर्जबर्दार हे खान फीरोजजंग याच्या नावे बादशाही फर्मान आणीत होते. ते जळगावजवळ आले तसे चोरांनी (मराठ्यांनी) त्यांना लुटले व फर्मान पळविले. येथील सुभ्याची व फौजदारीची व्यवस्था अत्यंत निकृष्ट आहे. बादशहांनी मन्सबी कमी केल्या. फर्मानची एक प्रत अल्लायारबेग गुर्जबर्दार याजकडे देऊन त्याने ते खान फीरोजजंग याजकडे पोहोचवावे अशी आज्ञा करण्यात आली. औरंगाबादेचा सुभेदार नजाबतखान याला अडीच हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. ती शंभर स्वारांनी कमी करण्यात आली. जळगावचा फौजदार हिंमतखान याला सातशे जात व तीनशे स्वार अशी मन्सब होती. ती दोनशे (जात) नी कमी करण्यात आली.

मरहूम शायिस्ताखान याचा मुलगा अबू नस्रखान याने हुजुरात यावे असा हुकुम देण्यात आला.

शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेतील बातम्यावरून कळले की : सय्यद मीरान, चार हजार जात व चार हजार स्वार ही मन्सब असलेला व अब्दुल्अजीज, दीड हजार जात व पाचशे स्वार यांचा मन्सबदार, हे फौजेत हजर नाहीत. त्यांच्या जहागिरी काढून घ्याव्या अशी आज्ञा झाली. अब्दुल्रसूल मियाना याला दोन हजार जात व तेराशे स्वार अशी मन्सब होती. तो मरण पावला असे बादशहांना कळविण्यात आले.

जिजियाचा अधिकारी मुहंमद गौस याने विनंती लिहून कळविली की : जिजियाच्या उत्पन्नाचे पन्नास हजार रुपये तळावर (ब्रह्मपुरी) जमले आहेत. आज्ञा झाली की : बादशहाच्या छावणीच्या बाजाराचा अधिकारी इमामुद्दीन याजबरोबर ती रक्कम हुजुरात पाठवून द्यावी.

सांगोल्याचा किल्लेदार अल्लाहकुली याला निरोप देण्यात आला. सत्रसाल राठोड याची मुले हतींसिंग व कर्णसिंग यांच्या मन्सबीत वाढ करण्यात आली.

**एकवीस ऑक्टोबर १७००**

काश्मीरचा बदललेला सुभेदार फाजिलखान याला हुजुरात येण्याविषयी लिहिण्यात आले. गाजिउद्दीनखान बहादुर याच्याकडे फर्मानाची (पूर्वीची गहाळ झाल्यामुळे) एक प्रत बादशहाच्या खास सहीने पाठविण्यात आली. गाजिउद्दीनने हुजुरात यावे अशी आज्ञा फर्मानात होती. औरंगाबादेचा सुभेदार नजाबतखान यालाही बहरामंदखानाने हस्बुल् हुकुम (बादशहाच्या आज्ञेने) याच अर्थाचा पाठविला.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : चोर(मराठे) हे डफळापूर(जत तालुका) भागात पसरले आहेत. बादशहांनी डफळापूरचा ठाणेदार अमानुल्लाखान याच्या मदतीस मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याला पाठविले. त्याच्या बरोबरच्या सैनिकांना एक महिन्याचा पगार (अगाऊ) देण्यात यावा अशी आज्ञा झाली.

मुनीमखानाने विनंती केली की : आज्ञेप्रमाणे मी दोन तीन दिवस लष्कराभोवती गस्त घातली. पण चोर(मराठे) या भागात दिसले नाहीत. बादशहा म्हणाले, 'गस्त घालणे थांबवा आणि मुजऱ्यासाठी येत चला.'

मतलबखानाने बादशहांना एक चश्मा(उपनेत्र) नजर(भेट) म्हणून दिला.

**बावीस ऑक्टोबर १७००**

सय्यद इमामुद्दीन हा रसद व बादशहाजादा कामबक्ष याचा खाशाचा पोशाख व जवाहरखाना घेऊन ब्रह्मपुरीहून आला. तो बादशहांना भेटला.

बादशहांनी अबूनस्रखान(शायिस्ताखानाचा मुलगा) याला लिहिले की : इच्छा असल्यास तुमची तैनाती शहाजादा मुइजद्दीन याजपाशी मुल्तान सुभ्यात करण्यात येईल. नाही तर हुजुरात यावे.

**तेवीस ऑक्टोबर १७००**

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याने तातडीने इस्लामगड उर्फ देवगड या स्थळाला जावे अशी आज्ञा पाठविण्यात आली. या कामासाठी एक गुर्जबर्दार सजावली(अंमलबजावणीचा अधिकारी) मुद्दाम पाठविण्यात यावा असा हुकुम झाला.

माळव्यात शेरअफगनखान याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा अली कुली याने शहाबादचा किल्ला सोडून दिला होता. तो आपण शहामण ढंढेरा याजकडून जिंकून घेतला असे ग्वाल्हेरचा फौजदार जाननिसारखान याने लिहून कळविले. त्याने सोन्याची किल्ली पाठविली.

बादशहाच्या आज्ञेने रूहुल्लाखान हा नवाब जीनतुन्निसा बेगम यांच्या देवडीवर गेला. त्याने मुजरा केला आणि नऊ मोहरांची नजर दिली. बेगमजू(जीनतुन्निसा) यांनी पानाचा विडा त्याला दिला. (समोरासमोर भेटीची पद्धत नसे. विडा बाहेर उभ्या असलेल्या रूहुल्लाखानाकडे पाठविला असे समजावे.)

**चोवीस ऑक्टोबर १७००**

अरसलानखान याचा पुतण्या रुस्तम बेग हा मध्य आशियातून(विलायत)नुकताच

आला होता. त्याने नऊ घोडे, तीन धनुष्ये व एक ग्रंथ या वस्तू बादशहांना दिल्या. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

मरहूम अब्दुलरसूलखान (सावनूरकडील पठाण सरदार) याची मुले अबूमुहमद, अब्दुलकादर, अब्दुल्जब्बार, अब्दुलवहाब, अब्दुल्करीम यांना व मरहूमचा पुतण्या मियानाखान यांना मन्सबी व खिलतीची वस्त्रे ही देण्यात आली.

### पंचवीस ऑक्टोबर १७००

हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली : चोर (मराठे) बादशाही छावणीपासून दोन तीन कोसावर आले. त्यांनी बंजाऱ्यांचे बैल लुटून नेले. त्या दिवशीचे टेहेळणीचे काम यलबारसखान याजकडे होते. तो आणि सादतखान हे शिकारीसाठी गेले होते. त्यांना बातमी कळताच ते मराठ्यांच्या पाठलागावर गेले आहेत.

बादशहांनी आज्ञा केली की : राव मानसिंग (जाधव) व बहिर्जी (पांढरे) यांनीही गनिमांच्या पारिपत्यासाठी जावे.

संध्याकाळी बादशहांना कळविण्यात आले की : यलबरसखान वगैरे सरदार गनिमांवर (मराठे) चालून गेले. त्यांनी शत्रूचे पारिपत्य केले. बैल सोडविले, काही शत्रू मारले व एक शत्रू व घोडी यांना धरून आणले.

बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.'

### सव्वीस ऑक्टोबर १७००

आज बीडचा फौजदार औरंगखान व परंड्याचा क़िल्लेदार गैरतखान (इज्जतखान) यांच्या नावाने हस्बुल् हुकुम (आज्ञापत्रे) रवाना झाले.

बहिर्जी पांढरे याला कोल्हापूर(?)ची ठाणेदारी देण्यात आली. त्याला मन्सबीत एक हजार जात व दोनशे स्वार अशी वाढ देण्यात आली.

उदाजी ओबळराव याला मकनोनी(?)ची ठाणेदारी देण्यात आली. त्याला एक हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती.

### सत्तावीस ऑक्टोबर १७००

औरंगखान हा बीडचा फौजदार होता. त्याच्या जागी सय्यद वजीहुद्दीनखान याची नेमणूक करण्यात आली. त्याला एक हजार जात व तीनशे स्वार अशी मन्सब होती. तीत चारशे स्वारांची वाढ करण्यात आली.

वऱ्हाड सुभ्याच्या दिवाणीवर मुहंमद नसीर हा होता. त्याच्या जागी मरहूम अमानतखान याचा मुलगा सय्यद अहमद याला नेमण्यात आले.

सदर (न्यायाधीश) मुहंमद अमीनखान याच्या तैनातीतील पथके रूहुल्लाखानाकडे द्यावी आणि यापुढे काही (रसद, गवत, लाकूडफाटा इत्यादी) आणण्यासाठी मुहंमद अमीनखानाने न जाता रूहुल्लाखानाने जावे अशी आज्ञा देण्यात आली.

### अठ्ठावीस ऑक्टोबर १७००

बादशहांनी गुजरातेतील सर्व प्रमुख अधिकाऱ्यांच्या मन्सबी कमी केल्या.

(मागितल्याप्रमाणे पथके दक्षिणेत न पाठविल्याबद्दल.)

**एकोणतीस ऑक्टोबर १७००**

चोरांचे(मराठ्यांचे) सैन्य भूषणगड व मायनी याच्या दरम्यान पसरले आहे अशी बातमी आली. बादशहांनी आज्ञा केली की : रूहुल्लाखान याजबरोबर नऊ हजार स्वार, पाचशे पायदळ व शंभर बर्कंदाज(बंदुकची) देण्यात आले. गनिमांच्या पारिपत्यासाठी त्याला पाठविण्यात आले. रूहुल्लाखान हा माणनदीच्या काठावर पोहोचला. त्याने कळविले की : चोर(मराठे) पळून गेले आहेत. बादशहांनी रूहुल्लाखानाला बोलावून घेतले.

तरबियतखान आजारी होता. तो बरा होऊन बादशहाला भेटला.

**तीस ऑक्टोबर १७००**

कंधार(नांदेड जिल्हा, मराठवाडा)चा किल्लेदार व फौजदार शम्सुद्दीन मुहंमदखान हा येऊन बादशहांना भेटला. त्याने व त्याचा पुतण्या नसुल्लाखान याने प्रत्येकी नऊ मोहरा नजर म्हणून दिल्या.

मसूरचा ठाणेदार मयाजी(मंबाजी) हा मरण पावला. त्याला दोन हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. त्याचा पुतण्या किशनराव(कृष्णराव) याला सुतकातून काढून आणण्यासाठी बादशहाने राव मानसिंग(जाधव) याला पाठविले.

अवधचा सुभेदार जबरदस्तखान याने विनंती लिहून पाठविली की: पाचशे स्वार नव्याने भरती करून घेऊन तुम्ही हुजुरात यावे आणि तेथे नायब ठेवावा, असा हुकुम झाला आहे. मी तिकडे आलो तर इकडे बंडाळी होण्याची शक्यता आहे. तर मला तिकडे येण्याची माफी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

यलंगतोशखानबहादुर(बादशहाचा दासीपुत्र?) याला शहाजहानाबाद दिल्ली येथे पोहोचवावे अशी आज्ञा झाली.

भगवंतराय नारोराघो ठाणेदार सांगोला(?) याने विनंती लिहून पाठविली की : बरेच दिवस झाले. स्वामीचे चरण पाहिले नाही. आज्ञा झाली तर येतो. परवानगी देण्यात आली. भगवंतराव यास दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती.

शहाजादा बेदारबख्त याच्याकडील बातम्यांवरून कळले की : शहाजादा हा पन्हाळगड जिंकण्यासाठी किल्ल्यापाशी पोहोचला आहे. किल्ल्याचा परिसर पाहून तो मोर्चे बांधून वेढा घालण्याच्या विचारात आहे. किल्ल्यावरील माणसे तोफांचा मारा करीत आहेत.

* * *

# १ नोव्हेंबर ते ३१ डिसेंबर १७००

### एक नोव्हेंबर १७००

बादशहांनी मुख्यप्रधान जुम्दतुल्मुल्क असदखान याच्या नावे खास फर्मान व खिलतीची खास वस्त्रे पाठविली. तळावर (ब्रम्हपुरी) नेण्यासाठी त्या वस्तू हकीम मुहंमद सईदखान याच्या हवाली करण्यात आल्या.

### दोन नोव्हेंबर १७००

यलंगतोशखान यास एक अरबी व एक साधा घोडा (प्रवासासाठी) हे देण्यात आले.

### चार नोव्हेंबर १७००

खटावचा ठाणदार किशनराव (कृष्णराव) याला दीड हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. त्याला अनुकूल असा मन्सबीत बदल करण्यात आला.

रणबाजखान याची पन्हाळगडाचा फौजदार म्हणून नेमणूक करण्यात आली. त्याला सातशे जात व साडेचारशे स्वार अशी मन्सब होती. शंभर (जात) अशी त्याला वाढ देण्यात आली.

### सात नोव्हेंबर १७००

बादशहांनी आज्ञा केली की : कंधार (नांदेड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार व फौजदार शम्सुनद्दीखान याने बादशहाच्या हुजुरात राहावे आणि त्याच्या मुलाने बापाचा नायब म्हणून कंधारचा कारभार करावा.

बादशहांनी आपला मुलगा मुअज्जम (काबुलचा सुभेदार) याच्याकडे पुढीलप्रमाणे गुलाबाचे अत्तर पाठविले :– मुअज्जमला पन्नास तोळे, मुअज्जमचा मुलगा रफीउल्कदर याला पंधरा तोळे, मुअज्जमची मुलगी दहर अफरोजबानू बेगम हिला पंधरा तोळे.

सुभे बंगाल मधील खालसा इलाख्याच्या वसुलात अफरातफर झाली होती. चौकशी करावी व रक्कम वसूल करून आणि खंडणीदाखल तेथून हत्ती येणार होते ते अद्याप आले नव्हते ते आणावे. यासाठी वालीबेग गुर्जबर्दार याला पाठविण्यात आले.

**आठ नोव्हेंबर १७००**

कचेऱ्या बंद होत्या.

**नऊ नोव्हेंबर १७००**

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले ते असे : जुल्फिकारखानबहादुर नुस्रतजंग हा आपल्या सैन्यासहित पन्हाळगडाहून त्वरेने निघाला. त्याने खेळणा (विशाळगडचा) प्रदेश लुटला. यानंतर तो परत पन्हाळगडाच्या परिसरात आला.

(जोधपूरचा)अजितसिंग राठोड याच्या नावे फर्मान आणि खिलतीची वस्त्रे व गुजरातचा सुभेदार शुजाअतखान याच्या नावे हस्बुल्हुकुम(आज्ञापत्रे) गुर्जबर्दारांच्या हस्ते पाठविण्यात आली. सुभेदाराला हुजूरात घेऊन यावे अशी गुर्जबर्दारांना आज्ञा देण्यात आली.

इस्लामगड उर्फ देवगड येथील जमीनदार राजा नेकनामखान याला हत्यारासहित दिवाणे खास मध्ये हजर राहात जाण्याची परवानगी देण्यात आली.

**दहा नोव्हेंबर १७००**

जुल्फिकारखान यास मुलगा झाली. याबद्दल असदखान(जुल्फिकारखानाचा बाप) याने शंभर मोहरा व एक पाचू या वस्तू नजर केल्या. बादशहांनी पन्नास मोहरा अश्रफ्या ठेवून घेऊन बाकीच्या माफ केल्या.

नेमतखानाने विनंती केली की : मला शहाजहानाबाद दिल्ली येथे तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

सय्यद हसन हा नुकताच मध्य आशियातून आला होता. त्याला पाचशे जात व दहा स्वार अशी मन्सब देण्यात आली.

**अकरा नोव्हेंबर १७००**

अब्दुलगफूर इखलासखान याला औरंगाबादेहून बडतर्फ केले होते. तो येऊन भेटला. त्याची मन्सब, चार हजार जात व दोन हजार स्वार व पदवी(इखलासखान) ही बहाल करण्यात आली.

बादशहांनी पुढीलप्रमाणे आज्ञा केली : मुहंमद अमीन सदर(न्यायाधीश) याने सरंजाम व मोठ्या तोफा तळावरून(ब्रह्मपुरी) आणाव्या. रूहुल्लाखानाजवळची पथके मुहंमद अमीनपाशी तैनात करण्यात यावी. तोफखान्याचा मुशरफ(हिशेबतपासनीस) यानेहि बरोबर राहावे. त्याच्या बरोबर शंभर बर्कंदाज व पन्नास बहेलिये देण्यात यावे. तोफा ओढणारे बैल व तोफा गुलबर्ग्याहून बोलावून घेण्यात आले आहेत, ते हूजुरात आणावे.

**बारा नोव्हेंबर १७००**

काल संध्याकाळी बादशहांनी मुहंमद अमीनखान सदर (न्यायाधीश) याला तळावरून (ब्रम्हपुरी) सरंजाम व तोफा घेऊन येण्यासाठी निरोप दिला. बादशहा बहरामंदखानाला म्हणाले, 'काही आणण्यासाठी म्हणून रूहुल्लाखानाबरोबर जी पथके दिली आहेत ती पण मुहंमद

अमीनखान याजबरोबर देण्यात यावी. एकंदरीत नऊ हजार स्वार मुहंमद अमीनखानाबरोबर असले पाहिजेत. सय्यद वजीहुद्दीनखान याने तळापर्यंत (ब्रम्हपुरी) मुहंमद अमीनखान याची सोबत करावी. नंतर तेथून आपल्या स्थळाकडे (बीड) जावे.'

शेख हिदायतकेश वाकनीस याला बादशहांनी विचारले, 'आमच्या छावणीपासून आजमतारागड (सातारा) किती लांब आहे हे मला कळवा.'

### तेरा नोव्हेंबर १७००

यलंगतोशखानबहादुर अद्याप रवाना झाला नाही असे कळले. त्याला मुहंमद अमीनखान याजकडे पाठविण्यात यावे अशी आज्ञा झाली.

मरहूम अईजखान याचा नातू शमशेरबेग याने मुहंमद अमीनखान याजबरोबर जावे अशी आज्ञा झाली.

### चौदा नोव्हेंबर १७००

खटावचा ठाणेदार किशनराव (कृष्णराव) याला त्याचा भाऊ मंबाजी याच्या मृत्यूबद्दल सांत्वनपर वस्त्रे देऊन खटावकडे जाण्यास निरोप देण्यात आला.

### सोळा नोव्हेंबर १७००

कंधार (नांदेड जिल्हा, मराठवाडा) चा किल्लेदार व फौजदार सय्यद शम्सुद्दीनखान याने दोन ठाण पांढरे कापड, शेला दोन ठाण व पिंजलेला कापूस या वस्तू बादशहांना नजर म्हणून दिल्या.

बादशहांनी दिवाणेखासच्या वाटेने तरबियतखानाला हुजुरात बोलाविले व त्याला सात तोळे अत्तर देऊन म्हटले, 'तयार रहा. मी तुम्हाला शहाजादा बेदारबख्त याच्या फौजेत पाठवीत आहे.'

जयसिंग (सवाई जयसिंग) याला हुजुरात येण्यासाठी निकडीचे फर्मान गुर्जबर्दाराच्या हस्ते पाठविण्यात आले. अजितसिंग राठोड (जोधपूर) याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली होती :– चार स्वार घेऊन मी हुजुरात येण्यासाठी तयार आहे. पण माझ्या सहकाऱ्यांना तनखा जहागीर मिळावी, किंवा मला रक्कम देण्यात यावी.

बादशहांनी आज्ञा केली की : तुम्ही हुजुरात याल तेव्हा तनखा जहागिरी देण्यात येतील. अजमीरच्या खजिन्यातून तीन हजार रुपये अजितसिंगाला द्यावे अशी आज्ञा झाली. त्याला खिलतीची वस्त्रे व फर्मान द्यावे आणि त्याला (अजितसिंगाला) घेऊन यावे अशी गुर्जबर्दाराला आज्ञा देण्यात आली.

इखलासखान मियाना याने विनंती लिहून पाठविली की : मला साहाय्य म्हणून रक्कम देण्यात यावी. दोन हजार रुपये देण्यात यावेत अशी आज्ञा झाली.

दुसरी विनंती अशी की : माझ्यापाशी चारशे स्वार असून ते बादशाही चाकरी बजावण्याची इच्छा धरून आहेत. आज्ञा झाली की : शंभर स्वार ठेवावेत.

बेदारबख्ताच्या फौजेतून पुढील बातमी कळली :– मरहूम खानजमान फतेहजंग

(संभाजी राजांना धरणारा मूकर्‍रबखान) याचा मुलगा इख्तिसासखान हा आपला भाऊ शेख अब्दुल्लतीफ याच्या घरी गेला. दोघा भावात बोलाचाली झाली. इख्तिसासखान याने खंजीर काढला. भावावर वार करण्याचा त्याचा बेत होता. तोच कोणीतरी मधे पडून त्याच्या हातातून खंजीर हिसकावून घेतला. त्या माणसाला जखम झाली. यानंतर इख्तिसासखानाने तल्वारीने एक घोडा जखमी केला.

इख्तिसासखान यास चार हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब होती. ही बातमी ऐकून बादशहांनी एक हजार स्वारांनी त्याची मन्सब कमी केली.

**सतरा नोव्हेंबर १७००**

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याने अंजनवेल जिंकून घेतले. त्याने सोन्याची किल्ली पाठविली. आपल्या अर्जात त्याने लिहिले की : मी खुश्कीच्या मार्गाने गेलो आणि किल्ल्याला वेढा घातला. नरकवासी रामाचा (राजाराम) पेशकार (कारभारी) रामचंद्र (रामचंद्रपंत अमात्य) याने एक हजार स्वार व सहा हजार पायदळ किल्ल्याच्या कुमकेसाठी पाठविले. मी त्याचे पारिपत्य करून किल्ल्या जिंकून घेतला. बादशहा म्हणाले, 'सेवा मान्य झाली.' सिद्दी याकूतखान याला तीन हजार पाचशे जात व तेराशे स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे स्वारांची वाढ करण्यात आली. त्याला खिलतीची वस्त्रे व फर्मान पाठवावे अशी आज्ञा झाली.

बादशहांना कळविण्यात आले की : तळापासून (ब्रम्हपुरी) वीस कोसावर टेंभुर्णी (?) येथे धनाजी जाधव याने तळ दिला असून तो चौथाई वसूल करीत आहे. ब्रम्हपुरीच्या आसपासच्या ठाणेदारांना त्याचे पारिपत्य करणे जमत नाही. धनाजीचे पारिपत्य करावे म्हणून मुहंमद अमीनखान याला लिहावे अशी आज्ञा झाली.

जफरेखानाच्या ऐवजी ख्वाजा खानाजाद यास दहीवाडा (दहीवडी) व मालिया (माला?) येथील ठाणेदारीवर नेमण्यात आले.

सुभे हैद्राबादचा दिवाण व एलगंदलचा फौजदार कारतलबखान याला सुभे बंगालच्या दिवाणीवर नेमण्यात आले.

**अठरा नोव्हेंबर १७००**

आज बादशहा मेण्यात बसून दिवाणेखास मध्ये आले. तळावरचा (ब्रह्मपुरी) सरंजाम मौजे आंगोली (?) येथे येऊन पोहोचला असे समजले.

शहाजादा बेदारबख्ताच्या सैन्यात दुय्यमबक्षी म्हणून तोफखान्याचा दारोगा मन्सूर खान याची नेकनामखानाच्या ऐवजी नेमणूक करण्यात आली.

**वीस नोव्हेंबर १७००**

दिवाण व बक्षी यांच्या कचेरीतील सेवकांना शामियान्यात बसवून त्यांना कामकाज करण्यास लावावे अशी आज्ञा झाली.

**एकवीस नोव्हेंबर १७००**

तरबियतखान याला आज्ञा झाली की : तयार व्हा. पन्हाळगड घेण्यासाठी तुम्हाला

पाठवीत आहे. त्याच्याबरोबर दोन हजार स्वार देण्यात यावेत अशी बक्षीउल्मुल्क बहरामंदखान याला आज्ञा करण्यात आली. तरबियतखानापाशी तैनात असलेल्या मोगल शिपायांना थकलेली पगारबाकी देण्यात यावी अशी आज्ञा झाली.

हत्तीखाना वगैरे संरजाम तळावर(ब्रह्मपुरी) पोहोचला असे कळले.

### बावीस नोव्हेंबर १७००

आज शुक्रवार. दोन्ही दिवाण(कचेऱ्या) बंद होत्या.

### तेवीस नोव्हेंबर १७००

बक्षीउल्मुल्क बहरामंदखान, रूहुल्लाखान व मुखलिसखान यांनी कचेरीतच (दीवाणखाना) बसून काम करावे अशी आज्ञा झाली. यासाठी त्यांच्या मागे लागावे म्हणून मुहंमद आरिफ कौल अबुल्खैर कौल व काममुराद कौल यांना बजावण्यात आले.

मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम हा डफळापुराहून येऊन भेटला. तरबियतखानाच्या कुटुंबियांना तळावर(ब्रह्मपुरी) पोहोचवून या असे त्याला सांगण्यात आले.

जयसिंग खोसला(?) हा बेदारबख्ताच्या फौजेत तैनात होता. तो वारला अशी बातमी आली.

### चोवीस नोव्हेंबर १७००

हैद्राबाद कर्नाटकच्या बातम्यावरून कळले की : नुस्रतजंग जुल्फिकारखान याच्या फौजेत तैनात असलेला मारूफखान हा आजाराने मरण पावला. त्याला चार हजार जात व तीन हजार स्वार अशी मन्सब होती.

### पंचवीस नोव्हेंबर १७००

तरबियतखान याने विनंती केली की : पन्हाळगडाकडे जाण्यासाठी आज्ञा झाली आहे. सगळा सरंजाम तयार होईपर्यंत मला येथेच राहाण्याची परवानगी असावी. विनंती मान्य करण्यात आली.

आज्ञेप्रमाणे मुहंमद अमीनखान हा परंड्याहून हत्तीखाना व उंटखाना इत्यादी सरंजाम घेऊन आला. तो बादशहांना भेटला. त्याच्या पुढील सहकाऱ्यांना बक्षिसे देण्यात आली :– राजा अवधूतसिंग, ओछर्याचा(राजा), मुहंमद इसहाक, मीर मुहसिन बक्षी व वाकेनवीस, मिर्जागुल, मीर हुसेन तनबक्षी, ख्वाजाबाबा, मुहंमद अमीन, शमशेरबेग.

### सव्वीस नोव्हेंबर १७००

मतलबखान याने अर्ज केला की : आपल्या आज्ञेप्रमाणे बादशाही छावणीतील बाजाराचा करोडी(व्यवस्थापक) सय्यद इमामुद्दीन याच्याकडून रोजचे बाजारभाव सादर करण्याचा मुचलका घेतला आहे. तो हिदायतकेश याजकडे द्यावा अशी आज्ञा झाली.

सुभे विजापुरचा बक्षी व वाकेनवीस अमानुल्ला याने पुढील बातमी पाठविली :– एक विजापूर हवेली तालुका सोडला तर बेडरांनी तमाम सुभ्यात आपली ठाणी बसविली असून ते चौथाई वसूल करीत आहेत. चोर(मराठे) हे शहापूरच्या तलावाभोवती घिरट्या घालून जात आहेत.

विजापूरच्या सुभेदाराला ताकिदीचे पत्र लिहावे अशी आज्ञा झाली.

विजापूर सुभ्यातून एक हजार बाण मुर्तजाबाद मिरज येथे पोहोचविण्यात यावे अशी आज्ञा झाली. यासाठी ख्वाजा आलम गुर्जबर्दार याला नेमण्यात आले.

सोलापूरच्या किल्ल्यांतून पाचशे मण सरब ( बंदुकीच्या दारू साठी लागणारी काळी माती), व चारशे मण दारू(बंदुकीची) आणून घेण्यात यावी अशी अज्ञा झाली. यासाठी मुहंमद माह गुर्जबर्दार याला नेमण्यात आले.

बेदारबख्ताच्या छावणीतील बातम्यांवरून कळले की : छावणीत पुढील माणसे हजर नाहीत :- नेकनियतखानाच्या पथकापैकी (१) मीर मीरान, चार हजार जात व दोन हजार स्वार अशी मन्सब; (२) सय्यद मुहंमद, एक हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब; (३) नागोजी, तीन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब; (४) रावजी, दोन हजार जात व पाचशे स्वार अशी मन्सब; (५) मुकुंदराव पाचशे जात व दोनशे स्वार; (६) रामांजी (रामाजी? ),पाचशे जात व शंभर स्वार; (७) नूरुल्ला चारशे जात व पन्नास स्वार. यांची फरारी म्हणून नोंद करावी अशी आज्ञा झाली.

**सत्तावीस नोव्हेंबर १७००**

बादशहांनी रूहुल्लाखान यास आज्ञा केली की : नवाब जीनतुन्निसा बेगम या पाच रजब गुरूवारी (पाच डिसेंबर) तळाकडे (ब्रम्हपुरी) रवाना होतील. त्यासाठी जी व्यवस्था हवी ती करा.

हैद्राबादी कौलार(पथके प्याद्यांची) चा मुशरफ(अधिकारी) गुलाम मुहंमद याने आजमतारागड (सातारा) किल्ल्यावरून तोफा वगैरे सरंजाम आणावा अशी आज्ञा झाली. त्याच्याबरोबर मरहूम खानजहान याच्या पथकातील माणसे, बर्कंदाज व सातशे पायदळ शिपाई देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

औरंगाबादेत जो काही उंटखाना राहिला असेल तो मागवून घ्यावा. त्यासाठी गुर्जबर्दार पाठवावा अशी आज्ञा झाली.

तरबियतखानाच्या कुटुंबियांना तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचविण्यासाठी मुनीमखानाचा मुलगा मुहंमद काजम याला निरोप देण्यात आला.

पवनार (वर्धा जिल्हा) येथील बातम्यांवरून पुढील हकीकत कळली : येथील फौजदार व तहसीलदार बिंद्राबन याने चांद्याचा जमीनदार बीरसिंग याजकडून येण्याची पेशकश (खंडणी) घेतली. पण खजिन्यात जमा केली नाही. बिंद्राबन याला कामावरून काढण्यात आले व अलीमर्दानखान (पाच हजार जात व पाच हजार जात व पाच हजार स्वार अशी? मन्सब व वऱ्हाडचा सुभेदार) याला चांदा व देवगडच्या तहसीलदारीचे (खंडणी घेण्याचे) काम पण सोपविण्यात आले.

**अठ्ठावीस नोव्हेंबर १७००**

चांद्याचा राजा बीरसिंग याला हुजुरात आणावे म्हणून एक गुर्जबर्दार नेमण्यात आला.

सातारगडावरून तोफा वगैरे सामान आणण्यासाठी यलबरशखान, सिद्दी बहिलाल

यांच्याबरोबर एक हजार नऊशे स्वार देऊन त्यांना पाठवावे अशी आज्ञा झाली.

### एकोणतीस नोव्हेंबर १७००

बादशहा पायाच्या दुखण्यातून बरे झाले. त्यांनी आंघोळ केली. बादशहाजादा कामबक्ष व हमीदुद्दीनखान यांनी नजरा दिल्या. त्या माफ करण्यात आल्या.

आज्ञेप्रमाणे गाजिउद्दीनखानबहादुर हा आपल्या सैन्यासहित आमनेरहून आठ जमादिसानी (नऊ नोव्हेंबर) रोजी रवाना झाला अशी बातमी आली.

मुहतशमखान याचा मुलगा मुहंमदजान याला मुलगा झाला. बादशहांनी त्याचे नांव मुहंमद सज्जद ठेवले.

श्रीपती(?) हा फरार म्हणून त्याची मन्सब काढून घेण्यात आली होती. एक हजार जात व नऊशे स्वार अशी त्याची मन्सब पुन्हा बहाल करण्यात आली.

### एक डिसेंबर १७००

हत्तीखान्याचा दारोगा हमीदुद्दीनखानबहादुर याने बादशहापसंद नावाचा हत्ती बादशहा समोर वाजत गाजत आणला. बादशहांना दोन पोती गूळ देऊन हत्तीसाठी खैरात करा(वा) असे सांगितले. इतर सात हत्ती बदशहांच्या समोर आणण्यात आले.

हकीम हाजकखान याने बादशहाच्या पायाचा इलाज केला होता. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यासाठी वेगळी काढून ठेवावी अशी आज्ञा झाली.

दारूगोळयाचा प्रमुख तरबियतखान हा येऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले, 'आज महिन्याची(रजब) पहिली तारीख आहे. दिवस चांगला आहे. आज तुम्ही निघा.' तरबियतखानाला अडीच हजार जात व चवदाशे स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे जात व शंभर स्वार अशी वाढ करण्यात आली. त्याला सात हजार रुपये किंमतीचा हत्ती बक्षीस म्हणून देण्यात आला. बादशहा सुरक्षिततेचा फातेहा पढले आणि तरबियतखानाला सैन्य घेऊन पन्हाळगडाकडे जाण्यासाठी निरोप दिला. त्याचा मुलगा मुहंमद इसहाक याला खिलतीची वस्त्रे देण्यात येऊन बापाबरोबर जाण्यासाठी निरोप देण्यात आला. त्याला दोनशे जात व वीस स्वार अशी मन्सब आहे.

### दोन डिसेंबर १७००

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दीयाकूतखान याला साडेतीन हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब होती. चांगल्या कामगिरीबद्दल त्याच्या मन्सबीत तीनशे स्वारांची वाढ करण्यात आली.

तरबियतखान हा बादशहाच्या परवानगीने नवाब जीनतुन्निसा बेगम यांच्या देवडी-वर गेला. त्यांनी त्याला खिलतीची वस्त्रे व पानाचा विडा पाठवून निरोप दिला.

मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार खुदाबंदाखान याने विनंती लिहून पाठविली की: साहाय्य म्हणून मला एक हत्ती देण्यात यावा. त्याला हत्तीची किंमत म्हणून सात हजार रुपये द्यावे अशी बादशहांनी आज्ञा केली.

**तीन डिसेंबर १७००**

श्रीरंगपट्टणच्या राजाला विजापुरी कर्नाटकचा फौजदार मामूरखान याजपाशी पोहोचविण्यासाठी मुद्दाम गुर्जबर्दार नेमण्यात आला.

अंबरचा राजा जयसिंग याने विनंती लिहून पाठविली की : चांगले सैन्य घेऊन हुजुरात यावे अशी मला आज्ञा झाली आहे. माणसी चाळीस रुपये पगाराची मंजुरी मिळावी. त्याच्या मोबदल्यात चाटसू वगैरे चार महाल तनखा जहागीर म्हणून देण्यात यावेत. नगारे नौबतीचाही मान मिळावा. विनंती मान्य करण्यात आली.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : सरकहाने (फणसे ? ) हा छावणी सोडून निघाला. तो चोरांना (मराठांना) मिळाला. छावणीपासून दोन तीन कोसावर असलेल्या कोसर (?) या गावी येऊन त्याने काही उंट व बैल नेले. दोन माणसांचे त्यांनी कान पण कापले.

**चार डिसेंबर १७००**

वऱ्हाडचा सुभेदार अलीमर्दानखान याला पवनार (वर्धा जिल्हा) च्या फौजदारीचेही काम देण्यात आले. त्याबद्दल फर्मान पाठविण्यात आले.

तरबियतखानाच्या बरोबर हुसेन कुलीखान व हबीबुल्ला यांना तैनात करण्यात येऊन निरोप देण्यात आला.

इस्माईलखान मका याचा भाऊ वारला. त्याच्या सांत्वनपर वस्त्रे इस्माईलखानाला देण्यात आली.

नवाब जीनतुन्निसा बेगम या तळाकडे (ब्रम्हपुरी) चालल्या आहेत. ज्यांनी ज्यांनी आपली बायका माणसे आणली आहेत त्यांनी त्यांना जीनतुन्निसा बेगमच्या स्वारीबरोबर तळाकडे पाठवावे अशी लष्करात दवंडी देण्याची आज्ञा झाली.

कबचाकखान हा तरबियतखानाच्या फौजेत तैनात होता. त्याने विनंती केली की : माझा मुलगा ख्वाजमकुली हा माझ्या कुटुंबियांना आणण्यासाठी विलायत (स्वदेश, मध्य-आशिया) ला गेला आहे. खर्चाची अडचण झाल्यामुळे त्याला येणे शक्य होत नाही. खर्चासाठी लाहोर किंवा काबुल येथील खजिन्यातून दहा हजार रुपये देण्याची व्यवस्था व्हावी. बादशहांनी आज्ञा केली की, 'लाहोरच्या खजिन्यातून त्याला पाच हजार रुपये देण्यात यावे.'

**पाच डिसेंबर १७००**

बादशहा हिदायतकेश वाकेनवीस याला म्हणाले, 'आपल्या छावणी पासून मुर्तजाबाद (मिरज) पर्यंत कोणकोणत्या मजला राहतील हे लिहून आणा. आम्ही येथून या महिन्याच्या (रजब) बारा तारखेस कूच करणार आहोत.'

आज सकाळी बादशहांनी जीनतुन्निसा बेगम यांना निरोप दिला. आज्ञा झाली की, 'सुल्तान बलंदअख्तर (बादशहाचा नातू व अकबरचा मुलगा) याने चौकीपर्यंत व हमीदुद्दीनखानबहादुर याने चार हजार सैन्यासहित तळापर्यंत (ब्रम्हपुरी) जीनतुन्निसा बेगमच्या बरोबर असावे.

अबुलकासिम याला गढबेतली (बेताळगड, अजंठ्याजवळ?) चा किल्लेदार म्हणून नेमण्यात येऊन त्याला निरोप देण्यात आला.

बेदारबख्ताच्या सैनिकांना पगारबाकी म्हणून एक हजार अश्रफ्या तरबियतखानाच्या हवाली करण्यात आल्या.

ख्वाजा महमूद, ख्वाजा मुहंमद काइम व ख्वाजा यूसुफ ही सफशिकनखानाची मुले औरंगाबादेहून येऊन बादशहांना भेटली.

### सहा डिसेंबर १७००

शुक्रवार. दोन्ही दीवाणांचे (कचेऱ्या) कामकाज बंद होते.

### सात डिसेंबर १७००

येथून पहिली मजल मौजे (माजरा) नाझरे येथे राहील. छावणीपासून ते गाव सव्वा-दोन कोस आहे असे मतलबखान व उस्मानखान करावल यांनी कळविले. बादशहा म्हणाले, 'हमीदुद्दीनखानबहादुर हा तळावरून (ब्रह्मपुरी) आला की कळवा. (निघण्याचे ठरविता येईल).

### आठ डिसेंबर १७००

असदखान (मुख्यप्रधान) याने तळावरून (ब्रह्मपुरी) विनंती लिहून पाठविली की : बरेच दिवस झाले. आपल्या पायाचे दर्शन घडले नाही. परवानगी असल्यास हुजुरात येईन. एक दिवसाठी येऊन जावे अशी आज्ञा झाली. बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'तयार रहा. तळाची (ब्रम्हपुरी) एक दिवसासाठी देखरेख करण्यासाठी तुम्हाला पाठवीत आहे.' मतलब-खानाबरोबर देण्यासाठी सहाशे सत्तर स्वारांचे पथक तयार करण्यात यावे अशी बहरामंदखानाला आज्ञा देण्यात आली.

बादशहा बहरामंदखानाला म्हणाले, आमच्याबरोबर कूच करण्यासाठी सैन्य किती राहील व त्याची रचना कशी राहील याचा आराखडा तयार करून आणा. कूच करताना पुढीलप्रमाणे व्यवस्था असावी :–

हरावल (आघाडी) — बादशहाजादा कामबक्ष,
उजवी फळी — बहरामंदखान,
डावी फळी — रूहुल्लाखान व मुखलिसखान,
चंदावल (पिछाडी) — हमीदुद्दीनखानबहादुर.

पगारबाकी चुकती करण्यासाठी म्हणून तरबियतखानाच्या फौजेत तैनात असलेले रजवीखान वगैरेंना पाच हजार अश्रफ्या द्याव्या अशी आज्ञा झाली.

उदाजी ओबलराव (आवजी ओढलराव?) याला दीड हजार जात व आठशे स्वार अशी मन्सब आहे. त्याला तरबियतखानाच्या फौजेत तैनात करण्यात आले.

औशाचा (उस्मानाबाद जिल्हा, मराठवाडा) किल्लेदार मुईनखान याने विनंती लिहून पाठविली की : चारशे चोरांचे (मराठ्यांचे) पायदळ या भागात पसरले आहे. आज्ञा झाली तर किल्ल्यातून बाहेर पडून त्यांचे पारिपात्य करीन. विनंती मान्य करण्यात आली.

**नऊ डिसेंबर १७००**

हमीदुद्दीखानबहादुर हा जीनतुन्निसा बेगम यांना तळावर (ब्रम्हपुरी) पोहोचविण्यासाठी गेला होता. तो परत येऊन बादशहांना भेटला. बादशहा म्हणाले, 'छान, खूप लवकर आलात. बरे झाले.'

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : हमीदुद्दीनखानाबरोबर तैनात असलेला शमशेरबेग हा मागे राहिला होता. दहीवाडीच्या पलीकडे चोरांबरोबर (मराठे) त्याचे युद्ध झाले. शत्रूपैकी नऊ माणसांची डोकी कापण्यात आली. पाच घोड्या हाती लागल्या. बादशहा म्हणाले, 'घोडी व गनिमांची लूट तुमच्याकडेच राहू द्या (तुम्हाला माफ).' शमशेरबेग व त्याचे सहकारी यांना दोनशे रुपये बक्षीस म्हणून देण्यात आले.

असदखानाचे येणे स्थगित करण्यात आले. सिकंदरखान विजापुरी (विजापूरचा शेवटचा बादशहा) मरहूम याच्या मुलांचे सहकारी बलंदअख्तर व मुहंमद गुल आणि राजा शाहू यांच्या बरोबर महूमर शुक्रुल्लाखान यांचा मुलगा इनायतुल्ला यांनीही हुजुरात येत असावे अशी परवानगी देण्यात आली.

**दहा डिसेंबर १७००**

यारअलीबेग गुर्जबर्दार याने कळविले की : चोर (मराठे) लष्कराच्या चौकीच्या बाजूने येतात. प्रवाशांना लुबाडतात व गुरेढोरे पळवून नेतात. जशी आज्ञा. बादशहांनी महंमद अमीनखानाला न्यायकचेरीतून त्यांच्या पारिपत्यासाठी रवाना केले.

रूहुल्लाखान याने विनंती केली की : भाड्याचे उंट अद्याप आले नाहीत. जशी आज्ञा. बादशहा म्हणाले, 'गुरुवारी निघण्याचे स्थगित. सोमवारी निघू. (सोळा तारखेस)'.

यारअलीबेग याने विनंती की : मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार खुदाबंदाखान (शायिस्ताखानाचा मुलगा) हा सुभ्याची व्यवस्था उत्तम प्रकारे ठेवीत आहे. बादशहा म्हणाले, 'त्याचे मान मरातब (मन्सब वगैरे) काय आहेत कळवा.'

हमीदुद्दीनखानबहादुर याने दलबादल हा हत्ती बादशहांना दाखविण्यासाठी आणला. त्याच्यासाठी बादशहांनी दोन पोती गुळ खैरात करा म्हणून दिला. बादशहांनी शंभर हत्तींचीही पाहणी केली. हत्तीखान्याचा मुशरफ (अधिकारी) याने बादशहांना या प्रसंगी एक कट्यार नजर केली.

**अकरा डिसेंबर १७००**

गनिमांचे (मराठ्यांचे) सैनिक वाटसरूंना लुटीत. त्यांच्या पारिपत्यासाठी बादशहांनी मुहमद अमीनखान सदर यास काल पाठविले होते. रात्री एक प्रहर झाला असता कळले की : मुहंमद अमीनखान याने सहा कोसाची दौड मारली. गनिमांचे पारिपत्य केले. त्यांचे वीस घोडे धरले. तो दीवाणेखास मध्ये आला आहे. बादशहा म्हणाले, 'त्याला आपल्या तंबूकडे जाण्यास सांगा.' त्याच्याकडे फळफळावळे पाठविण्याची आज्ञा झाली.

बादशहांनी मतलबखान करावलबेगी याला निरोप देऊन म्हटले, 'शत्रूची पथके मंगळवेढा भागात पसरली आहेत. तुम्ही तडक मंगळवेढ्याला जा. तळाची (ब्रह्मपुरी)

बातमी काढा, शत्रूचे पारिपत्य करा आणि परत या.' यासाठी एक हजार सहाशे साठ स्वारांचे सैन्य तयार करून मतलबखानाबरोबर द्यावे अशी बहरामंदखानाला आज्ञा देण्यात आली. याशिवाय सहाशे पायदळ, पाच रेहकले(लहान तोफा) व दहा शुतरनाळ(उंटावरून चालविण्याच्या हलक्या तोफा) मतलबखानाला द्याव्या अशी आज्ञा झाली.

डफळापूरचा ठाणेदार अमानुल्लाखान याने गनिमांना लुटून चाळीस बैल धरले. ते पाठविले आहेत. सरकारात(बयूतात) दाखल करावे अशी आज्ञा झाली.

### बारा डिसेंबर १७००

विजापूरचा सुभदार लुत्फुल्लाखान याने विनंती लिहून पाठविली की : (१) शेख शहाब याला हरका(?)ची ठाणेदारी देण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली व शहाबची मन्सब वाढविण्यात आली; (२) बेंदारबख्ताच्या फौजेत शम्सुद्दीन हा तैनात आहे. त्याला माझ्यापाशी तैनात करून बिद्री वगैरे पाच महाल या ठाण्यावर त्याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

मुहंमदाबाद बीदरचा सुभेदार याजकडे कारतलबखानाच्या बदलीमुळे रामगीर (करीमनगर जिल्हा, आंध्रप्रदेश)ची फौजदारी पण देण्यात आली. त्याला दोन हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब होती. तीत पाचशे स्वारांची वाढ करण्यात आली.

मतलबखानाने विनंती केली की : मला तळाकडे (ब्रह्मपुरी) टेहेळणीसाठी जाण्याची आज्ञा झाली आहे. पण माझ्याजवळ पथक फार थोडे आहे. राजा अवधूतसिंग(ओछर्याचा राजा) याला माझ्यापाशी तैनात करण्यात यावे. विनंती मान्य करण्यात आली.

बादशहांना कळविण्यात आले की : सुभे विजापूरचा कानूनगो(देशपांडे) जिऊद्दा याने बंडखोर जमीनदाराकडून दहा हजार होन घेतले. इकडच्या बातम्या तो त्यांना देत असतो. त्याला हुजुरात घेऊन यावे अशी आज्ञा झाली. काळसे(फणसे याचा नातू?) बादशाही छावणी सोडून मराठ्यांना मिळाला होता. त्याचा जामीन कोण याची चौकशी करावी अशी आज्ञा झाली.

### तेरा डिसेंबर १७००

शुक्रवार. दीवाण(कचेऱ्या)चे काम बंद होते.

### चौदा डिसेंबर १७००

दहीवाडया(दहीवडी)चा ख्वाजा सनाउल्ला हा येऊन बादशहांना भेटला. साताऱ्याचा दिवंगत किल्लेदार सुभानजी याचा मुलगा नानाजी(तानाजी? बाबाजी?) हा बादशहांना भेटला. त्याने नऊ मोहरा नजर दिल्या.

अबू तालिब हा विलायतेहून(मध्य अशिया) आला होता. त्याला खिलतीची वस्त्रे देण्यात आली.

लखुमाजी चौहाण याला एक हजारी मन्सब, खिलतीची वस्त्र, घोडा व एक हजार रुपये देऊन तरबियतखानाच्या सैन्यात तैनात करण्यात आले.

शर्फुद्दीनने विचारले, 'पेशखाना (पुढे पाठविण्याचे तंबू) उद्या पाठविण्यासंबंधी जशी आज्ञा.' बादशहा म्हणाले, 'पाठवा.' मुहंमद अमीनखान, सियादतखान, सद्रुद्दीन मुहंमदखान, मल्हारी वगैरेंनी पेशखान्याबरोबर जावे. मल्हारी वगैरेंना तेथे सोडून स्वत: मार्गावर राहून खबरदारी बाळगावी. रूहुल्लाखान याने लष्करापासून एक कोसावर संध्याकाळ पर्यंत राहावे.'

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : नरकवासी संता (संताजी घोरपडे) याचा मुलगा राणोजी याने बागेवाडी (विजापूर जिल्हा) च्या ठाण्याला वेढा दिला. तेथील ठाणेदार मुहंमद नसीर हा ठाण्यातून बाहेर पडून लढू लागला. शेवटी चोरांनी (मराठ्यांनी) ठाणेदाराला ठार मारले व ठाणे लुटून इंडी (विजापूर जिल्हा) कडे गेले.

## पंधरा डिसेंबर १७००

बादशहांनी मुखलिसखानाला बोलावले. तो आजारी आहे असे कळले. तो बरा होई-पर्यंत रूहुल्लाखानाने काम पहावे अशी आज्ञा झाली.

रामचंद्र (रामचंद्रपंत अमात्य) यांचे वकील रामा पंडित अशी दोन माणसे तोफ-खान्याच्या आवारात कैदेत होती. त्यांची सुटका करण्यात येऊन त्यांना बादशहाजादा कामबक्ष यांच्या वकीलांकडे सोपविण्यात आले.

विजापूरचा कानूनगो (देशपांडे) जद्दूचया (रूद्रा?) याला हुजुरात घेऊन येण्यासाठी मुहंमद इब्राहीम गुर्जबर्दार याला नेमण्यात आले.

मरहूम ईरजखान याचा जावई बख्शीखान याला मुहंमद सईदच्या जागी मोकलबंदा (मंगळवेढा?) ची किल्लेदारी व अमीनी या जागांवर नेमण्यात आले. पाईन विलायत (वाई शिरवळप्रांत) चा ठाणेदार नाहरखान याने पुढीलप्रमाणे अर्ज लिहून पाठविला :— माझा मुलगा जैनुद्दीन याने चंदनवंदनच्या पायथ्याशी सोचरज (?) येथे ठाणे कायम केले आहे. त्याच्यापाशी चांगले पथक आहे. त्याला एक हजार जात व एक हजार स्वार अशी मन्सब मिळावी. यावर त्याने हुजुरात यावे अशी आज्ञा झाली. आता आपले पथक ठाण्यात ठेवून तो सडा हुजुरात आला आहे. विनंती मान्य व्हावी. त्याला सातशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब देण्यात आली.

## सोळा डिसेंबर १७००

आज बादशहा खवासपुराहून निघाले. सव्वादोन कोसाचा प्रवास. तख्ते रवां या वाहनात बसून त्यांनी केला. ते माणनदीवर माहीवाडी (?) या मुक्कामावर आले. रूहुल्लाखान व सादतखान हे मार्गात बादशहांना भेटले. बादशहा म्हणाले, 'आम्ही येथे उद्या मुक्काम करू.' शहाजादा बेदारबख्त याजकडे नासपतीची करंडी पाठविण्यात आली.

बादशहांनी खवासपुराहून निघताना आज्ञा केली की : त्याने पिछाडीवर राहावे. लष्करातील, वंजारी व बाजारातील (गंज) माणसांना ताकीद करून आज हुजुरात पाठबावे आणि स्वात: वंजाऱ्यांना घेऊन उद्या हुजुरात यावे.

## सतरा डिसेंबर १७००

मतलबखान हा टेहेळणीसाठी तळाकडे गेला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

दारूगोळयाचा नायब दारोगा फजले अलीखान याला बादशहांनी आज्ञा केली की : शेतांच्या संरक्षणासाठी पाहारे बसवा.

मरहूम मुहंमद अमीनखान याचा जावई व विजापूरचा फौजदार अश्रफुद्दीनहा मरण पावला. त्याच्या जागी विजापूर सुभ्याचा दिवाण दिवंगत काजी अब्दुल्ला याचा मुलगा अब्दुल्मजीद याची नेमणूक करण्यात आली.

### अठरा डिसेंबर १७००

आज बादशहा माहीवाडी (?)हून निघाले. पावणेतीन कोसाचा प्रवास करून ते अवतार(?) या मुक्कामावर आले.

जीनतुन्निसा बेगम हिने तळावरून(ब्रह्मपुरी) फळे, हलवा, इत्यादी वस्तू पाठविल्या त्या बादशहांनी पाहिल्या.

छावणीतील सराफ याचा चौधरी भगवंतराय याने बादशहांना भेटून नऊ रुपये नजर केले.

बादशहांनी आज्ञा केली की : रूहुल्लाखान हा पुढे रवाना होईपर्यंत छावणीतील लोकांना छावणीच्या बाहेर जाऊ देण्यात येऊ नये.

### एकोणीस डिसेंबर १७००

बादशहाचा मुक्काम मौजे अवतार(?) येथे.

मुहंमद मुराद मिंगबाशी याला औरंगाबादच्या किल्ले अरक(आतील किल्ला)चा किल्लेदार नेमण्यात आले.

बादशहाजादा मुअज्जम(काबुलचा सुभेदार) याने नासपती व खरबूज या फळांच्या करंड्या पाठविल्या.

### वीस डिसेंबर १७००

आज शरफुद्दीनने विचारले, 'पेशखाना(पुढील मुक्कामासाठी पाठवायचे तंबू) पुढे पाठविण्याबद्दल जशी आज्ञा. बादशहा म्हणाले, 'पाठवा.' तसे करण्यात आले. बादशहा रूहुल्लाखानाला म्हणाले, 'तुम्ही पेशखान्याबरोबर जा. मुक्कामावर पेशखाना पोहोचवून संध्याकाळी परत या.'

बादशहांना कळविण्यात आले की : उद्याच्या मुक्कामावर पाणी फार कमी आहे. एक ओढा आहे. तो ही कोरडा पडला आहे. बादशहा म्हणाले, 'खिदमतराय उर्फ हीराचंद याने काही बेलदारांना घेऊन जावे आणि विहिरी खणाव्या.'

### एकवीस डिसेंबर १७००

आज बादशहा निघाले. पावणेचार कोसाचा प्रवास करून ते मौजे सोंधा(सोनंदव) येथे पोहोचले.

वाटेत बादशहांनी करावलखानाला विचारले, 'येथून मुर्तजाबाद(मिरज) किती लांब आहे?' त्याने सांगितले, 'वीस कोस.'

बादशहांनी आज्ञा केली की : सिद्दीयाकूतखान, अब्दुन्रीफ वगैरे हैद्राबादी पथका-

तील माणसांनी दहा हजार अश्रफ्या तरबियतखानाकडे पोहचवाव्या. आपल्याबरोबर त्यांनी नरकवासी रामा(राजाराम) याचा कारभारी रामचंद्र(रामचंद्र पंत अमात्य) याचे गोविंद पंडित आदी चार वकील बरोबर न्यावे.

वरील वकीलांनी विनंती केली की : आम्हाला खर्चाला काही रक्कम द्यावी. त्यांना एक हजार रुपये देण्यात यावे अशी आज्ञा झाली.

बादशहांनी आज्ञा केली की : बुणग्यांच्या माणसांना वेगवेगळे जाऊ देऊ नका. सर्वांना एकत्र करून जाऊ द्या. आघाडीचे, उजव्या व डाव्या फळीचे, टेहेळणीचे सैन्य, साराशं चहुकडून, अत्यंत खबरदारी बाळगण्यात यावी.

संगमनेरचा फौजदार रजातलबखान याने डाळींबाच्या दोन करंड्या पाठविल्या.

### बावीस डिसेंबर १७००

बादशहा आज सोंधा(सोनद) येथून निघाले. सव्वादोन कोस प्रवास करून ते मौजे बारुगढी(बालेकुंडी) येथे मुक्कामाला आले.

खंडोजी हा मरण पावला होता. त्याची मुले शिवनाजी(सोनाजी?) व गोपाळजी(?) ही येऊन बादशहांना भेटली. शिवनाजीने पाच मोहरा व गोपाळजीने चार मोहरा नजर केल्या.

### तेवीस डिसेंबर १७००

आज बादशहा बारुगढी(?)हून निघाले. दोन कोसाचा प्रवास करून ते मुक्कामाला पोहोचले. वाटेत लष्करच्या बायकामाणसांच्या बैलगाड्या अडकून पडल्या होत्या. त्यांनी आपल्यासमोर गाड्या रवाना करविल्या.

डफळापूरचा ठाणेदार अमानुल्ला हा येऊन बादशहांना भेटला.

### चोवीस डिसेंबर १७००

आज बादशहा मौजे यरनाईपूर(प्रतापपूर) येथून निघाले. अडीच कोस प्रवास करून ते तातार(?) येथे पोहोचले.

तळावरून(ब्रम्हपुरी) बातमी आली की : हलकट गनिमांची(मराठ्यांची) पंचवीस हजार फौज तळापासून(ब्रम्हपुरी) चार कोसावर आली आहे.

### पंचवीस डिसेंबर १७००

बादशहा मौजे तातार(?)हून निघाले. अडीच कोस प्रवास करून ते मौजे नौकला (कोकळे, कवठे महाकाळ पासून सहा मैल?) येथे मुक्कामाला आले. वाटेत बादशहांना सांगण्यात आले की, 'उद्याच्या मुक्कामाला पाणी कमी आहे.' बादशहा मतलबखानाला म्हणाले, 'पुढे जा आणि चौकशी करा. जेथे पाणी मुबलक असेल तेथे मुक्कामाची योजना करा.'

बादशहांनी शहाजादा बेदारबख्त(पन्हाळयाच्या वेढ्यात गुंतलेला), याला अननसाची करंडी पाठविली.

बादशहा सादतखानाला म्हणाले, 'विजापुराहून एक हजार मण दारू(बंदुकीची),

पाचशे मण सरब(कृष्ण मृत्तिका) व एक हजार बाण मुद्दाम गुर्जबर्दार पाठवून मागवून घ्या. वाटेतील फौजदारांनी आपापल्या हद्दीपुरते बदर्का(संरक्षक पथक) देऊन वरील माल रवाना करावा असे फौजदारांना लिहा.'

गाजिउद्दीनखान, राजा जयसिंग, नजर अलीखान(अहमदाबाद) व मुहंमद मुरादखान(गोधा) यांना हुजुरात बोलावण्याविषयी आज्ञापत्रे रवाना झाली.

### सव्वीस डिसेंबर १७००

मतलबखानाने विनंती केली की : पुढील मुक्कामाला पाणी नाही. एक ओढा आहे. तोही कोरडा आहे. बादशहा म्हणाले, 'यलबरशखान, खिदमतराय व बेलदार यांनी जाऊन पाण्याचा पाट तयार करावा.'

टेहेळणीसाठी मुहंमद अमीनखान यास पुढे पाठविण्यात आले.

हरकाऱ्यांच्या तोंडून कळले की : हालीहाल (जालीहाळ?) चा देसाई हा तीर्थयात्रेसाठी (बुतपस्ती) हैद्राबाद कर्नाटककडे रवाना झाला आहे. आज्ञा झाली की : त्या प्रांतातील फौजदारांना लिहिण्यात यावे की :– तो(देसाई) जेथे सापडेल तेथे त्याला कैद करावा.

गदगचा फौजदार शेरखानहमीद याने विनंती लिहून पाठविली की : मला जल्फिकारखानबहादुर याच्या फौजेत तैनात करण्यात आले आहे. यासाठी गुर्जबर्दार येथे पाठविण्यात आला आहे. मी आजारी आहे. पालखीतूनही प्रवास करणे होत नाही. गुर्जबर्दाराला परत बोलावून घ्यावे. अज्ञा झाली की : गुर्जबर्दार काही दिवस तेथेच राहील. तुम्हाला बरे वाटल्यांवर तो तुम्हाला नुस्रतजंगाच्या(जुल्फिकारखानाच्या) फौजेत पोहोचवील.

### सत्तावीस डिसेंबर १७००

शुक्रवार. कचेऱ्यांचे काम बंद होते.

### अठ्ठावीस डिसेंबर १७००

आज बादशहा मौजे कोकला येथून निघाले. पाच कोसाचा प्रवास करून ते मौजे खिळणा (?) येथे पोहोचले बादशहा रूहूल्लाखानाला म्हणाले, 'मुर्तजाबाद(मिरज) पासुन तळापर्यंत (ब्रह्मपुरी) बंदोबस्त करून कळवा हरकाऱ्यांच्या तोंडून पुढील हकीकत कळली :–

धनाजी जाधव व कृष्णाजी मल्हार यांचे ब्रह्मपुरीच्या तळापासून पाच सहा कोसावर, राणोजी(घोरपडे) व बहिर्जी(घोरपडे) यांच्याशी युद्ध झाले. त्यात उभयपक्षातील लोक नरकाला गेले. राणोजी व बहिर्जी यांचा पराजय झाला व ते अहीरवाडीकडे गेले. धनाजी जाधव त्यांचा पाठलाग करीत आहे. बादशहा म्हणाले, 'तिघेही नरकात जातील (मरतील).'

बादशहांना कळविण्यात आले की : राणोजी व बहिर्जी हे दोघे यात्रेसाठी म्हणून बीदर(प्रांताकडे)कडे गेले. त्यांनी तो प्रदेश लुटला. तेथील फौजदार इल्तिफातखान हा त्यांचे पारिपत्य करू शकला नाही. त्याला आठशे जात व बाराशे स्वार अशी मन्सब होती. ती अडीचशे स्वारांनी कमी करण्यात आली.

### एकोणतीस डिसेंबर १७००

आज बादशहा मौजे खिळणा(?) येथून निघाले. तीन कोसाचा प्रवास करून ते मौजे मकसूळी(?) येथे पोहोचले.

बादशहांनी मुल्तफतखानाबरोबर मुखलिसखानाकडे निरोप पाठविला की : तुमचा आजार बळावला असल्यास आम्ही येथे मुक्काम करू. मुखलिसखानाने अर्ज केला की, 'आपल्या चौकशीमुळे आराम वाटत आहे. कूच करावे.'

दंडराजपुरीचा किल्लेदार व फौजदार सिद्दी याकूतखान याने पुढीलप्रमाणे विनंती लिहून पाठविली :–

(१) अंजनवेलचा किल्ला जिंकून घेतला आहे. त्यावर सिद्दी सर्फराज याची नेमणूक करण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली. सर्फराजला चारशे जात व दोनशे स्वार अशी मन्सब देण्यात आली.

(२) शुर्फुद्दीन बक्षी व जहाजांचा वाकनीस याची मन्सब वाढविण्यात यावी. विनंती मान्य करण्यात आली.

### तीस डिसेंबर १७००

आज बादशहा पावणेचार कोसाचा प्रवास करून मौजे खानगांव(मालगाव?) येथे पोहोचले.

सकाळी बादशहांना कळविण्यात आले की : चोरांनी (मराठ्यांनी) वाटेत काही उंट व बैल लुटून नेले. मुहंमद अमीनखानबहादुर आपली पथके घेऊन निघाला. लष्करापासून दोन कोसावर तो गनिमांवर चालून गेला. चकमकीत त्याने एका माणसाचे डोके कापून आणले. नऊ घोडे पकडले आणि उंट व बैल सोडविले. ते त्याने बादशहांना त्याचा प्रवास चालू असताना दाखविले. बादशहा म्हणाले, 'खूप त्वरा केली. बैल व उंट त्यांच्या मालकांना द्यावे आज्ञा झाली.'

शर्फुद्दीनने विचारले, 'पेशखाना रवाना करण्यासंबंधी जशी आज्ञा.' बादशहा म्हणाले, 'रवाना करा. कृष्णेच्या काठावर तंबू उभे करा.'

### एकतीस डिसेंबर १७००

मुक्काम खानगाव. मुर्तजाबाद मिरजेचा किल्लेदार व फौजदार मुफ्तखरखान हा आपला मुलगा जहीरुल्ला व नातू इमामुल्ला यांना आपल्याबरोबर घेऊन आला होता. तो येऊन बादशहांना भेटला.

बादशहांनी मुहंमद अमीन सदर याला पुढील मुक्कामावर जाण्यासाठी निरोप दिला. पेशखान्याबद्दल अत्यंत सावधगिरी बाळगा असे बादशहा म्हणाले.

यलबारशखान याने तोफा आणण्यासाठी आज्जमतारागड (सातारा) येथे जावे अशी आज्ञा झाली. त्याच्या बरोबर दोन हजार स्वार देण्यात यावे असा बादशहांनी हुकुम दिला.

सोंध्याचा जमीनदार सदाशिव याला सावनूरच्या जमीनदाराच्या पारिपात्यासाठी रवाना करावे. त्यासाठी सदाशिवकडे अमंलबजावणी करणारे अधिकारी पाठवावे अशी आज्ञा झाली.

* * *

# काही बाबीसंबंधी खुलासा

अनुवाद करताना नावे व स्थळे यांचे निर्देश अखबारात मध्ये येतात ते व्यवस्थित नसल्यामुळे वाचनात गोंधळ उडतो. मोगल सरदारांच्या नावांसंबंधी हा घोटाळा जाणवतोच.

कारण की नावांचे उच्चार एक व मराठी माणसांच्या तोंडी बसलेले उच्चार दुसरे असा प्रकार असल्यामुळे एकीकडे शुद्ध उच्चार द्यावे व दुसरीकडे मराठी वाचकांना दुर्बोध होईल असे नावांचे व स्थळांचे स्वरूप दाखवू नये या दोन्ही अडचणीतून मार्ग काढावा लागला.

नावांची काही उदाहरणे पहा : शुद्ध उच्चार आजम, जअफर, गाजीउद्दीन, फतहुल्ला, चीनकुलीजखान, रूहुल्लाखान, खानाजादखान, मोतबरखान, बख्शी, मुहमद असे आहेत. मराठी माणसांच्या तोंडी जे उच्चार बसले आहेत ते म्हणजे आज्जम, जाफर, गाजिउद्दीन, फतेउल्ला, चिनकिलीचखान, रोहिलाखान, खानजादखान, मातबरखान, बक्षी, महंमद, असे होत. बऱ्याच ठिकाणी अनुवादात सोयीसाठी म्हणून तसेच उच्चार ठेवले आहेत. पण जमेल तेथे व दुर्बोध होणार नाहीत अशा बेताने नीट उच्चार देण्याकडे लक्ष दिले आहे. अशा प्रकारची सुधारणा हळूहळू होत जाणार हे उघड आहे. अद्यापही झकीर हुसेन(जाकिर हुसेन), झकरिया(जकरया), जेहरा(जुहरा), असे उच्चार कसे रूढ आहेत हे मराठी वाचकास सांगण्याची आवश्यकता नाही.

मराठे व क्वचित रजपूत सरदारांची नावे देताना अखबारामध्ये नावे स्पष्टपणे देण्याकडे लक्ष देण्यात आले नाही. त्यामुळे त्या नावांचे वाचन करताना अभ्यासकाची तारांबळ उडते. कानामात्रा, अनुस्वार इत्यादी कसोशीने देण्यात येत नाहीत. त्यामुळे नावे देताना आपण चुकत तर नाही ना?' असा भास अभ्यासकाला सतत होत असतो. अशा प्रकारच्या उल्लेखामुळे एलोजी, एकोजी, रघोजी, असे एकाच नावाचे तीन तऱ्हेने वाचन होऊ शकते. रामचंद्र खटावकर याचा भाऊ मंबाजी हा मसूरला ठाणेदार होता. त्याचे नाव मयाजी, सयाजी, महाजी असेही वाचले जाऊ शकते. वणगोजी व फिरंगोजी या नावाचा असाच घोटाळा होतो. पिराजी व हिराजी हे याच प्रकारातील. रूद्राजी व चिमणाजी या नावाचे वाचन हास्यास्पद होऊ लागले. पृथ्वीसिंग की हतीसिंग, खानचंद की जानचंद, खुमानसिंग की गुमानसिंग, केसरसिंग की किशोरसिंग असा पेच अनेकदा पडतो.

मराठे सरदारांची आडनावे क्वचितच आढळतात. हणमंतराव(निंबाळकर का घोरपडे?), जानोजी(पालकर का निंबाळकर?), एकोजी(घोरपडे?), असे अनेक प्रकार आढळतात. जेथे आडनावे देतात त्यांचे वाचन चुकीचे होऊ शकते. जाधव(जादून), माने (मानिया), घोरपडे(खोडपडे), निंबाळकर(बालकर, पालकर), ही काही उदाहरणे झाली.

मराठ्यांची नावे देताना नावाबरोबर आदरार्थी 'जी' जोडण्याची पद्धत त्या काळात नसावी. शिवा, संभा, संता, धना, राणू, नेमा, असे उल्लेख आढळतात. राजा-

रामाचा उल्लेख रामा असा आढळतो. राजाराम म्हटल्याने त्याला राजा म्हणून मान्यता दिल्यासारखे होईल अशी मोगलांना काळजी वाटत असावी. शिवाजी, संभाजी, संताजी, राजाराम इत्यादी दिवंगत व्यक्तींचा उल्लेख करताना त्यांना जहन्नमी म्हणजे नरकवासी म्हटल्याशिवाय अखबारलेखक पुढे सरकत नाहीत.

सुदैवाने निदान काही नावांसंबंधाने निर्णय घेताना राजवाडे यांच्या खंडात व निरनिराळ्या बखरीत मोगलांच्या काही मराठे मन्सबदारांची नावे आढळली त्यांचा उपयोग झाला. अर्थात सर्वच नावांचा पत्ता लागला असे नाही. अभ्यासाचा तो एक स्वतंत्र विषय होऊ शकेल. जाधवराव, घोरपडे, निंबाळकर, घाटगे, जव्हारकर, वाडीकर, सावंत, उदाराम, इत्यादींच्या वंशांची प्रकाशित व अप्रकाशित माहिती उपयुक्त ठरावी.

## स्थळांचे उल्लेख

अखबारात मध्ये आलेल्या अनेक स्थळांच्या नावाचे वाचन हेही काही कमी कट-कटीचे नाही. त्या काळातील शासकीय विभागांचे उल्लेख व आजची परिस्थिती यात बरेच अंतर पडले आहे.

आजचा कर्नाटक म्हणजे कन्नड भाषिक राज्य. मोगल काळात सर्व दक्षिण भारताला कर्नाटक म्हणत. मोगलांनी त्याचे दोन शासकीय विभाग पाडले होते. एक हैद्राबाद कर्नाटक, मुख्य ठिकाण प्रथम कांची, नंतर अर्काट; दुसरे विजापूर कर्नाटक, मुख्य ठिकाण प्रथम अधोनी, नंतर बेंगळूरजवळील सिरा.

वाई ते शिरवळ या प्रांताला पायीने विलायत म्हणजे देशाच्या पायथ्याचा भाग म्हणत. कल्याण–भिवंडी, कुलाबा, रायगड, पुणे या भागाला तळकोकण व क्वचित् निजा-मुल्मुल्की (म्हणजे जुनी निजामशाही) तळकोकण म्हणत. आजच्या रत्नागिरी जिल्ह्याचा उल्लेख आदिलखानी तळकोकण म्हणून होई. मोगल काळात बागलाण व गाळणा हे जिल्हे खानदेशात होते. आज ते डांग व नाशिक जिल्ह्यात आहेत. परभणी (पालिम व गंगाखेड सोडून) जिल्हा, नांदेड जिल्ह्याचे हदगाव किनवट हे तालुके त्या काळात वऱ्हाडात मोडत. त्या काळच्या हालचालीची माहिती होण्यासाठी त्या काळचा भूगोल सतत नजरेसमोर राहणे आवश्यक आहे.

सारांश, स्थळे व व्यक्ती यांचे उल्लेख बरोबर आहेत की नाहीत हे पाहण्यासाठी सावधगिरी बाळगणे आवश्यक आहे.

या खंडांतील काळ हा १६८५ ते १७०० अखेर असा आहे. १६८५–१६९२ पर्यंतचे उल्लेख त्रोटक आहेत. त्यानंतर १६९३–९४चे उल्लेख बरेच आहेत. १६९५ मधील संताजी हिंमतखान संघर्षाचे काही महत्त्वाचे उल्लेख मिळतात. १६९७ व १६९८ मधील नोंदी नाहीत. संभाजीराजांच्या हौतात्म्यासंबंधीचा कागद नेमका नष्ट झाला आहे. पण त्याला इलाज नाही. वाळवीसमोर कागद किती टिकणार? जे टिकले तेही काही कमी महत्वाचे नाहीत. त्यामुळे मोगल–मराठा संघर्षाचे अनेक अज्ञात तपशील हाती लागतात, ते केवळ अमोल आहेत.

* * *

# सूची

## भाग १

(मोगल दरबारची बातमीपत्रे खंड १ या ग्रंथाची सूची दर्शनिका विभागातील संशोधन अधिकारी श्री. श्याम कृष्णाजी खिलादे यांनी तयार केली.)

* * *

# सूची

## भाग २

* * *